अर्पणपत्रिका

हें पुस्तक

महाराष्ट्रांतील कर्त्या सुधारकांचे अग्रणी

**कै. रा. रा. राजाराम रामकृष्ण भागवत,**

यांस

त्यांनीं या पुस्तकास दिलेल्या प्रोत्साहनाबद्दल

कृतज्ञ होऊन नम्र भावानें

अर्पण केलें आहे

**कर्ता**

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना

रा श्रीपाद कृष्ण कोल्हटकर याचे 'सुदाम्याचे पोहे' गेलीं सात आठ वर्षे खंडशः लोकाच्या हातांत पडत होते. हे विनोदात्मक लेख एकत्र करून पुस्तकरूपानें पुन्हा छापण्याचा सुप्रसंग हल्लीं रा. काशिनाथ रघुनाथ मित्र—मासिक मनोरजनाचे संपादक—यानीं आणिला, ही फार चागली गोष्ट झाली 'सदर्हू पुस्तकास तुम्ही प्रस्तावना लिहा,' अशी रा. कोल्हटकर यानी मला काही दिवसापूर्वी स्नेहभावपूर्वक आज्ञा केली, परंतु ती बऱ्याच विचाराशिवाय मला मान्य करता आली नाहीं. कारण, ज्या घाटाची मूर्ती त्याच घाटाची तिला बैठक—किंवा ज्या घाटाची तरवार त्याच घाटाची तिला मूठ—शोभेल, इतर शोभणार नाही, असें तेव्हा माझें मत होतें, व तें अद्यापि कायम आहे, परंतु अखेर मीं मनाशीं असा विचार केला कीं, विषम वस्तूंच्या सयोगानेंही कित्येक वेळां जगांत कार्य साधण्यासारखें असतें. धनुष्यावरून सोडल्या जाणाऱ्या तीराचें तोंड म्हणजे लोखडी फळ किती जड असतें, तथापि त्याचें पुच्छ म्हणजे पीस किती हलकें असतें ! उलट पक्षीं, चवरीचा दाडा जड असतो पण तिचें कार्यकारी मुख केशमय अर्थात् हलकें असतें. माझ्या प्रस्तावनेनें रा. कोल्हटकरांच्या पुस्तकाचें इतर कोणतेंहि कार्य न साधलें तरी एक हटकून साधण्यासारखें आहे; म्हणजे प्रस्तावनेची जड व रुक्ष भाषा आणि खुद्द पुस्तकाची चुरचुरीत व हलकी—म्हणजे अल्पभार आणि हंसविणारी—भाषा या एकमेकींशेजारीं ठेविल्या गेल्यानें रा. कोल्हटकरांच्या भाषेची खरी मौज वाचकास अधिक खुलून दिसेल; व रा. कोल्हटकराच्या विनोदात्मक लेखांचें गुणग्रहण वाचकांकडून होण्यास केवळ या विरोधामुळें तरी माझी स्वतंत्र रीतीनें थोडीबहुत मदत होईल अशी मला खात्री वाटली, व म्हणूनच ही प्रस्तावना लिहिण्यास मी उद्युक्त झालों.

प्रस्तावना ही कांहीं टीका नव्हे; यास्तव सदर पुस्तकांतील लेखांचें परीक्षण करून त्यांतील गुण अगर दोष समर्पक रीतीनें दाखविणें हा प्रस्तुत माझा हेतु नाहीं. रा. कोल्हटकरांच्या विनोदात्मक लेखांच्या योगानें मराठींत एक नवीन व इष्ट अशी लेखनपद्धति सुरू झाली, व केवळ या

दृष्टीनें प्रस्तुत लेखाचे महत्त्व मी मानतों. या लेखातील कोणताहि विषय, किंबहुना कोणताहि विचार नवीन नसेल, परंतु कदाचित् जुनेच विचार काहीं एका नव्या लेखनसरणीनें-नव्या पद्धतीनें मांडलेले आहेत हीच मुख्य गोष्ट होय. या पद्धतीस विनोदी पद्धति हें नाव देता येईल तिजमध्यें व्यंगोक्ति, वक्रोक्ति, अतिशयोक्ति वगैरे मुख्य घटक असून प्रायः हास्योत्पादन आणि तद्द्वारा करमणूक व बोध हे तिचे परिणाम होत इंग्रजींत या पद्धतीस Humorous व Epigrammatic असें म्हणतात. मार्क ट्वेन, मॅक्स ओरेल, चेस्टर्टन वगैरे ग्रंथकर्ते याच पद्धतीचे पुरस्कर्ते होत इंग्रजी भाषेमध्यें पूर्वीं ऑलिव्हर, गोल्डस्मिथ, ॲडिसन वगैरे लेखकाच्या लेखात विनोद असे, नाहीं असें नाहीं; परतु तो थोडा व मधून मधून सहज न कळत ओघाने येत असे. मार्कट्वेन वगैरे लेखकाच्या लेखात तो पुष्कळसा व मुद्दाम जाणूनबुजून आणलेला असतो. या दृष्टीनें पाहता हा विनोद कृत्रिम वाटेल, पण त्याची कृत्रिमता असली तरी ती फक्त हेतूत आहे, खुद्द विनोदाच्या स्वरूपात नाही. शिवाय एखाद्या लेखकास विनोदी लिहिणें साधू लागलें म्हणजे संवयीनें ते त्याच्या इतकें अगवळणीं पडतें कीं, विनोदाची छटा उमटल्याशिवाय त्याला प्रायः काहीं लिहिता येईनासेंच होते. पण अशा रीतीनें एखाद्या गुणाचा क्वचित् अतिरेक होण्याचा संभव असला तरी तो गुणच नव्हे, असें केव्हाहि म्हणतां येणार नाहीं. ज्याप्रमाणें काव्य करण्यास त्याचप्रमाणें विनोदी लेख लिहिण्यास उज्ज्वल प्रतिभा लागते कवि व विनोदी लेखक या दोघांसहि वस्तुजाता-तील चित्ताकर्षक असे काहीं विशिष्ट सबध इष्ट असतात व सुचावे लागतात. पैकीं कवि हा संवादित्व हुडकून काढतो, त्याचें लक्ष सौंदर्यावर असतें, उलट, विनोदी लेखक हा विसंवादित्व हुडकून काढीत असतो, त्याचें लक्ष विकृत व हास्योत्पादक गोष्टीवर असतें, परंतु दोघांचेंहि कार्य एकच-म्हणजे विषय मनावर बिंबविणें हें-असतें व तें घडून येतेंहि कारण जसे लेखक तसेच वाचकहि निरनिराळ्या मनोरचनेचे असतात, जो तो लेखक मुख्यतः आपल्याशीं समानधर्म अशा वाचकासाठीं लिहितो; व जो तो वाचकहि आपापल्या मनोधर्माप्रमाणेंच वाचण्यास लेख पसंत करितो.

सरस कवितेप्रमाणें विनोदी लेख लिहितां येणें ही एक ईश्वरी देणगी आहे. ती गुण अंगीं असणारे दुर्मिळ, पण तो गुण अंगीं असतां त्याचा उपयोग न

करणारे तर त्याहूनहि दुर्मिळ. विनोदी लेखनपद्धति साधून तिचा अंगिकार केला असता लेखकास विषयप्रतिपादनाला मदत कशी होते हें रा. कोल्हटकर याचें प्रस्तुत पुस्तक निर्विकार मनानें वाचणारास सहज कळून येईल. प्रस्तुत निबधविषयापैकी बहुतेक अगदीं नेहमींच्या व्यवहारांतले आहेत. तथापि, प्रत्येकामध्ये विषयप्रतिपादनाची हातोटी नेहमींच्या प्रतिपादकास न सुचणारी अशी व हास्योत्पादक आहे. 'साक्षीदारा'चे स्वभावदुर्गुण, 'कुलुपा'वरचे रूपक, 'शिमग्या'तील घाणेरड्या चालीरीतींवरील चुरचुरीत व्याजस्तुतिपूर्ण टीका, देवाच्या विकृत मूर्तींच्या दर्शनापासून थट्टेखोर मनुष्यास सुचणाऱ्या कल्पना, 'गवई' लोकाच्या स्वभावाचा तऱ्हेवाईकपणा आणि गायनातील चमत्कारिक प्रकार व खोडी, 'हजामती'वरील निबंधातील केशवपनविधीसंबंधानें केलेलें मौजेचें वर्णन, 'भविष्यें' नेहमीं खोटीं कशी ठरतात, परतु तीं खोटीं ठरलीं असें म्हणता येऊं नये याकरिता तीं पैशापायली विकणारे भविष्यवेत्ते काय काय युक्त्या योजतात याचें मार्मिक विवेचन, एकामागून एक अशीं अनेक लग्नें करण्याचा जणुं काय हट्ट घेतलेल्या बेमुरवती नवरदेवावरील विनोदी टीका, जनसमाज आजवर पूर्ण भाविकपणें करीत आलेले धर्मविधी व समारभ म्हणजे उदाहरणार्थ लग्न, श्रावणी वगैरे—याचा मूळ हेतु व हल्लीं रूढ असलेली त्यांची आचारक्रिया याजमधील विसवादित्वामुळें सूक्ष्म नजरेनें पाहणाऱ्या विचारी मनुष्याच्या मनास सुचणारे विचार, 'वर्तमानपत्र' या नावाखालीं लेख व जाहिराती याच्या बाबतींत भोळे, अज्ञानी अगर आपमतलबी अशा लोकांनीं घातलेला धुडगुस, 'मुंबईचें प्रदर्शन' व 'दीपोत्सव' या लेखात केलेले मनुष्यस्वभाववर्णन, अलीकडे जिकडेतिकडे भरणाऱ्या संमेलनांतील रूढ, 'कायम ठशानीं छापलेल्या' औपचारिक प्रकाराची थट्टा करण्याकरितां 'चोराच्या समेलना'चें रूपक घेऊन केलेलें वर्णन, आज निरनिराळ्या हजारों रूपानी भिक्षेचा 'धंदा' करणाऱ्या लोकासंबंधानें त्रस्त झालेल्या यजमानास प्रत्यहीं येणाऱ्या प्रसंगाचे वर्णन, स्वभावतःच विनोदविषय होऊन बसणारें—दुसरें बालपणच—असें जें 'म्हातारपण' त्याला अंगभूत असणाऱ्या सर्वतोपरी वैगुण्याचे थट्टेखोरपणाचें वर्णन; आणि 'चित्रगुप्ताचा जमाखर्च' या निबंधांतील पापपुण्याच्या हास्यास्पद कल्पनांचें हास्योत्पादक रीतीनें केलेलें विवेचन;—हीं वाचणारास निबंधकाराच्या अंगीं

असलेली वस्तुनिरीक्षणाची दृष्टि, मार्मिकपणा, गहनविचारशक्ति, उदाहरणें देण्याची हातोटी व सर्वांत मुख्य म्हटलें, म्हणजे कोणतीहि गोष्ट हंसू येईल व मौज वाटेल अशा रीतीनें सागण्याची कला—या सर्वांबद्दल त्याचे अभिनंदन करावें असेंच वाटेल

सदर निबधातून कित्येक दोषस्थळेंहि आढळतात उदाहरणार्थ, निबध-कारास शाब्दिक कोट्याची वाजवीहून अधिक हौस असल्यामुळे क्वचित् दूरान्वय व कृत्रिमपणा दिसून येतो, कल्पनाची थोडी ओढाताण व वेळीं अतिशयोक्तीचीहि अतिशयोक्ति होते. तसेंच भाविक समाजाच्या दृष्टीनें पाहता या निबधातून काहीं काहीं भाग वगळले असते तर अधिक बरें झालें असतें. रा. कोल्हटकरानी या निबंधात केलेली टीका जरी सर्वस्वी अयुक्त म्हणता आली नाहीं, तरी जें बोलणे व्यक्तीला राग येण्यास कारणीभूत होतें तें समाजालाहि होईल हे लक्ष्यात ठेवूनच समाजावर टीका करणें योग्य आहे निर्दयपणाची टीका ही वैद्यकातील सजीवछेदनशास्त्रा-(Vivi-section) प्रमाणें आहे. ती एकंदर समाजाला शास्त्रीय दृष्ट्या अखेर उपयोगी असली, तरी ती जशी आपण आपल्या स्वतःच्या तरुण मुलाबाळावर, एवढेंच काय, पण वृद्ध व मरणोन्मुख झालेल्याहि मातापितरा-वर करणार नाहीं, त्याचप्रमाणें शाब्दिक टीकेचीहि गोष्ट मानिली पाहिजे.

रा. कोल्हटकराच्या या लेखावरून त्याजवर इतरहि कित्येक आरोप लादण्यात येत असतात लेखात अश्लीलता आहे या आरोपास स्वतः कोल्हटकरानींच सदर्हू पुस्तकातील एका लेखात उत्तर दिलें असून, खुद्द टीकाकाराच्याच लेखातील उतारे त्यानीं दिल्यामुळें तें समर्पक झालें आहे. रा. कोल्हटकरास विनोदाशिवाय काहींच लिहिता येत नाहीं, असाहि त्यांजवर एक आक्षेप असतो, परंतु 'विविधज्ञानविस्तारा'तील त्यांचे ग्रंथपरीक्षणात्मक लेख, विशेषत. बडोद्यास भरलेल्या ग्रंथकाराच्या गेल्या संमेलनाकरिता त्यांनीं लिहिलेला 'मराठी भाषे'वरील निबध जो कोणी वाचील त्याला हा आक्षेप निर्मूल आहे हें तेव्हांच कळून येईल. त्याच्या लेखांत ज्याची त्याची कुचेष्टाच आढळावयाची, असा आक्षेप घेणारानीं लक्षांत ठेवण्यासारखी एक गोष्ट आहे, ती अशी कीं, सुदाम्याच्या पोह्यात अगर इतरत्रहि, साधुपुरुष व सन्मान्य व्यक्ति—ज्यांच्या महानुभावित्वा-विषयीं कोणाचा मतभेद नाहीं—अशांची थट्टा बाष्कळपणानें त्यांनीं केली,

अगर केवळ व्यक्तिनिंदा आरंभिली, असें बहुधा कोठेहि आढळणार नाहीं. रा कोल्हटकराच्या विनोदाचें हत्यार कल्पनेवर पडतें, व्यक्तीवर तें उचललेंहि जात नाही विधिसमारंभ वगैरेंची चेष्टा करणें व नास्तिकपणा ह्या गोष्टी समानार्थक आहेत, हें मुळींच खरें नाहीं. असें असता नास्तिकपणाचाहि आक्षेप या लेखावर कोणी कोणी आणतात तथापि कोल्हटकराच्या नाटकातून व इतर लेखातून ईश्वरविषयक अत्यत उदात्त विचाराचीं पदे व वाक्ये नीट पाहणारास हवीं तितकी आढळतील. असो, तथापि हे सर्व शाबीद मानून जमेस धरिलें असताहि सदहु निबध आदरणीय आहेत, यात शका नाहीं. कारण, या दोषासंबंधानेंहि पाहता असें म्हणतां येईल कीं, समाजामध्यें मतातर होत असता अशी टीका होणें हें अपरिहार्य आहे. यूरोपांत कॅथोलिक पंथाची सुधारणा होऊन प्रॉटेस्टंट पथ स्थापन होण्याच्या सुमारास लेखक, व्यक्ति किंवा लोकनिंदेची भीति न बाळगतां अशाच टीका करीत असत जर्मनीमध्यें सोळाव्या शतकात इरॅसमस व अठराव्या शतकात फ्रान्समध्ये व्हॉल्टेअर या विनोदी लेखकानी समाजासंबंधानें जें लिहिलें, त्या मानानें रा कोल्हटकर याचें लिहिणें काहीच नाहीं असें म्हणावें लागतें. आज कालातरानें व्हॉल्टेअर व इरॅसमस यानी केलेले आघातरूपी दोष विसरले जाऊन त्याचे ग्रथ जसे वाङ्मयाच्या दृष्टीनें वाचनीय म्हणून मानले जातात, तशीच गोष्ट काहीं अशी रा कोल्हटकर याच्या लेखासंबंधानें कालातरानें इकडेहि घडून येईल, -यात मला बिलकूल शका वाटत नाही.

रा. कोल्हटकर यांनी आपले 'पोहे' हल्लीं होतील तितके काळजीपूर्वक पाखडूनच वाचकास दिले आहेत, असें असूनहि कित्येक वाचकास त्यांचीं टोकें अद्यापीहि दुःसह वाटतील व कित्येकास तर ते मुळींच पचणार नाहींत! तथापि, श्रीसरस्वतीच्या पाकशाळेंत तयार झालेला चुरचुरीत फोडणीचा हा मेवा 'इच्छा असेल त्याला' हवा तितका मिळण्यासारखी सोय करून 'मनोरंजनकारां'नीं रा. कोल्हटकराप्रमाणेंच मराठी वाचकवर्गाचेंहि मित्रकार्य संपादिलें, याबद्दल त्यांचें अभिनंदन करून ही प्रस्तावना पुरी करितों.

पुणें, ता. १० माहे जुलै, १९१० } न. चिं. केळकर

# तिसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना

या पुस्तकाची दुसरी आवृत्ति सन १९०९ सालीं प्रसिद्ध झाली तिच्यात सन १९०२ पासून सन १९०९ पर्यंतच्या आठ वर्षांत 'विविधज्ञान-विस्तार', 'सुधारक', 'करमणूक' व 'मनोरजन' या नियतकालिकात प्रसिद्ध झालेले या लेखमालेचे अठरा लेख सकलित केले असून तिला 'अठरा धान्याचें कडबोळें' हें वैकल्पिक नाव दिलें होतें सन १९०९ सालापासून आजपर्यंतच्या तेरा वर्षात 'मनोरंजन', 'उद्यान', 'चित्रमय जगत्', 'नवयुग' व 'अरविंद' या मासिकात या मालेचे एकदर चवदा लेख प्रसिद्ध झाले. त्याची दुसऱ्या आवृत्तींतील लेखात भर घालून ही बत्तीस लेखाची तिसरी आवृत्ति 'साहित्यबत्तिशी' या वैकल्पिक नावानें काढण्यांत येत आहे. दुसऱ्या आवृत्तीस माझे विद्वान् व रसिक स्नेही रा. रा. नरसिंह चिंतामण केळकर यानी माझ्या विनंतीवरून प्रस्तावना लिहिली. मालेच्या उद्देशासबधानें मला जें निवेदन करावयाचें होतें तें तिच्यातील 'माझे टीकाकार' या लेखात आलें आहे. तेंच निराळ्या स्वरूपानें व विस्तारपूर्वक तिसऱ्या आवृत्तीच्या या प्रस्तावनेंत वाचकापुढें माडावयाचा विचार आहे

मनुष्यमात्राचा कल नेहमीं सुखाकडे असतो, मग तें सुख स्वतःचे असो, अगर इतराचें असो, ऐहिक असो अगर पारलौकिक असो. स्वार्थी मनुष्यापैकीं जे अदूरदर्शी किंवा उतावळ्या स्वभावाचे असतात ते स्वतःच्या क्षणभगुर सुखाकरिता इतराच्या सुखावर किंवा स्वतःच्या शाश्वत सुखावरहि पाणी सोडण्यास तयार असतात. त्याचें अदूरदर्शित्व व काहीं अंशीं उतावळा स्वभावहि भावी परिणामाच्या जाणिवेनें नष्ट होऊ शकतो त्याच्या उतावळ्या स्वभावास पूर्णपणें आळा बसण्यास त्याच्या अगी आत्मसंयमनाचा गुण बाणावा लागतो. तो बाणण्यास व्यावहारिक किंवा धार्मिक शिस्तीनें त्याची संवय उत्पन्न करावी लागते. दूरदर्शी व आत्मसंयमी माणसें स्वतःचें कल्याण उत्तम रीतीनें साधू शकतात. पण त्यांच्या कल्याणाचा पुष्कळदा समाजहिताशीं विरोध येतो. त्याजकडून समाजास

अपकार होऊ नये म्हणून त्याचें लक्ष समाजविरोधी उद्योगाहून निराळ्या कार्यांत गुंतवून ठेवावे लागतें, व त्याजकडून समाजहित घडवावयाचें असल्यास त्याच्या सकुचित दृष्टीचा विकास करून तिला स्वहिताची व परहिताची व्याप्ति एकच वाटावयास लावणें भाग पडतें. उत्तरोक्त कार्य त्या माणसाच्या आनुवाशिक गुणधर्माप्रमाणे किंवा पूर्व संस्काराप्रमाणें कमीअधिक सुलभ जातें. पण तें सुलभ जाण्यास ज्ञानाचेंहि साहाय्य होतें हें ज्ञान, समाजाच्या सर्व घटकावयवाचे धार्मिक, राजकीय, सामाजिक वगैरे हितसबंध एकच आहेत अशा व्यावहारिक स्वरूपाचें किंवा समाजातील, किंबहुना जगातील, साऱ्या व्यक्ति एकाच परमात्म्याचीं भिन्न स्वरूपें होत अशा आध्यात्मिक स्वरूपाचें असते हें ज्ञान फलद्रूप व्हावयास त्या माणसांची आत्मसयमनपूर्वक स्वार्थत्याग करण्याची तयारी असावी लागते.

याप्रमाणें मनुष्यमात्राच्या सुख प्राप्तिरूप अतिम ध्येयाच्या स्वरूपनिश्चयाशीं ज्ञानाचा व कर्माचा निकट सबघ असतो. त्या ध्येयाच्या साधनाशींही त्याचा तितकाच निकट संबंध असलेला दिसून येईल सुखाचे उगम बेंथॅम या इंग्रज ग्रथकाराच्या मते विषयोपभोग, आरोग्य, सपत्ति, कर्मकौशल्य, मैत्री, कीर्ति, सत्ता, धर्मनिष्ठा, सदिच्छापूर्ति, अपकारेच्छापूर्ति, ज्ञान, स्मृति, कल्पना ( इन्यात सौदर्यबुद्धीचाही समावेश होतो ), आशा, विचारसगति, दुःखमुक्तता, असे अनेक आहेत. त्यापैकीं काहीं बव्हंशीं शारीरिक श्रमाने व इतर प्रमुखत्वेंकरून मानसिक श्रमानें साध्य होण्यासारखे असतात. उदाहरणार्थ, विषयोपभोगाची साधनें, सत्ता, कर्मकौशल्य हीं प्राप्त करून घेण्याकरिता जसें मुख्यत्वेंकरून शरीर झिजवावें लागतें तसा ज्ञान प्राप्त करून घेण्याकरिता बुद्धीस, व मना समोर कल्पनाचित्रें उभीं करण्याकरिता कल्पनेस शीण द्यावा लागतो. शारीरिक किंवा मानसिक व्यवसाय उत्तम रीतीनें होण्याकरिता त्या व्यवसायास लागणाऱ्या साधनांचें पूर्ण ज्ञान व त्यावर पूर्ण विश्वास असावा लागतो शिवाय उद्दिष्टप्राप्तिबद्दल तीव्र आतुरता व एकाग्रता हीं व्यवसायाचीं इतर अंगेंहीं असावीं लागतात. पूर्वोक्त आतुरता फलद्रुप होण्याकरिता तिला प्रेम, द्वेष, राग, कुतूहल, भय यासारख्या एकाद्या भावनेचें पाठबळ असावे लागतें. उत्तरोक्त एकाग्रता उत्पन्न होण्याकरिता इतर क्षोभजनक विषयाचा अभाव व एकाग्रतेस

सशवलेलें मन ही सामुग्री आवश्यक असते. मनाचे ठायीं एकाग्रतेची शक्ति अभ्यासानेंच आणावी लागते. याप्रमाणें सुखाच्या साधनाशीही ज्ञान व कर्म यांचा जिव्हाळ्याचा संबध असतो. ज्ञानात सत्य व कर्मांत कर्तव्य जसें श्रेष्ठ तसें सुखाच्या उगमात सौंदर्य श्रेष्ठ असतें. प्रसिद्ध जर्मन कवि गेटी याचें ब्रीदवाक्य 'सत्य, कर्तव्य व सौंदर्य' हें असून त्यात मनुष्याच्या बौद्धिक, नैतिक व भावनात्मक ध्येयाचें सार आलें आहे असें म्हणण्यास हरकत नाही. सत्य म्हणजे एका पक्षीं वस्तुस्थिति व दुसऱ्या पक्षीं विचारात्मक मानसिक व्यवसाय किंवा उच्चारात्मक शारीरिक व्यवसाय याजमधील मेळ, आणि कर्तव्य म्हणजे व्यवसायाचा सुखाशीं व सौंदर्य म्हणजे वस्तुस्थितीचा कल्पनासृष्टीशीं मेळ होय. या तिन्ही मेळामध्यें, अर्थात् कल्पना, वस्तु-व्यवसाय व सुख यामध्यें पूर्ण मेळ रहाणें मानवी पूर्णावस्थेच्या दृष्टीनें अत्यत आवश्यक आहे.

आता वरील तत्त्वाची कसोटी आपल्या समाजात लाविली असता तो तिला कितपत उतरतो हें पाहूं.

आपला समाज व्यक्तीचा बनलेला नसून जातीचा व पोटजातीचा बनलेला आहे. या जातींपैकीं काही सुशिक्षित व सुसंस्कृत व काही पूर्णपणें अशिक्षित व संस्कारहीन आहेत. पूर्वोक्त वर्गाच्या जाती आपापल्या हितास दक्षतेनें जपू शकतात, पण उत्तरोक्त वर्गातील जातींस ते शक्य नसतें. व्यक्तीस सज्ञान व आत्मसंयमी करणें सर्वस्वीं नसलें तरी बरेंच साध्य असतें; पण सबंध समाजात ज्ञानाचा किंवा संयमनाचा प्रसार करणे अशक्य नसलें तरी अत्यत दुर्घट असते यामुळें नीच जातींत शिक्षणाचा प्रसार करण्याचे जारीचे प्रयत्न सुरू असताही त्याजमध्यें विशेष चेतना उत्पन्न होत नाहीं, व उच्च जातींत नीच जातींकरिता स्वार्थत्याग करण्याची बुद्धि उत्पन्न करण्याचे प्रयत्न थोर महात्म्याकडून होत असतांही त्यास यावें तसे यश येत नाहीं. व्यक्तीप्रमाणें जातीचा स्वभाव उतावळा नसतो हें खरें आहे त्याच-प्रमाणें प्रत्येक जातीमागें काही ना काहीतरी नियतकर्म लावून दिलेलें असल्यामुळें त्या जातीस इतर जातींशीं विरोध करण्यास फावत नाहीं हेंही खरें आहे. पण जातीच्या या स्थितिस्थापकत्वामुळें व आत्मसतुष्टतेमुळें समा-जांत क्रांति होण्याचें भय नसलें तरी त्यानीं त्याच्या प्रगतीस साहाय्य न होतां

विघ्नच होते, व त्यावर बाहेरून आघात होऊ लागल्यास त्याच्या अवयवातील वैषम्यामुळे त्याचा नाश होण्यास विलब लागत नाहीं सर्व जीवात्मे परमात्म्याचीच स्वरूपें आहेत या अभेदप्रतिपादक सिद्धातास हिंदु धर्माच्या तात्त्विक अगात जरी महत्त्वाचें स्थान आहे तरी त्याच्या वर्णव्यवस्थारूप आचारात्मक अगावर त्याचा थोडासुद्धा परिणाम झालेला दिसत नाहीं वर्णव्यवस्थेंत भिन्नभिन्न वर्णांस भिन्नभिन्न कर्तव्यें आखून दिलेली असल्यामुळें सर्व वर्णांस समान असे जिव्हाळ्याचे धार्मिक व सामाजिक हितसबध मुळीच नाहीत असें म्हटल्यास चालेल सर्व जातीचो नियामक राजसत्ता एक असल्यामुळें त्याचे राजकीय हितसबध एक आहेत ही गोष्ट खरी आहे पण जातीजातीमध्यें शिक्षण, सपत्ति, अधिकार इत्यादि बाबतींत वैषम्य असल्यामुळें व ते वैषम्य शतकानुशतकें चालत आलेलें असल्यामुळे हल्ली जागृत होऊ लागलेल्या मागासलेल्या जातींना पुढारलेल्या जातींबद्दल अविश्वास वाढत आहे, आणि यामुळे त्याजमध्ये राजकीय हितसबंधाच्या ऐक्याच्या भावनेपेक्षा भिन्नतेची भावनाच प्रबळ आहे, व ती बदलणें जातीच्या स्वाभाविक स्थितिस्थापकतेमुळें अत्यत दुर्घट होऊन बसलें आहे. मागासलेल्या जातींकडून जातवार प्रतिनिधींची जी जोराची मागणी करण्यात येत असते ती या अविश्वासाची व भेदभावाची उत्तम निदर्शक होय. हा अविश्वास व भेदभाव घालविण्याकरिता पुढारलेल्या जातींनी प्रचंड स्वार्थ-त्याग केला पाहिजे. पण येथे हरएक प्रकारच्या भेदामुळें कनिष्ठ जातीशीं तादात्म होण्याचीच भ्राति, तेथें तशा स्वार्थत्यागाची अपेक्षा तरी कशी करावयाची ?

गेल्या हजार वर्षात हिंदुस्थानच्या लोकात मुसलमान, पारशी, ख्रिस्ती, यहुदी इत्यादि अनेक धर्माच्या अनुयायाची भर पडून साप्रतच्या हिंदी समाजास हिंदु समाजाच्या वर्णव्यवस्थेचेच स्वरूप आलें आहे. या नवीन जातींचा परस्पराशी बेटीव्यवहार नसला तरी रोटीव्यवहार चालू असल्यामुळें त्याचे परस्परसबध ते दोन्ही व्यवहारनिषिद्ध मानणाऱ्या हिंदुधर्मीय जातीच्यापेक्षा अधिक सलोख्याचे आहेत हिंदु धर्मातील ब्राह्मण किंवा क्षत्रिय त्याच धर्मातील अस्पृश्यांशी भोजनव्यवहार किंवा पानव्यवहार तर राहोच, पण स्पर्शव्यवहारही करणार नाहीं उलट पक्षीं, हिंदुधर्मबाह्य

लोकास त्या अस्पृश्याशीं रोटीव्यवहार करण्यासही काहीं संकोच वाटत नाहीं व त्यामुळें त्या अस्पृश्यास हिंदु धर्मांतील इतर जातीपेक्षा अन्यधर्मीय लोकच जवळचे वाटतात. हे अस्पृश्य लोक थोडथोडके नसून त्याची गणना कित्येक कोटींनी होण्यासारखी आहे, व त्याच्या पतितावस्थेचा काळ थोडाथोडका नसून हजारों वर्षांनीं मोजण्यासारखा आहे इतर देशातही सुशिक्षित व अशिक्षित, श्रीमंत व गरीब, प्रबळ व निर्बळ यासारखे उच्चनीच वर्ग आहेत. पण त्या वर्गांमध्यें अनुल्लंघनीय मर्यादा नसल्यामुळें आजचा निरक्षर कालांतरानें पंडित होऊ शकतो, आजचा भिक्षाधीश अल्पावधीत लक्षाधीश होऊ शकतो व आजचा गुलाम उद्या सर्वसत्ताधारी होऊ शकतो तशी सवलत आपल्या लोकांत नाही. आम्हामधील चार हजार वर्षांपूर्वीच्या पवित्र व सतेज ब्राह्मणाचा आजचा दुराचारी व निस्तेज वंशज पवित्र व तेजस्वीच गणिला जातो, व चार हजार वर्षांपूर्वीच्या अंत्यजाचा हल्लीचा शुचिर्भूत वंशज अस्पृश्यच मानण्यात येतो स्वतःच्या देशबांधवास व धर्मबांधवास पशूपेक्षाही नीच मानणाऱ्या आम्हांस परदेशांत परधर्मीयाकडून पशूपेक्षा अधिक मान मिळत नाही याचा अचंबा किंवा राग मानण्याचा आम्हास काय हक्क आहे ?

ही स्थिति अवश्य बदलली पाहिजे ती इतके दिवस टिकण्याचें कारण. तिचा चातुर्वर्ण्यात्मक धर्माशीं असलेला निकट संबंध हें होय, व त्या दोहोंची फारकत करणें शक्य नसल्यास ' इंद्राय स्वाहा, तक्षकाय स्वाहा ' या न्यायानें दोहोंचें बरोबर उच्चाटन करणें जरूर आहे चातुर्वर्ण्यसंस्था गेलीं हजारों वर्षें जरी आपणात रूढ असली तरी ती मूळच्या आर्यसमाजाची प्रकृति नसून तिच्यात पडलेली विकृति आहे ' ना विष्णु पृथिवीपति ' ही राजकारणाची कल्पना, ' न वदेत् यावनीं भाषा प्राणै कंठगतैरपि ' ही व्यवहाराची कल्पना, इत्यादि विकृतीचा आपण कालमानास अनुसरून जसा त्याग केला तशी जातिभेदाची कृत्रिम संस्थाही नष्ट करून व मनुष्याची योग्यता गुणकर्मानुसार ठरविण्याची प्राचीन स्वाभाविक रूढि पुन्हां प्रचारात आणून आपल्या समाजाची प्रकृति पूर्ववत् निकोप केली पाहिजे. या अपूर्व स्वार्थत्यागाची जरूर आहे हें खरें, पण उच्चवर्णीयानीं नीच-वर्णीयाकरिता असा स्वार्थत्याग करणे अशक्य कोटींतील नाहीं हें

जपानातील सामुराई लोकानी आपल्या वर्तनानें सिद्ध करून दाखविलें आहे.

चातुर्वण्यरूप धर्मानें सब व जाती मागासलेल्या राहून राष्ट्रीय कल्याणाची कितपत हानि झाली याचा येथवर विचार झाला. आता उच्च जातींतील व्यक्तीच्या पुरुषार्थाचें तरी रूढ धर्माकडून कितपत पोषण होतें हें पाहू.

पुरुषार्थ साधावयास शरीरबल, बुद्धिबल, भावनाबल इत्यादि धनात्मक साधनाचें जसें साहाय्य होतें तसें आत्मसयमनरूप ऋणात्मक साधनाचेंही होतें आत्मसंयमनाचा परिपोष होण्यास भावी परिणामाची तीव्र जाणीव असावी लागते. आमच्या पोथ्यातील फलश्रुतींपासून किंवा गरुडपुराणादिकातल्या फौजदारी कायद्यापासून आत्मसंयमनास कितपत पोषण मिळत असेल याची शंकाच आहे त्यानीं भाविकाच्या श्रद्धेची दोरी प्रमाणाबाहेर ताणली गेल्यामुळें तुटण्याचाच फार संभव त्याचा जो काहीं अल्पस्वल्प परिणाम व्हवयाचा तोही दानादिकानीं पापक्षय करण्याची जी सवलत धर्मीने ठेविली आहे तिने नष्ट होतो आत्मसयमन व्रतनियमानींही वाढविता येतें, व ती सोय मात्र आपल्या धर्मानें चागली केली आहे यात सशय नाहीं धर्मोक्त व्रतवैकल्यादिकांत मन गुतून राहिल्यामुळें पापाचरणाचा विचार करण्यास त्यास फावत नाही हाही त्याचा एक फायदा आहे. या व्रतनियमाचा संस्कार घडलेल्या नैष्ठिकाची संयमी या दृष्टीनें योग्यता दुसऱ्या देशातील कोणत्याही सयम्याच्यापेक्षा श्रेष्ठ नसली तरी त्याच्या बरोबरीनें असते असें म्हणण्यास मुळीच हरकत नाही. पण आपणामधील विधिनिषेधात्मक नियमानी मनुष्य इतका जखडून जातो, की त्याच्या पुरुषार्थास फारसा अवसरच रहात नाही. आज काय सोमवार, उद्या काय एकादशी, परवा काय एकादशीचे पारणें, तेरवा काय पोथीची समाप्ति, याप्रमाणें रोजचे रोज आमच्या मागें नवा नवा व्याप लागलेला असतो कर्मठाचा तर पहाटे चार वाजेपासून रात्रीचे दहा वाजेपर्यंत सारा काळ प्रातर्विधि, काकडआरती, स्नान, संध्या, पूजा, वैश्वदेव, जपजाप्य, मत्रपठन, स्तोत्रपठण, पुराणश्रवण, देवदर्शन, शेजारती इत्यादि व्यवसायांत विभागलेला असतो कधीं कधीं तर श्रावणमासातील नक्त, अधिकमासातील एकभुक्त, यासारखीं किंवा चातुर्मास्यासारखी व्रतें महिना:महिना चारचार महिने चालू तसतात. पुरुषांच्यापेक्षा स्त्रियांची व्रतें साहजिकच विपुल व

घोटाळ्याची असतात दुष्काळात गरिबास पोटास पुरेसें अन्न व पाठीस पुरेसें वस्त्र मिळत नसताही बायकाच्या लक्ष वाती तुपात जळतच असतात देवभोळेपणाच्या खालोखाल आमचा भुतेखेतें, वेताळ, समंध, ब्रह्मराक्षस, चेटकिणी मांत्रिक याजवरील विश्वास असतो मंत्रतंत्र, जादूटोणा, धूपदीप, दोरेगंडे, ताईत, कोंबडीं, लिंबें, शेंदूर इत्यादि खुळांत आमचे प्रत्यहीं हजारो रुपये खर्च होत असतात, आम्हांमध्यें गुरूचें बंडही विलक्षण असतें आमचा साधुसंतांवरील विश्वास अचल असतो वाटेल त्या बोकेसन्याशानें उठावें व महान् साधु म्हणून मिरवत भक्ताचा द्रव्यसंचयरूप लोण्याचा गोळा मटकावावा किंवा त्याच्या नवनीतकोमल अर्धांगीवर आपल्या जन्मांतरीच्या स्त्रिया म्हणून बेलाशक हक्क सांगावा ! सोंवळ्यासंबंधानें तर आमचा इतका कटाक्ष असतो, कीं सुतानें नरकास जाण्याच्या भीतीनें आम्हास वाटेंतील सुतावर पाणी तरी सोडावें लागतें किंवा तें टाळण्याकरिता आपल्या अव्वलच्या पूर्वजाप्रमाणे उघड्या मारांत तरी चालावें लागतें. हिरेमाणकें देवाच्या मूर्तींत भरून ठेविली म्हणजे त्याच्या वाटेस जाण्याची दुरोडे-खोराचीही प्राज्ञा नाहीं, गाई अवध्य असल्यामुळे त्या देवळाच्या महाद्वारा-पुढें उभ्या केल्यास तें यवनाकडूनही भ्रष्ट होण्याची भीति बाळगावयास नको, किल्ल्याच्या कोटास धाबळ्या गुंडाळून ठेविल्या म्हणजे तो अभेद्य होऊन त्याजवर हल्ला चढविण्याची शत्रूची छातीच होणार नाहीं अशा मासलेवाईक आमच्या कल्पना ! परकीयांनीं एकीमागून एक स्वाऱ्या करून आपली संपत्ति खुशाल लुटून न्यावी, आमच्यामधील पराक्रमी पुरुषास मात्र ती परत खेंचून आणण्यासाठींही देशाची मर्यादा ओलांडण्याची सक्त मनाई ! धर्मानें पुरुषार्थास स्थलाचेंच केवळ बंधन लाविलें आहे असें नाहीं, तर काळाचेंही बंधन लाविलें आहे, आणि फलज्योतिषानें व शकुनमुहूर्तादिशास्त्रानीं धर्माच्या क्षेत्रात प्रवेश करून घेऊन तें बंधन दृढ केलें आहे परकीयांनीं 'शुभं च शीघ्रम्' हा नैसर्गिक मुहूर्त साधून आम्हावर स्वारी करावी, आणि तिचा प्रतिकार करण्यास आम्हाला मात्र नक्षत्रादिकाचा कृत्रिम मुहूर्त पाहिला पाहिजे ! तो मुहूर्त लांबचा असला किंवा शत्रूनें आमच्या जोशीबुवाची मूठ दाबून तो आपल्या सोईप्रमाणें लांबवून घेतला तर आम्हीं हातपाय जोडून व डोळे मिटून आमच्या घरादाराची राखरांगोळी

व आमच्या क्रियाची विटंबना होऊ दिली पाहिजे! आमच्या मार्गांत एखाद्या माजरानें पाऊल टाकिलें, कीं आमचें पाऊल आम्हाला मागें घेतलें पाहिजे! आमच्या पराक्रमाची ज्योत जरी चागली प्रज्वलित असली तरी समोरील पंचारतीमधील एखादा अल्पस्नेह दीप विझल्याबरोबर आम्हाला हार खाल्ली पाहिजे! आम्ही शत्रुसैन्याच्या वावटळीस तोंड देण्याऐवजीं नाकाचा सूर पहात बसलों, सेनानायकाच्या रणगर्जनेने स्फुरण पावून पुढें सरसावण्याऐवजीं घुबडाच्या घूत्कारानें कच खाऊन माघार घेऊं लागलों, नाकासमोरील शत्रूच्या जमावाचें, सरजामाचें व हालचालीचें नीट निरीक्षण करण्याऐवजीं आकाशातील ग्रहाच्या युतीचें व गतींचें अवलोकन करण्यात मग्न होऊन राहिलों, यामुळेंच आम्ही परिणामीं विजयश्रीच्या मालेऐवजीं आकाशपुष्पमालेचा मात्र लाभ करून घेतला! आमच्या भोळसरपणानें उत्पन्न केलेल्या या दुबळेपणात दैववादानें व कर्मवादानें भरच टाकिली. अपेश आल्यावर खिन्न मनाचें समाधान करण्याच्या कामीं त्या दुकलीचा चागला उपयोग होईल खरा पण कार्याच्या आरंभींच तिची कास धरल्यास अपेशाला आमत्रण दिल्यासारखें होतें, व मागील जन्मातील कर्मापेक्षा चालू जन्मातील कृतिशून्यता मात्र फलास येते कोणत्याहि कार्यास यश येण्या-करिता त्याच्या साधनाचे पूर्ण ज्ञान व त्यावर पूर्ण विश्वास असावा लागतो पण आपण प्रत्येक कार्याचा संबंध त्याच्या वास्तविक साधनांशीं; व मानवी प्रयत्नाशीं न लाविता दैव, जन्मातरींचें कर्म, अंतरिक्षातील ग्रह, जीवकोटी-तील घुबडें, माजरें, पाली वगैरे असबद्ध गोष्टींशीं लावितों! मनुष्यकृत गोष्टींशी लाविलाच तर शिंका, उचक्या, नाकाचा सूर यासारख्या अहेतुपूर्वक झालेल्या प्रकाराशीं लावितों, व या रीतीनें आपली दिशाभूल करून घेतो! स्वप्रयत्नाशिवाय दुसऱ्या प्रत्येक पदार्थावर यशाची भिस्त ठेवणाऱ्या अप्रयोजक प्राण्यापासून यश दुरावत गेल्यास त्यात आश्चर्य कसचें!

कार्यसिद्धि होण्यास कार्याबद्दल भावनामूलक तीव्र तळमळ लागावी लागते, व तदर्थ करावयाचा प्रयत्न एकाग्रतेनें व्हावा लागतो पण आपणात गेल्या हजार वर्षांपासून तरी व्यवहारापेक्षा परमार्थाचें, प्रवृत्तीपेक्षा निवृत्तीचें व कर्मयोगापेक्षा कर्मसंन्यासाचें जें वर्चस्व चालू आहे, त्यामुळें संसार मिथ्या आहे, कामक्रोधादि षड्रिपूंचें दमन करणें हेंच मनुष्याचें कर्तव्य, ते केल्या-

शिवाय त्याची जन्ममरणाच्या फेऱ्यांतून मुक्तता होत नाहीं, याच विचाराचें चोहोंकडे साम्राज्य दिसून येतें जेथें ऐहिक सुखाबद्दल इतकें तीव्र औदासिन्य, तेथें कार्याबद्दल अव्यभिचारी व तळमळ कोठून रहाणार? व तशी तळमळ असल्यावाचून सिद्धि तरी कशी प्राप्त होणार?

ही लेखमाला सुरू झाली त्या वेळीं समाजैक्यास व पुरुषार्थास विघातक अशा उपर्युक्त विचारसरणीचें समाजात फारच प्राबल्य होतें ते उत्तरोत्तर सपाट्यानें कमी होत आहे या क्रांतीचें बीज आपली राजकीय स्थिति सुधारण्याबद्दल समाजात जी उत्कट तळमळ उत्पन्न झाली आहे, तिच्यांत पुरुषार्थास मारक अशा दुबळ्या कर्मसन्यासाचें हीनत्व व कर्मयोगाचें श्रेष्ठत्व स्थापन करणारा एक उत्कृष्ट ग्रंथ एका राजकीय पुढाऱ्याकडूनच झाला. अस्पृशाची अस्पृशता दूर झाल्याशिवाय स्वराज्य मिळणे व टिकणें आणि आपली परदेशातील अवहेलना थाबणें शक्य नाहीं असा उपदेश परिणामकारक रीतीनें होण्यास एका राजकीय नेत्या-कडूनच सुरुवात झाली. कर्मसन्यासाचा व जातिभेदाचा निषेध यापूर्वी धर्मसुधारकाकडून व समाजसुधारकाकडून अनेक वेळा करण्यात आला होता. पण त्या वेळीं कर्मप्रधान व समताप्रधान पाश्चात्य संस्कृतीचा विशेष प्रसार झाला नव्हता म्हणून म्हणा, किंवा उद्योगाचा व आत्मत्यागाचा स्वहिताशीं असलेला संबध बहुजनसमाजास स्पष्ट दिसत नव्हता म्हणून म्हणा, त्यांच्या प्रयत्नास तादृश यश आले नाही हल्लीं हक्काच्याबरोबर जबाबदारीचीही जाणीव सपाट्यानें उत्पन्न होत असल्यामुळे त्या दोन्ही गोष्टींचें महत्त्व सामान्य जनास पटूं लागलें आहे, व तें त्याच्या करणींत वठूही लागेल अशी आशा करण्यास सबळ कारणें दिसत आहेत हल्लीं राजकीय बाबतींत तरी कोरड्या वक्तृत्वापेक्षा कळकळीचा ओलावा असलेल्या कृतीस प्राधान्य मिळूं लागलें आहे, व राजकीय प्रगति होण्यास सामाजिक सुधारणा आवश्यक आहे हें एक वेळ उपहासास्पद ठरलेलें तत्त्व जनतेच्या आचरात जरी नसलें तरी विचारात स्पष्टपणें प्रतिबिंबू लागलें आहे. आज समजू लागलेलें सत्य उमजूं लागण्यास, आज कळूं लागलेलें तत्त्व कृतिद्वारा वळूं लागण्यास कांहीं कालावधि लागेल यांत संशय नाहीं; पण तो कालावधि

दीर्घ नाहीं असें भोंवतालच्या चिन्हांवरून भविष्य वर्तविणारा प्रत्येक समाजशास्त्री निश्चयानें सागू शकेल.

वर एका जर्मन कवीचें जें ब्रीदवाक्य दिलें आहे त्यांत सौंदर्याचें महत्त्व सत्य व कर्तव्य याच्या बरोबरीने मानिलें आहे, व तें योग्यच आहे. अनार्यांशी व बौद्धांशी करावा लागलेल्या समेटामुळें आपल्या धर्माचें मूळचें उज्ज्वल स्वरूप मलिन होऊन सत्याची व कर्तव्याची जशी हानि झाली तशी सौंदर्याचीही झाली सौंदर्य केवळ शारीरिकच असतें असें नाहीं, तर बौद्धिक व नैतिक स्वरूपाचेंही असतें गणपतीचें बाह्य स्वरूप, विधवाचें केशवपन हे शारीरिक सौंदर्यहानीचे प्रकार होत. आपण गणपति हें दैवत त्याच्या पित्याप्रमाणें व अनेक क्षुद्र देवताप्रमाणें अनार्यांपासून व केशवपन सन्यासाभिमानी बौद्धापासून उचललें असावें असा अनेक विद्वानांचा तर्क आहे, व तो खरा असण्याचा बराच सभव आहे. विचारात व आचारात प्रमाणशीरपणा नाहीसा झाला म्हणजे बौद्धिक व नैतिक सौंदर्याची हानि होते. शिमग्यातील बीभत्स प्रकार अशा हानीचें उदाहरण होत. त्याचें मूळही शोधू गेल्यास अनार्यांच्या चालीतच सापडेल.

या लेखमालेत वरील ब्रीदवाक्यातील त्रयीस विघातक अशा प्रकारावरच टीका केल्याचे दिसून येईल जुन्या धर्मकल्पनास न पटण्याजोगे असे या मालेंत पंधरा लेख आहेत बाकीचे सतरा व्यावहारिक स्वरूपाचे आहेत. पूर्वोक्त लेखातील टीकेप्रमाणें उत्तरोक्त लेखात टीका आली असलीच तर ती अपवादात्मक स्थळीं व तुरळक आढळून येईल.

कोणताही सिद्धात स्थापन करण्याचे तर्कशुद्ध मार्ग दोन असतात. त्याचा एखाद्या परिचित सिद्धाताशीं पूर्ण मेळ आहे असें दाखविणें हा एक मार्ग, व त्या सिद्धातांचा विरोधी अपसिद्धांत घटकाभर खरा मानिल्यास त्यापासून निघणारी अनुमानपरंपरा आपल्या पूर्व अनुभवाशीं किती विसंगत व हास्यास्पद ठरते हें दाखविणें हा दुसरा मार्ग. प्रस्तुत लेखमालेंत विनोदी लेखनपद्धतीचा अगीकार केलेला असल्यामुळें दुसरा मार्गच अनुसरिला आहे. या लेखनपद्धतींत लेखकाची भिस्त अन्वयापेक्षा व्यतिरेकावर, सादृश्यापेक्षा विरोधावर व बुद्धीपेक्षा कल्पनेवर असल्यामळें तिचा वाचकावर

ात्कट ग्रह होतो तिनें वाचकास प्रथम जरी राग आला तरी त्याचें चित्त ाात व स्थिर होतांच त्याच्या कल्पनेसमोर टीकाविषयीभूत प्रकारांतील ेरोध उभा राहून त्याच्या बुद्धीसही त्याची हास्यास्पदता पटूं लागते, ागाची जागा लाजेकडून घेण्यात येते, व टीकाकार आपणास हिणविण्यात ानंद मानणारा आपला हितशत्रु नमून आपलीं वैगुण्यें हसतहंसत ाखविणारा आपला निस्सीम मित्र आहे अशी शेवटीं त्याची खात्री होते

पुष्कळदा सत्यज्ञानाचा जन्म अज्ञानमूलक मिथ्या कल्पनापासून झालेला ेसून येतो. पण त्या कल्पना त्या ज्ञानास, जन्म दिल्यानतर स्वतःच्या पिलास ारणाऱ्या श्वापदाप्रमाणें त्याचा नाश करितात, किंवा स्वतःच्या छायेखाली ाढू पहाणाऱ्या रोपट्याच्या मुळ्यास आपल्या मुळ्यानी प्रतिबध करणाऱ्या वृक्षाप्रमाणें त्याची प्रगति खुंटवितात. शुद्ध धर्माची, ज्योतिषशास्त्राची व रसायनशास्त्राची उत्पत्ति अनुक्रमें पिशाचादिकावरील, फलज्योतिषावरील व किमयावरील विश्वासापासून झाली परतु तोच विश्वास पुढे आपल्या अपत्यांची उन्नति खुंटविण्यास कारण झाला तो विश्वास उडवितांना त्याच्या अपत्यास धक्का न पोहोंचविण्याची खबरदारी अवश्य घेतली पाहिजे, व ती या लेखनमालेंत घेतलीही आहे. आपणामधील धर्मतत्त्वांपैकी अद्वैतसिद्धाताबद्दल किंवा भागवतधर्मांतील भक्तिमार्गाबद्दल, आपल्या पूर्वजांनीं गणितात व ज्योतिषात लाविलेल्या शोधाबद्दल प्रस्तुत लेखकास अत्यत आदर आहे, व पिशाचादिकाचा किंवा फलज्योतिषाचा उपहास करिताना त्यानें त्या आदरास न शोभतील असे उद्गार मुळींच काढिले नाहींत अशी वाचकाची खात्री होईल.

कालांतरानें पिशाचयोनींचें अस्तित्व व गुणधर्म निश्चित होण्याचा संभव ाहे. तसेंच मनुष्याचें भवितव्य आणि अतरिक्षातील ज्योति, पशुपक्ष्याचें ्वर व हालचाली याजमधील सबंध शास्त्रीय पद्धतीनें सिद्ध होणें आणि ानुष्यास अंतर्ज्ञानासारख्या शक्ति शास्त्रीय साधनांनीं प्राप्त होणें हेंही ासंभवनीय नाहीं ही गोष्ट कबूल न करणें म्हणजे एक तऱ्हेचा भोळसर-ाणा व हटवादीपणाच होईल. पण तो संभव खरा ठरेपर्यंत यशाची इच्छा ारणाऱ्या प्रत्येक व्यवहारज्ञानें त्यांवर अविश्वास ठेवूनच चाललें पाहिजे.

सांप्रत काळा अश्रद्धय म्हणून गणिल्या गेलेल्या प्रत्येक अद्‌भुत प्रकाराच्या हुलीबरोबर स्वत स बहकू देणें म्हणजे स्वत च्या ऐहिक व पारमार्थिक हिताची वाताहत करून घेणें होय यात शंका नाहीं.

प्रस्तुत मालेंतील काहीं लेख प्रथम प्रसिद्ध झाले त्या वेळीं लेखकाचा त्या लेखाच्या द्वारें काहीं जातीचा किंवा काही प्रातातील लोकाचा उपहास करण्याचा हेतु आहे असा एक समज उत्पन्न झाला होता परतु तो समज अवास्तव होता तो उत्पन्न होऊन लेखकाच्या काहीं देशबाधवाचीं मनें, कांहीं काळ का होईना, दुखावली गेली याबद्दल लेखकास अत्यत दिलगिरी वाटते हिंदुस्थानातील सर्व जातींचे व सर्व प्राताचे ऐक्य व्हावें हाच लेखकाचा हेतु असून सर्व स्वदेशीयाबद्दल बधुतुल्य प्रेम ही एकच त्याची तत्सबंधीं भावना आहे त्या ऐक्याशीं व त्या प्रेमाशी विसदृश अशा भाषेची त्याजकडून योजना झाली असल्यास तो त्याच्या हेतूचा दोष नसून भाषेचा आहे असें समजावें वाचकांनीं ते लेख या दृष्टीनें वाचिल्यास त्यानीं त्याच्या शुद्ध हेतूबद्दल पूर्ण खात्री होईल

गाजराच्या पुगीपासून वादनासारख्या ललित कलेंत जरी भर पडली नाही तरी निदान जठरात भर पडण्यास हरकत नसते. तिच्याप्रमाणें या लेखमालेचेही बोध व करमणूक असे सूक्ष्म व स्थूल स्वरूपाचे दोन उद्देश आहेत. त्यांपैकी पहिला उद्देश फसून दुसरा सिद्धीस गेला तरी लेखकाचे श्रम अगदी फुकट गेले असें त्यास वाटणार नाहीं.

लेखकास विनोदाकरिता काहीं स्थळी जरी थोडीफार अत्युक्ति करावी लागली आहे तरी त्यानें वर्णिलेले बहुतेक प्रकार सत्यावर उभारलेले आहेत. उदाहरणार्थ, 'साधुसत' या लेखातील मत्कुणपूजेसारखे असंभवनीय वाटणारे प्रकारही लेखकाच्या अनुभवातूनच कागदावर उतरले आहेत. मनुष्याच्या श्रद्धेवरील विचारशक्तीचें नियत्रण दूर झालें म्हणजे त्याच्या आचरणास शक्याशक्यतेचे कोणतेही निर्बंध बाधूं शकत नाहींत.

प्रस्तुत पुस्तकांतील पहिल्या अठरा लेखापेक्षां पुढील चवदा लेखांमध्यें टीकापर लेखांची संख्या कमी असून त्या लेखाची भाषाही बरीच सौम्य आहे. पहिल्या अठरा लेखांतील टीकापर लेख प्रथम प्रसिद्ध झाले तेव्हां ते

अनेकास अत्यंत तीव्र वाटले परतु समाजाच्या त्या वेळच्या मतात हल्लीं कालाच्या ओघास अनुसरून बरीच प्रगति झालेली असल्यामुळें ते लेखही हल्लीं बरेच सौम्य वाटण्याचा सभव आहे त्या लेखावर वाचकाचा विशेष रोष न होण्याचें आणखीही एक कारण आहे कालाचा समाजावर जसा सस्कार झाला आहे तसा प्रस्तुत लेखकावरही झाला आहे मालेच्या आरंभकाली लेखक तरुण व बरेच वाचक त्याजपेक्षा वयस्क अशी स्थिति होती. ती बदलता बदलता आता अगदीं उलट झाली आहे. हल्लीं लेखक वृद्ध व बहुतेक वाचक तरुण असा प्रकार असल्यामुळे वाचक हें पुस्तक वाचिताना त्याजकडे कमी सरोष, किंबहुना दयार्द्रच दृष्टि ठेवतील अशी आशा आहे ती सफल होवो अशी इच्छा प्रकट करून ही लाबलेली प्रस्तावना संपवितों.

जळगाव, वऱ्हाड }
१९२३

श्रीपाद कृष्ण कोल्हटकर

## तिसऱ्या आवृत्तीचें
## आभारसमर्पण



हें पुस्तक छापत असतां मला अनेक उपयुक्त सूचना व इतरही महत्त्वाचें साहाय्य केल्याबद्दल या पुस्तकाचे प्रकाशक व माझे बंधु चि. रा हरी गणेश कोल्हटकर आणि माझे स्नेही रा. रा. अनंत कृष्ण ठाकूर, रा रा. प्रभाकर गणेश घोपेश्वरकर व रा. रा केशव काशिनाथ जोशी यांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानिले पाहिजेत या पुस्तकाच्या लेखसंख्याबोधक वैकल्पिक नावातील ' साहित्य ' हा द्व्यर्थी शब्द सुचविल्याबद्दल श्रीमती सौ. सीताबाई घोपेश्वरकर यांचाही मी अत्यंत ऋणी आहें.

मुंबई,
ता. १५-५-२३ } **श्री. कृ. कोल्हटकर**

# सुदाम्याचे पोहे

| मुष्टी | विषय | पृष्ठ |
|---|---|---|
| १ ली | साक्षीदार ... | १ |
| २ री | कुलूप .. ... | ७ |
| ३ ,, | शिमगा .. ... | १३ |
| ४ थी | गणेशचतुर्थी ... | २२ |
| ५ वी | गवई . .. | ३४ |
| ६ ,, | हजामतीची नीतिमिमांसा | ४३ |
| ७ ,, | भविष्यकथनाची साधनें | ५१ |
| ८ ,, | माझ्या भीष्मप्रतिज्ञेचा विजय ... ... | ६० |
| ९ ,, | लग्नसमारंभ ... | ६८ |
| १० ,, | श्रावणी .. ... | ७९ |
| ११ ,, | वर्तमानपत्रकर्ता ... | ८९ |
| १२ ,, | मुंबईचा दीपोत्सव ... | १०० |
| १३ ,, | माझे टीकाकार .. | ११९ |
| १४ ,, | मुंबईचें प्रदर्शन ... | १२६ |
| १५ ,, | चोराचें संमेलन .. | १४० |
| १६ ,, | याचक ... ... | १४९ |
| १७ ,, | म्हातारपणाचे फायदे | १५९ |
| १८ वी | चित्रगुप्ताचा जमाखर्च | १६६ |
| १९ ,, | लेखनकलेतील स्थित्यंतरें | १७६ |
| २० ,, | आमचे बैठे खेळ ... | १८४ |
| २१ ,, | यांत्रिक चमत्कार ... | १९९ |
| २२ ,, | भाषा व इतिहास ... | २१२ |
| २३ ,, | साहित्यपरिषदेची तयारी | २२३ |
| २४ ,, | चित्रकार ... ... | २४३ |
| २५ ,, | छायाचित्रें उर्फ फोटो | २५५ |
| २६ ,, | साधुसंत ... ... | २६६ |
| २७ ,, | पाडूतात्याची निर्जळी एकादशी ... | २८२ |
| २८ ,, | मरणोत्तर ... ... | २९२ |
| २९ ,, | झोंप .. ... | ३०९ |
| ३० ,, | यशःसिद्धीचे सोपे व अचूक मार्ग ... | ३२४ |
| ३१ ,, | आमच्या गावातील पाण्याचें दुर्भिक्ष ... | ३४० |
| ३२ ,, | धर्मांतर ... ... | ३५५ |

# सुदाम्याचे पोहे

मुष्टि १ ली *

## साक्षीदार

न्यायसभात निर्ढावलेल्या लोकाना 'साक्षीदार' हा किती विलक्षण प्राणी आहे हें सागावयास नकोच. इतर लोकासही त्याच्या बुद्धिमत्तेची, नीतीची व व्यवसायाची ओळख व्हावी या हेतूनें हा वर्णनात्मक लेख लिहीत आहें

या प्राण्याचे मातापितर 'पुराव्याची गरज' व 'पोटगी भत्ता' हे होत. गरज ही कल्पकतेची आई, हें नातें तर प्रसिद्धच आहे. आई एक असल्यामुळें साक्षीदार व कल्पकता हीं अर्थात् बहिणभावडें झाली. या दोघाचें सख्य किती आहे व साक्षीदारास त्याच्या बहिणीचें प्रसंगीं किती साहाय्य असते हें अनुभवानेंच कळण्याजोगे आहे

या प्राण्यास मुख्य व्यवसाय बहुतकरून लोकातील तटे तोडणें हा असतो. यामुळें जेथे जेथें म्हणून देवघेव वगैरे चालली असेल तेथें तेथें हा अगदीं ठेवलेला असावयाचा ! जेथें रिणको धनकोस वसूल देत असेल किंवा धनको दस्तऐवज लिहून घेत असेल, तेथें हा सार्वजनिक प्राणी तो सर्व प्रकार सूक्ष्म दृष्टीनें अवलोकन करीत असतो कोणत्या मनुष्यानें कोणत्या रगाचें पागोटें घातलें आहे, रुपये वसूल देताना किती किती मोजून दिले, कशात बाधून आणले होते, मालाचें माप कोणत्या धातूचें होतें, माल आणलेल्या गाडीच्या बैलाचा रग कोणता होता, वगैरे लहानसहान गोष्टींची सुद्धा नोंद त्याच्याकडून होत असते. जेथे वाटणी चालली असेल तेथें हा प्राणी हजर असावयाचाच. लग्नसमारंभ किंवा दत्तकविधान चाललें असेल तेथें एक वेळ उपाध्या नसला तरी चालेल, पण साक्षीदार पाहिजेच, मग तो अन्य जातीचा असला तरी हरकत नाहीं एकदा तर एका मुसलमान साक्षीदारानें एका हिंदूच्या लग्नप्रसंगीं हजर राहून अतरपाट धरल्याचेंही शपथेवर सागितलें ! बरें, हा

* वि. विस्तार, पु. ३३, अक ८–९. [सन १९०२]

प्राणी नुसत्या सार्वजनिक प्रसंगींच हजर असतो असें नाही, तर दुसऱ्याचा एकान्त चालला असतानाही हजर राहण्याची याची तयारीच ! नवराबायकोंचे प्रेमळ सवाद, खुनी लोकांचीं कारस्थानें, इत्यादि प्रसगी त्या त्या प्रसगाच्या प्रत्यक्ष वाटेकऱ्याशिवाय दोघेजण तेथें हजर असतात — एक परमेश्वर व दुसरा साक्षीदार ! पण या रीतीने या नामाचा एकवचनीं उपयोग केल्यानें वाचकाचा गैरसमज होईल, तो घालविण्याकरिता प्रथमच एका गोष्टीचा उल्लेख केलेला बरा. ती गोष्ट हीच कीं, साक्षीदार एकटा कधीही असावयाचा नाहीं नेहमीं दोन किंवा अधिक साक्षीदार एकत्र आढळून येतात. अर्थात् हा प्राणी कळप करून राहणारा [ Gregarious ] आहे. परतु चमत्काराची गोष्ट ही की, जरी इतरामधील भाडणें तोडण्याचा साक्षीदारापैकीं प्रत्येकास हव्यास असतो तरी त्याचे एकमेकाशीं कधींही पटत नाही विवक्षित प्रसगी कोणती वेळ होती असें त्याना विचारल्यास, एकाचें प्रात काळ तर दुसऱ्याचे सध्याकाळ असे मत पडेल, व तिसऱ्याचें मत त्या वेळीं रात्र झाली असून प्रकृत साक्षीदाराशिवाय सर्व गाढ झोपेंत होते असें पडेल ! तीन साक्षीदारात अशी त्रेधा होण्यासारखें मतवैचित्र्य ! मग त्याची जास्ती सख्या असल्यावर विचारूच नये एकदा आम्हीं चौघा साथीदारास एका घडलेल्या प्रसगाच्या काळाविषयी विचारलें असता एकानें शपथेवर [ साक्षीदार शपथेशिवाय तोडातून ब्रही काढीत नाहींत ! ] असें सागितले की, त्या प्रसगीं पावसाची मुसळधार सुरू होती, दुसऱ्यानें सागितले, थडी पडल्यामुळें चोहोंकडे आगट्या पेटल्या होत्या, तिसऱ्यानें वसतपूजा चालली असून चादण्यात अगास उट्या लावीत असल्याचे निक्षून सागितले ! चवथ्या साक्षीदाराने चवथीच गोष्ट सागितली नाहीं याला त्या बापड्याचा इलाज नव्हता कारण उन्हाळा, हिंवाळा व पावसाळा या काळाव्यतिरिक्त चवथा काळच त्याच्या ऐकिवात नव्हता. साराश, साक्षीदाराच्या विरुद्ध विधानाची एकवाक्यता करता करता नाकी नव येतात. बरें, ही विधाने खोटीं असतात अशातलाही प्रकार नसतो कारण सगळ्यानीं शपथा वाहिलेल्या असतात. शिवाय भवभूतीने वर्णन केलेल्या ‘ वाचमर्थोऽनुधावति ’ या कोटींतच साक्षीदाराची गणना असते पंचमहाभूतें

त्याच्यापुढें हात जोडून उभी असतात एखादा साक्षीदार रात्रींची सहल करण्यास निघाला असता, जर अंधारात एखादें चौर्यकर्म चाललेलें असेल, तर स्वच्छ आकाशात सुद्धा वीज चमकून तें कर्म त्याच्या नजरेस आलेंच म्हणून समजावें पचमहाभूताप्रमाणेच इतर मनुष्यप्राणीही साक्षीदारास वश असतात. कधीं कधीं चोराने, घरात शिरून कडी लावली असताही, साक्षीदाराची चाहूल ऐकताच त्याने कडी उघडून व त्याला आत घेऊन नतर त्याला साक्षी ठेवून चोरी केल्याचे आमच्या ऐकिवात आहे

दुसऱ्याच्या कामात हात घालण्याच्या इच्छेबरोबर देवाने या प्राण्यास तदनुरूप इंद्रिये व बुद्धि दिली आहे हें सुदैवच समजावयाचें ! एका आधळ्या साक्षीदारानें एकदा एका मनुष्याच्या पागोट्याचा रग पिवळा होता हें प्रत्यक्ष डोळ्यानीं पाहिल्याचें सागितले प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिल्यावर खोटें तरी कोणी म्हणावें ? तसेच वार्धक्यामुळें बहिरे झालेल्या साक्षीदारांचे कान दुसऱ्याची व्यवहारासंबधी होणारी बोलणीं ऐकताना चागले शाबूत होतात, व तरुण साक्षीदाराना फार लाबून ऐकू येते साक्षीदाराची आठवण तर फारच बळकट असते. सामान्य मर्त्यांची आठवण विशेष कारण नसताना दहापाच वर्षांपलीकडे जात नाहीं, व तिची पकड ठळक गोष्टीवरच असते, पण साक्षीदाराच्या आठवणीची मगरमिठी फार भयकर असते पाहिजे तितकी क्षुल्लक बाब असू द्या व तिला कितीही वर्षें लोटली असोत, साक्षीदाराना ती आठवण नाहीं असे होणारच नाहीं पधरावीस वर्षांपूर्वीचेही जमाखर्च ते घडाघड मुखोद्गत म्हणून दाखवितात, मग ते कितीही घोंटाळ्याचे का असेनात ! हा प्रकार पाहताना अलीकडील काहीं वक्त्याची आठवण झाल्यावाचून रहात नाहीं हे वक्ते घरून एखादे जोरदार भाषण पाठ करून, किंबहुना छापवूनही काढून तें सभेत पाठ म्हणून दाखविताना त्यातील सुभाषितें किंवा प्रसिद्ध पुरुषांच्या उक्ति साशंक मुद्रेनें व If I remember right [ जर माझी आठवण धड असेल तर ] अशा उद्गारासहित उच्चारीत असतात साक्षीदाराचा प्रकार मात्र यापैकीं नसतो हो ! त्यांना खरोखर मोठ्या व भानगडीच्या रकमा कालातरानें जशाच्या तशा आठवतात. जितकी जितकी क्षुल्लक गोष्ट तितका तितका तिचा ठसा

याच्या मनावर अधिक ! परवा एका साक्षीदारांने वीस वर्षांपूर्वी ऐकलेल्या पचवीस रकमा आणे–पैमुद्धा बिनचूक सागितल्या ! तसेच दुसऱ्या एकानें लहानपणीं पाळण्यात ऐकलेल्या वाटणीसबधाच्या गोष्टी चाळीस वर्षांनंतर अचानक न्यायसभेपुढे आणिल्या ! यापलीकडचें उदाहरण, कृष्णाच्या भाषणास हुंकार देणाऱ्या गर्भस्थ अभिमन्यूशिवाय एकही आढळणार नाही अशी माझी खात्री आहे.

आता साक्षीदार झाला तरी तो मनुष्यच असल्यामुळे वरील विधानास काहीं अपवादही आहेत उदाहरणार्थ, जरी त्याला पुष्कळ वर्षांपूर्वीची गोष्ट पूर्णपणें आठवते तरी, नुकत्याच होऊन गेलेल्या गोष्टी पुष्कळदा त्याच्या आठवणींतून निसटूनही जातात. त्याच्या स्मृतिपटावर उमटणाऱ्या चित्राचें स्पष्टत्व बहुधा कालसान्निध्याशी व्यस्त प्रमाणावर असतें नुक्तीच मुखावाटे निघालेली गोष्ट लक्षात न राहिल्यामुळें कधी कधी त्याच्याकडून परस्पराशी विसगत विधानें बाहेर पडतात 'तसेंच नेहमीं परोपकाराकडे दृष्टि असल्यामुळें खाजगी हितासारख्या क्षुल्लक गोष्टींकडे तो दुर्लक्ष करितो. 'वसुधैव कुटुंबकम्' हेंच त्याचे व्रत असते वर सागितलेल्या फर्ड्यां हिशोबी साक्षीदाराला तुम्ही जर विचारिलें कीं, 'जेथे या जमाखर्चाच्या गोष्टी चालल्या होत्या तेथें तुझे काय काम होतें ?' तर तें त्याला मुळींच सागता येणार नाही त्याचप्रमाणें 'दोन वर्षांपूर्वी तुझ्या बापाच्या श्राद्धास कोण ब्राह्मण बोलाविले होते ?' असा प्रश्न केल्यास तो कुंठित होईल, पण वीस वर्षांपूर्वी एकत्र जमलेल्या पन्नास मडळीपैकीं प्रत्येकाचें नाव, पोषाख, धदा, आईबापाची नावें, एकदर वंशावळ, वाटेल तें विचारिलें तरी तो तुम्हाला दाद देणार नाही. शिवाय जरी वर सागितल्याप्रमाणें साक्षीदाराची नष्ट झालेलीं इंद्रियेंही कधीं कधीं पालवतात, तरी कधीं कधीं डोळे असूनही काहीं वस्तू त्याना दिसेनाशा होतात. हें एकदेशीय ग्रहण बहुतकरून दस्तऐवज लिहिणाराच्या डोळ्याना लागतें. त्यात नमूद केलेल्या गोष्टीखेरीज इतर गोष्टी त्याना मुळींच दिसत नाहींत, इतकेंच नाहीं, तर पुष्कळदा तारणगहाणखताऐवजीं ताबेगहाणखत व ताबेगहाणखताऐवजी खरेदीखत, केवळ हस्तदोषामुळें त्याच्याकडून लिहिलें जातें.

साक्षीदारांना चिलीम ओढण्याचें एकच व्यसन असते, पण ते त्याच्या फारच पथ्यावर पडते कारण त्याचें हें व्यसन माहीत असल्यामुळे समान-व्यसनी लोकाकडून अर्थातच तमाखुसेवनात पक्तीचा लाभ देण्यासबधानें त्याना पाचारण येतें, व तें आलें म्हणजे त्यांना त्याची भीड न तुटून इतरांचें व्यवहारनिरीक्षण करण्याचा त्याचा मार्ग सहजच खुला होतो जेव्हा ते तबाखू ओढीत नसतात तेव्हा ते बहुतकरून बाजारास जात असतात पण अशा प्रसगीं सुद्धा इतर लोक त्याचा मार्ग रोखून त्याना तटे तोडण्याकरिता ओढून नेतातच साक्षीदार एकमेकाशीं कधीही बोलत नाहीत. एकमेकाबरोबर लाबचा प्रवास करण्याचा प्रसग जरी आला तरी त्याचें परस्पराशीं वर्तन दोन इग्रज गृहस्थाच्यासारखे तुसडेपणाचें असतें न्यायसभेत येईपर्यंत तर त्याची एकमेकाशीं ओळखही नसते

साक्षीदाराची सत्यप्रियतेबद्दल फार ख्याति आहे. ते ज्याच्या वतीनें बोलावयास येतात ते जरी नेहमी त्याचे नातेवाईक किंवा सावकार असतात तरी ते खरे असेल तेच सागतात व त्याना कितीहि प्रश्न विचारिले तरी ' माहीत नाही ' हे शब्द त्याच्या तोडावाटे कधीं बाहेर पडावयाचे नाहीत. एवढेंच कीं, कधीं कधी प्रसगानुसार त्याच्या उत्तराचा नमुना बदलतो उदाहरणार्थ, उलट तपासणीच्या वेळी त्याचें उत्तर प्रश्नरूप किंवा सामान्य सिद्धान्ताच्या स्वरूपाचें असतें समजा, आपण एखाद्या साक्षीदाराला विचारिलें, की ' अमुक अमुक करार चावडीवर झाला कीं काय ? ' तर या प्रश्नाला उत्तर खालील दोहोंपैकी एका स्वरूपाचें आहे असे तुम्हाला आढळेल —' असे करार चावडीशिवाय दुसरीकडे कशाला होतील ? ' किंवा ' असे करार चावडीवरच व्हावयाचे ' या उत्तर देण्याच्या पद्धतींत वैचित्र्य असून शिवाय तीपासून लौकिक ज्ञानही प्राप्त होतें. ही उत्तरसरणी साक्षीदाराच्या इतकी अंगवळणीं पडून गेलेली असते कीं, कधी कधीं तिच्यामुळे खालच्याप्रमाणें मासलेवाईक प्रकार घडून येतात.

प्रश्न—तुम्हाला चार बायका होत्या की काय ?

उत्तर—सगळ्यानाच चार चार बायका असतात.

प्रश्न—पहिली बायको मेली वाटतें ?

उत्तर—मरू नये तर तिनें काय करावें ?

प्रश्न—तिच्यापासून तुम्हाला एक मुलगा झाला होता ना ?

उत्तर—माझ्यापासून होऊं नये तर काय...?

साक्षीदाराना घातलेले प्रश्न त्याना सहसा कळत नाहीत, त्यामुळें कधी कधीं ते त्याना विसगत उत्तरें देतात, व कधी कधी कोणी, केव्हा, कोठें इत्यादि प्रतिप्रश्न विचारून व प्रश्नातील काहीं शब्दाचा पुनरुच्चार करून पृच्छा करणारास पुरेपुरेसे करितात.

एखाद्या प्रमगाचे वर्णन करण्याची साक्षादाराची तऱ्हा कादबरींतल्याप्रमाणे व्यवस्थित व मोहक असते. 'अमक्या प्रसगासबधानें तुला काय माहीत आहे ?' असे त्याला मोघम विचारले असता, मुद्दयाच्या गोष्टीकडे एकदम न येता 'सहा महिन्यापूर्वी एक दिवशी सकाळीं मी निजून उठून तोंड धुऊन शेताकडे जात होतो, इतक्यात–' इत्यादि स्थलकालादि तपशिलासकट सर्व हकीकत तो आपण होऊन अस्खलितपणे देतो पूर्वी मुळीच तयारी नसताना याप्रमाणें सुसंबद्ध भाषण करणारा वक्ता विरळाच आढळून येईल.

एक महत्त्वाची गोष्ट सागावयाची राहिली ती ही की, या सर्वज्ञ प्राण्याला स्वत चे वय मुळीच माहीत नसते. एखादा तरणा बाड स्वतःस मरणाच्या दारीं बसलेला समजतो, तर एखादा थेरडा स्वत.स विशीच्या आतच मानीत असतो पण साक्षीदाराच्या वयाची माहिती न्यायाधीशास चागली असते त्याच्या कागदपत्रावरून असे खात्रीलायक समजते, की या प्राण्याचे वय नेहमीं पाचाच्या बाराखडीत असते उदाहरणार्थ, एखाद्या साक्षीदाराचे पस्तिसावें वर्ष सपले की, इतर क्षुद्र जतूप्रमाणें छत्तीस, सदतीस इत्यादि मधल्या पायऱ्यावर पाय न ठेविता तो एकदम चाळिसाव्या वर्षांत प्रवेश करून दस्तऐवज वाचण्याकरिता चाळिशी विकत घेतो !

साक्षीदार जबानी देताना बहुतकरून वर आढ्याकडे पहात असतो, जणू काय आपला खरेंपणा जाहीर करण्याकरिता तो त्रिकालज्ञानी ईश्वरास आव्हानच करीत आहे त्याचप्रमाणें बोलताना तो सारखा खोकत किंवा खाकरत असतो पण हा परिणाम बहुतकरून चिलीम ओढण्याचा असावा. व्यसनी लोकानी यापासून अवश्य धडा घ्यावा.

मुष्टि १ ली*

# कुलूप

कुलपासारखा रखवालदार त्रिभुवनात सापडणार नाहीं त्याच्यापुढें पैशाची तिजोरी ओतली तरी त्यानें दारास मारलेली मगरमिठी सुटावयाची नाही, किंवा स्त्रियाच्या नेत्रकटाक्षानी त्याचे लोखडी हृदय विरघळावायचे नाही. पहारा करिताना त्याला डुलकी लागत नाहीं किंवा भूक-तहानेची बाधा होत नाही त्याला उन्हाचा किंवा शीताचा कधी त्रास होत नाहीं. लोहाराकडून त्याच्या हृदयावर प्रहार करून तें छिन्नभिन्न केले तर मात्र त्याचा नाइलाज होतो जुन्या रोमन शिपायाप्रमाणें चाकरी बजाविता बजाविता मरण्याचें त्याचें ब्रीदच असतें.

परतु या जगात सर्वगुणसपन्न असे काहींच नाही, या नियमास बिचारें कुलूपच अपवाद कसे असणार ? वरील गुण अगीं येण्यास जी बुद्धिशून्यता कारण होते तिच्याचमुळे कधीं कधीं त्याच्याकडून विलक्षण प्रमादही घडून येतात. त्याचें काम बहुतकरून कडी व कोयडा या जोडप्याला वियोग न होऊ देणे हें असते, परतु एखाद्या चोराने कडी कानसून दोघाची ताटातूट केली तर कुलपाकडून फारशी हरकत होत नाही ! तसेंच कडीचे अग कुलपापेक्षा रुद असल्यास तिच्यामधून ते काढिले असताही हा सर्व चमत्कार तें स्तिमित वृत्तीनें पहात बसतें ! कधी कधी पेटीच्या फळ्या हत्यारानी उकलून टाकिल्या तरी त्याला त्याची दाद नसते, व कधीं कधी तर कुलपासकट पेटी पळविली तरी, तें त्याच्या मुळीच गावी नसते ! जणूं काय कोणताही प्रसग आला तरी आपली जागा न सोडता, त्या प्रसगास पाठ देण्याचा त्याच कृतनिश्चय झालेला असतो ! पण कुलपासारख्या दृढनिश्चयी व बाणेदार प्राण्यासही स्थानभ्रष्ट होण्याचा कधीं कधी प्रसग येतो तो कोणामुळें येतें हे ख्रिस्ती धर्मपुस्तकाच्या वाचकास सागावयास नकोच. त्या पुस्तकाप्रमाणे मानवजातीच्या मूळ पुरुषाचा अधःपात झाला तो केवळ स्त्रीमुळें कुलपाच अधःपात होण्यासही त्याची स्त्री किल्लीच कारणीभूत होते, व चमत्कार हा

---

* वि. विस्तार, पु, ३४, अक १ [ सन १९०३ ]

की ॲडमचा नाश जसा ईव्हच्या फाजील जिज्ञासेमुळे झाला तसा कुलपाचा स्थानभ्रंशही किल्लीच्या अतिजिज्ञासेमुळेच होतो ही विचित्र स्त्री पतीच्या पोटात शिरून आतील खाचाखोचांची पूर्ण माहिती करून घेते, व अंती हृदय काबीज करून पतीच्या निश्चळपणाचा भग करून टाकिते फार काय सागावे, या स्त्रीचा पतीवर इतका पगडा असतो, कीं ती अतरल्यास कुलूप आपल्या धन्याला सुद्धा दाद देत नाहीं !

किल्ली कुलपाच्या उजव्या बाजूस फिरली म्हणजे तें बद होते, व डाव्या बाजूस फिरली म्हणजे त्याची कळी खुलते स्त्री ही पुरुषाची अर्धांगी असून तिचें स्थान त्याच्या डाव्या अंगास आहे, व मनुष्याच्या हृदयाचें ठिकाण त्याच्या छातीच्या डाव्या बाजूस असतें, या कल्पना आपण बहुतकरून कुलपावरूनच उचलल्या असाव्यात.

कित्येक कुलपे शेवटपर्यंत अविवाहित राहतात. हे ऐकून आमचे धर्माभिमानी आर्यपुत्र चकित होऊन म्हणू लागतील, 'लहानपणीं चतुर्भुज न होता आजन्म ब्रह्मचर्यांत आपलें आयुष्य दवडणें म्हणजे केवढा मूर्खपणा ! सोळाव्या वर्षीं ससार करावयास लागून पोराची खानेसुमारी करीत करीत तिसाव्या वर्षीं पोक्त होण्याचें साध्य असता, अशा अकालपरिपक्वतेवर लाथ मारून आपली शक्ति व स्वतत्रता कायम ठेवणे हे केवढे धाडस ! कुलपामध्ये असा भ्रष्टाकार असलाच तर तो परदेशस्थ कुलपात तरी असला पाहिजे, किंवा या देशातील कुलपात असल्यास ती कुलपें निदान शिकलेली तरी असलीं पाहिजेत ' आमच्या धर्माभिमान्याच्या चातुर्याची आम्ही तारीफ करितों. कारण, या ब्रह्मचारी कुलपाना खरोखरच अक्षराचा सस्कार झालेला असतो. त्याना अक्षरे मुखोद्गत असून अक्षरी कुलपें [ Letter Locks ] अशी सज्ञा आहे आमच्या दुर्धारक बंधूंचे समाधान व्हावे म्हणून आम्ही असेंहि खात्रीपूर्वक सागतों, कीं अशा काहीं बाटग्या कुलपाचा धर्मलंडपणा बाजूला ठेविला तर इतर कुलपे मात्र विवाहाच्या बाबतींत आर्यभूमीस पूर्णपणें शोभण्यासारखींच असतात, म्हणजे प्रत्येक कुलपास एका वेळीं दोन दोन किल्ल्या विकत मिळतात, शिवाय दोन्ही हरवल्यास तिसरी करण्याचीही त्याना धर्माज्ञा आहे.।

आमच्या बडूनानाना कुलपाचा मोठा शोक अनेक धातूंची, अनेक आकाराची, अनेक कळींचीं किती तरी कुलपें जमवून त्यानीं एक संग्रहालयच बनविलें आहे. घरात दूधदुभत्याच्या पेटीपासून तो तहत पैशाच्या तिजोरीपर्यंत व धान्य साठविण्याच्या कोठडीपासून तों थेट त्याचा निकाल करण्याच्या कोठडीपर्यंत [ यावरूनच कदाचित् उच्च प्रतीच्या खतास सोनखत हें नाव पडलें असावें. ] प्रत्येक ठिकाणीं त्यानीं कुलपें लावून नाकेबंदी करून टाकिली आहे ! घरावर एखादा डाका पडणार आहे अशी बातमी कळूनहि कोणी इतकी तयारी करीत नसेल ! बरें, इतका बंदोबस्त करण्याचें कारण विचाराल तर तें, आपल्या चीजवस्तूचें रक्षण व्हावे ही इच्छा नसून, कुलपाचा संग्रह मित्रमंडळीच्या नजरेस पडावा एवढेंच आहे या हव्यासामुळे बडूनानानीं काहीं कड्यास दोन दोन, व काहीं दारास दोन्ही बाजूनीं कुलपें लाविलेली आहेत.

एवढा खटाटोप करून ठेविल्यामुळे बडूनानावर अनेक चमत्कारिक प्रसंग आले आहेत एकदा त्याच्या धान्याच्या कोठीच्या कुलपाची किल्ली त्याच्या कुटुंबाने हरवली कुलूप जरासें विजातीय असल्यामुळें त्याला किल्ली शोधण्याकरिता त्यानी सगळा बाजार पालथा घातला तरी किल्ली मिळेना. बरें, कुलूप लोहाराकडून फोडवावे तर पोटच्या पोरापेक्षाही ममतेनें वागविलेल्या कुलपाची हाडें खिळखिळी होताना पाहणे हे बडूनानासारख्याना जरा दुर्घटच होतें शिवाय गृहस्थ इतका मानी, कीं त्याने शेजाऱ्यापाशीं कधीं पसाभर धान्यही उसनें मागितलें नव्हते असो, अशा रीतीनें पहिला दिवस तर घरातील सर्व मंडळीनें त्या कुलपानिमित्त कडकडीत उपास काढिला पण त्या दिवशीं एकादशी असल्यामुळे उपासाचें सर्व श्रेय धार्मिकपणाकडेच गेलें ! दुसऱ्या दिवशी द्वादशी असता तो दिवसही सगळ्यांनी तितक्याच धार्मिकपणानें उपासात काढिला. नानाचे तर डोळे पांढरे होण्याची वेळ आली. शेवटीं ही सर्व हकीकत कळतांच आम्ही स्वत लोहारास बरोबर घेऊन नानाच्या घरीं गेलो व ते कुलूप एकदाचें फोडिलें. पण त्यामुळे नानाचा आमच्यावर इतका घुस्सा झाला कीं, ते पुढें पंधरा दिवसपर्यंत आमच्याशीं नीटपणे बोलेनातच !

तीन दिवस तर त्यानीं त्या मोडक्या कुलपाकरिता अशौच धरिले होते ! व त्या तीन दिवसात अनेक वेळा त्याचे प्रेमानें चुबन घेताना अनेकानी त्याना पाहिले आहे !

बडूनाना आपल्या उपयोगातील सर्व किल्ल्या आपल्या जानव्यास अडकवून ठेवीत असल्यामुळे त्या कधीं हरवत नाहींत हरवतात त्या बहुतकरून त्याच्या कुटुबाच्या ताब्यातील किल्ल्या वरील अनर्थ गुदरल्यापासून ते कुटुबाच्या स्वाधीन साधी बाजारी कुलपेच करू लागले. ही कुलपे किल्लीच्या बाबतीत काहीच विधिनिषेध बाळगीत नसत त्याना कोणतीही किल्ली, खिळा किंवा काडी चालत असे. कधी कधी तर नुसत्या हिसक्यानेच ती उगडत असत ! अमुक एक किल्ली समोर आली तरच मी मोकळेपणाने वागेन, अशा तऱ्हेचा एककल्लीपणा किंवा हेकेखोरपणा त्याच्या अगीं मुळीच नव्हता त्याची अशी ' वसुधैवकुटुबक ' वृत्ति पाहून शेवटी नानाच्या पदरच्या एका विश्वासू नोकरालाही चोरी करण्याची इच्छा झाली, व तो हजार पाचशाचे डबोलें घेऊन पळून गेला तेव्हापासून नाना आपल्या बायकोस जास्त नीतिमान् कुलपें देऊ लागले. एकदा मुबईकडील एका विद्वान् गृहस्थानीं बायकाच्या मुजी करून त्याच्या गळ्यात जानवी अडकविण्याचा बूट काढिला होता. तो आमच्या नानास इतका पसत पडला की, त्यानीं त्याच्याकडे एक समतिप्रदर्शक पत्रही पाठविले ते बहुतकरून किल्ल्या राखण्याच्या कामीं जानव्याचा जो उपयोग होतो तो ध्यानी आणूनच लिहिले असावें

तिजोरीला कोणते कुलूप लावावयाचें याचा बडूनानाना फार दिवस प्रश्न पडला होता. प्रथम त्यानी अक्षरी कुलूप लाविले पण तिजोरी अधारात असल्यामुळें कुलपाची अक्षरे जमविताना नीट दिसेनातच म्हणून त्यानी तिजोरी महाप्रयासाने उजेडात आणून ठेविली पण तेव्हापासून अक्षरें जुळविताना ती त्याजप्रमाणें जवळ उभे रहाणारासही दिसू लागली तेव्हा, ' शिकलेल्या लोकाप्रमाणेंच शिकलेली कुलपेही कुचकामाची असतात, यापेक्षा अक्षरशत्रु कुलपें पुष्कळ बरीं ' असा आधुनिक शिक्षणावर टोला देत देत त्रासानें त्यानीं त्या कुलपाच्या ऐवजीं दुसऱ्या कुलपाची योजना केली. हे कुलूप नुसते दाबिलें कीं लागत असे. उघडताना मात्र त्याला किल्लीची जरूर

लागे. एके दिवशी बहूनाना आम्हाकडे हर्षित मुद्रेनें येऊन म्हणू लागले, ' आमच्या आर्यभूमीच्या पुत्राना कल्पकता नाही म्हणून चोहोंकडे ओरड चालू आहे, पण हा आरोप निव्वळ खोटा आहे. अहो, आम्हाला संधि मिळत नाही सधि ! ती मिळती तर आम्हामध्ये शेकडोशें एडिसन झाले असते ! ' देशाभिमानाच्या या उकळीचा अर्थ विचारिता, बहूनानानी प्रथम आपली कोणत्याही प्रकारे स्तुति करणार नाही असे आम्हापासून वचन घेतलें व नतर लोहाराच्या मदतीनें त्यानी स्वत तयार केलेले एक कुलूप दाखविलें. ते म्हणाले, ' या कुलपाची कल्पना मला आमच्या तिजोरीच्या कुलपावरून सुचली या कुलपाचे गुणधर्म त्या कुलपाच्या अगदी विरुद्ध आहेत. त्या कुलूपास उघडण्याला किल्ली पाहिजे-याला लाविताना मात्र पाहिजे ते कुलूप नुसतें दाबून लावता येते - माझे नुसत्या हिसड्यासरसे उघडते हे कुलूप मी आता तिजोरीला लावून पूर्वीचे काढून टाकणार '

हा अकल्पित प्रकार ऐकून आम्ही नानाचे मन वळविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण ज्याचे नाव ते ! नानाच्या अगी दृढनिश्चय हा एक अलौकिक गुण आहे. ' आपल्या लोकात कोणत्याही कलेला उत्तेजन नाही ' अशी पुटपुट करीत त्यानी ठरलेला बेत लागलीच अमलात आणिला. थोड्याच दिवसात आमच्या अनुमानाप्रमाणे तिजोरीची चोरी झाली तेव्हा तर नानाचा तिळपापड झाला. ते म्हणाले, ' आमच्याकडे चोर सुद्धा देशबुडवे व कलेला आश्रय न देणारे असतात ! '

ह्यानतर नानानी तिजोरीस घंटेचे कुलूप लाविले व ती आपल्या निजावयाच्या खोलीत नेऊन ठेविली ते म्हणाले, ' आता मात्र चोर माझ्या हातीं नि.सशय सापडणार. बेट्यास कळणारसुद्धा नाही, कीं किल्लीचा प्रयोग सुरू होताच घटा वाजावयास लागून घरातील सर्व मडळी जमतील, व तत्काळ कोतवालचावडी दिसेल ! तिची झोंप जरी फार गाढ असते, तरी माझी झोंप चागली सावध आहे फार काय सागूं, माझें घोरणें सुद्धा मला झोंपेंत स्पष्ट ऐकू येतें घाटेच्या पहिल्या आवाजाबरोबर मी ताडकन् उठून त्याच्या मानगुटीस बसलोच समजा ! ' हा विचार आम्हालाही फार पसत पडला. असो

ज्या दिवशी तें कुलूप लावण्याचा बेत ठरला, त्याच दिवशी रात्रीं आम्हाला घंटानाद ऐकू आल्यामुळे आम्ही धावतच बडूनानाच्या निजाव-वयाच्या खोलींत गेलो तों काय चमत्कार सांगावा! बडूनाना स्वत: उजव्या हाताने तिजोरीचे कुलूप उघडीत असून डाव्या हाताने उजवा हात जोरानें पकडून 'चोर, चोर!' म्हणून ओरडत आहेत।

यानतर लवकरच आमच्या गावात एक बलुची लोकाची टोळी आली त्याच्याजवळ चाकू, सुऱ्या, कुलपे वगैरे बरेच जिन्नस विकावयाकरिता होते त्याच्याजवळची बहुतेक कुलपे बडूनानानीच विकत घेतली, व घरातील सर्व जुनी कुलपे काढून त्यानी त्याच्या जागी या नवान कुलपाची स्थापना केली. कर्मधर्मसयोगाने एक नाटकमडळीही याच सुमारास आमच्या गावात आलेली होती. तिचा पहिला प्रयोग 'सुभद्राहरण अथवा चौर्यविपाक' त्याच दिवशी होता यास्तव आपली सर्व मडळी बरोबर घेऊन बडूनाना निर्भय चित्तानें नाटकाला गेले. जाताना त्यानी म्हटले सुद्धा, की "आता चोराना म्हणावे, 'या, कशी चोरी करता ती पाहू तुमच्या बापजन्मी सुद्धा अशी तऱ्हे-तऱ्हेची कुलपे तुम्ही पाहिली नसतील!"'

नाटक सकाळी पाच वाजता आटपलें नाना परत येऊन पहातात तो सर्व पेट्याची कुलपे जशीच्या तशी असून आतील माल मात्र चोरीस गेलेला! शोध करिता बलुच्याचा तांडाही पळून गेलेला आढळला त्यावरून उघड असे अनुमान निघाले, की बलुची लोकानी बिचाऱ्या भोळसर नानाकडे आपली सर्व कुलपें खपवून पुढे रात्रीं अनायासे त्यानी स्वत च्याच किल्ल्या चालवून माल लाबविला! सुदैवाने त्या रात्री बडूनानाचे कुटुब त्याच्या ताकिदसि न जुमानता आपले सर्व दागिने अगावर घालून नाटकगृहात गेलें होतें, त्यामुळे तेवढें मात्र बचावलें यापुढे बडूनानास नेहमीं त्याच्या कुटुबानें टोमणा द्यावा, की 'दागिने घालणाऱ्या माझ्या हौशीबद्दल आपण सदा मला दोष लावीत होता. पण शेवटीं आपल्या कुलपापेक्षा माझ्या हौशीनेच आपल्या मिळकतीचा बचाव केला!'

बिचारे बडूनाना तरी यावर काय बोलणार? त्याच्या तोडाला आपो-आपच कुलूप बसलें!

---

## मुष्टि ३ री*

# शिमगा

आपल्या धोरणी पूर्वजानी आपल्या हिताकरिता ज्या कित्येक उपयुक्त संस्था काढाल्या त्यापैकींच शिमग्याचा सण ही एक आहे

बाह्यात्कारी निरर्थक किंवा अनीतिकारक दिसणाऱ्या गोष्टीत सुद्धा किती चागला भाग असतो हें शोधून काढण्याचा मला अलिकडे बऱ्याच दिवसापासून नाद लागला आहे याचे सर्व श्रेय प्रो०—याच्याकडे आहे. हे प्रोफेसरसाहेब दोनतीन वर्षांपूर्वी आमच्या गावीं आले होते, तेव्हा त्यानी सुरस व्याख्याने देऊन आमची अगदी बालबाल खात्री करून दिली, की इग्रजी सुधारणात नवीन असें काहीं नाही 'अग्निमीळे पुरोहित' या वैदिक मत्रावरून, आपल्या पूर्वजाच्या वेळीं आगगाड्या अस्तित्वात होत्या असें त्यानीं सप्रमाण शाबीत करून दाखविलें तसेंच तारायंत्र, टपाल वगैरे सर्व काहीं पुरातन आहे असेही त्यानी सागितलें त्याच्या वक्तृत्वानें श्रोतृजन आनदानें सारखा टाळ्याचा गजर करीत राहिला, इतका, कीं व्याख्यात्याचें भाषणही शेवटीं ऐकू येईनासे झालें. तरी पण त्याच्या विधानावद्दल आमची खात्री होतच होती मधून मधून व्याख्याते आपला आवाज उचावून 'वेदात बूटपाटलून आहे', 'स्मृतींत चष्मे आहेत', 'अगस्त्य ऋषींनी सोडावाटरचा कारखाना काढला होता,' वगैरे मुद्द्याचीं वाक्ये मोठ्यानें सागत, तीं मात्र स्पष्टपणें ऐकू येत शेवटी त्यानीं पूर्वीचे ऋषि मद्यमास सेवीत असत असें ठरविलें, तेव्हा तर आमचा आनंद पोटात मावेना आम्ही सुधारक सभासदाकडे तिरस्कारानें पहावयास लागलों 'ह्या उन्मत्त सुधारकाना वाटतें, कीं दारू व मास हीं यानीं नवीनच काढलीं. पण यांना एवढेंही ज्ञान नाही, कीं वशिष्ठ ऋषी जेवताना सबध बैल पार करीत, व इंद्र तर उल्लू होऊन गटारात पडला होता या टारग्या लोकाचे सर्व प्रकार आमच्या पूज्य पूर्वजांनीं उष्टे करून टाकले आहेत.' अशा आशयाचे उद्गार चोहोंकडे ऐकू येऊ लागले, व शेवटी टाळ्याचा प्रचड गजर होऊन सभा बरखास्त झाली

---

* वि. विस्तार, पु ३४ अक ५-६ [ सन १९०३ ]

या सभेनतर लवकरच एक दारूचे व खाटकाचे दुकान आमच्या गावं उघडलें. तेव्हापासून आजपर्यंत त्याची सारखी भरभराटच चालू आहे व अनेक धर्माभिमानी लोक आपल्या सन्मान्य पूर्वजाचा कित्ता उचलून सुधारकावरही ताण करीत त्याना खाली पहावयास लावीत आहेत या रीतीने आमच्या येथील सुधारकाचा पूर्ण मोड झाला आहे या दुकानाच्या मालकाने अलीकडे असें उठविले, की प्रोफेसरमजकुराना त्यानेंच पैसे देऊन आमच्य गावी व्याख्याने देण्यास पाठविले होतें पण हा निव्वळ खोटा आळ आहे हें माझ्यासारख्या काहीं शेलक्या लोकानीं तेव्हाच ताडलें, व सदरहू गुत्ते वाल्याचा पाडाव करण्यासाठी दुसरे एक दारूचे दुकान त्याच्यासमोरच आणविले आहे याचीही भरभराट पहिल्या दुकानाप्रमाणेच सुरू आहे. या गोष्टीवरून, खऱ्या पक्षाचा नेहमी जयच होतो, हे माझ्या मार्मिक वाचकाऱ्या तेव्हाच लक्षात येईल

प्रोफेसर मजकुरानीं असेंही सागितलें, की आपल्या दूरदर्शी पूर्वजानी सोंवळें नेसण्याची कल्पना काढली यावरून, रेशमाच्या ठायीं वीज रहाते हे शास्त्रीय तत्त्व त्याना चागलें माहीत असले पाहिजे. यापूर्वी विजेचें मुकट्याच्या ठेकाणचे अस्तित्व मला ऐकूनही माहीत नव्हते. पण व्याख्यानाच्या देवशीं माझी इतकी खात्री झाली, कीं दुसरे दिवशी मला मुकटा नेसण्याचे धाडस होईना वाटे, की न जाणो निऱ्या करता करता वीज चमकून तिनें मला भस्म करून टाकिले, तर माझे देशहिताचे विचार जागचे जागीच रहातील माझ्या स्वतःच्या जिवाबद्दल मला मुळीच पर्वा नव्हती, पण माझ्या देशाबद्दल मला वारवार हळहळ वाटे असो याप्रमाणे मी विजेच्या भीतीनें दोन दिवस आजाराचे मिष करून ओंवळ्यानेंच अन्न खाल्लें. चिंतेमुळें पोटात अन्नही नीटपणें जाईना, यामुळे माझा दुखण्याचा बहाणा घरच्या मडळीस खराच वाटला सरते शेवटी आमच्या गावात एक पदार्थविज्ञानशास्त्री होते. त्याना विजेवर उपाय विचारिला मात्र त्याच्यापाशी सोंवळ्यासबंधानें एक चकार शब्दही काढिला नाही. त्यानी असे सागितल कीं ज्या पदार्थावर वीज पडण्याची भीति असेल तेथून जमिनीत एक तार लावी म्हणजे विजेची बाधा होणार नाही अशा प्रकारें आश्वासन

मिळतांच मी स्वस्थ चित्ताने घरीं आलों व जेवण्याच्या पाटाजवळ एक लहानसे छिद्र पाडून त्यात लाबवर पोहोंचेल अशी एक तार विकत आणिली. तेव्हापासून ती तार माझ्या करगोट्याला अडकवून व छिद्रात सोडून नंतर मी पाटावरच मुकटा नेशीत असे व हें रहस्य इतरांना समजू नये म्हणून अगावर शालजोडी घेऊन जेवावयास बसत असे दुखण्यानतर शालजोडी घेणें योग्यच होतें, त्याअर्थीं आमच्या घरच्या मडळीस त्याने सशय आला नाहीं पुढें एके दिवशीं एक लहान उदीर मीं केलेल्या तारायंत्राच्या मार्गानें शालजोडीच्या आत प्रवेश करून घेऊन माझी पाठ कुरतुडू लागला, त्यासरसा घाबरून मी पाटावरून ओरडत उठलो, व त्या वेळीं माझें सर्व बिंग बाहेर पडलें ! पण या फजितीमुळे एक फायदाही झाला विजेविषयींची माझी सर्व भीति पार नाहींशी झाली. तेव्हापासून अंड्रोक्लीज व सिंह जसे गुण्यागोविंदाने नांदत होते तसेच मी व माझा मुकटा नादूं लागलों; व त्याच्या निऱ्या करणें, त्यास हिवाळ्यात पाठीवर घेणें वगैरे सलगीच्या गोष्टीही मी पूर्ववत् करू लागलों इतकेंच नाही, तर मुकाट्याच्या अगी विजेप्रमाणें प्रकाश पाडण्याचा गुण आहे कीं नाही याची परीक्षा पहाण्याकरिता प्रयोग करण्यापर्यंतही मी मजल आणली एका अवेऱ्या रात्री मी एकटाच मुकटा घेऊन बाहेर पडलों व मुकट्याच्या आतील वीज भोंवतालच्या वस्तू प्रगट करील म्हणून चोहोंकडे डोळे ताणून पाहू लागलो. अशा स्थितीत चालता चालता पायास ठेंच लागली, शिवाय विजेनें दाखविलेले पदार्थ हुबेहुब दिसतात याची कसोटी पाहण्याकरिता जवळ कदीलही नव्हता, यास्तव निरुपायाने घरी परत आलों. दुसऱ्या दिवशीं रात्रीं कंदील घेऊन निघालो, तो काय चमत्कार सागावा ? रस्त्यावरील खडान् खडा स्पष्ट दिसूं लागला, मग ठेचाळणें तर दूरच राहिलें हा सर्व विजेचा चमत्कार प्रत्यक्ष डोळ्यानीं पाहताच आपल्या पूर्वजाच्या बुद्धिमत्तेबद्दल मला जो आदर उत्पन्न झाला तो या घटकेपर्यंत कायम आहे.

असो, तर अशा प्रतीच्या धोरणी पूर्वजानी निर्माण केलेल्या शिमग्याचा सण तरी अहेतुक असेल कसा ? माझ्या मतें शिमग्याच्या मुळाशीं असणारे सद्धेतु चार प्रकारचे आहेत. एक ऐतिहासिक, दुसरा तात्विक, तिसरा

आरोग्यविषयक व चवथा नीतिविषयक आपळी मूळची रहाणी किती विचित्र असे हें दाखविण्याचा हेतु ऐतिहासिक सदराखालीं येतो. साहेब लोक पूर्वी रंग लावून नागडे उघडे हिंडत असत हें आमच्यामधील सन्मान्य पत्रानीं अनेक वेळा जाहीर केलें आहे. पण कृत्रिम रग तयार करून तो अंगाला फासणे ही किती झालें तरी अलीकडची कल्पना ! आपल्या सुवर्ण-भूमीची आयती तयार असलेली धूळ व निसर्गनिर्मित शेण अगास उटीदाखल लावून चोहोकडे भटकणें ही त्या कल्पनेवरची कडी झाली ! नुसत्या या एका गोष्टीवरूनच आमचें पुरातनत्व शाबीत होत आहे यापुढें पाश्चात्य इतिहासकारानीं आमच्या देशाच्या जुनेपणाबद्दल किती जरी सशय घेतले तरीं ते रद्द होत. ते सफई दूर करण्याला केवळ आमच्या पाचजन्याचा ध्वनि पुरेसा आहे !

दुसरा हेतु तात्त्विक. सर्व वस्तूचा शेवट मरणात व्हावयाचा हे दाखविण्याचा आमच्या पूर्वजाचा हेतु असावा वर्षाचा आरभ गुढ्यातोरणात व त्याची अखेर धुळींत, होळीत, शंखध्वनींत व प्रेतसंस्कारात होते, यावरून अल्लड लोकाना किती तरी बोध घेण्यासारखा आहे ! असें उदात्त तत्त्व आम्हापुढें साध्या स्वरूपानें व आडपडदा न ठेवता माडल्याबद्दल मी आमच्या पूर्वजाचे अनत उपकार मानितों. या सणात बायकाना मिसळण्याची परवानगी ठेवली असती तर त्यापासून होणारा फायदा शतपट वाढला असता असें माझ्या अल्प बुद्धीला वाटतें

तिसरा हेतु आरोग्यविषयक. पूर्वी हल्लींप्रमाणे कमेट्या नव्हत्या, सबब वर्षभर साचलेली घाणीचीं डबकीं कृत्रिम उपायांनीं उपसावीं लागत, व अशा उपायापैकींच शिमगा हा एक सर्वसामान्य उपाय आहे हल्लींच्या धर्मभ्रष्ट काळात सुद्धा धुळवडीच्या दिवशीं गटारें जितकीं स्वच्छ दिसतात तितकीं वर्षातून एक दिवसही दिसत नसतील. यावरून सुधारलेल्या देशांतील कायदेकानूंपेक्षां केवळ धर्माज्ञेनें प्रसंगीं केवढें कार्य होतें हें सहज दिसून येतें. याशिवाय चोहोंकडे होळ्या पेटविल्यानें हवा स्वच्छ होते, पाचजन्य केल्यानें फुपफुसें साफ होतात, व शेणाच्या शिडकावानें आरोग्य वाढतें हें कोणीही डाक्टर कबूल करील. आमच्या पूर्वजास आरोग्य-शास्त्राचें व शारीर शास्त्राचें फार मार्मिक ज्ञान होतें हें सूक्ष्म निरीक्षण

करणाऱ्या कोणाही समजस मनुष्यास उघड दिसून येईल. ज्या इसमास तें दिसणार नाही तो एक तर समजस नसला पाहिजे किंवा त्याचें निरीक्षण तरी सूक्ष्म नसले पाहिजे

आता राहिला नैतिक हेतु शिमग्यात नीति हुडकून काढण्याचा माझा उपक्रम पाहून थिल्लर सुधारक लोक दात विचकू लागतील. पण 'हाथी चाले अपनी चालने, कुत्ता भुकत वाको भुकवा दे!' या सदुक्तीकडे लक्ष देऊन मी माझ्या म्हणण्याचा खुलासा करितों इग्रजी शास्त्रात असा एक नियम आहे, की कोणतीही क्रिया झाली, की तिच्या मागोमाग प्रतिक्रिया व्हावयाचीच आता येथे कोणी असा आक्षेप घेतील, कीं एखाद्या आप्ताच्या मरणानतर जी क्रिया करितात तिच्या पश्चात् कोणती प्रतिक्रिया घडते? ही शका मी माझ्या नेहमीच्या वहिवाटीस अनुसरून 'क्रिया' या शब्दाची व्याख्या न दिल्यामुळेच उद्भवली असून तिचे समाधान फार सोपे आहे. एक तर 'क्रिया' शब्दाचा या ठिकाणी अर्थ 'मरणोत्तर संस्कार' असा नसून 'कृति' असा आहे उदाहरणार्थ, चेंडूकडून जर जमिनीवर आपटण्याची कृति झाली तर लागलीच जमिनीचाही चेंडूवर उत्सारणरूप संस्कार घडतो दुसरे असे, की क्रिया शब्दाचा पूर्वोक्त अर्थ जरी घेतला तरी अनेक साथींनी त्रस्त झालेल्या हल्लीच्या काळी तोही चालण्यासारखा आहे. बद्यातापानें मेलेल्या आप्ताची क्रिया जो एखादा मनुष्य करू लागतो तो त्याची स्वतःची क्रिया करण्याचा प्रसगही लवकरच येतो एवच क्रियेचा व प्रतिक्रियेचा असा कार्यकारणसंबंध आहे.

आता हा न्याय शिमग्यास लागू करावयाचा. जर एखादा मनुष्य नेहमीं सभ्यपणानें वागू लागेल तर त्याला एखादे वेळी तरी असभ्य वर्तन करावेंसें वाटणारच. उदाहरणार्थ, द्रौपदीसारखी साध्वी स्त्री, की जी केवळ पाचच पतीबरोबर एकनिष्ठपणें वागत असे, तिलासुद्धा कर्णाविषयीं अभिलाष उत्पन्न झालाच. हा सारा प्रतिक्रियेचा प्रभाव! त्याचप्रमाणें आम्ही जर नेहमीं अगास अत्तरें व उटणी लावून स्वच्छपणानें राहू तर आम्हालाही एखादे वेळीं गटारात लोळावेंसें वाटणारच फार कशाला? कित्येक पाश्चात्य लोक आणि सुधारक नेहमीं शिमग्याची थट्टा करून निर्मळपणें वागतात; पण ते

सुद्धा शेवटीं गटारांत पडतातच कीं नाहीं ? त्याचप्रमाणे आम्ही सदोदित जर सभ्य तऱ्हेचे भाषण करू लागलो तर एखादे वेळीं तरी अभद्र शिवी द्यावीशी आम्हाला वाटणारच नेहमी जर आम्ही घोड्यावर स्वारी करू लागलों तर द्रौपदी ज्याप्रमाणें कर्णाला भाळली त्याप्रमाणें आम्हींही लबकर्णाला भाळणारच. उलट पक्षी जी बीभत्स गोष्ट प्रतिक्रिया म्हणून हटकून होणार ती जर आपण आपखुषीनेंच स्वीकारली तर ती क्रियेच्या ठिकाणी होऊन बसेल व तिची प्रतिक्रिया, अर्थात् सभ्य वर्तन, सभ्य भाषण ही होऊन बसतील वर्षातून तीनचार दिवस आम्ही होऊनच जर डबक्यात पोहू लागलें, उकिरड्यात लोळू लागलो, आपल्या मित्रानाच आईबापावरून शिव्या देऊ लागलो, गाढवावर मिरवणुकी काढू लागलो व शखध्वनीनें सगळे आकाश दणाणून टाकू लागलो तर, लवकरच आम्हाला या साऱ्या गोष्टीचा वीट येऊन जाईल, व नतर उभ्या वर्षात एकही असभ्य गोष्ट आमच्याकडून होणार नाहीं. चोराच्या उलट्या बोंबा जशा फलद्रूप होतात तशी क्रियेची जागा पटकाविलेली प्रतिक्रियाही झाली पाहिजे वर दिलेल्या उदाहरणात द्रौपदीनें पहिल्यानेच कर्णाशी पत्नीप्रमाणें वर्तन केले असते तर तिला त्याबद्दल वाईट वासना कधीही उत्पन्न झाली नसती. स्वतः माझेच उदाहरण घ्याना ! मी शिमग्याचा सण लहानपणापासून निस्सीम भक्तीनें पाळीत असल्यामुळे माझ्या तोडीं हल्ली पाचदहा ठरीव शिव्याखेरीज एकही शिवी नाही, व गटारात एखादे वेळीं पडलोंच तर शिमग्यातल्याप्रमाणें मुद्दाम न पडता वर सांगितलेल्या दुकानास उदार आश्रय दिल्यामुळे बेशुद्ध स्थितीत पडतो पूर्वजाचें अनुकरण करण्यात एखादे वेळी अशा तऱ्हेचे स्खलन—व तेंही जाणूनबुजून नव्हे—झाल्यास ते क्षम्य आहे हे उघड आहे

आमच्या गावांत इतर सणाप्रमाणें शिमग्याबद्दलही गावकऱ्यामध्यें पूज्यबुद्धि असल्यामुळें हा सण मोठ्या प्रमाणावर साजरा करण्यात येतो या सणापूर्वी एक महिन्यापासून लहान मुलाना अचकटविचकट लावण्याची व अभद्र शब्दाची तालीम देण्यात येते. त्याचप्रमाणें शेणाचे गोळे अचूक कसें मारावे, पाचजन्याचे प्रकार किती आहेत, मोऱ्यातील पाणी पिचकारीनें थोड्या अवकाशात पुष्कळ कसें सोडावें, अभद्र शब्दांचे छाप तयार करून

पाठीवर कसें उठवावे याचेंही आस्थापूर्वक शिक्षण दिलें जातें गणपतीच्या मेळ्यांतील पोराना जशी कवाईत शिकविली जाते, तशी शिमग्याकरिता पोरें तयार करितानासुद्धा त्याना एकेका रांगेत पाचपाच अशीं उभी करून मोहरक्याने शीळ फुंकरल्याबरोर पाचजन्याची सरबत्ती एकदम कशी उडवावी याची तालीम चागल्या रीतीने देण्यात येते. आमच्या पक्षाचे अग्रणी बडूनाना व विरुद्ध पक्षाचे पुढारी पाडूतात्या असावयाचे. परतु बडूनानाची प्रत्येक कामात शिस्त असल्यामुळें आमच्या पक्षाची नेहमीं सरशी असावयाची वर वर्णिलेली कवाईत शिकविल्यानतर शेणगोळा जमा करण्याकडे अनेक हुशार माणसाची नेमणूक होते ती माणसे गावात रस्तोरस्ती व गल्लोगल्ली साचलेले शेण जमा करून एक मोठा साठा तयार करितात. काहीजण दिवसभर गुराच्या मागे राहून शेण गोळा करितात, व कित्येक तर गुराना बडवून आपली खडणी वसूल करितात ! अशा रीतीनें शेण जमल्यावर त्यावर पहारेकरी नेमण्यात येतात, व नतर जमलेल्या शेणाचे लहान लहान गोळे करून त्यात गोटे भरण्याचें महत्त्वाचे काम कित्येकाकडे देण्यात येतें.

बरें, आमच्या सैन्यात नुसते पायदळ व तोफखाना एवढेच असतें असें नाही कुंभाराकडून बरीचशी गाढवे जमवून त्याचीही एक पलटण तयार करण्यात येते आमच्या धर्मांत इतर धर्मापेक्षा एक विशेष असा आहे, की त्याने जनावरानासुद्धा आपल्या उदरात जागा दिली आहे त्यानें नदीची शकरापुढे स्थापना केली, पोळ्याच्या दिवशी बैलाची पूजा करावी असा निर्बंध घातला, व दसऱ्याच्या दिवशी घोड्याची अर्चा करावी असा नियम लावून दिला. आता व्यक्तीव्यक्तीप्रमाणें कधी कधी पूजेंत पक्तिप्रपच होतो खरा पोळ्याचे दिवशी बंडूनाना आपल्या मारक्या बैलास किलकिल्या डोळ्यांनीं नैवेद्य दाखवीत असत, परंतु दसऱ्याचे दिवशीं मात्र डोळे पूर्ण मिटून भाविकपणानें घोड्यास नैवेद्य दाखवितात याचें कारण इतकेंच की, त्याचा घोडा फार गरीब आहे, व धन्यानें डोळे मिटले असता तोही डोळे मिटून नैवेद्याचा स्वीकार करीत असतो. असो. आमच्या धर्मानें वानराच्या समाधानाकरिता हनुमानजयंती उत्पन्न केली व सिंहाच्या

खुषीकरिता नरसिंहजयंती काढली. फार काय सांगावे ? त्याने हत्तीलाही नाक मुरडावयास जागा ठेवली नाही. त्याने त्याचा शिरच्छेद करून त्याचे शिरकमल मनुष्याच्या धडावर ठेविले व त्याला वाहन म्हणून उंदरासारखा चपल व हुशार प्राणी बक्षीस दिला. हे उपकार फेडण्याकरिता उंदीर अलीकडे किती खटपट करीत असतो याचा अनुभव प्लेगची साथ ज्या प्रांतांत चालू असते त्याला पूर्णपणे येतो. प्लेगच्या आगमनाची याच्याकडून जी आगाऊ सूचना देण्यात येते तिच्यावरून प्लेगच्या रोगास मूषकवाहन गणपतीचा अवतार म्हणून अलीकडे म्हणण्यात येते, पण हा निव्वळ धर्मच्छल आहे.

याप्रमाणे लंबकर्णांची पलटण तयार झाल्यावर त्यावर उलटे कसे बसावे याची तालीम देण्यात येते. या रिसालदारांच्या अंगात कवचाऐवजी फाटक्या चिंध्या घालून, व शिरस्त्राणाऐवजी त्यांचे सात पाट काढून, त्यांना सदरहू सैन्यात मधून मधून आपापल्या श्वापदासह उभे करितात. मध्ये मध्ये शोभेकरिता दोनचार इसमास प्रेताप्रमाणे ताट्यावर बांधून अंतराअंतराने उभे केलेले असतेच. अशा थाटाने शंभरदोनशें इसमाची टोळी बहूनानाच्या घरापासून निघून गावातील राजमार्गानें अनेक चेष्टा करीत कूच करू लागते. अशा वेळीं गावांतील कोणाही संभावित स्त्रीला त्या मार्गानें जाण्याचे धैर्य होत नाही, इतकेच नाही तर, एखादीनें अशा प्रसंगीं खिडकीतून तोंड जरी बाहेर काढिले तरी, तिच्या नावाने पांचजन्य करून व शिव्या देऊन आम्ही तिला मर्यादशीलपणाचा असा धडा शिकवितो, की तिला जन्मभर त्याची आठवणच रहावी ! अशा रीतीनें आमची टोळी चालली असता प्रत्येक रस्त्याने व गल्लीनें तिला मांडलिक टोळ्या मिळत असतातच. शेवटी आमची संख्या पाचशे-सातशेपर्यंत जाते. जेव्हा हा सेनासमुद्र मोतीचौकापाशी जातो तेव्हा पाडूतात्याचें सैन्य आपल्या आयुधासह आम्हाला भेटण्याकरिता तयारच असतें. दोन्ही सैन्यांची दृष्टादृष्ट होतांच दोन्ही पक्षाकडून पांचजन्याची सलामी होते. त्या वेळी ' शंख दध्मौ पृथक् पृथक् ' या भगवद्गीतेंतील वाक्याची आठवण होऊन माझा कंठ भक्तिरसाने सद्गदित होतो. असो. पहिली सलामी झाल्यावर दोन्हीकडून प्रतिपक्ष्यांवर मोऱ्यातील

पाण्याच्या पिचकाऱ्या व चिखलाचे किंवा शेणाचें अवगुठन असलेले दगड फेकण्यात येतात दगडाच्या माराने तर प्रेताच्या ताट्यावर खरोखरीचीं प्रेतें पसरण्याचा प्रसग येतो की काय अशी भीति असते पण पाडूताल्याचा पक्ष निर्बळ असून त्याला कवाईत येत नसल्यामुळें त्याचा लवकरच पराजय होतो, व शखध्वनीच्या रूपानें आमच्या विजयदुदुभी वाजू लागतात

या सामन्यासाठीं जशी आमची एक महिनाभर आगाऊ तयारी चाललेली असते तशी होळीसाठी लाकडे मिळविण्याकरिताही खटपट सुरू असते. गावकऱ्याच्या घरातील लाकडे चोरण्यासाठीं आमचे हेर अहोरात्र फिरत असतात लाकडे न मिळाल्यास वाटेल ती लाकडी वस्तु – फाटक, दार, खुर्ची, टेबल, पोळपाट, लाटणे, मुसळ, भोंवरा, चाक, रहाट, चौरग, कठडा, खुटी चोरून आणण्यास बहूनानाचा वटहुकूम सुटलेला असतो. एकदा तर एका सन्याशाच्या खडावा व एका गृहस्थाचा बुदबळाचा डाव – राजावजीरासुद्धा अग्नये स्वाहा करण्यात आला ! या दिवसात फौजदारी कायद्यातील चोरी, मारामारी, अब्रूनुकसानी वगैरेबद्दलच्या कलमाना रजा देण्यात येते

सरते शेवटीं एक महत्त्वाची गोष्ट सागून पुरे करितों वर जे अभद्र शब्दाचे छाप सागितले त्यावरून आमच्या पूर्वजास छापण्याची कला अवगत होती हें उघड होते असें असता त्याचे धन्यवाद गाण्याचें सोडून या कलेचें श्रेय चिनी किंवा इग्रज लोकाकडे देण्यात येतें हा निव्वळ अन्याय आहे



मुष्टि ४ थी *

# गणेशचतुर्थी

'गणेशचतुर्थी!' हें नाव ऐकले की माझ्या सर्व अगात आनदाचा सचार होऊ लागतो या नावाशीं खिळलेल्या किती तरी मजेदार व आल्हादजनक कल्पना लहानपणापासून माझ्या डोक्यात खेळत आहेत! ते मखर, ती रोषनाई, ते दिवे, ती खिरापत, ते मंत्रजागर, तीं पुराणें, ती कीर्तनें, त्या मिरवणुकी, त्या दिंड्या, ती प्रयोजने,—अशा एक का दोन, अनेक गोष्टी मनात आल्या कीं, मन क्षणभर तल्लीन होऊन जाते

गणपति माझा लहानपणापासूनच आवडता देव आहे 'अललल डुर्'च्या नाटकात विदूषक, गणपति व सरस्वती हीं माझीं अत्यंत प्रिय पात्रे असत त्याच्या प्रवेशानंतर मला जी झोंप लागावयाची ती सरतेशेवटीं राळेतून तालावर नाचत येणाऱ्या टोपवाल्या व बोडक्या राक्षसांच्या डुरकावण्यानीं मात्र मोडत असे, तोंपर्यंत ती निर्घोर चाले. ज्या झोपेत घोरण्याचा भाग विशेष तिला निर्घोर हे विशेषण लाविल्याबद्दल वाचक मला क्षमा करतीलच

विदूषक लिबाच्या डहाळ्या बाधून नाचू लागला कीं मला मोठी गमत वाटे. तो आपल्या नावाशी बेलाशक, शालिवाहनशक इत्यादि यमके जुळवून कोट्या करी, तेव्हा तर माझी हसता हसता मुरकुडी वळत असे पण यापेक्षाही मौज जेव्हा गणपति तांबडा मुखवटा लावून व आपले दोन स्थावर व दोन जगम हात घेऊन येत असे तेव्हा वाटे 'मी पित्याच्या अकावर बसलो असता तुझी दीन वाणी श्रवण करून—' इत्यादि वाक्ये त्याच्या मुखवट्यातून घुमू लागलीं म्हणजे मला फार कौतुक वाटे खरें म्हटले तर पित्याचा अक कशाशीं खावा हेंही मला त्या वेळी ज्ञान नव्हते इतकेंच नाहीं तर, एके दिवशीं मी आपल्या अकगणितात पित्याचा अक सापडेल या आशेने किती वेळ तरी सूक्ष्म अवलोकन करीत होतों पण बाळपणीं गंभीर मुखांतून निघालेल्या वाक्यांतील शब्द न कळताही त्याचा

---

* वि. विस्तार, पु. ३४, अक ७ [ सन १९०३ ]

आपल्या मनावर विलक्षण ग्रह होतो शिवाय त्या वेळीं मी वाईतील ढोल्या गणपति पाहिलेला नसल्यामुळें गणपतीनें पित्याच्या माडीचा चुराडा न करिता तिच्यावर बसणें हें नाटकापेक्षा सर्केशीमध्येंच शक्य आहे हें मला माहीत नव्हतें यामुळे मी हीं भाषणे पूर्ण भाविकपणानें ऐकत असे.

गणपतीचा अवतार प्रत्येक युगास भिन्न भिन्न असतो कृतयुगात त्याला दहा हात असून दिव्य तेज होते इतक्या हातानी कामें तरी काय काय करावयाचीं, असा त्याला सहजच प्रश्न पडला असावा यामुळें पुढील युगात त्यानें त्यापैकी चार हातास निरोप दिला व श्वेतरूप धारण केलें पण पुढे श्वेतवर्णाचाही कटाळा येऊन त्याने द्वापारात ताबड्या रंगाचा अगिकार केला व सहांपैकीं आणखी दोन हातास फाटा दिला यानंतर त्याला लाल रंगापेक्षा काळा रग आवडला म्हणून म्हणा, किवा काजळ डोळ्यासच का फासावें तोंडास का फासू नये अशी त्याला शका उत्पन्न झाली म्हणून म्हणा, त्यानें कलियुगात धूम्रवर्णाचे म्हणजे काळे मुख स्वीकारले आहे व तो दोनच हातावर संतुष्ट होऊन राहिला आहे आम्हा अज्ञानी मानवात एखाद्या पुतळ्याच्या तोंडास काळे फासले असता तें रासायनिक प्रयोगानें काढून टाकण्याचा प्रघात आहे, पण देवामध्ये उलट प्रकार प्रचलित दिसतो.

हेंच वैचित्र्य वाहनासबंधीं आढळते कृतयुगात सिंह हें त्याचे वाहन होतें, तें त्रेतायुगात मयूर झालें, पण या दोन्ही वाहनात आटपसरपणा मुळींच नाहीं हे त्या बुद्धिदात्याच्या लवकरच लक्ष्यात येऊन त्याने द्वापारयुगात उदरावर जीन चढविलें हल्ली कलियुगात तो घोड्यावर स्वार झाला आहे.

वरील गोष्टीवरून आपणास, विशेषतः सुधारकास अल्पसंतोषीपणा शिकण्यासारखा आहे गणपतीने डोक्याला केंस ठेविले नाहींत, डोळ्यांना चष्मा लाविला नाही किंवा बूटपाटलूणही चढविली नाहीं. त्याचप्रमाणे जरी त्याचा एक दात चिरुटाप्रमाणे दिसतो तरी खऱ्या चिरुटाचा त्याच्या तोंडास विटाळही झालेला नाही. सध्याकाळीं तो दोन घोड्याच्या शिग्रामातून मिरवतांना दिसत नाहीं फार झाले तर एखादे वेळीं उदरावर मात्र रपेट करिताना आढळून येईल बरे, त्याला असल्या ऐसपैस वाहनाची जरूर नाहीं असें म्हणावें तर तेही नाहीं. कारण त्यानें बाह्य सौंदर्याची तुच्छता

दाखविण्याकरिताच कीं काय हत्तीचें जड व ओबडधोबड शिर आपल्या कंठावर धारण केलें आहे, व त्याच्या पोटाचा विस्तारही कमी नाही खास केवळ भक्ताना शहाणे करण्याकरिता गजाननानें हे सगळे श्रम घेतले, हा विचार मनात आला की माझे मन भक्तीनें ओथबून जाते. असो दुसराही एक गुण गणपतींत दिसून येतो. तो, अनुरूप पदार्थाची निवड करण्याचे चातुर्य हा होय सिंह हें जेव्हा वाहन होते तेव्हा त्याला काबूत ठेवण्यास त्यानें दहा हाताचा स्वीकार केला, पण तेच उदीरमामा वाहन होताच दोन हातावर काम भागू लागलें. बरे, उंदरावर एखादे माजर झडप घालवयास पाहील तर त्याचे रक्षण करण्याकरिता सोड लावून घेतली परतु या सर्वांपेक्षां अनुरूप पदार्थाची योजना त्याच्या कृष्णवर्णात व अश्ववाहनात दिसून येते कलियुगात टारगे सुधारक लोक आपली चेष्टा करावयास लागणार, आपणास वक्रतुड, लबोदर वगैरे बहुमानदर्शक विशेषणानी हाक न मारता वाकडतोंड्या, ढेरपोट्या इत्यादि प्राकृत नावानींच सबोधू लागावयाचे, बद्यातापाची साथ उत्पन्न होऊन व आपल्या वाहनाचा सहार होऊन, न जाणों, एखादे वेळीं पायीं चालण्याचा प्रसग येईल, या गोष्टी त्याने अगोदरच धूर्तपणाने ताडून आता काळे करून घोडा दामटीत निघून जाणेच श्रेयस्कर आहे असे जाणलें व उदरापासून एक युगभर सक्तमजुरीची चाकरी घेतल्यानतर त्याला विश्राति देण्याचा विचार केला, हें त्याच्या अलौकिक बुद्धिमत्तेचे लक्षण आहे असें असता आमच्या धर्माभिमानी लोकानी अजून गणपतीचें द्वापारीचेच रूप कायम ठेविलें आहे ही गोष्ट फार लाजिरवाणी आहे. ज्याप्रमाणे अग्निहोत्र, संन्यास [ विधवाचा नव्हे हो ! ] ही कलिवर्ज्ये आहेत त्याचप्रमाणें, ताम्रमुखी गणपतिही कलियुगातून बहिष्कृत आहे. अर्थात् काळ्या तोंडाच्या गणपतीची पूजा करूनच आम्हाला सिद्धीची आशा बाळगता येण्यासारखी आहे या काळात लाल देवापेक्षा काळा देवच अपणास लाभणार आहे.

अवयवाच्या व वाहनाच्या या विलक्षण योजनेंत एकच उणीव काय ती प्रथमदर्शनीं दिसून येते, पण जरा सूक्ष्म विचार केल्यास तीही केवळ आभासरूप आहे अशी पूर्ण खात्री होईल भक्ताचे अपराध पोटात घालतां

घालता ते बरेच प्रमाणाबाहेर गेले आहे हे माहीत असता, गणपतीनें उदरासारख्या क्षुद्र जिवावर बैठक घालण्याचे प्रयोजन काय? हा प्रश्न सुधारक लोक मोठ्या दिमाखानें विचारीत असतात मागे एकदा डोंगरावरून उंदीर सपाट्यानें जात असता गणपतीनें उदरावरून उडी मारली होती तेव्हा चंद्र त्याला हंसला होता, व त्याबद्दल गणपतीने त्याला शाप दिला होता, तो त्याला अजून नडत आहे. त्याच प्रकाराची पुनरावृत्ति सुधारकासबंधानें घडून येईल, व त्याच्या दात विचकण्याबद्दल आमचा एकदन्त देव त्याची बत्तिशी एक दिवस पाडील हा माझी खात्री आहे पण तसे होण्यापूर्वी मी आपल्या अल्प बुद्धीने वरील विरोधाभासाचे निराकरण करण्याचा प्रयत्न करितों, तो त्याला मान्य होवो

उदरामध्ये अनेक जाती आहेत त्यान्यामागे शेपटाप्रमाणे परमात्म्यानें वर्णयोजनाही लाविलेली दिसते त्याच्यामध्ये आपणातल्याप्रमाणेंच कर्मभेदावर जातिभेदाची इमारत उभारलेली दिसून येते जातिभेदाची संस्था याप्रमाणें सर्वत्र दिसत असून सुधारक लोक तिला हाणून पाडण्याचा यत्न करीत आहेत, हा केवळ त्याच्या अज्ञानाचा परिणाम आहे. असो. उदरामध्यें अनेक जाती आहेत असें वर सागितलें, त्या जातीपैकीं काहींचा मात्र येथें निर्देश करितों मागे एकंदर उंदराची सभा भरून त्यानी सर्वानुमते माजराच्या गळ्यात घाट बाधण्याचा ठराव पास करून घेतला परंतु आमच्या 'मना'ची गर्जना अजून मुक्त कठानेच होत असल्यामुळे 'घाट बाधावी कोणी?' हा प्रश्न मात्र आजपर्यंत तसाच वादग्रस्त राहिलेला दिसतो. या सभेस गेलेले सर्व लहानमोठे उंदीर बोलक्या राजकीय सुधारकात मोडतात ज्या उदरानें राजाच्या तोंडावर 'राजा भिकारी, माझी टोपी घेतली' असे अत्यंत निस्पृह उद्गार उपहासपूर्वक काढून आपली मिळकत परत मिळविली तो कर्ता राजकीय सुधारकवर्गापैकी होता या उंदरात नैतिक धैर्य इतके होतें, की त्याला राजानें कोपवश होऊन तुरुगात [अर्थात् सापळयात] जरी टाकिलें असते तरी तो डगमगला नसता. इतकेच नाही, तर त्यानें आपले चीत्कार तसेंच चालू ठेविले असते. याच प्रतीच्या महात्म्यास अनुलक्षून एका आधुनिक कवीनें म्हटलें आहे—

'बहु कष्ट जीवास । दुष्टान्न उपवास
कारागृहीं वास । त्या सौख्य कैचे ॥'

वरील दोन जातींत विशिष्ट मानसिक किंवा नैतिक गुण दिसून येतात काहीं जाती शरीरबलासंबधाने प्रसिद्ध असतात पण त्यातही अनेक भेद आहेत. एक जात नुसती कपडे फाडणारी असते, दुसरी पोती फोडणारी व तिसरी लाकडी वस्तूही कुरतडून चूर्ण करणारी असते. सिंहाची बधने कुरतडून त्याची मुक्तता करणारा प्रसिद्ध 'जवानमर्द उदीरभाई' बहुत करून याच वर्गापैकीं असावा परतु या सर्व जातीपेक्षा बलाढ्य अशी एक जात पूर्वी निर्माण झालेली वाचण्यात येते. तिचाच मूळपुरुष गणपतीचा वाहक उदीर असावा असा माझा तर्क आहे

एके काळीं एका डोंगरास प्रसववेदना लागल्या. [ मनुष्यामध्यें ज्याप्रमाणें स्त्रियानींच गर्भधारणाचा वाटा उचलला आहे तसा अचल सृष्टींत प्रकार नाहीं. टेंकड्याप्रमाणे डोगरही कधी कधी मौजेखातर गरभार राहतात असें दिसते ] डोगरास अशा प्रकारे वेदना सुरू झाल्या आहेत हें ऐकून भोंवतालच्या प्रदेशातील बरेच लोक त्याच्या समाचारास आले त्यापैकी काही वैद्य होते, त्यानीं सुलभ प्रसूतीकरिता त्याच्या घशात औषधानी भरलेली शेकडो पिंपें ओतली, तरी वेदना कमी होण्याऐवजीं वाढतच चालल्या भोंवतालच्या टेकड्यापैकी ज्या सुग्रण सुईणी होत्या त्याही जवळ येऊन चितातुर दृष्टीनें परिणाम काय होतो हे पहात बसल्या हळुहळू डोंगराच्या मुखाशीं जे ढग होते त्याच्या द्वारे तो मोठ्यानें गर्जना करूं लागला; तेव्हा तर लोकामध्ये फारच कुतूहल उत्पन्न झाले व नानादेशाचे शास्त्रज्ञ लोक आपापल्या दुर्बिणी घेऊन आसमतात् तळ देऊन राहिले. अशा धादलीत एक महिना लोटला. तिक्या अवकाशात शेंकडों वैद्याची दिवाळीं निघाली, व हजारों वाण्याची दुकाने ठार बुडाली सरते शेवटी जेव्हां एके दिवशीं डोंगराच्या आरोळ्यामुळें प्रेक्षकाची जिज्ञासा कळसास जाऊन पोहोंचली तेव्हा अवचित एक उंदीर डोंगराच्या गाभ्यातून उडी मारून बाहेर पडला, व डोगराच्या सर्व वेदना एका निमिषांत बंद पडल्या ! याप्रमाणें डोंगरास आराम पडला खरा, पण त्यामुळे एक महिनाभर

स्वत चा खर्च सोसून तेथे ठाणीं दिलेल्या जिज्ञासूचा फार हिरमोड झाला कारण त्याना वाटलें होते, की डोंगरास होणारें मूल त्याला सर्वथैव शोभण्यासारखें म्हणजे टेंकाड, उंचवटा, निदान पक्षी वारूळ तरी असेल ! परतु बिचाऱ्याची अगदीच निराशा झाली. वास्तविक म्हटलें तर डोंगराचा हा प्रतापी पुत्र आपल्या बापास पूर्णपणे साजेसा होता. कारण यालाच पुढें गजाननासारख्या विशालदेही देवाच्या वाहनाचा मान मिळाला, व तेव्हापासून तो त्याच्या नाकातला बाल होऊन बसला आहे हा उदीर हिमालयाच्या धाकट्या भावाचे अपत्य असल्यामुळें गणपतीचा [ म्हणजे गिरिजेच्या मुलाचा ] मातुलही ठरतो. हा निकटचा संबध गणपतीने आजमितीपर्यंत कायम ठेविला आहे हे त्याला भूषणास्पद आहे

इसापनीतींत दिलेली वरील गोष्ट 'इसाप'ने आमच्या गणेशपुराणातून चोरून घेतली असें दिसते. इलियड काव्य रामायणाची व बायबल भगवद्गीतेची चोरी आहे हे माझ्यापेक्षाही थोर विद्वानानी जगाच्या नजरेस आणिले आहे. पण 'इसापा'च्या या दरवड्याचा आजपर्यंत कोणासही सुगावा नव्हता या चौर्यात व इतर ग्रथचौर्यात एक विशेष भेद दिसून येतो तो हा की, इतर ग्रथातील चोरी करताना चोरानीं मुळांतील वाक्यें पूर्ववत् राहूं दिलीं, पण 'इसापा'ने तर या गोष्टीचा मुळात मागमूसही राहू दिला नाहीं काय हे धाडस !

ही उदराच्या जन्माची हकीकत झाली. गणपतीच्या जन्माची हकीकत याहूनही चमत्कारिक आहे. मागील गोष्टींत ज्याप्रमाणे निर्जीव वस्तूपासून प्रजोत्पत्ति झाली आहे त्याप्रमाणें या गोष्टीतही झालेली दिसून येते. पूर्वीच्या युगात हल्लीप्रमाणे गर्भसंभवासबधाने ठरलेले नियम नव्हते. शकराच्या जटेपासून वीरभद्र व भस्मापासून भस्मासुर झाला. मधु व कैटभ हे दैत्य विष्णु निद्रित असता त्याच्या कानातून निघाले, व त्याच्या बेबींतून कमलासनस्थ ब्रह्मदेव निघाले. ब्रह्मदेवाच्या जाभईपासून सिंदुरासुर दैत्य निघाला, व त्याच्या मुख-बाहु-जघा-चरणापासून ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र उत्पन्न झाले याप्रमाणें जाभया, शिंका, उचक्या, ढेंकरा याजपासून प्रजोत्पत्ति होत राहिल्यास जगात उभें राहण्यासही जागा मिळणार नाहीं.

असा विचार करूनच ईश्वराने या बाबतीत नियम घालून ठेविला असावा. काही असो, झाले हे फारच चागलें झाले नाही तर दररोज सकाळी उठताच जाभईबरोबर आपल्या इच्छेविरुद्ध एक एक पुत्र उत्पन्न होऊन दर वर्षास तीनशेपासष्ट पाळणे घरात राहिले असते, व दिवसाची वेळ जशी हल्ली घड्याळाच्या हेलकावणाऱ्या लबकावरून काढिता येते तशी वर्षातील दिवसाची संख्याही हलणाऱ्या पाळण्यावरून काढिता आली असती

असो एकदा शकर पार्वतीवर रागावल्यामुळे ती त्यास प्रसन्न करण्याच्या हेतूने रानात तपश्चर्या करण्यासाठी निघून गेली तेथे तिने स्नानाचे वेळीं अगावरचा मळ काढून त्याचा एक पुतळा करून तो दाराशी रखवालदार म्हणून बसविला, व माझ्या परवानगीवाचून कोणासही आत सोडू नकोस असे त्याला बजाविले इकडे शकरास पार्वतीची आठवण होऊन ते तिला शोधीत रानोमाळ हिंडू लागले फिरता फिरता त्याना पार्वतीचा आश्रम दिसला, व ते आत जाणार, तोच दारावरील रखवालदाराने त्यास मना केले. बिचाऱ्या गणपतीस तरी शकरपार्वती याचे नाते काय माहीत ? त्याने अटकाव करताच शकरानी गणपतीच्या धडाचा व शिराचा वियोग करून पतिपत्नीच्या वियोगदु खाचा थोडासा मासला त्याच्या प्रत्ययास आणून दिला व आत प्रवेश केला पार्वतीनें विचारले, ‘ महाराज ! दारावर माझा कृतकपुत्र असता आपण आत कसे आलात ? ’ शकरानी सर्व वर्तमान सागताच पार्वती आक्रोश करू लागली. शकरानी तिला पुष्कळ समजाविले की, मी जाभया देऊन, जटा आपटून किंवा कान झाडून वाटेल तितके पुत्र तुजकरिता उत्पन्न करितो, पण तिचें काही केल्या समाधान होईना उलट अशा सात्वनाने स्वतःच्या मळापासून झालेल्या अपत्याचे चुबन घेण्याची तिची इच्छा दुणावली मात्र. शेवटीं शकरानी एक हत्तीचें शीर आणून त्या धडावर बसविले व त्याला सजीव केले हा जो हत्तीच्या शिराचा व मनुष्याच्या धडाचा द्वद्वसमास झाला त्यालाच पुढे गजानन म्हणू लागले.

शकरानी धडावर जे हत्तीचें शिर चिकटविलें त्याला प्रथम दोन बाजूस दोन विशाल दात होते, व त्यामुळें ते फारच प्रमाणशुद्ध व सुदर दिसत असे. असें असता हल्लीं त्याचा एकच दात दिसून येतो याचें कारण काय ? दात दुखू

लागल्यामुळें या विघ्नहर्त्या प्रभूने एक दात अश्विनीकुमाराकडून समूळ उपटून तर काटविला नाही ना ? किंवा ब्रह्मदेवानें आपल्या मुली सिद्धि व बुद्धि यांच्याशी गणपतीचा विवाह लावून दिला तेव्हा विड्या तोडण्यास अडथळा येऊ नये म्हणून तर त्याने त्यास फांटा दिला नसेल ना ? किंवा अष्टनायिकापासून मिळणाऱ्या चुंबनसुखात व्यत्यय येऊं नये म्हणून तर त्यानें त्याची वाट लाविली नसेल ना ? वाचक हो ! आपल्या कल्पनेला अशी उच्छृंखल सोडू नका एकच दात उरण्याचें कारण गूढ नसून फारच थोडक्यात सागण्यासारखे आहे. एकदा शिवाजवळ एक अमृतफळ होते, ते त्याच्यापाशीं गजानन व षडानन दोघेही मागू लागले त्याने ते एकट्या गणपतीलाच दिले. त्यासरशी षडाननानें श्रीमंगलमूर्तींच्या श्रीमुखात भडकावली. तेव्हा गणेशानेंही आपल्या वडील भावाचा मान राखण्याकरिता आपला एक दात पदच्युत होऊ दिला तेव्हापासून त्याला एकदन्त ही संज्ञा प्राप्त झाली आहे केवढे तरी हे बंधुप्रेम !

गणपतीस दूर्वा फार प्रिय असतात. त्या त्याच्या एकदा फार उपयोगी पडल्या रावणानें जेव्हा तेहतीस कोटी देवास आपल्या घरी कामे करण्यास ठेविले तेव्हा गणपतीवर गाढवे राखण्याची पाळी आली. गुरें वळण्याचे काम शांत विचारास फार अनुकूल असल्यामुळेच बहुधा गणपतीने ही कामगिरी पत्करिली असावी यावरून त्याची आटोकाट दूरदृष्टि दिसून येते. असो . तर याप्रमाणें गाढवे राखीत असता गणपतीस कधी कधी चाऱ्याची फार टंचाई पडे. तेव्हा त्याने, मला अधिक दूर्वा वहात जाव्या अशी एक दिवस आपल्या भक्तापाशी इच्छा प्रदर्शित केली तेव्हापासून दूर्वाचा पुरवठा मुबलक होऊ लागला, व गाढवाचा उपासमार चुकला. यावरून गणपतीचे हृदय किती कोमल आहे हे दिसून येते

या प्रसंगी जरी गणपति गुराख्याच्या नात्याने रावणाची निमूटपणें नोकरी करीत होता तरी दुसऱ्या एका प्रसंगी त्याने रावणास त्याच रूपात सपशेल चकविलें रावण जेव्हा महादेवास आपल्या गायनाने प्रसन्न करून शिवलिंग घेऊन लंकेस जात होता त्या वेळीं, गणपतीने त्याला वाटेंत गुराख्याच्या रूपानें गाठून व त्याच्याजवळून तें युक्तीने काढून घेऊन तें

त्यानें परत घेण्यापूर्वीच जमिनीवर ठेविलें, ही कथा गोकर्णमाहात्म्यात प्रसिद्ध असल्यामुळें येथे विस्ताराने देत नाहीं तिच्यावरून गणपतीचें आटोकाट धोरण व जशास तसे या न्यायाचें कपटपटुत्व दिसून येते.

आम्हा आर्य लोकास आमचे देव फार आवडतात याचे रहस्य हेंच आहे, की त्याच्या अंगी विशालता, तेजस्विता, पराक्रम वगैरे सद्गुण जसे असतात तसे कपटशीलता, चौर्य, व्यभिचार इत्यादि आम्हा मनुष्यात वास करणारे दुर्गुणही दिसून येतात, व त्यामुळें सज्जनाप्रमाणे दुर्जनासही ते फार प्रिय वाटतात 'समानशीलव्यसनेषु सख्यम्' ही म्हण येथे चागली लागू पडते प्रत्येक आर्य चोरास चोरी करताना असे वाटत असते, की पाच हजार वर्षापूर्वी श्रीकृष्ण परमात्म्यानें दूधदहीं चोरण्यामध्ये जे दैवी कृत्य केलें तेंच मी आज करीत आहें आर्य जार सुद्धा श्रीकृष्णाच्या १६००० अशानें तरी आपल्या हातून पराक्रम घडला असें मानून किंवा इद्राचा अहल्येवरचा विजय आठवून आपणास धन्य समजतो. तमाशातल्या आर्य पोऱ्यासही श्रीविष्णूच्या मोहिनीरूपाची आठवण होऊन डोळे मुरडण्याची व दौलतजादा करण्याची स्फूर्ति होत असते याप्रमाणे आमच्या देवाचे कित्ते समोर ठेवून आम्हामधील चोर–जारादि सर्व लोक 'कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन' ही भगवदुक्ति मनात वागवून, परिणामाकडे लक्ष न देता, आपापले व्यवसाय पार पाडीत असतात अशा रीतीने परमात्म्याच्या अतर्क्य लीला आमच्या चित्तापुढें नेहमी उभ्या असल्यामुळे त्यांच्यावरचे आमचें प्रेम व भक्ति क्षणोक्षणी वाढत असतात. युरोपातील मिशनरी लोकानीं काळे झगे घालून ख्रिस्ताच्या नावानें हजारो वर्षे कठशोष केला तरी आमची हिंदु देवावरील भक्ति ते अणुमात्र कमी करू शकणार नाहीत हे त्यानी मनात खूप बाळगून असावें.

गणपतीवर आमची प्रीति बाकीच्या बत्तीस कोटी नव्याण्णव लक्ष नव्याण्णव हजार नऊशे नव्याण्णव देवापेक्षा अधिक असण्याचे कारण त्याची शारीरिक व्यंगे होत. त्याचा उरलेला एक दात भक्ताच्या हृदयाला सारखा टोंचीत असतो, व त्याच्या अवाढव्य पोटामुळें त्याचें उंदरावरील आसन

डळमळताना पाहून त्यांच्या मनाची चलबिचल होत असते. दयेपासून प्रीति उत्पन्न होते, ही म्हण अक्षरशः खरी आहे.

गणपतीचें विसर्जन करिताना आम्हाला जे हुदके येतात, गळा दाटून आल्यामुळे 'गणपति बाप्पा मोरया, पुढच्या वर्षी लौकर या' हे शब्द निघण्यास जी मारामार पडते व त्याला जलसमाधि देण्यापूर्वी आसवानीं विरघळून टाकण्याची जी इच्छा उत्पन्न होते त्या सर्वांचें इंगित, जो वरील भाग वाचील त्यालाच कळून येणार आहे

गणेशचतुर्थीच्या दिवशी कोणीही तुझे मुखावलोकन करणार नाही व केलें तर त्याच्यावर खोटा आळ येईल असा गणपतीनें चंद्रास जो शाप दिला होता त्याचा उल्लेख वर आलाच आहे त्या दिवशी चंद्र न पाहण्याचा निश्चय करून गावातील लहानमोठ्या सर्व गणपतींचें दर्शन घेण्याकरिता मी घराबाहेर पडत असतों पण मनुष्यस्वभाव किती विचित्र आहे पहा ! निषिद्ध वस्तूचा अनुभव घेण्याकडे मनाची धाव नेहमी आढळून येते एकादशीच्या दिवशीं भातपिठल्यावर ताव मारावासा वाटतो चातुर्मासात कांद्याकडे आशाळ-भूतपणाने पहावेसें वाटतें परस्त्री असलेल्या चंद्राननेशीं कोणतें ना कोणतें तरी निमित्त काढून बोलावेंसे वाटते. तसे, गणेशचतुर्थीच्या दिवशी चंद्राकडे, चोरून का होईना, पण पहावेसें वाटते खरें म्हटलें तर त्या दिवशीं त्याच्या भोवतीं शनीच्याप्रमाणें कडें उत्पन्न होतें किंवा तो त्या मुहूर्तावर गुरुपत्नीशीं निर्धास्तपणे प्रेमालाप करीत असतो अशातला कांहीं प्रकार नाहीं. इतर महिन्याच्या शुद्ध चतुर्थीस तो जसा दिसतो तसाच याही चतुर्थीस दिसतो पण त्याच्याकडे आपली दृष्टि गेल्याशिवाय रहात नाहीं. या रीतीनें आपण एकदा फसलों म्हणजे आपल्याबरोबर इतरानाही 'मारुतीच्या बेंबीतील गारव्या'चा अनुभव यावा अशी आपणास साहजिकच उदारपणाची इच्छा होते. 'तें पाहिलेंत का काय आहे ?' असें आपण एकदम चंद्राकडे अंगुलिनिर्देशपूर्वक पाहून म्हटले म्हणजे आपले सोबतीही उत्कंठेनें तिकडे पाहूं लागतात, व चंद्रदर्शन झालें म्हणजे मग कुठें त्याना त्याची चूक कळून येते. परंतु याही दोषाचे परिमार्जन करण्याचा एक उपाय शास्त्रानें ठेविला आहे. तो उपाय, दुसऱ्याच्या घरावर दगड मारून त्यांच्या शिव्या घेणें हा होय. एकदा

आमची टोळी चंद्रदर्शनाचें पातक घडल्यानंतर त्याचें क्षालन करण्याकरितां दुसऱ्याच्या घरावर दगड मारूं लागली. तरी आम्हाला कोणी शिव्या देईना, व शिव्या ऐकण्याकरितां आमचे कान तर कसे भुकेलेले होते. शेवटीं या धर्मावेशात आमच्याकडून एकाचा डोळा फुटून तो शुक्राचार्य बनला, एका म्हाताऱ्याच्या अवशिष्ट दोन दातांपैकीं एक पडून तो एकदन्त झाला व तिसऱ्याच्या टाळक्यावर भली मोठी जखम झाली, तेव्हां कोठें आम्हाला एकानें आईबापावरून शिव्या दिल्या, व आमचा जीव खालीं पडला. याप्रमाणें आमच्या पातकाचे खापर अक्षरशः दुसऱ्याच्या डोक्यावर फोडून व कृतकृत्य होऊन आम्ही भाविकपणानें घरीं परत आलों. दुसरे दिवशीं आमच्यावर गर्दी केल्याचा, भयंकर जखम केल्याचा वगैरे खटले होऊन प्रत्येकास एक एक, दोन दोन वर्षांची सजा झाली. पण या आरोपामुळे आमच्यावर चंद्रदर्शनामुळे जो खोटा आरोप येणार होता तो मात्र चुकला. केवढा हा साक्षात्कार !

गणेशचतुर्थीच्या उत्सवात दिवसेंदिवस भर पडत आहे ही मोठ्या आनंदाची गोष्ट समजली पाहिजे. आजपर्यंत मुसलमानांचा मोहोरमाचा सण पाहून आपण यांच्याप्रमाणे कधीं नाचावयास उडावयास लागूं असा मला त्यांचा अतोनात हेवा वाटत असे, पण आतां मात्र ती ददात पूर्णपणे नाहीशी झाली आहे. इतकेंच नाहीं, तर आमची त्यांच्यावर सरशीही झाली आहे. त्यांची दंगल सारी पांच दहा दिवसच चालते, पण आमच्या मेळेवाल्यांचा धिंगाणा सतत दोन दोन महिने चालू असतो. हल्लींच्या व्यवस्थेत दोन गोष्टींची मात्र उणीव दिसून येते. एक तर आपल्याकडे गणपतीची मूर्ति नालसाहेबाच्या स्वारीप्रमाणे डोक्यावर घेऊन धावत जाण्याचा अजून परिपाठ सुरू झाला नाहीं. असें करण्याला लंबोदराच्या उदराची थोडीशी अडचण येईल हे खरें आहे, पण पोटामुळें जितकें अधिक वजन होईल तितकें दांताच्या खळग्यामध्ये गडप होईल असा भरवसा आहे. दुसरी उणीव म्हटली म्हणजे अजून आपणामध्ये वाघाची सोंगे येत नाहींत. हल्लीं गणपत्युत्सवात जे वक्ते धर्माभिमानाविषयीं नुसत्या तोंडाच्या हात हात लांब गप्पा मारतात ते जर हातभर शेपूट लावून व अंगावर काळे पिंवळे

पट्टे ओढून नाचू लागतील तर धर्मास अधिक बळकटी येईल अशी माझी समजूत आहे

मेळ्यामुळे प्लेगचा आजार सुरू झाला व प्लेग हा मूषकवाहनाचा अवतार आहे, असें धर्मद्रोही सुधारक समजतात. या अनुमानास प्रमाण कोणते विचाराल तर, प्लेग सुरू होण्यापूर्वी उंदीर मरूं लागतात हें देण्यांत येईल. पण एक तर गणपति आपल्या आवडत्या उंदराचा संहार कधी करणार नाहीं दुसरे असें, की गणपति जेव्हा जेव्हा भक्तावर प्रसन्न होतो तेव्हा तेव्हा त्याला शारीरिक व मानसिक अशी दुहेरी देणगी देत असतो. उदाहरणार्थ, बंगाली लोकांचीं पोटे मोठीं असून बुद्धिही विशाल असते, व पारशी लोकाचीं नाकें लांब असून बुद्धिही नाकाप्रमाणेंच दीर्घ असते; यावरून त्याच्यावर गजाननाचा वरदहस्त आहे असें निश्चित समजावें. भ्रूशुंडी नावाच्या ऋषीवर तर गणपतीची इतकी मर्जी होती, कीं त्यानें त्याचें उदर स्वतःप्रमाणेंच लोंबणारे करून त्याच्या भिंवईवर एक सोंड ठेवून दिली. या सोंडेमुळे ऋषीच्या डोळ्यासमोर चिलटे येतनाशीं झालीं हा एक मोठा फायदा झाला. असो. आता प्लेगच्या रोगाची स्थिति पाहिली तर अगदी उलट दिसून येईल. बुद्धि तीव्र होण्याऐवजीं उलट त्याला ती सोडून गेलेली असते, अर्थात् तो बेशुद्ध असतो, व त्याच्या ठायीं शारीरिक चिन्हही उत्पन्न होत नाही नाही म्हणावयास अगावर सूज मात्र येते खरी. पण रोग्याची असते काखेंत व गणपतीची असते पोटावर. एवंच सुधारकांचा आरोप केवळ वृथा आहे

माझ्या अल्प बुद्धीप्रमाणे माझ्या आवडत्या सणाचें मी येथवर समर्थन केले. ज्या बुद्धिदात्याच्या कृपेनें या चार ओळी खरडता आल्या त्याचा शेवटी जयघोष करून लेखणी थांबवितों —' गजानन महाराजकी जय !'

---

मुष्टि ५ वी *

# गवई

ललित-कलामध्यें गायनास जे उच्च स्थान दिले आहे तें योग्य नाहीं असें कोण म्हणेल? केवळ स्वरांच्या आरोहावरोहाबरोबर-ससारातील उच्चनीच स्थितीचा प्रत्यय आणून देणाऱ्या कलेचा महिमा किती वर्णन करावा? गायन थिल्लर मनुष्यास गंभीर करितें, गंभीर पुरुषास वेडावून नाचावयास लावितें, सुखितास दुःखी व दुःखितास सुखी करिते. आपलपोट्या मनुष्याच्या हृदयाची एकतानता करून त्याला आपपरभाव विसरावयास लावितें, एकाच वेळीं वातावरणात व श्रोत्याच्या अंतःकरणांत कल्लोळ उत्पन्न करितें. एखादें पद मृदगाच्या तालावर चोहोंकडे घुमत असता, आपणासमोर विश्वगायनाची कल्पना उभी राहून, आपणास स्थलकालाची महती व अनंतत्व एकदम कळून चुकतें असे म्हणण्यास हरकत नाहीं.

गायनाचें साहाय्य करणाऱ्या वाद्यांचें तरी सामर्थ्य कोठवर वर्णावें? या जगात लोखंडी तारेचा प्रताप चोहोकडून दिसून येतो. पण सतारींच्या ठिकाणी तो जसा विशेष प्रमाणात दिसून येतो तसा इतरत्र येत नाहीं. तारायंत्राची तार एका ठोक्याबरोबर निराशेस हद्दपार करिते किंवा आनंदाचें उच्चाटन करिते विद्युयत्राची तार एका धक्क्यासरशी सजीवास निर्जीव करिते व निर्जिवास सजीव बनविते इमारतीच्या वर डोकावून पाहणारी तार खुद्द विद्युल्लतेस जलसमाधी घ्यावयास लाविते. सतारीची तार एका झणत्काराबरोबर हजारों श्रोत्यास स्वर्गसुख देऊन तिच्या अगदीं उलट कृति करिते.

सतारीच्या भोंपळ्याचीही तारेहून कमी योग्यता आहे असे मुळींच नाहीं. भोंपळ्याचे गोड व कडू असे दोन भेद प्रसिद्ध आहेत गोड्या भोंपळ्याची भाजी तर आपण नेहमी खातोंच लग्नकार्यांत पुरवठ्याला या भाजीसारखी दुसरी भाजी नाहीं. एक तर फळ मोठें असल्यामुळे त्याची भाजी बरीच विपुल करिता येते. शिवाय सामान्य आचाऱ्याकडून फारशी

---

* वि. विस्तार, पु. ३४, अंक ८ [सन १९०३]

चवदार होत नसल्यामुळे ती विशेष खपतही नाही पक्वान्नामध्ये जसे दळ्याचे लाडू त्याप्रमाणे तिखटमिठाच्या पदार्थांत भोपळ्याची भाजी वाटेल तितकी मोठी पंगत झाली तरी, सपायची भीति म्हणून नको ! भोंपळ्याची कोशिबीर किंवा रायतेंही करितात गरीब किंवा कवडीचुबक लोक त्याच्या सालीची चटणीही करितात. विशेषेकरून दुसऱ्या वर्गाची ही फार आवडती असते. गोड भोंपळ्याचा जो अन्नासबधानें उपयोग तो कडू भोपळ्याचा पाण्यासबधाने असतो. हें फळ कमंडलूच्या रूपाने पाणी पिण्याच्या फार उपयोगी असतें बरे, याचा त्या कामी नेहमी खात्रीनें उपयोग होतो असेंही नाहीं कारण पोहण्याची सवय नसलेला एखादा नवशिक्या जर पाण्यात गटगळ्या खाऊन पाणी पिऊ लागला व एखादा भोपळा जर ही सर्व गमत पहात जवळ उभा असला तर हे आडमुठें फळ काहीं केल्या त्या तृषार्त गृहस्थास पाणी पिऊ देत नाही काय हा दुटप्पीपणा ! याशिवाय हें फळ बैराग्याना भिक्षा मागण्यासही उपयोगी पडते परतु रसनेंद्रियास कडू वाटणाऱ्या या फळाचा सर्वात मोठा उपयोग म्हटला म्हणजे तंबुऱ्याचा किंवा सतारीचा नाद कर्णमधुर करणें हा असतो काहीं काही वाद्यास तर दोन दोन तीन तीन भोपळे लाविलेले असतात, व त्याच्या संख्येप्रमाणें त्याना बीन, रुद्रविणा वगैरे नावें प्राप्त होतात असे एखादे विचित्र वाद्य खाद्यावर टाकून किंवा माडीवर घेऊन गवई गाऊ लागला म्हणजे तो हुबेहुब भोपळ्याच्या वेलाप्रमाणे दिसू लागतो, व त्याला श्रोतृप्रवाहातून सुरक्षितपणें पार पाडण्यास त्या भोंपळ्याचा फार उपयोग होतो यात सशय नाहीं

अशा लोखडी तारानी वेढिलेली व अशा भोंपळ्यानी टेका दिलेली वाद्यें फार मजुळ वाजत असतील यात नवल ते काय ? त्यांच्या जोडीला मृदंग असला म्हणजे मग विचारावयासच नको. मृदुग एकदा घुमूं लागला म्हणजे श्रोत्यासही आपणाप्रमाणेंच मृदग करून टाकितो कारण त्याचा आवाज ऐकून हृदय ढेंकळाप्रमाणे विरघळून जात नाही असा एकही मनुष्य आढळणार नाही.

आमच्या वडिलाची गाण्यावर फार प्रीति असे. मला गाणें यावें ही त्याची मनापासून इच्छा. त्यानीं माझ्या कानावरून चागल्या चांगल्या

गवयाचें गाणे जावे म्हणून दर महिन्यास एखादी तरी बैठक घरीं करावा गाण्याचा शेवट होईपर्यंत झोंप येऊ नये म्हणून मी आपल्याकडून अनेक उपाय करीत असें. दोन प्रहरीं झोंप घेई, गाणे सुरू व्हायच्या वेळीं डोळ्यात कापूर किंवा तेल घाली, पण सर्व व्यर्थ! गवई वीण्याच्या तारा व तबल्याचा सूर लावीपर्यंत मी मोठ्या कष्टाने डोळे कसेबसे उघडे ठेवीत असें, पण त्यानें गाण्याकरिता तोंड उघडलें, की इकडे माझे डोळे मिटलेच म्हणून समजावें माझ्याइतका शात श्रोता कोणाही गवयास कधी मिळाला नसेल. शेवटीं मी एका सोबत्यास मला झोंप आल्यास चिमटा घेण्याकरिता मागे बसवू लागलो जसा गवयाचा तबलजीवर तसाच माझाही माझ्या साथीदारावर पहिल्यापहिल्यानें भरवसा असे. पण पुढे पुढे असें होऊ लागलें, कीं गवयाच्या मोहनास्त्राचा माझ्याप्रमाणें माझ्या साथीदारावरही अमल बसून त्याच्या चिमट्याऐवजीं घोरण्यानें मात्र एखादे वेळीं मला जाग येत असे, व मलाच उलट त्याला जोराचा चिमटा घेऊन उठवावें लागे जागे रहाण्याचे उपाय अशा रीतीनें थकल्यावर मी शेवटी झोंपेस अडथळा करण्याचे अजीबात सोडून दिले तरी माझें दैव शिकदर असल्यामुळें माझें पेंगणें मान डोलविण्यादाखल समजलें जाऊन माझ्या सुषुप्तावस्थेचा कोणालाही सशय येत नसे कधीं कधीं तर चिजेतील अवसान, गवयाची दृष्टि व माझ्या मानेचा झोंक याचा विलक्षण बहारीचा त्रिवेणी संगम जमत असे, व अशा रीतीनें झोंप सापडून मार्मिकपणाबद्दलची वाहवा मिळत असे कारण प्रत्येक गवई माझ्या प्रासगिक मान हलविण्याबद्दल मान तुकावीत असे व अशा लहान वयात तालाचें इतकें गम्य दुसऱ्या कोणत्याही मुलात सापडणार नाहीं अशी बाबापाशी तारीफ करीत असे. अशा प्रकारे निर्धास्त झाल्यावर मी भर बैठकीत यथेच्छ निद्रासुख अनुभवीत असे व कधीं कधी तर मोठ्यानें घोरून तालाच्याप्रमाणें सुराचेही ज्ञान व्यक्त करीत असें.

शेवटीं माझ्या उसन्या मार्मिकपणाचा असा प्रतिकूल परिणाम झाला, की बाबानीं मला शिकविण्याकरिता एका मुसलमान वस्तादजीस ठेविले त्याचें नाव टर्रेहुसेनखा होतें. हे गृहस्थ गुणानी नावाप्रमाणेंच होते. पूर्वी मला

गाणें ऐकताना इतकी हटकून झोप येत असे, कीं मी एखादे वेळी आजारी पडून मला झोप येईनाशी झाली व वैद्याचे औषधोपचार थकले, म्हणजे बाबानीं गाणे करावें, की गवयाच्या एका चिजेसरशी मला ढाराढूर झोप लागत असे पण तो मनु आता बदलला टर्रेहुसेनखाच्या आवाजात इतकें मार्दव असे, की त्याचें गाणे चाललें असतांना पुष्कळदा कुंभाराचीं गाढवें भोवतालीं जमून तें एकचित्तानें ऐकत असत व कधी कधीं त्याच्या पुरास सूरही देत असत अर्थात् अशा आवाजाने माझी झोप कायमची नाहींशी केली. बरें, आवाजात काहीं लवचिकपणा होता म्हणावें तर तेही नाहीं. मानेला सपाटून हिसका द्यावा तेव्हा कोठें लहानसा खटका येत असे. सर्व अग जेव्हा घुसळावें तेव्हा तान यावी, व तीही इतकी सावकाश, की ही तान की हे नुसते सूर हें कळण्याची मारामारच. पुष्कळदा तर ते तान हातानींच दाखवीत असत व सूर उच चढविण्याऐवजी आपले सर्व शरीर उंचावीत असत. अशा तऱ्हेची त्याची स्वतःची तयारी असल्यामुळें मला शिकवितानाही ते आतर व नैसर्गिक गुणापेक्षा बाह्य व कृत्रिम उपायावरच भिस्त ठेवीत असत. गाण्यातील मूर्छना म्हणून जो प्रकार आहे तो मला चागला साधावा म्हणून ते मला खरोखरीच मूर्छना येईपर्यंत यथेच्छ मार देऊन रडवीत असत, खटका यावा म्हणून माझी शेंडी धरून जोरानें हिसका देत, व तान चागली यावी म्हणून हिंवाळ्यात सकाळीं पाठीवर थंड पाण्याच्या घागरी ओतीत असत. अशा उपयानीं मला शेवटी हिंवतापाचें दुखणें लागलें हिंवाची पाळी बहुतकरून टर्रेहुसेनखा माझ्या समाचारास येत त्या वेळची असे. कधीं कधीं त्याची येण्याची वेळ बदले तेव्हा माझी पाळीही बदलत असे. अखेरीस माझा आजार व वस्तादजींचें आगमन यामधील या प्रकारचा कार्यकारणभाव ताडून व वस्तादजींचें न येणें हेच माझ्या रोगावर वस्ताद औषध होईल हे जाणून बाबांनीं त्याचें येणें बंद केलें, व तेव्हापासून माझ्या प्रकृतीस उतार पडत चालला. मात्र यापुढें काही दिवस कोणत्याही प्रकारचें गाणें माझ्या ऐकण्यात येऊ नये अशी व्यवस्था करण्यास वैद्यानें बाबांस सजाविलें होतें, इतकेंच नाहीं, तर तंबुऱ्याची आठवण होईल म्हणून भोंपळ्याची भाजीही मीं बरेच दिवस वर्ज्य केली होती.

गवई बैठकींत बहुतकरून ख्याल नावाच्या चिजा म्हणतात त्या फार
आखूड असतात. सबध चीज म्हटली म्हणजे दोन ओळींची असते. तिसर
ओळ असली कीं डोक्यावरून पाणी गेले! हा आखूडपणा त्याच्या कर्त्यानं
गवयाच्या आखूड मेंदूकडे पाहूनच ठेविला असावा 'ख्याल' [ आठवण
या नावावरूनही माझ्या अनुमानास बळकटी येते. चीज इतकी लहा
असूनही तिच्यामुळे गवयाच्या स्मृतीस बराच ताण पडत असतो, असें य
शब्दावरून उघड दिसते बरें, चीज इतकी त्रोटक, तेव्हां ती सब
म्हणतात असें म्हणावे, तर अशातला मुळीच भाग नाही. उलट ज्याप्रमा
एखादा गर्भश्रीमत पचपक्वानाचे ताट समोर असताही नुसता वरचा वरच
भाग चाखून बाकीचा लोटून देतो, त्याप्रमाणे घरंदाज गवई नुसती अस्ता
गाऊन अत्रा तुच्छ म्हणून समजतो अर्थाकडे [ पैसा या अर्थी नव्हे हो !
तर त्याचे अगदींच दुर्लक्ष असतें व्याकरणाचा व त्याचा अगदी उभ
दावा व्युत्पत्तीची व त्याची चुकामूक झालेली असते ती मेलगाडी
मुबईस जात असते तेव्हा हा स्पेशलमधून नागपुरास जात असतो. कध
कधी गाण्याच्या रगात असता एका शब्दाचे धड घेऊन त्याला दुसऱ्या
शेपूट लावून बनविलेला गंगाजम्नी शब्द घोळून म्हणताना त्याला फा
मौज वाटते वैय्याकरण शब्दाचे महत्त्व अर्थवाहक म्हणून मानितात, गव
लोक स्वरवाहक म्हणून मानतात, व स्वर घेण्यास बरे पडावे म्हणून पुष्कळ
ऱ्हस्वाचें दीर्घ व दीर्घाचें ऱ्हस्व करिताना त्याना काही दिक्कत वाटत नाही
एखाद्या चिजेत 'सग', 'मंद' असे मजुळ शब्द असले म्हणजे त्याच्याव
दोन दोन मात्राचे वळसे देऊन त्यानी त्याची 'सौग', 'मौद' अश
तऱ्हेवाईक रूपें बनविलीच म्हणून समजावे.

ख्याल व टप्पा हे जसे गाण्यातील भारदस्त भाग त्याप्रमाणे ठुबरी, गजल
तराणा हे त्यामधील थिल्लर भाग होत ते घशातून काढणे म्हणजे घश
विटाळणें आहे असे खानदानीचे गवई समजतात श्रोत्याचा फारच आग्र
पडला तर ते एखादे वेळी तराणा म्हणतील, कारण त्यातील शब्द अर्थशून्
असतात. पण प्राण गेला तरी ते ठुबरी म्हणावयाचे नाहींत.

ठुंबरी ओळखण्याची मुख्य खूण म्हटली म्हणजे 'संया' व 'गुंया' य
शब्दाची विपुलता होय तिच्यांतील विषय बहुतकरून 'माझी सासू खरा

आहे, नणंद हट्टी आहे.' अशा तऱ्हेचें किंवा 'यमुनातटीं मी जात असता माझी घागर फोडली' अशा आशयाचें गाऱ्हाणें असतें. आजपर्यंत हिंदुस्थानात तानसेन, सदारंग, अधारंग, हद्दूखां, हस्सूंखां आदिकरून अनेक प्राचीन व अर्वाचीन गवई झाले पण गाण्यात सासूचा व नणदेचा द्वाडपणा पूर्वी होता तसाच सर्वव्यापी अजून चालू आहे, व घागरी फोडण्याचा क्रम यमुनातटस्थ चटोरानीं अजून सोडिला नाही, हे त्यास लाछनास्पद आहे.

ज्याला चांगला गवई म्हणवून घ्यावयाचे असेल त्यानें खालील नियम अवश्य ध्यानांत ठेवावे त्यापासून त्याचे हित होईल.

१ गवयानें आजपर्यंतच्या संप्रदायास अनुसरून गालांवर गालमिशा ठेवाव्या. त्याचा आकार ॐ या अक्षरातील उजवीकडच्या गाठीसारखा असावा. प्रत्येक चित्रकाराचे थोडेंबहुत स्वरूप त्याच्या चित्रात उतरतें हे तत्त्व जर खरे असेल तर, या अक्षराच्या आकारावरून असे अनुमान निघतें कीं याचा उत्पादक सामवेदाचा कोणी तरी गायक असावा. त्याच्या मिशाच्या या आद्य अक्षरात राहिलेल्या अवशेषावरून सामवेदाचें पुरातनत्वही चांगले शाबीत होते.

२ डोक्यास जरीची टोपी घालून अंगावर शालजोडी घेत जावी या वस्तूमुळें श्रोत्यावर पडणारे तेज दुणावते.

३ मजलशीत दुसरा गवई गात असला तर 'खाशी', 'वाहवा' असे संतोषप्रदर्शक शब्द मोठ्यानें उच्चारून लागलीच जवळच्या इसमापाशीं हलक्या आवाजात 'जसा कांही गद्धा ओरडत आहे!' अशा अर्थाचे उद्गार काढावे या जगात जोपर्यंत चोहोंकडे जीवनकलह चालला आहे तोपर्यंत अशा प्रकारें एका जीवानें दुसऱ्याचा पाणउतारा करण्यात कांहीं पातक नाही हे उघड आहे.

४ ज्या बैठकीस आपले गाणे व्हावयाचे ठरलें असेल तिला नेहमीं उशीरानें जावें. अशा प्रकारें लोकाना त्रास दिल्याबांचून स्वतःचें महत्त्व वाढत नाही

५ आपल्या यजमानाशी व इतराशीं नेहमीं बेपर्वाईनें वागावें. उदाहरणार्थ, कोणी कल्याण राग म्हणावयास सांगितला की आपण भैरवास

सुरवात करावी, केदार सुचविला की मेघमल्हाराची वृष्टि करावी, ख्याल फर्मोविला असता ' धितलाग तननतो 'ची गर्दी करून कपाळ उठवावें व ठुंबरी ऐकण्याची इच्छा दर्शविल्यास ध्रुपदाचा धिंगाणा घालावा. गवई लोक लहरी असतात ही कीर्ति पुढे चालू ठेवण्यास हेंच वर्तन योग्य आहे

६ गाण्यापूर्वी दोन तास विण्याच्या किंवा सतारीच्या तारा जुळविण्यात किंवा तबला लावण्यात दवडावे. कारण तारा चढविताना आपण श्रोत्याची उत्कठाही त्याच मानानें चढवीत असतों हें पक्कें समजावे. कधीं कधीं तर ती अगदी तुटण्याच्या बेतास येते. गवई तंबुऱ्याच्या खुंट्या पिळीत असता किंवा तबल्यावर थाप देत असता कितीकदा तरी त्याचे कान पिरगळण्याची किंवा गालावर थप्पड देण्याची इच्छा श्रोत्याच्या मनात झालेली दिसून येते !

७ तबलजीस चुकविण्याचा प्रयत्न करावा, किंवा तो चुकत नसल्यास त्याच्याकडे विनाकारण धिक्काराने पहावें काहीं लोक समजतात त्याप्रमाणें गाण्याचें खरे मर्म स्वरसंवादात नसून उलट विसवादात आहे. आपल्या साथीदाराचा असा पाणउतारा करीत गेल्यास, आपलें गाणें कोणाच्या पसतीस न उतरलें तरी, त्याचे खापर त्याच्या टाळक्यावर फोडता येतें

८ गाताना श्रोते तारीफ करू लागण्यापूर्वी आपणच आत्मस्तुतीस आरंभ करावा ' लोकानीं आपला गौरव करण्यापूर्वी आपण आत्मगौरव [ Self-respect ] करण्यास शिकलें पाहिजे.' असें जें एका ग्रथकाराने म्हटलें आहे तें अक्षरशः खरें आहे शिवाय महाकवींच्या नाटकातून जो आरभींच कवीची व ग्रंथाची प्रशसा करण्याचा संप्रदाय आढळून येतो त्यानेही वरील नियमास पुष्टीकरण मिळते आत्मस्तुतीच्या कामात बहुतेक सर्व गवयाना जणूं काय बाळकडूच मिळालेलें असतें कारण अनेकदा त्यांच्या पद्यापेक्षा त्यांचें आत्मस्तुतिपर गद्यच कर्णमधुर दिसून येतें.

९ आत्मस्तुतीबरोबर दुसऱ्या गवयाची निंदा करीत गेल्यास ती अधिक खुलून दिसेल.

१० विशेषेंकरून संगीत नाटकांतील प्रसिद्ध पात्राची खूप थट्टा करीत जावी ते तुमचे प्रतिस्पर्धी आहेत, त्याच्या बाजाच्या पेट्यांनीं आपल्या

भात्यांच्या सोसाट्यासरशी तुमच्या तंबुऱ्याची त्रेधा उडविली आहे व त्याच्या अर्थपूर्ण पद्यानी तुमच्या 'संया–गुया'स रानोमाळ पळावयास लाविलें आहे हें तुम्ही विसरता कामा नये.

११ आवाज जन्मताच कर्कश असेल तर फारच चागलें तसा नसेल तर रेंकून म्हणण्याचा अभ्यास ठेवावा. कारण तुमचा आवाज जितका कर्णकटु असेल तितकी तुमच्या गानपटुत्वाबद्दल कीर्ति अधिक होणार हें निश्चित समजावे.

१२ वरील सर्व नियमापेक्षा महत्त्वाचा नियम अजून सागावयाचा राहिला आहे तो हाच कीं, गाताना तोंड जितकें वेडेंविद्रें व भेसूर करवेल तितकें करावें. याचे कारण इतकेंच कीं, जों जो तुमचा चेहरा विद्रूप दिसत जाईल तों तों त्याच्याशीं तुलना करिता तुमच्या गाण्याची खुमारी अधिक स्पष्ट कळून येणार आहे. अंधारात दिव्याचें तेज विशेष पडतें किंवा सहारा वाळवंटात रम्य उद्यान आढळून आल्यास तें फारच बहारीचें वाटतें, त्याप्रमाणें कुरूप तोंडांतून मनोहर गाणे ऐकूं आल्यास त्याची मातब्बरी अधिक वाटते आमच्या धूर्त पुराणकारानीं प्रसिद्ध गायक नारद याची शेंडी डोक्यावर सुरूच्या झाडाप्रमाणें उभी रहावयास लाविली व तुंबरूला घोडमुख्या बनविलें याचें तरी रहस्य हेंच असावे.

तोंडें वेडीवाकडीं करावी असा उपदेश करणे सोपें आहे, पण त्याप्रमाणें वागणें फार दुर्घट आहे देवानें सुदर नाकडोळे दिले असता त्याच्या देणगीचा याप्रमाणें विपर्यास करून त्याला पश्चात्तापांत पाडणें यास बरेच नैतिक धैर्य लागतें. ज्याला तें असेल त्यानें अवश्य वाकोल्या दाखविण्याचा अभ्यास करावा व प्रयत्नातीं परमेश्वर ही म्हण लक्षात असू द्यावी. हा अभ्यास सुलभ जाण्यासाठीं प्रथम एक प्रामाणिक आरसा खरेदी करावा कांहीं गांवढळ न्हाव्यांपाशीं जसे खोटे आरसे असतात त्यापैकीं तो नसावा. कारण, नाहीं तर वांकोल्या न दाखविताही त्यांत तोंड वेडेंवाकडे दिसूं लागेल. असो. आरसा घेतल्यानंतर एक माकड विकत घ्यावें त्याला सपाटून दारू पाजावी. याप्रमाणें त्याला पाजून तर्र केल्यानंतर त्याला विंचू चावववा. असें झाल्यावर सहजच त्याच्या स्वाभाविक लीला सुरू होतील

मुष्टि ६ वी *

# हजामतीची नीतिमीमांसा

'रोज मरे त्याला कोण रडे' ही म्हण आजकालची नाही, फार प्राचीन काळापासून चालत आली आहे. या म्हणीचा अर्थ करिताना नुसतें शब्दार्थाकडे पाहून उपयोगी नाही. कारण आहारनिद्रादिकाप्रमाणे रोजचे रोज मरण्याची आवश्यकताही ईश्वराने ठेविली नाही, किंवा जगाच्या आरंभापासून आजमितीपर्यंत रोजरोज मरण्याची विलक्षण हौसही कोणामध्ये दिसून आली नाही आत्महत्या करणाराला एकदा मरावेंसे वाटते हें खरे आहे पण जर एकदा मेल्यावर तो पुन जिवत झाला तर दुसऱ्यादा मरण पत्करण्यापेक्षा तो जगातील अति निकृष्ट स्थिति सोसण्यास तयार होईल ह्यात सशय नाहीं. इसापनीतींतील 'मोळीविक्या व मृत्यु' ही गोष्ट माझ्या वाचकाना माहीत असेलच. असो. तर या म्हणीचा लाक्षणिक अर्थ मात्र घेतला पाहिजे कोणतीही दुःखाची गोष्ट रोज रोज घडू लागली तर तिचे वाईट वाटेनासे होतें. एक तर सातत्यामुळें दु.ख सहन करण्याची संवय होऊन जाते. दुसरें असे की, दुःखाच्या अपूर्वत्वामुळें प्रथम प्रथम जे भय वाटत असते तेंही हळूहळू नाहीसे होते.

'रोज जन्मे त्याला कोण हसे' ही म्हण जरी प्रचारात नाहीं तरी ती वरील म्हणीइतकीच खरी आहे. आपणाभोवतीं पसरलेल्या सुखापैकीं प्रत्येकाची थोरवी फार मोठी आहे. ती पैदा करण्याकरिता हजारों उदार पुरुषास प्राणास मुकावे लागलें, व हजारों धाडशी पुरुषास जिवापाड कष्ट करावे लागले. तीं प्राप्त होण्याकरिता हजारो पिढ्यास निर्माण होऊन कालाच्या उदरांत जावें लागलें. आपण जर कालप्रदेशात पुढें सरण्याचे ऐवजीं एक एक शतक मागे हटू लागलों तर आपणाभोंवतालच्या वस्तुही एक एक कमी होतील, व अशा रीतीनें हजारो शतकें ओलांडल्यास इमारती, रस्ते, विहिरी, तलाव, शेते, बगीचे, गाड्या, टेबलें, खुर्च्या, पुस्तकें, यंत्रें

---

* वि. विस्तार, पु. ३४, अक १० ( सन १९०३ )

वगैरे यच्चयावत् पदार्थ गुप्त होऊन, आसमंताद्भागी भलें मोठे अरण्य व पाठीमागे एक लांबलचक शेपूट येवढीच सामुग्री अवशिष्ट राहिलेली दिसेल

हजामत ही अशाच निरुपयोगी वाटणाऱ्या परंतु अत्यंत उपयुक्त व सुधारणेमुळेंच प्राप्त झालेल्या वस्तूंपैकी आहे. न्हाव्याच्या धोपटींत असणाऱ्या वस्तरा, साबण, आरसा इत्यादि पदार्थांपैकी प्रत्येक पदार्थ पृथ्वीच्या आरंभापासून आजपर्यंत लोटलेल्या कालाचे अपत्य आहे यांत शंका नाहीं. इतक्या साऱ्या वस्तूंची जेव्हा सिद्धता असावी तेव्हां कुठें डोक्यावरील किंवा दाढीच्या केंसास हुसकावून टाकिता येतें थोडीशी दिरंगाई झाली, की ते डोक्यावर बसलेच म्हणून समजावे आपण दर आठवड्यास हजामत करतों [ नव्हे करवतों ], म्हणून केंस वाढलेले असतां किती त्रास होईल याची आपणास सामान्यतः नीटशी कल्पना होत नाही परंतु सुदैवानें सोयर किंवा दुर्दैवानें सुतक प्राप्त झालें म्हणजे हजामतीची खरी मातब्बरी कळते. खरे म्हटलें तर हजामत ही चित्र, नाट्य, गायन इत्यादि कलामध्ये एक उच्च व मूर्धस्थानापन्न कला आहे हातीं वस्तरा घेऊन रक्तानें डोकें रंगविणारा न्हावी कुंचले घेऊन रंगविणाऱ्या कोणाही चिताऱ्यापेक्षा कमी आहे असें म्हणतां येणार नाहीं. तसेंच हातीं आरसा देऊन सगळ्या तोंडास साबणाचा फेंस लावणें व पात्राच्या तोंडास रंग देऊन सजविणें यांतही फारसें अंतर नाही. डोक्यास पडणाऱ्या जखमांमुळें विव्हळणाऱ्या मनुष्याचें रडगाणें जर हिशेबांत घेतलें तर गाण्याचाही भाग स्मश्रूंत मुळींच नसतो असें कोणासही शपथ घेऊन म्हणतां यावयाचें नाहीं. सारांश, हजामत ही वरील तिन्ही कलांचें मिश्रण असून त्यांपैकीं कोणत्याही कलेच्या तोडीची आहे यांत संशय नाहीं.

या कलेचा ज्या ज्या लोकांत प्रसार अधिक ते ते लोक अधिक सुधारलेले असतात असें चोहोंकडे दिसून येईल पशूमध्यें तर हजामतीची कल्पनाही नसते. बोकडाची दाढी वस्तऱ्याच्या संस्कारापासून आमरण अलिप्त असते. मांजराप्रमाणें भाटीलाही मिशा असून ती फावल्या वेळीं त्यावर तावही देत असते, व यांत तिला स्त्रीस्वभावास विरुद्ध कांहींच दिसत नाही हें आपण रोज पाहतोंच. मोराच्या डोक्यावरचा तुरा नारदाच्या शेंडीसारखा

अखेरपर्यंत उभा असतो, व सिंहाचे आयाळ, पशुनापिकाच्या अभावामुळे, शाकुंतल नाटकाच्या सातव्या अंकात वर्णिलेल्या म्हाताऱ्या ऋषींच्या जटाप्रमाणे अव्यवस्थित स्थितीत असते. पशूंच्या वरची पायरी म्हटली म्हणजे रानटी स्थितीतील लोकाची या लोकातही लोखंडी हत्यार उपलब्ध नसल्यामुळे हजामतीचा प्रचार बेताचाच होता. यानंतर जेव्हा पहिल्याप्रथम वस्तऱ्याचा शोध लागून हजामतीस सुरवात झाली असेल तेव्हा, अमेरिकेचा शोध लागल्यावर जसा कोलंबसाला किंवा मुद्रणकलेचा शोध लागताच वाचनेच्छूंस हर्ष झाला असेल तसाच, ह्या रानटी लोकानाही झाला असेल. कदाचित् हर्षावेशात त्यानी न्हाव्याना मोठमोठ्या पदव्या देऊन त्याचा गौरवही केला असेल खंडेराव महाराजाच्या कारकीर्दीत जसें मल्लाचें व तमाशाचे पिकलें होतें तसेच अर्धवट रानटी स्थितींत न्हाव्याचेंही पिकले असले पाहिजे, व केवळ शब्दशःच नव्हे तर लाक्षणिक अर्थानेंही सर्व राज्याची शेंडी त्याच्या हाती आली असली पाहिजे. अजून आपल्या न्हाव्यात एक तऱ्हेचा मुत्सद्दीपणा दिसून येतो तो या काळाचाच अवशेष असावा असो. वपनकलेचा अचाट शोध लागल्यावरही प्रथम प्रथम लोकास सवय नसल्यामुळें आपले डोके वस्तऱ्याच्या धारेखालीं ठेवणे बरेच जड गेले असेल म्हणून त्याच्यात केंस कातरून सबंध डोकें ठेवण्याचा प्रघात पडला असावा अशाच अर्धवट रानटी स्थितींत अजून पाश्चात्य लोक आहेत याच्या पुढची पायरी म्हटली म्हणजे चिनी लोकाची व आम्हा हिंदुस्थानवासी आर्यांची आम्हीं केंसाच्या नैसर्गिक वाढीस फारच लहानशी म्हणजे केवळ गाईच्या पावलाएवढी जागा आखून दिली आहे या मर्यादेपलीकडे जर एखादा बंडखोर केस गेला तर त्याला दयामाया न ठेवता एकदम छाटून काढण्यात येतें. बरें, हजामत करण्याचा हा हक्क आम्हीं पुरुषानी आपलपोटेपणाने स्वतःकरिताच राखून ठेविला आहे असें नाहीं तर पति मरण पावल्यामुळें ज्याच्या अंगी विशेष अधिकार आला आहे अशा आमच्या अर्धांगींनाही त्यात वाटेकरी केलें आहे किंबहुना त्याचा हक्क आमच्या हक्कापेक्षाही विस्तृत आहे कारण त्यांच्या डोक्यावर गाईच्या पावलाइतकीही जागा आम्ही रानटी निसर्गास मोकळी

ठेविली नसून सर्व प्रदेश वपनकलेच्या स्वाधीन केला आहे. हा हक्क पुरुषामध्ये सन्याशाना मात्र असतो असें असताही विधवाना हक्क नाहीत अशी सुधारकाची ओरड चालूच आहे ! आम्हा आयात मानभाव म्हणून एक जात आहे, तिच्यात पुरुष व सवाष्ण स्त्रियादेखील सन्याशाप्रमाणेच असतात पुरुषातल्याप्रमाणे स्त्रियातही वपनविधि ठेवण्यापासून एक मोठा फायदा होतो हल्लीं आमच्यातील बहुतेक कलाचा दिवसेंदिवस ऱ्हास होत चालला आहे. या हळूहळू मावळणाऱ्या कलापैकी वपनकला ही एक आहे. तिला गिऱ्हाइकें बरींच मिळालीं तरच ती तग धरून राहणार आहे. नाहीं तर इतर देशी कलाप्रमाणे तीही राम म्हणणार यांत तिळमात्र सशय नाही. आमच्यामधील विधवा स्त्रिया या कलेच्या खऱ्या आश्रयदात्या आहेत. त्याचे गळून पडणारे केंस या कलेचें मजबूत टेंके होत. यास्तव विधवाकेशवपन आहे तसेच चालू ठेवणे हें प्रत्येक देशहितेच्छूचे कर्तव्य आहे

केंसाच्या वाढीचा आपल्या मनावर काय परिणाम होतो हें लक्ष्यपूर्वक पाहू ज्या दिवशीं आपण हजामत करवितो त्या दिवशीं आपण तरणेबाड आहोंत असा आपला समज होतो, मग आपलें खरे वय कोणतें का असेना ! आपल्या अगीं एकदम विलक्षण उत्साह शिरल्यासारखा वाटतो, आपणास डोकें ताठ ठेवून व छाती वर करून चालावेंसे वाटतें, रस्त्यानें चालणाऱ्या युवतीची कुचेष्टा करावीशी वाटू लागते, घरात जे वडीलधारें मनुष्य असेल त्याला वाकोल्या दाखवाव्याशा वाटतात, देवधर्म सब झूट आहे असें प्रतिपादन करावयाची इच्छा होते, मिशाना पीळ भरण्याची इच्छा आवरावीशी वाटत नाहीं, बोलताना शिव्या हासडण्याची हौस पुरवल्याशिवाय रहावत नाही, पागोट्याचा झोक एका कानावर टाकल्याशिवाय चैन पडत नाहीं, अशा एक की दोन, अनेक चेष्टा कराव्याशा वाटू लागतात यानंतर एकदोन दिवस गेले कीं हळूहळू आपला नूर बदलूं लागतो पगडीचें वर्तुळ पूर्ववत् क्षितिजाशीं समातर होऊ लागते, 'तू'बद्दल 'तुम्ही' व 'तुम्ही'बद्दल 'आपण' हे शब्द तोंडी येऊ लागतात, रस्त्यानें वांकून व नाकासमोर चालण्याची इच्छा होते, 'कदाचित् जगन्नियता ईश्वर असेल, नाहीं कुणी म्हणावें ?' असे पुसट भक्तीचे मोघम व गुळमुळीत उद्गार निघूं लागतात,

लोकांच्या गुणाकडे आदरानें व दोषांकडे सदय अंतःकरणानें पहावेंसे वाटू लागते. असे होता होता जेव्हा हजामतीचा दिवस पुन्हां जवळ येऊन ठेपतो त्या वेळी आपण फारच सभावित व समोर कित्त्यादाखल ठेवण्यासारखे बनतों. आपल्या चेहेऱ्यात गाभीर्य येतें, तोंडात प्राकृत शब्दापेक्षा सस्कृत शब्दाचा भरणा अधिक दिसून येतो, फार हसायची लाज वाटू लागते, ईश्वरावर निःसीम भक्ति जडते, रगीत पागोट्यापेक्षा पांढरें पागोटें घालावेसें वाटतें; फार काय, पण स्वत च्या स्त्रीलाही मुलीप्रमाणें लेखून पितृवात्सल्यानें ' अष्टपुत्रा सौभाग्यवती भव ! ' असा आशिर्वाद द्यावासा वाटतो. हा सर्व फरक एका आठवड्याच्या दरम्यान घडून येतो, व अल्पकाळात संपादन केलेला हा सर्व सभावितपणा केसाबरोबर छाटला जाऊन आपण फिरून वीस वर्षांच्या पोराइतकेच अल्लड, रगेल व उल्लू बनतों. येणेंप्रमाणें दर आठवड्यास आपण आपले सर्व आयुष्य पुनः पुनः अनुभवीत असतों असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं.

परतु हा फरक चालला असताना दुसरा एक फरक आपल्या नीतिमत्तेंत चाललेला असतो केंसाबरोबर आपल्या नखाची वाढही चालूच असते. नखें मोठीं झाली म्हणजे ती तीक्ष्ण आहेत किंवा नाहींत हें पाहण्याकरिता त्याचा इतरावर प्रयोग करावासा वाटू लागतो, प्राकृत भाषेत म्हणावयाचे म्हटले म्हणजे दुसऱ्यास ओरबडावेसें वाटू लागते. मनुष्याच्या अंगी सामर्थ्य आलें म्हणजे त्याचा दुरुपयोग झालाच म्हणून समजावे. फार कशाला ? मी या वेळी हातीं लेखणी घेऊन लिहीत आहे म्हणून माझ्या मनांत फार सभ्यपणाचे विचार येत आहेत. पण लेखणी करण्यास हातीं चाकू घेतला की पुरे — माझे डोळे तारवटून जातात, रक्तामध्यें खळबळ सुरू होते, व ताडकन् उठून चाकूला कोणी बळी मिळतें कीं नाहीं हें पाहण्याकरिता मी साऱ्या घरभर फिरू लागतों चाकूसारखें हलकेंसलकें हत्यार क्षणभर हातीं आल्याचा हा परिणाम ! मग माझ्या बोटांतून अंगचेच चाकू बाहेर आले तर माझ्या क्रूरपणास सीमा न राहिल्यास नवल नाहीं.

याप्रमाणें दर आठवड्यास आपली नखे आपणास रानटी स्थितीकडे ओढीत असतात, व केंस सुधारणेकडे आकर्षून नेत असतात. यालाच

कदाचित् शास्त्रज्ञ केशाकर्षण म्हणत असावेत असा माझा समज आहे. याप्रमाणें वरील दोन्ही अवयवाची झोंबी चालली म्हणजे त्या अवयवाच्या स्वामीची पुरेवाट होते, व केंसांपासून उद्भवणारा सभ्यपणा व नखापासून होणारा रानटीपणा यांचे कधी कधी फार हास्यास्पद मिलाफ उत्पन्न होतात. उदाहरणार्थ, रस्त्याने जात असता बाजूने एखादी तरुणी चालली असली तर केसाच्या प्रेरणेमुळे आपण खालीं मान घालून चालत असतो, पण इतक्यात नखे एकदम उचल खाऊन तिच्या तोंडाचा टवका काढण्याची सूचना करितात. अहिंसा हाच खरा धर्म आहे हे तत्त्व प्रतिपादण्याकरिता वक्तृत्वाचा व दयाळुत्वाचा पुरवठा केंस करीत असतात, पण हें वक्तृत्व संपतें न संपतें तोंच नखे श्रोत्याच्या भाविक चेहेऱ्यांवर ओरखडे काढून वरील उदात्त तत्त्वाचें खडन करितात.

याप्रमाणें केंसाचे व नखाचे गुणधर्म एकमेकांच्या अगदीं विरुद्ध आहेत; व हजामतीमुळें केंस गेल्यानें एका बाजूनें सभ्यपणाचा जितका नाश होतो तितकीच नखास रजा मिळाल्यानें दुसऱ्या बाजूने रानटी प्रवृत्तीची पीछेहाट होते. एवच हजामतीमुळे प्रथम जो तोटा झाल्यासारखा वाटतो त्याची भरपाई नखकुन्तनाच्या द्वारें पूर्णपणें होऊन येते यात संशय नाही

हा हजामतीपासून होणारा पहिला फायदा होय याशिवाय दुसरेही फायदे तिच्यापासून आपणास प्राप्त होतात. हजामत होईपर्यंत आपली शेंडी न्हाव्याच्या हातीं असते, व तो आपणास केंसभरही इकडे तिकडे हालूं देत नाही, यामुळें आपणास एक आज्ञाधारकपणाचा बोधप्रद धडाच मिळतो. प्रजेच्या अगीं जी राजनिष्ठा असली पाहिजे तिचा खरा उगम न्हाव्याच्या वाटींत असतो या दृष्टीनें पाहिलें तर न्हावी हे राज्याचे खरे हितकर्ते व आधारस्तभ आहेत असें दिसून येईल. शिवाय सर्व हजामतीभर हत्याराशीं काम पडत असल्यामुळें आमच्या पूर्वजाचें आर्यतेज अगी जागृत ठेवण्यासही तिचा फार उपयोग होतो वाटीतील व वस्तऱ्याचें पाणी आमच्या अगांतील पाणी नेहमीं जिवंत ठेवीत असतें. हत्याराच्या कायद्यात वस्तरे व नराण्या याचा समावेश केला नाहीं हे आमच्या इंग्रज प्रभूचे आमच्यावर डोंगराएवढे उपकार आहेत. हजामत होत असताना डोक्यास ज्या जखमा

होतात त्याच्यामुळें दुःख सोसण्याचें सामर्थ्य अंगीं येतें, व हजामत होईपर्यंत दुःख सोसल्याशिवाय इलाज नसतो, म्हणून एक प्रकारची ईश्वरावर हवाला ठेवण्याची व कोणत्याही स्थितींत राहिलें तरी संतोष मानण्याची संवय जडून जाते वस्तऱ्याच्या तडाख्याचा अनुभव घेऊन हें जग दुःखपूर्ण आहे अशी खात्री होते, व उन्मत्तपणा जागचे जागीं गारठून जातो. मोठमोठ्या अधिकाऱ्यांचेंही हजामतीवांचून चालत नाही ही दुःखांत समाधानाची गोष्ट आहे. कारण उन्मत्त व अविचारी अधिकाऱ्यांस हजामतीसारखें वक्तशीर व झणझणीत दुसरें अंजन नाहीं. जो मॅजिस्ट्रेट हजामतीनंतर दोनतीन दिवस लोटले असता फटक्यांची शिक्षा फर्मावतो तोच हजामतीचे दिवशीं अपराध्यास दंडावर सोडून देतो हा नेहमींचा अनुभव आहे फौजदारी कायद्याच्या धोरणी कर्त्यांनी न्यायाधीशाच्या किंवा पंचांच्या हजामतीचा भाग आपल्या व्यापक कायद्यातून कसा वगळला कोण जाणे !

शेंडी विंचरताना न्हावी आपल्या डोक्यास जे हिसके देतो ते तरी किती बोधप्रद असतात ! त्यांच्यामुळें चक्रनेमिक्रमानें फिरणारें दैव आपल्या डोळ्यांसमोर मूर्तिमंत उभें रहातें. या जगांत स्थिर काही नाहीं, या क्षणास उच्च तर पुढील क्षणास नीच स्थिति आपणास अनुभवावी लागते हें तत्त्व केंसांच्या ओढाताणीमुळें आपल्या डोक्यावर चागलें ठसते. जगाची विषमता अगदीं जवळचा दृष्टांत घेऊन डोक्यात बिंबवण्याच्या कामीं केंस विंचरणे हें पहिल्या प्रतीचें आहे. धरणीकंप सुद्धा त्यापुढें केवळ पोरखेळ ठरतात

साबणाचाही उपयोग जगातील नीति वाढविण्याचे कामीं कमी असतो असें नाही. थोड्याशा घर्षणानें साबणाच्या एका अणूपासून विस्तृत फेंस उत्पन्न होताना पाहून कोणालाही शून्यापासून हे अवाढव्य विश्व निर्माण करणाऱ्या ईश्वराची आठवण झाल्यावाचून रहाणार नाहीं तसेंच साबणाचे बुडबुडे काही वेळ टिकून नंतर त्याचे ऑफस झालेलें पाहून या ससाराचे क्षणभंगुरत्वही त्याजवर ठसल्याशिवाय राहणार नाहीं.

आता राहिला आरसा. न्हाव्याचे आरसे बहुतकरून विषम भिंगांचे असल्यामुळे त्याच्या अंगीं सत्यापेक्षा कल्पकताच विशेष असते. म्हणजे वस्तुस्थितीचें हुबेहुब प्रतिबिंब वठविण्यापेक्षा तिचा विपर्यास करणेंच त्यांना पसत वाटते. या त्याच्या विनोदी स्वभावामुळे होते काय, कीं आरशांत पहाणाराचे अवयव अगदीं निराळ्या स्वरूपांत दिसतात. म्हणजे नाकाच्या ठिकाणीं गुडघा दिसतो व तोंडाच्या जागीं पोट दिसतें असे नाहीं; तर

सरळ नाक असेल तेथें वाकडे दिसतें, लहान दात असले तर मोठे दिसतात व कान लहान असले तर अघळपघळ लांबलचक दिसतात. इतकेंच नाहीं, तर कधी कधीं हे गमती आरसे चेहेऱ्यावर नवे नवे अवयवही उत्पन्न करितात. सौंदर्याचा गर्व वाहणाऱ्या एका गृहस्थास परवा आरशात पहाताच नाकावर गेंड्याच्यासारखे शिंग दिसू लागले व कपाळावर शंकराच्याप्रमाणें एक बटबटीत डोळा दिसूं लागला. असो तर या आरशाचा धर्म असा असल्यामुळे सौंदर्याचे सापेक्षत्व सिद्ध करण्यास त्याचा फार उपयोग होतो कितीही सुंदर पुरुष असू द्या, त्याचा सौंदर्याचा गर्व न्हाव्याचा आरसा पाहिल्याबरोबर जागचे जागी जिरलाच पाहिजे यावरून आमच्या देशातील विधवाचें लक्ष्य सौंदर्यापासून व विषयापासून परावृत्त करण्यात या आरशापासून किती साहाय्य होतें हे उघड होईल

येथपर्यंत हजामत करविणारावर जे परिणाम घडतात त्याचे आविष्करण झालें हे परिणाम घडत असता खुद्द हजामसाहेबासही अशाच प्रकारचें नैतिक शिक्षण मिळत असतें. समोर बसलेल्या मनुष्याच्या यातना चाललेल्या पाहून त्याचें मन कोमल बनत जाते. त्याला एका क्षणीं शेंडी तर दुसऱ्या क्षणी पाय धरावे लागत असल्यामुळे व त्याच्या वस्तऱ्याच्या एका फटकाऱ्यासरसे हजारों केस आपल्या उच्च स्थानावरून भ्रष्ट होत असल्यामुळें त्याला ऐहिक घडामोडींचा हरघडी अनुभव येतो, दर आठवड्यास केशनखादिकांत जी वाढ होते ती पाहून सर्व वस्तूंचें अस्थिरत्व त्याच्या प्रत्ययास येतें, व डोक्यात जिरविलेले पाणी लागलीच डोळ्यावाटे झिरपताना पाहून त्याला प्रभूच्या अतर्क्य लीलेची वारंवार आठवण होते

याप्रमाणे स्मश्रूची नीतिदृष्ट्या योग्यता आहे मनुष्यजातीच्या उन्नतीचा व केसाच्या अवनतीचा निकट संबध वर दाखविण्यात आलाच आहे. वाचकहो, या संस्थेच्या उपयुक्ततेविषयी मजप्रमाणें तुमचीही खात्री झाली असेल तर केशवपनाची चाल सुधारकाच्या बडबडीकडे लक्ष्य न देता चालू ठेवा. यातच आपला तरणोपाय आहे. मात्र आपणापेक्षा रानटी प्राण्याचें मन वळविण्याच्या भरीस पडू नका तुम्ही कितीही कंठशोष केला तरी सुधारक सबंध डोकें ठेविल्याशिवाय कधीं राहणार नाहींत, पाश्चात्य लोक कांहीं केल्या तुमची शेंडी उपटण्यास तयार होणार नाहींत, व पशु तर काय, पशुच ! सिंहाच्या डोक्यावर गाईच्या पावलाचें मोजमाप घेण्याचा प्रयत्न करू लागाल तर गाईच्या डोक्यावरच सिंहाचा पंजा पडेल, हें मनांत पूर्ण वागवून असा.

मुष्टी ७ वी*

# भविष्यकथनाचीं साधनें

अमुक अमुक गोष्ट अमुक वेळेस घडून येईल असें, ती घडण्यापूर्वी व अनपेक्षित असता निश्चयात्मक सांगणें, यालाच भविष्यकथन किंवा भाकित म्हणतात ही व्याख्या ततोतत लागण्यास अर्थातच तीन गोष्टीची आवश्यकता असते एक तर विधान निश्चयात्मक पाहिजे अमुक झालें तर अमुक होईल अशा तऱ्हेचे विधान 'आत्याबाईला मिशा असत्या तर काका म्हटले असतें' या विधानापेक्षा अधिक मातब्बरीचें नाही 'कदाचित् असें असें घडून येईल' अशा प्रकारचे गुळमुळीत विधानही भाकिताच्या पदवीस पोहोंचण्याच्या योग्यतेचें नाही नाही तर वर्तमानपत्रातून झळकणारी पार्लमेंटच्या निवडणुकीसबधाची झाडून सारीं विधानें भाकितें होऊ पहातील. दुसरी आवश्यक गोष्ट म्हटली म्हणजे ते विधान ती गोष्ट अनपेक्षित असताना झालें पाहिजे रोग्यास घरघर लागलेली पाहून त्याच्या मरणाचें भविष्य करणें व घडल्यानतर त्याबद्दल फुशारकी मारणे हे वेडगळपणाचें लक्षण होय तिसरी आवश्यक गोष्ट ही की, विधान गोष्ट घडण्यापूर्वी झालें पाहिजे एखादा विलक्षण चमत्कार घडल्यावर कांहीं भविष्यवादी म्हणवून घेणारे लोक 'असें होणार हे मी आधीच भाकीत केलें होतें' अशी फुकट घमेंड मारून धोरणीपणाचे ऐवजीं वेडेपणा मात्र पदरीं घेतात अकलेची वाटणी होताना चुकलेल्या या लोकाना इतकेंही कळण्याचें ज्ञान नसतें कीं, जें विधान गोष्ट घडण्यापूर्वी भाकित म्हणून म्हटलें जातें तेच ती घडल्यानंतर प्रथमतःच झाल्यास घमेंड किंवा फुशारकी या नांवाप्रत पावतें.

नुसतें भाकित केल्यानें आपणावर लोकाचा विश्वास बसेल ही आशा निरर्थक होय. तो बसवून घेण्यास लोकास भाकिताचा ठोकताळा आला पाहिजे. असें असता काहीं लोकास आपल्या बगलेतून झपाझप भाकितें काढून दुसऱ्यास फुकट वांटण्याची जी हौस असते ती काही विलक्षण! आमच्या माजी राणीसाहेबाना देवानें जरी उदंड आयुष्य दिलें होतें तरी त्याच्या जिवंतपणीं त्यांच्या मृत्यूसंबंधानें प्रत्येक वर्षी भाकितें होत. शेवटी

* वि विस्तार पु. ३४, अंक ११-१२ [सन १९०२]

एकदाचें दोन वर्षांपूर्वी एका ज्योतिषास यश मिळाले पण ते ज्योतिषाच्या ज्ञानवृद्धत्वाचे फळ नसून केवळ राणीसाहेबांच्या वयोवृद्धत्वाचे होते. वेधशालासही अशी वाझ भाकिते करण्याची भारी हौस! त्याची सगळी इमारत वातावरणावर उभारलेली असावयाची. तेव्हा ती बऱ्याच वेळा वाऱ्याच्या हेलकाव्याबरोबर सत्यापासून दूर गेलेली आढळल्यास नवल नाहीं. जेव्हा वेधशाला अनावृष्टीचें भाकीत करिते तेव्हा सर्व सृष्टि अतिवृष्टीमुळें जलबंब झालीच म्हणून समजावे, व तिनें पावसाचे भविष्य केले म्हणजे लागलीच सगळे जग वायुशास्त्रवेत्त्याच्या डोक्याप्रमाणे कोरडे ठणठणीत पडतें. वेधशालेच्या होऱ्यात वादळ आले की, हवा फारच शांतपणे तिच्या अप्रयोजकपणाचें चिंतन करीत असते. पण वेधशाला शांत वातावरणाची उत्कंठेनें वाट पहात बसली म्हणजे झंझावात एखाद्या मत्सरी वल्लभाप्रमाणें चोहोंकडे रंगण घालू लागतो. याप्रमाणे वेधशाला सृष्टीशी आंधळ्या कोशिंबिरीचा खेळ खेळत असते, व ज्याप्रमाणे रात्र व दिवस एकमेकास कधी भेटत नाहीत त्याचप्रमाणें वेधशाला व सत्य यांची वर्षानुवर्षे गांठ पडत नाहीं.

वेधशाळेच्या या चमत्कारिक वृत्तीचा सरकारास व लोकास फायदा करून घेता येण्यासारखा आहे. जेव्हा जेव्हा सरकारास दुष्काळाची भीति वाटत जाईल तेव्हा तेव्हा त्यानें वेधशाळेस दुष्काळाचें भाकीत करण्याचा हुकूम पाठवावा, म्हणजे ताबडतोब चोहोंकडे सुबत्ता होत जाईल. उलटपक्षीं अतिवृष्टीचा संभव दिसला कीं, पावसाचे भविष्य वर्तविण्याचा तिला हुकूम सोडावा, म्हणजे लागलीच पाऊस बंद पडत जाईल. पूर्वी वाय्वस्त्र, पर्जन्यास्त्र वगैरे अस्त्रांचे मंत्र कसे असतील ते असोत, पण हल्लींच्या काळी तरी इष्टेतर देवतास आव्हान केले असता इष्ट देवता तेव्हाच प्रसन्न होतात, असा सर्व वेधशालाचा अनुभव आहे. [रमणी अनुकूल नसल्यास ज्याप्रमाणें वल्लभ दुसरीवर प्रेम करण्याचा आव घालतो व शेवटी यश संपादन करितो, त्याचप्रमाणें वायुशास्त्रवेत्ताही पावसाची प्रतीक्षा करून सूर्याची मर्जी संपादन करितो, व कडकडीत उन्हाची अपेक्षा करून पावसाच्या सरीवर सरी पडावयास लावितो] रयतेस जो वेधशालेपासून फायदा व्हावयाचा तो असा—वेधशालेचे भाकित जरी प्रत्येक वेळेस हटकून खोटें ठरलें तरी त्या भाकिताचा विपरीत अर्थ घेत गेल्यास वेधशाळेच्या चुकीच्या नियमितपणा-

मुळेंच तो अर्थ हजार हिश्शानीं खरा ठरावयाचा, व याप्रमाणें हवापाण्याचें मान अगोदर कळत गेल्यामुळे रयतेस पुढें येणाऱ्या अडचणींचा बंदोबस्त आगाऊ करता येत जाईल हे उघड आहे वेधशालेनें दुष्काळाचें भाकित केले कीं, शेतकऱ्यानीं खुशाल पेरणी करण्यास सुरवात करावी आणि तिनें सुबत्तेचे भाकीत केल्यास त्यानीं प्रथम धान्य साठविण्याकडे लक्ष पुरवावें.

भविष्यकथनाची जी प्रसिद्ध साधनें आहेत त्याचे दोन वर्ग करितां येतील काहीं साधने घडणाऱ्या गोष्टींशीं कार्यकारणभावाने संबद्ध असतात, व काहींचा त्याच्याशीं अर्थाअर्थी काहीं संबध नसतो. या दुसऱ्या वर्गांचेही ज्योतिष, काजळी, रमल वगैरे पोटवर्ग आहेतच ज्योतिषी आकाशांत चमकणाऱ्या ग्रहाच्या गतिस्थितीवरून भविष्य काढू पहातो, पायाळू जमिनीवर ठेवलेल्या काजळांत पुढें घडणारी गोष्ट पाहू लागतो, व रमलवाला फाशावरून किंवा कोष्टकावरून ती ताडू लागतो. पहिल्याचा आधार तेज, दुसऱ्याचा अधकार व तिसऱ्याच्या पाढऱ्यावर काळे केलेली वस्तु. या दृष्टीने रमलाची जागा ज्योतिष व काजळी यांच्या मधोमध येते. माझ्या मते हे तिन्ही आधार भ्रमात्मक आहेत फासे अमुक अमुक तऱ्हेनें पडले, या गोष्टीचा मनुष्याच्या दैवाशी काय संबध येऊन पोहोंचतो बरे ? फार झाले तर सोगट्यावर व त्याच्या द्वारे खेळणारावर त्यांचा परिणाम होईल, परंतु या संसाररूपी विशाल पटावर खेळणाराचें नशीब बदलण्याची त्याच्या अगीं मुळीच शक्ति नाही हाच प्रकार काजळीचा. जगात प्रथमतःच प्रवेश करिताना त्याकडे रडवें तोंड करून आलें काय किवा पाय झाडीत आलें काय एकच. एकामुळे भविष्यकालीन गोष्टी काजळींत वाचण्याचें सामर्थ्य यावें व दुसऱ्यामुळें त्यासंबंधाने काजळीइतकाच अंधार मेंदूंत असावा, याचे कारण काय ! या दोहोंच्याही वरची कडी ज्योतिषाची आहे. खरें म्हटलें तर ग्रहाचा परस्पराशी काहीं तरी सबंध आहे का ! उद्यां मंगळ नाहींसा झाला तर शनीस सुतक धरावें लागणार नाहीं. वरुण व प्रजापति हे दोन ग्रह नवीनच सापडले तेव्हां इतर ग्रहांस सोयरही लागलेलें ऐकिवांत नाहीं. जर आकाशस्थ ज्योतींमध्यें खरोखरीच मित्रत्व शत्रुत्व असतें तर अरुंधती वसिष्ठऋषीस मिठी न मारता शतकेंचीं शतकें गप्प बसली असती काय ? सूर्य पुत्रवात्सल्याने शनीच्या कंठाभोंवती आपल्या बाहूंचें दुसरें कडें

अडकवित्यावाचून राहिला असता काय ? ज्योतीज्योर्तीमध्यें जर ही कथा तर त्याचा आम्हा दूरच्या प्राण्याशीं सबंध बादरायण संबंधाखालींच येणार नाहीं का ? शनीची साडेसाती सुरू झाल्याबरोबर जर मनुष्यावर अनर्थांची पर्णोळिका येत असेल तर मुळामुठा नदीस पूर आल्याने आकाशगंगा गढूळ का होऊ नये ? व एखाद्या सन्याशास मुंडल्याबरोबर शेंडेनक्षत्राची शेंडी का छाटली जाऊ नये !

याशिवाय अंतःकरणप्रवृत्ति व कर्णपिशाच्च अशींही दोन भविष्यकथनाचीं साधने प्रसिद्ध आहेत पहिल्या साधनाचा अभिमानी दुष्यंत राजा होता. ‘ सतां हि संदेहपदेषु वस्तुषु प्रमाणमंतःकरणप्रवृत्तयः ’ असें त्याचे मत होतें पण हे विधान साधुपुरुषाच्या शुद्ध अंतःकरणास मात्र लागू पडण्यासारखे आहे. माझे अंतःकरण शकुंतलेशीं संभावितपणाचे वर्तन ठेवणाऱ्या दुष्यंताच्यासारखें शुद्ध नसल्यामुळें या साधनाचा रामबाणपणा मला अजून पटला नाहीं, व यांत माझा फारसा दोषही नाहीं आता राहता राहिले कर्णपिशाच्च. हें पिशाच्च कानाशीं लागून भविष्यवाद्याचे कान लांबतात कीं नाहीं याचा मला अनुभव नाहीं, पण त्यावर विश्वास ठेवणाराचे कान तरी बरेच लांब असतात हे मी पक्कें सांगू शकतो.

भविष्यकथनाचीं हीं जी अतींद्रिय साधने वर सांगितलीं त्यांची छाप पृच्छकावर शास्त्रीय साधनाच्यापेक्षा अर्थातच अधिक बसते ज्या गोष्टीचा पुढे घडणाऱ्या गोष्टीशीं असलेला कार्यकारणसंबंध बुद्धीस गोचर असतो, त्याजवरून काढलेले अनुमान चुकीचे आहे असेंही एखादे वेळीं दाखविता येते पण साधने व साध्य यामध्ये जेथे तोंडओळख देखील नसते तेथे पृच्छक मोठा दीर्घशहाणा असला तरी काय रडणार ? अगम्य वस्तूचा बुद्धिगोचर वस्तूवरील वरचढपणा नेहमीं कायम रहाणार. म्हणून शहाण्या भविष्यवाद्यानें सदोदित आपली इमारत शास्त्रीय नियमावर उभारून बाह्यात्कारी मात्र तिला ज्योतिषाचा किंवा कर्णपिशाच्चाचा आधार असल्याचा आव घालावा. कोलंबसाने एकदा चंद्रग्रहण गणिताच्या नियमाच्या आधारें वर्तवून नंतर चंद्राचा कोप होणार असल्याचे भोळ्या इण्डियन लोकांस भासविलें, दुसऱ्या एकानें आपल्या बायकोचा लाकडाच्या ढलप्यावरील निरोप वाचून नंतर त्याच्याशीं कान लावून निर्जीव वस्तूचेही संदेशकथनाचें

सामर्थ्य अडाणी लोकांच्या प्रत्ययास आणून दिले, वगैरे गोष्टी वाचकास माहीत असतीलच आता तावड्या इंडियन लोकाइतके अडाणी पृच्छक मिळण्यासारखे शिकदर नशीब प्रत्येक भविष्यवाद्याचे थोडेच असते ! तथापि पृच्छकाच्या मूर्खपणाच्या अभावाचा वचपा त्याच्या स्वतःच्या कपटपटुत्वाने पूर्णपणे काढता येईल अशी माझी खात्री आहे. ज्याप्रमाणे गारोड्याच्या चमत्काराशी काडीचा व फूक मारण्याचा काही सबध नसूनही तो त्याच्या साहाय्याने आपल्या मन्त्रप्रभावाचा प्रेक्षकावर पूर्ण ठसा उमटवितो त्याप्रमाणे पृच्छकावर चागला ग्रह उत्पन्न करण्याकरिता ग्रहाचें साहाय्य घेतल्यास पुष्कळ वेळा त्यास चागल्या रीतीने चकविता येते. कोणकोणत्या ग्रहामध्यें जिवश्चकठश्च आहे, कोणत्या ग्रहामधून विस्तव जात नाही, कोणते साम्राज्यवादी ग्रह इतर ग्रहास आपल्या जाळ्यात अडकाविण्यास पहात आहेत, वगैरे ज्ञानाचा गध जरी नसला तरी आपल्या पृच्छकास जाळ्यात अडकविण्याकरिता प्रत्येक धोरणी भविष्यवाद्यास ग्रहामधील अतर्राष्ट्रीय [ international ] सबधाच्या पूर्ण माहितीची बतावणी करावी लागते. ग्रहाची दृष्टि किती दूरवर पोहोचते वगैरे माहितीचा सपर्क नसूनही दूरदृष्टि भविष्यवाद्यास त्याबद्दल लाबलचक चऱ्हाट वळावे लागते. ग्रह मार्गी केव्हा असतो किंवा वक्री केव्हा होतो वगैरे ग्रहाच्या फेऱ्याबद्दल कधी स्वप्नही पडत नसता लक्ष्मीची वक्रदृष्टि झालेल्या व आकाबाईच्या फेऱ्यात सापडलेल्या प्रत्येक जोशास त्याविषयी सर्वज्ञत्वाचें ढोंग पत्करावे लागते

भविष्य वर्तविणे व ते शब्दश खरे होणे या दोन्ही गोष्टी फारच थोड्या भविष्यवाद्याच्या नशिबी असतात. अशाच थोड्या भाग्यवंतापैकी नाटककार व कादबरीकार हे होत. शेक्सपियरने मॅकबेथ नाटकात एक विलक्षण भविष्य चेटकिणीकडून वदवून तें फारच अकल्पित रीतीने अक्षरश पूर्ण करून दाखविलें आहे कालिदासानेही दुर्वास ऋषीच्या तोंडात एक भाकित घालून ते अचाट रीतीनें सिद्धीला नेलें आहे कवीच्याच पक्तीला चोर बसतात चोरांचें कवीशी साम्य अर्थचौर्यापुरतेच नसून भविष्यकथनासंबधानेंही आहे. जर एखादा अलंकार चोरीला गेला व एखाद्या चोराने जर तो अमुक अमुक ठिकाणीं खणल्यास सांपडेल असें भविष्य केलें तर त्याचा

इटकून पडताळा येणार असे समजावे. कवींचें व चोराचें भविष्य इतके अचूक असण्याचें कारण भाकिताप्रमाणें त्याची पूर्णताही त्याच्या हातीं असते हे होय

नुसत्या धूर्तपणाच्या पुजीवर भविष्यकथन कसें करावें याचे एक निराळें शास्त्रच करिता येईल हे शास्त्र लिहिण्याचें कोणी मनावर घेतल्यास त्यास सुलभ जावें म्हणून त्याचे काहीं नियम येथे देतों

एखादी गोष्ट ज्या काळी घडणार असे आपण भविष्य करितों तो काळ एक तर श्रोत्याच्या किंवा वाचकाच्या आयुर्मर्यादेत पडण्यासारखा असतो किंवा ती सपल्यानंतर येणारा असतो.

प्रथम आयुर्मर्यादेंत पडणाऱ्या काळासंबधाने केलेल्या भविष्याचा विचार करूं. या भविष्यासंबधाने दोन विशेष गोष्टी लक्षात ठेविल्या पाहिजेत. एक तर घडणारी गोष्ट वस्तुस्थितीचा विचार करिता संभवनीय असली पाहिजे, व दुसरें, घडणारी गोष्ट, तिचा काळ व तिचें स्थळ हे जे प्रत्येक भाकिताचे घटकावयव असतात त्यापैकीं नेहमीं एक अनिश्चित व बाकी राहिलेले दोन निश्चित ठेवण्याची आपण खबरदारी घेतली पाहिजे. म्हणजे खालीं दिलेल्यापैकीं एखाद्या नमुन्यावर सदोदित भविष्य करीत असावे—

‘ जर्मनीच्या बादशहावर त्याच्या राजधानीत एका वर्षानें एक चमत्कारिक प्रसंग येणार आहे.’

[ राजांवर नेहमींच चमत्कारिक प्रसंग येत असतात. भविष्यकथनाच्या तारखेपासून एका वर्षाने त्याजवर कोणताही क्षुल्लक प्रसंग आला तरी लोकांचें इतर प्रसंगाकडे दुर्लक्ष होऊन त्या प्रसंगाकडे दृष्टि वेधून जाईल, व याप्रमाणें आपलें भाकित पूर्ण झालें असे समजण्यात येईल. या स्थलीं घडणारी गोष्ट मोघम ठेविल्यानेंच आपली अब्रू बचाविली जात आहे हे तेव्हाच लक्षात येईल ]

‘ चालू सालीं पृथ्वीवर एक मोठा भूकंप होणार आहे ’

[ दर वर्षी पृथ्वीवर कोठें ना कोठेंतरी धरणीकंप होतोच होतो. यंदा तो कोणत्याही ठिकाणीं जरी घडून आला तरी आपलें स्थलवर्णन मोघम असल्यानें त्याचा आपल्या भविष्याशीं संबंध जुळवितांना फारशी अडचण पडणार नाहीं. ज्या ठिकाणीं अशा तऱ्हेचा धक्का बसतो त्या ठिकाणच्या रहिवाशांना तो मोठा वाटणेंही साहजिक आहे: ]

' लवकरच इंग्लंड व रशिया यामध्यें मोठा तंटा उपस्थित होणार आहे.

[ या दोन्ही देशांतील साम्प्रतचे संबंध पाहता वरील विधान मागेंपुढें खरें होणार यांत मुळीच संशय नाहीं. आता तें फार लवकर न होता २०-२५ वर्षांनी जरी खरें झालें तरी आपण योजिलेला ' लवकरच ' हा शब्द राष्ट्राच्या इतिहासाच्या दृष्टीनें त्या अवधीकडेही लावण्यास फारशी हरकत येणार नाहीं.]

आजपर्यंत ख्रिस्ती धर्मशास्त्र, भविष्योत्तरपुराण इत्यादि जे भविष्यपर ग्रंथ झाले आहेत त्यातील त्या त्या ग्रंथाच्या कालानंतर घडून येणारी म्हणून वर्णिलेली सर्व भविष्यें वरील नमुन्यावरच आढळून येतील ग्रीक देशातील डेल्फाय या बेटातील देवाचा कौलही याच संदिग्ध पद्धतीवर मिळत असे. ख्रिस्ती धर्मशास्त्रात देवाचा प्रेषित भूतलावर प्रगट होण्यासबंधाचें जें भाकीत होतें तें इतकें मोघम होतें, की येशू ख्रिस्ताचा अवतार झाल्यावर त्याच्या प्रेषितत्वासबधानें लढा पडून त्यामुळेंच ख्रिस्ती व यहुदी असे दोन पंथ उत्पन्न झाले, व ' मी माझ्या लाडक्या लोकाना पुढें जगाचें राज्य देईन ' हें प्रभूनें दिलेलें मोघम अभिवचन अजून यहुदी लोक उराशीं बाळगून त्या सुदिनाची वाट पहात आहेत !

प्रतिवर्षी प्रसिद्ध ज्योतिषाकडून जीं वर्षफले प्रसिद्ध होत असतात त्यातही अशीच खुबी आढळून येते ' काहीं भागात पाऊस चांगला पडेल व काहीं भागात कमी पडेल. ' ' पश्चिमेकडे एक मोठी लढाई होईल ' [ भाकिताप्रमाणे पश्चिमेस झाली तर बरेंच झालें. जरी पूर्वेस चिनाकडे किंवा जपानकडे झाली तरी हे देश आपल्या देशाच्या पूर्वेस आहेत तसें पश्चिमेकडेही असल्यामुळें त्या गोष्टीने भाकितास बाध येत नाही ], ' जगावर एक मोठा अग्निप्रलय होईल. ', ' एक जगी आगबोट वादळात सापडून बुडून जाईल. ', ' एक मोठा राजपुरुष मरण पावेल. ', ' काहीं भागात व्यापारास तेजी राहून इतर ठिकाणीं तो मंदावेल. ', ' मरणापेक्षा जननाचे प्रमाण अधिक राहील. ', इत्यादि. शेवटचें विधान घडवून आणण्यात मनुष्यामध्ये कलियुगात साधारणतः आढळून येणारी स्वसंरक्षणाची इच्छा व स्त्रीसुखलालसा यांची फार मदत होते

आपलें भविष्य ज्याच्या ऐकण्यात किंवा वाचण्यात येतें त्याच्या मरणानंतर जर तें आपल्या म्हणण्याप्रमाणें पुरें व्हायचें असेल तर वरील तरतूद घेण्याची फारशी जरूर नाहीं. कारण त्यानतरच्या काळासंबंधानें आपण वाटतील तशा व वाटतील तितक्या लाब लांब गप्पा झोंकल्या तरी त्याचा खोटेपणा आपल्या समकालिनांकडून शाबीत होण्याची आशाच नको.

आपल्या मागाहून येणाऱ्या पिढ्यास आपल्या भाकिताची अयथार्थता दिसून येईल अशीही भीति बाळगण्याचें फारसें कारण नाही. कारण एक तर तोंपर्यंत आपणा स्वतःप्रमाणे आपलें भाकितही हजार हिरशानीं काळाच्या उदरात नापत्ता होऊन गेलें असेल. दुसरें असें, कीं जरी तें कर्मधर्मसंयोगानें जीव धरून राहिलें व खोटेपणामुळें सर्वांच्या थट्टेस पात्र होऊन बसलें, तरी मेल्यावर आपला व त्याचा काय संबंध राहिला! व ती थट्टा झोंबण्यास आपलें मन तरी शिल्लक कोठे असणार? 'आपण मेले व जग बुडालें!' हा कोटिक्रम जर खरा असेल तर खालील असंभवनीय भाकितें करण्यासही माझ्या मतें कांही हरकत नाही —' आणखी शंभर वर्षांनी पृथ्वीचा वाटोळा आकार बदलून चौकोनी होईल, मनुष्ये खालीं डोके व वर पाय करून चालूं लागतील, हल्लीं डोक्यात मेंदू असतो तो तेथून निघून नाकावर गेंड्याच्या-प्रमाणे शिंगाच्या रूपानें राहूं लागेल, व पाठीचा कणा समोर पोटावर येईल, पुरुषाप्रमाणें बायकासही दाढ्यामिशा फुटतील, आजपासून पांचशें वर्षांनी हिंदुस्थान देशातील प्रजासत्ताक राज्याच्या तर्फे शंकरमामजी युरोपावर राज्य करितील व विधवाकेशवपन, असमतवैधव्य, वृद्धबालविवाह, सहगमन, जातिभेद वगैरे आर्यसंस्था तेथें स्थापून जारीनें अमलात आणतील, स्त्रियांना शिक्षणामृत पाजल्यास जलसमाधीची व ओंवळ्यानें जेवल्यास अग्निकाष्ठ भक्षण करण्याची शिक्षा सुनाविली जात जाईल, आणि गणपतीची थट्टा केल्यास हत्तीच्या पायीं तुडविलें जाईल.'

आपलें भविष्य आपल्या मरणानंतर अस्तित्वात राहील अशी जर आपणास भीति किंवा घमेंड असेल व त्याच्या वैफल्यामुळें होणाऱ्या उपहासाची कल्पना करूनच जर आपणास शहारे येत असतील तर मात्र यापेक्षा जास्त खबरदारी घेतलेली बरी. बाकी हल्लीच्या भाकितापेक्षा पुढील भाकिताच्या बाबतींत आपणास मानवी स्वभावामुळें एक प्रकारची आयती मदत होते. मनुष्यास प्रत्येक जुन्या गोष्टीचा अभिमान असतो. कोणी चटोरपणानें त्याचा उपहास केला तर त्याच्या तळव्याची आग मस्तकास जाते. असें असल्यामुळें आपल्या भाकिताचाही पुढील पिढ्या अभिमान बाळगूं लागतील व ते भाकित लाक्षणिक अर्थानेंही जरी पुरें झालें तरी त्या त्याच्याकडे पूर्वजांच्या अपरंपार ज्ञानाची खूण म्हणून बोट दाखवूं लागतील. शिवाय हल्लीच्या भाकितात अगदीं साध्या गोष्टी आपणास आपल्या पृच्छकावर अतर्क्य म्हणून लादता येत नाहींत, पण पुढील पिढ्यांवर त्या निर्धोकपणे

तशा लादता येतील आपल्या लोकात सामाजिक चालीरीतीचा इतिहास लिहिण्याचा प्रघात नसल्यामुळे पुढील पिढ्यास हल्लीच्या चालीरीतींविषयी अर्थात पूर्ण अज्ञान असणार, व त्याच्यापुढे आपण हल्लीं शिळ्या वाटत असलेल्या गोष्टी ताज्या म्हणून जरी मांडल्या तरी त्या सुग्रास पक्वान्ने म्हणून मिटक्या मारीत खाण्यात येतील. कलियुगात प्लेग होण्याविषयींचें आमच्या एका पुराणातील भविष्य जेव्हा आमच्या लोकानी प्लेग आल्यानंतर प्रथमत वाचले तेव्हा त्याना आपल्या पूर्वजाच्या सर्वज्ञत्वाबद्दल विलक्षण अभिमान वाटू लागला या सर्वज्ञ भविष्यवाद्याच्या हयातीत प्लेग सुरू होऊन कदाचित् हे भविष्यही प्लेगच्या झोपडीतच झाले असावे असा संशय सुद्धा त्याच्या श्रद्धाळू मनास शिवला असेल तर शपथ मनुष्याची नैसर्गिक प्रवृत्ति या प्रकारची असल्यामुळें आपण जरी खालील विधानाप्रमाणे सामान्य भाकिते केली तरी ती पुढील पिढ्यास असामान्य वाटू लागतील— 'मनुष्याचा कल उदरंभरणाकडे विशेष राहील, त्याचा स्त्रियाकडेही ओढा अधिक राहील, देशाला फार दारिद्र्य येईल व लोक अन्नान्न करून प्राण सोडतील' अशा भाकिताच्या भरीस आपण 'लोकाची प्रवृत्ति नास्तिक होण्याकडे अधिक होईल, केशवपनाचा धार्मिक आचार बंद होईल, विधवा स्त्रिया आप्ताची अपत्ये खेळविण्यासारखा सात्त्विक व्यवसाय सोडून देऊन स्वतःचीं अपत्ये खेळविण्याकरिता पुनर्विवाह करू लागतील' वगैरे धर्मग्लानिपर भाकिते जर घालू लागलो तर लोकाची आपल्याविषयींची श्रद्धा परमावधीस जाऊन पोहोचेल यासबधाने एक विशेष गोष्ट लक्षात ठेविली पाहिजे. ती ही की, पुढील काळासबधानें जीं भाकितें करावयाची ती नेहमी त्या काळास प्रतिकूल असावी. कारण मनुष्य नेहमी चालू स्थितीचा तिटकारा करीत असतो व गत काळाकडे लोभी पण निराश दृष्टीने पहात असतो, आणि हल्लींचा काळ पूर्वीच्यापेक्षा फार निकृष्टावस्थेस जाऊन पोहोचला आहे यावर त्याचा तेव्हाच भरवसा बसतो

ज्या वेळेपासून भाकिताची मुदत मोजावयाची ती भविष्यकथनाची न ठेविता नेहमी कलियुगारंभाची वेळ ठेवीत जावी. कारण कलियुग केव्हा सुरू झाले याबद्दल अजून विद्वानात मतभेद आहे, व एका गणनापद्धतीने तुमचे भाकीत चुकले तर त्यामुळे लोकाचा विश्वास न उडता दुसरीने तें खरें ठरतें कीं नाही इकडे त्याचे डोळे लागून राहतील.

---

## मुष्टि ८ वी *

# माझ्या भीष्मप्रतिज्ञेचा विजय

चार वर्षांपूर्वी म्हणजे माझ्या वयाच्या साठाव्या वर्षी माझी द्वितीय पत्नी निवर्तली त्यानतर माझा रुईशी यथाविधी विवाह झाला. वनस्पतीशीं लग्न करण्याची जी ही रीत आपणात पडून गेली आहे तिच्यावरून आपणास प्राणी व वनस्पति याजमधील अभेदाचें पूर्वीही ज्ञान होतें असें दिसतें. असो. हा विवाह झाल्यावर मी रुईबरोबर सुसार थाटण्याच्या मोहात न पडता आत्मसंयमन करून तिचा अत्यविधि आटपला व चवथ्या स्त्रीशी विवाह केला. पण दुर्दैवाने तीही लवकरच मृत्युमुखात पडली. अशा दारुण प्रसंगीं मला किती दुःख झालें असेल हें अनुभवावाचून कळणार नाहीं. त्या प्रसंगीं दुःखावेशात मी ' पुनः विवाह करणार नाहीं !' अशी शपथ घेतली व ती या घटकेपर्यंत पूर्णपणें पाळली आहे तरुण पिढीनें या माझ्या वर्तनावरून किती तरी शिकण्यासारखें आहे

मध्यतरी माझ्या या शपथेचा भग होण्याची वेळ आली होती, पण ती माझ्या धैर्यामुळे पार पडली. तो प्रकार असा—

अशौचाचे दिवस पूर्ण होण्यापूर्वीच माझ्याकडे दोनचार मुलींच्या पत्रिका पहाण्याकरिता आल्या. करमणुकीचें दुसरें साधन नसल्यामुळें मीं त्या पत्रिका चाळण्यात व माझ्या पत्रिकेशीं त्या जुळतात कीं नाही हें पहाण्यात ते दिवस घालविले पण हा व्यवसाय चालला असताना मनाचा मात्र पूर्ण धडा झालेला होता, की इत.पर विवाह म्हणून करावयाचा नाहीं. शेवटीं अशौच सपल्यावर पिंडदान करण्याचे वेळीं कावळा काहीं केल्या पिंडास स्पर्श करीना. अशा प्रकारें अर्धा तास मोडल्यावर त्यानें एकदांचा पिंडास स्पर्श केला. पण तो करण्यापूर्वी नुक्ताच मीं माझ्या पत्नीचें मनोगत जाणून पुनः विवाह करण्याचा स्वतःशी संकल्प केला होता. याप्रमाणें कावळा बसावयाला व माझी प्रतिज्ञा डळमळण्याला एकच गाठ पडली या कलियुगात अशा प्रतीचे दैवी शक्तीचे हजारों दाखले प्रतिदिवशीं दिसत असूनही सुधारक लोक सनातन धर्माबद्दल नेहमीं बरळत असताच.

---

* वि. विस्तार पु ३५ अंक २ [सन १९०४]

यावरून असे म्हणावयास काहीं हरकत दिसत नाही, की एक डोळा असणाऱ्या कावळ्याची दृष्टि जितकी धड असते तितकीही चष्मा वापरणाऱ्या या चारचक्षु सुधारकाची नसते.

माझा संकल्प झाल्याबरोबर कावळा शिवला हे जेव्हा माझ्या आप्तवर्गास कळलें तेव्हा त्याचा आनंद गगनीं मावेना. जो तो त्या कावळ्याला त्याच्या निर्णयाबद्दल धन्यवाद देऊं लागला. मी मात्र मनातून मनस्वी कष्टी झालों. कावळा आपल्या निर्णयात काकपद घालून अशत तरी माझी सोडवणूक करील अशीही मला काहीं वेळ आशा होती, पण कावळा उडून जाताच तीही मावळून गेली. तरी माझ्या इष्टमित्राच्या आनंदाचा विरस कशाला करावा असा पोक्त विचार करून मीं बाह्यात्कारी संतोषच दाखविला त्या वेळीं माझ्या डोक्यात हजारो विचारानी काहूर माजविले होतें एकदा वाटे, कीं माझ्या गत पत्नीची गुणात बरोबरी करणारी पुन्हा दुसरी कोणतीही स्त्री मिळणार नाहीं दुसऱ्यादा वाटे, की गुणात जरी बरोबरी केली नाही तरी रूपात जर तिनें गुणाचा वचपा काढला तर काय हरकत आहे? पुन्हा असें वाटे, की मी विवाह करणार नाही अशी शपथ वाहून नतर मन बदलणे नीचपणा आहे पण लागलीच दुसऱ्या बाजूनें असे मनात येई, की मी जर लग्न केले नाही तर त्या कावळ्याचा विश्वासघात केल्याचे पाप पदरी येणार आहे. मी दुसऱ्या स्त्रीच्या पिंडास स्पर्श करीन या विश्वासावर तर त्याने माझ्या गत स्त्रीच्या पिंडास स्पर्श केला विश्वासघात व तोही एका बिचाऱ्या पक्ष्याचा करणे हें आमच्या कुलाचें ब्रीद नव्हे. यापेक्षा एक सोडून चार बायका कराव्या लागल्या तरी हरकत नाहीं असे उदात्त विचार चालले असताना हरिश्चद्र, शिबि, दशरथ, रामचद्र इत्यादि हजारों सत्यप्रतिज्ञ राजाची चरित्रे माझ्या चित्तादर्शापुढून सारखीं जात होती हे येथें सागणे अवश्य आहे महात्म्याच्या चरित्राचा आपल्या विचारास वळण देण्यात किती उपयोग होतो हे यावरून उघड होतें.

यानतर आणखीही कांही टिपणे माझ्याकडे आलीं पण टिपणें पहाण्यापूर्वी मुलीच पहाव्या असे माझ्या मनानें घेतलें, व मीं लागलीच सांगून आलेली स्थळे पहाण्याच्या उद्योगाला लागलों. प्रथमतः मुलगी पाहिली ती नाकाडोळ्यानी बरी होती; पण तिचे पुढले दोन दात पडले

होते, व माझी तर इच्छा अशी होती की तिच्या व माझ्या दाताची बेरीज निदान बत्तीस तरी असावी. असो यापुढील स्थळ रूपाने हजारपाचशात होते, पण वयानें सारे अकरा वर्षांचे, व माझे तर मत असे होतें, कीं स्त्रीपुरुषाच्या वयांमधील जो जों कमी तों तो प्रेमाचा संभव अधिक. शिवाय ती वयात येण्यापूर्वीच जर माझे काही बरेंवाईट झाले तर आम्ही दोघेही संसारसुखास अचवणार! मुलगी आधीच वयात आलेली असली तर एका अर्थी फारशी हरकत नसते. कारण प्रायश्चित्त घेऊन भटाच्या दातावर दोन दोन आण्याचे पैसे टाकले, की सर्व दोषाचे परिमार्जन होण्याची तजवीज आमच्या उदार धर्मानें केलीच आहे तिसरे स्थळ पाहिले तें रूपानें बरें होते, पण काळसावळ्यांत जमा, व याप्रमाणें कोळशातलें माणिक पदरीं बाधून घेऊन माझ्या संततीचे नुकसान करण्यास मी तयार नव्हतो बायको काळी असली म्हणजे मुलेंही काळींच निपजण्याचा संभव. बरे, एकदा कुटुंबात काळा रंग शिरला म्हणजे तो धुऊन नाहींसा करण्यास पाचसात पिढ्या तरी लागणारच, तो सुदिन पहाण्याचा संभव असण्यासारखे माझें वयही नव्हतें. असो याप्रमाणें प्रत्येक ठिकाणी काहीतरी दोष आढळून येत असे. माझें मत तर असे होते, कीं स्त्रीपुरुष एकमेकास पूर्णपणे पसंत पडल्याखेरीज लग्न करणें निव्वळ वेडेपणा आहे.

या सर्व मुलींना नकार देताना मला एका गोष्टीचें फार साहाय्य झालें मी जेव्हा माझ्या आप्तांचा माझ्या पाचव्या विवाहविषयींचा आग्रह पाहिला तेव्हा त्याचाही हिरमोड होऊ नये व माझाही निश्चय तडीस जावा म्हणून मीं एक अजब शक्कल काढिली, व दोन अटींवर विवाह करण्याचें कबूल केले पहिली अट अशी, की माझी भावी पत्नी अप्रतिम सुंदर असावी. दुसरी अट अशी, की ती सोळा वर्षांच्या वयाची असावी. या अटी घालण्याचें कारण इतकेंच कीं, आपणामध्यें मुली या वयापर्यंत अविवाहित रहात नसल्यामुळें या वर्णनाची मुलगीच आधीं सापडणार नाहीं, व सांपडलीच तर ती अप्रतिम सुंदर असण्याचा संभव कमी असें स्थळ मिळालें नाहीं कीं अर्थात् माझा निश्चयहि अनायासे कायम राहिलाच

पण माझ्या दुर्दैवानें याही बाबतींत माझें तोंड बंद केलें कारण वर लिहिल्याप्रमाणें दोनतीन दिवस वृथा श्रम घेतल्यानंतर एक दिवस एक स्थळ

माझ्या पाहण्यात आलें, तें अगदीं माझ्या वर्णनाजोगे होतें अल्लडपणा व पोक्तपणा याच्या सीमेवर असणारें वय, बर्फ व सोने याच्या कांतींच्या मधला रग, स्पर्श झाल्यास टोंचण्यासारखी कृशही नव्हे व उचलली असता जड वाटण्यासारखी स्थूलही नव्हे अशी अगयष्टि,—यापुढे तिच्या एक एक अवयवाचें वर्णन करूं लागलो तर तें माझ्या सामर्थ्याबाहेरचें आहे एक क्षणभर तर मला गत स्त्रीच्या मृत्यूबद्दल थोडासा आनदही वाटला यावरून मी कृतघ्न होतों असातला भाग नाहीं, तर माझ्यासारख्या प्रेमळ पतीसही क्षणभर असे आपलपोटेपणाचे विचार वाटावयास लावण्यासारखे त्या मुलीचें रूप होते. माझे असे विचार चालले आहेत तो मुलीच्या बापानें मला तिचें टिपण आणून दिलें ते घेऊन मी उपाध्यासह घरी चालता झालो

वधूवराप्रमाणे त्याच्या उच्चनीच ग्रहाचेंही नीट जुळले पाहिजे असा समज सर्वत्र आहे. परतु वधूवराचीं टिपणे अगदीं ततोतत जुळलीं आहेत असें क्वचितच आढळते. कोठें ना कोठें तरी काहीं व्यग रहातेंच कधीं कधी तर दोन्ही पत्रिकातील शत्रुग्रह एकमेकावर चाल करून भयकर रण माजवतील अशा भीतीनें पत्रिका जवळ ठेवण्याचीही मला भीति वाटते. अशाच एखाद्या प्रसगीं मुखश्रीत मिळाल्यामुळे मगळ लाल व शनि निळा पडला असावा तें काहीं असो, माझा ज्योतिषावर पूर्ण भरवसा असल्यामुळें मी दोन्ही टिपणातील ग्रह बारकाईनें पाहू लागलों, परतु काहीं केल्या तिकडे चित्त लागेना चंद्रबळ पाहू लागल्याबरोबर वधूचा मुखचद्र माझ्यासमोर उभा राहिला, शनीकडे लक्ष्य गेल्यावर तिची मद गति आठवूं लागली; गुरूची स्थिति पाहून तिचे गुरु नितब दिसूं लागले; मगळ पाहूं लागतांच तिचा कुकवाचा टिळा माझें मन वेधूं लागला. शेवटीं मुख्य गोष्टी सरासरीनें पाहून टिपणे गुडाळून ठेवलीं. या अवलोकनात इतकेंच दृष्टोत्पत्तीला आलें, की माझे ग्रह वधूला प्रतिकूल आहेत परंतु मला तें फारसें महत्त्वाचें वाटलें नाही यदाकदाचित् माझ्या ग्रहामुळे वधूवर अकालिक मरणाचा प्रसग आला, तर ती बिचारी सवाष्णपणें मेल्यामुळे स्वर्गी जाईल ही माझी खात्री होती. शिवाय तिच्या मरणानंतर पुनः लग्न न करण्याचा निश्चय मी आताच करून चुकलों होतों. याप्रमाणें या मुख्य अडचणीची वाट लागली. याशिवाय एकदोन ग्रह विवाहमहर्तास प्रतिकूल होते पण त्यांचे [illegible]

यथासांग करण्याची तजवीज मी करणार होतो. दोनचार भट जपास बसवून दिले कीं झालें काम. ग्रह ग्रह म्हणजे काय बिशाद आहे? भटास तृप्त केलें, की सर्व क्रूर ग्रहास तृप्त केल्याचें श्रेय आलेंच म्हणून समजावे. माझे उपाध्ये बचभट तोतरे असल्यामुळें त्यानीं एकच जप जपल्याबरोबर पांच पांच सहा सहा जप जपल्याचें श्रेय येत असावें असा माझा समज आहे.

जप केल्यानें ग्रह प्रसन्न होतात हें फार दिवस मला खरे वाटत नसे पण एकदा या गोष्टीचा पडताळा पाहण्याकरिता मी एक दुर्बीण आणून ठेवली व दोनचार भिक्षुकांस ओळीनें काहीं ग्रहांचे जप जपण्यास बसविले. त्यानी जपास सुरवात केली असें पाहून मी हातात दुर्बीण घेऊन आकाशाकडे फिरविली मात्र, तो काय चमत्कार सागावा! सर्व ग्रहानी आपापला सकोच टाकून उदारता धारण केलेली दिसली. शनीने तर सतोषाचें चिन्ह म्हणून एक कडेही परिधान केले होतें. मंगळामध्यें मात्र अजून कोपाचा ताबडेपणा कायम होता पण त्याचें कारण शोधून पाहतां असे आढळून आले, की बचंभटजींकडे सोंपविलेला मगळाचा जप अनन्यभावानें जपण्याऐवजी त्यानी मधून मधून विड्याचे व तंबाखूचे बार भरण्याचे काम चालू ठेविले होते, व यामुळे शेवटीं त्याचें तोड अगदी मगळासारखेच ताबडे लाल झालें होतें. पुष्कळ जप थोड्या वेळात जपण्याच्या त्याच्या सामर्थ्याकडे पाहून वास्तविक मीं त्याच्याकडे हा महत्त्वाचा जप दिला होता, पण त्याच्या जिव्हालौल्यानें सारी घाण केली असो वरील गोष्टींवरून आमचे जप म्हणजे नुसती चर्पटपजरी नसून त्यात अलौकिक गुण आहेत अशी सुधारकाची बालंबाल खात्री होईल

माझें टिपण पाहिल्यावर वधूचे आप्त कदाचित् घाबरतील म्हणून मला माझ्या कुडलींत काहीं महत्त्वाचे फेरफार करावे लागले परतु असे करण्यांत मी कोणाचाहि गुन्हा करीत नव्हतों ज्याप्रमाणे आपल्या मालकीच्या घरात वाटेल तो फेरफार करण्यास आपणास मोकळीक असते, त्याप्रमाणें माझ्या कुडलींत वाटतील ते व हवे तितके बदल करण्याला मी स्वतःचा मुखत्यार होतों. सबब मी सूर्याची योजना बिनदिक्कत थंडगार कुभराशींत केली, चंद्रावरील सशाच्या ओरडण्याकडे बिलकूल

लक्ष्य न देता त्याला सिंहराशींत कोंबून ठेविलें, बुधाची व वृषभाची खुशाल गांठ घातली, व मंगळाची मेषाशीं बेधडक टक्कर लावून दिली. अशा प्रकारें विषम विवाह घडविल्याबद्दल ग्रहमजकुरांची मजवर जी इतराजी होईल ती जप जपणाऱ्या भटांच्या मध्यस्थीनें मला तेव्हाच घालविता येईल अशी माझी खात्री असल्यामुळें मीं त्याच्या कुरकुरीकडे मुळींच लक्ष्य दिले नाहीं. याप्रमाणें नवी कुडली सजवून व जेवणखाण आटोपून मी पोषाखाच्या तयारीला लागलों. मी खुटीवरील माझ्या पाढऱ्या पागोट्यास हात घालण्याला व माझ्या वडील मुलाने नुकाच विकत घेतलेला इष्कीचा पोषाख दृष्टीस पडण्याला एकच गाठ पडली. मग काय विचारता ? मला छानछोकी मुळींच आवडत नसे. यामुळे तो सर्व सरमजाम पाहून माझ्या तळव्याची आग मस्तकास गेली, व मीं तोंडास येईल तें बोलण्यास सुरुवात केली. 'बाबारे, आपला जुन्या थाटाचा साधेपणा सोडून नवीन तऱ्हेचा डामडौल करणें तुला शोभत नाहीं. ज्या आमच्या पूर्वजानीं बंदाचा अगरखा आणि चक्रासारखे अघळपघळ पागोटें काढलें ते मूर्ख होते वाटतें ? त्या पोषाखात भारदस्तपणा होता, व तो डोळ्यात भरत असे. पण आता पाहावें तों इतर बाबतीतल्याप्रमाणें पोषाखातही नुस्ता दिखाऊपणा आणि तकलादीपणा माजला आहे. या तुझ्या ऐटबाज पगडीत नुस्त्या चिंध्या व शेण आहे. ही शेणाची टोपली डोक्यावर घेऊन मिरविण्यात तुम्हाला काय भूषण वाटत असेल ते असो. पण स्थानिक स्वराज्य मिळाल्याबरोबर तुम्ही शेणाच्या टोपल्या वाहू नयेत तर काय करावें म्हणा ! ज्याप्रमाणें आपल्या जवानमर्द पूर्वजाच्या ढाली तरुण पिढीला उचलत नाहींत त्याप्रमाणें ढालीएवढाली पागोटींही उचललीं नाहींत तर नवल नाहीं बरें पागोटें एक राहिले, निदान बंदाचा अंगरखा तरी कायम ठेवावयाचा होता ! पण जेथें सर्वच कारभार बेबंद झाला तेथें अंगरख्यासच बंद कुठून रहावे ? या इष्कीचा परिणाम तरुणावर इतकाच होईल, कीं ते दिवसेंदिवस चैनी व बाहेरख्याली बनत जाणार. मी तर तुला या कामात कधीं मदत करणार नाही. हें पागोटें व हा अगरखा घेऊन मी रस्त्यावर फेंकून देणार. पण असलीं मूल्यवान् वस्त्रे रस्त्यावर तरी कशीं फेंकून देता येतात ! तसें करण्यापेक्षां तीं वापरून फाडावीं हें चागलें. पण तीं मी तुला

मात्र देणार नाहीं, मीच वापरीन म्हणजे झालें.' असें म्हणून मी तो अंगरखा व पगडी अंगावर चढविली, व समोरचा मोठा आरसा आमच्या आळशी गड्यानें साफ केला आहे किंवा नाहीं हें पाहाण्याकरिता त्याकडे एकदां दृष्टि फेंकून उपाध्यासहवर्तमान मुलीचे घरीं गेलों.

तेथें गेल्यावर माझें टिपण तिच्या बापाचें स्वाधीन केलें. त्यानें तें हातीं घेऊन दोन्ही टिपणें एकमेकाशीं जुळतात कीं नाहीं हे पाहिलें, व जुळतात अशी खात्री झाल्यावर संतोष प्रदर्शित केला. नंतर मीं तिला लिहिता वाचता येतें काय म्हणून प्रश्न केला. त्यावर 'होय' असें उत्तर येताच माझा थोडासा हिरमोड झाला. कारण मुलींना शिक्षण दिलें म्हणजे त्यांना चळभांस प्रणयपत्रिका पाठवितां येऊन त्या वाममार्गास प्रवृत्त होतात, अशी माझी पक्की समजूत होती. तरी मीं तिच्या बापाला म्हटलें, 'काहीं हरकत नाहीं. धडे पाठ करण्यात तिनें जितका वेळ घालविला असेल तितकाच ते विसरण्यांत घालविला म्हणजे झाले. धडे विसरण्यात तिला मदत व्हावी म्हणून पाहिजे तर मी शिक्षक ठेवण्यासही तयार आहें. दर एक वर्षास एक एक इयत्ता धरली तरी पाचसहा वर्षांत ती सर्व इयत्ता पार विसरून अरुंधती आदिकरून आमच्या जुन्या साध्वी स्त्रियास शोभण्यासारखी होईल. स्वैंपाकघर, माजघर हाच आमच्या बायकाचा खरा भूगोल, आणि घरातील गाऱ्हाणीं व शेजाऱ्याच्या नालस्त्या हाच खरा त्याचा इतिहास आहे. पक्वान्नें करणे हेंच रसायनशास्त्र, आणि कुंकू लावणें व गोंदणें हीच त्याची चित्रकला आहे पतीचें हृद्गत जाणणें हें त्याचें गणित, आणि चाळणे, पाखडणें व निवडणें हे त्याचें तर्कशास्त्र होय.' अशा रीतीनें आपल्या सनातन धर्माची कड घेऊन मी बोलत असता मुलीच्या आप्तात कुजबुजणें सुरू झालें मधूनमधून ते माझ्या कपड्यांकडेही पाहात असत. काहीं वेळानें त्याच्यापैकीं एकाने 'नवरा मुलगा' पाहाण्याची इच्छा दर्शविली. तेव्हा एकदम वस्तुस्थितीचा उजेड माझ्या हृदयांत पडला. परंतु आतां ऐन वेळी माघार घेण्यात काहीं अर्थ नाहीं असें जाणून मीं तिळमात्रही भीतीचें चिन्ह न दाखविता 'मीच नवरा मुलगा आहे.' असें स्पष्ट सागितलें त्याबरोबर ती सर्व मंडळी खो खो करून हंसू लागली. पोटभर हसणें झाल्यावर मुलीच्या बापानें 'आम्हाला हें कार्य कर्तव्य नाही.' असें

सांगितलें. तेव्हा मी त्याला म्हटले, 'असे एक घाव आणि दोन बुकडे करूं नका. चांगला लांबवर विचार करून मग काय तें ठरवा. मीं हा विवाह गत स्त्रीचें मन मोडूं नये म्हणूनच केवळ करणार आहे. यावरून माझें मन स्वस्त्रीबद्दल किती कोमल आहे याची तुम्हाला अटकळ करितां येईल. जसें मीं तिजवर ठेविलें तसेंच इजवरही प्रेम ठेवीन. इजवर दुर्दैवानें जर तोच प्रसंग आला तर इच्याकरिताही मी पुन्हा माझ्या इच्छेविरुद्ध लग्न करून इजवरील प्रेम सिद्ध करीन. इला मजकडून बालाग्रही त्रास होणार नाहीं असे मी तुम्हाला अभिवचन देतो. आपले परमपूज्य पूर्वज जसे कामवासनेच्या तृप्त्यर्थ न करता संततीकरिता विवाह करीत, तसाच मीं हा विवाह करण्याचें योजिले आहे. खरें म्हटले तर या विवाहाच्या मुळाशीं पुत्रोत्पत्तीचीही इच्छा नाहीं. कारण ईश्वराच्या दयेनें मला माझ्या बरोबरीचा एक मुलगा आहे. हा विवाह केवळ प्रीतिविवाह होणार आहे. म्हणजे त्याच्या बुडाशीं कामवासना, पुत्रेच्छा, वगैरे नीच मनोवृत्ति नसून नुसती निर्मल प्रीति राहाणार आहे. पुनर्विवाहांप्रमाणें हा देहाचा देहाशीं नव्हे, तर आत्म्याचा आत्म्याशीं विवाह होय विधवा स्त्रिया सुद्धा आप्तांच्या मुलबाळाचें संगोपन करितां करिता कामेच्छा विसरून जाऊन काबाडकष्टात आनंद मानितात, असे 'हिंदुधर्म आणि सुधारणा' या उत्कृष्ट ग्रंथाच्या विद्वान् कर्त्यांनीं म्हटलें आहे. हे जर खरें असेल तर तुमच्या लेकीची सुद्धां माझ्या पूर्वीच्या भार्यापासून झालेल्या मुलाबाळाच्या खस्ता खाण्यांत तामस वृत्ति मावळून जाऊन तिच्यात सात्त्विक प्रेम उगवूं लागेल. शिवाय बालावृद्धविवाहास आपल्या पवित्र धर्माने मुळीच आडकाठी ठेविली नाहीं. उलट मीं जरी एकामागून एक अशा चार बायका केल्या तरी ग्रामस्थ लोक मला अभिमानानें पत्तीस घेऊन जेवावयास बसतील सारांश काय, कीं अशा प्रकारचा विवाह आमच्या धर्मास व रूढीस संमत असल्यामुळें तो घडवून आणण्यानें तुम्ही पुण्यकर्म करीत आहांत असेंच होणार आहे. विवाहास मोडता घालाल तर मात्र पापाचे धनी व्हाल' अशा प्रकारचा मी पुष्कळ उपदेश केला; पण ती निगरगट्ट मंडळी कांहीं केल्या आपला आग्रह सोडीना शेवटीं निराश होऊन मी घरी परत आलों. दुसरे दिवशीं पुन्हां मुली पाहाण्याचा क्रम चालू केला पण जेथें जावे तेथें हाच प्रकार आढळून

येई. काही ठिकाणी तर स्वतः मुलींनीं माझी थट्टा आरंभिली अर्था
हा नवीन शिक्षणाचा परिणाम होता.

इतक्या थरास गोष्ट आली तेव्हा मी त्रासून गेलों, आणि अशा धार्मि
व सात्विक विवाहाची योग्यता कळण्याची ज्याना अक्कल नाही अशा मुलीं
पुनरपि मागणी करावयाची नाही असा माझा कृतनिश्चय झाला. पुनः विवा
करणार नाहीं ही माझी भीष्मप्रतिज्ञाही केवळ याच माझ्या निश्चयामु
आजपर्यंत टिकली आहे. ‘ निश्चयाचे बळ तुका म्हणे तेची फळ.’

---

## मुष्टि ९ वी *

## लग्नसमारंभ

मागील लेखात माझ्या स्वतःच्या लग्नासबधाने जो प्रकार झाला तो विदि
केला. त्यानतर माझ्या वडील मुलाच्या लग्नाचा योग जुळून आला
त्यासंबधानें आज लिहिण्याचा विचार आहे.

मुलाला पाहाण्याकरिता आमचे भावी व्याही पुण्याहून आमचे गावी आले
त्यानी त्याला प्रत्यक्ष पाहून त्याचे अक्षर तपासून त्यास पसत केले. ते
इतक्या बारकाईने चौकशी करीत आहेतसे पाहून पहिल्याने मला त्यांच
बराच राग आला पण त्यानी स्वतःस नुकताच आलेला अनुभव सागितल
तेव्हा, माझा राग निऊन उलट मला सपाटून हसें कोसळले. ते म्हणाले,
‘ माझी मुलगी हजारात देखणी व चतुर असल्यामुळें तिला घर बसल्या व
सागून येतील ही माझी खात्री होती म्हणून मी वरेच दिवस स्वतः
फिरण्याच्या भानगडीत पडलों नाही हळूहळू मुलीला वर सागून येऊ
लागले. पण कोठें एक तर कोठे दुसरें, अशा रीतीने व्यंगे आढळण्यात
येऊन स्थळ निश्चित होईना. अखेरीस मुंबईच्या एका गृहस्थानीं माझ्या
बिऱ्हाडी येऊन मुलीस पाहून पसंत केलें, व वराची फारच तारीफ
आरंभिली. वराच्या घरीं आज सकाळ सध्याकाळ दोनशे पान जेवून उठत
आहे, असें त्याच्या दोनचार वेळा सागण्यात आल्यामुळे, माझ्याही तोंडाला

---

* वि. विस्तार पु. ३५, अंक ५ [ सन १९०४ ]

पाणी सुटले. मुलाला पाहाण्याचा हट्ट धरल्यास त्यांना राग येईल असें वाटून मी त्याबद्दल तर गोष्ट काढिली नाहींच, पण टिपण वगैरे पाहाण्याच्याही फारसा भानगडींत पडलों नाही, व लागलीच रुकार दिला झालें, तिथि-निश्चयही होऊन चुकला, व मुंबईस लग्न होण्याचें ठरलें थोडेच दिवसात सर्व इष्टमित्रासह मुंबईस जाऊन एका टोलेजंग वाड्यात जानोसा दिला. आगाऊ पुण्यास आलेले मध्यस्थ गृहस्थ दलाल होते हें मला मागाहून कळले. त्याच्याबरोबर मीं आपला एक आप्त देऊन नवरदेवाच्या भेटीस पाठविला. तेव्हा कसचें काय आणि कसचे काय! नवरदेव म्हणजे एका खाणावळीचे मालक होते, व मध्यस्थानीं वर्णिल्याप्रमाणे त्याच्या घरीं सकाळ सध्याकाळ खरोखर दोनशें पान जेवून उठत होतें हा सर्व प्रकार ऐकून मला मेल्यापेक्षाही मेल्यासारखे होऊन मीं पुण्याची पहिलीच गाडी धरिली. तेव्हापासून मी स्वतः प्रत्येक ठिकाणी जाऊन 'वराची परीक्षा करीत असतों. उघडच आहे, दुधानें तोंड पोळल्यावर लोक ताकसुद्धा फुंकून पितात.'

यानंतर वधूवराच्या पत्रिका पाहाण्यात आल्या. त्या एकमेकींशीं इतक्या जुळल्या, की खुद्द पत्रिकाचा विवाह झाला असता तर त्यानीं सुद्धा संसार मोठ्या आनदानें हाकला असता. त्यानतर हुंड्याची गोष्ट निघाली. हुंडा ही आपल्या पूर्वजानी काढिलेल्या संस्थात एक अत्यंत उपयुक्त संस्था आहे असें माझें मत होतें. खरें म्हटले तर सुधारकाच्या इष्ट सुधारणा उचलण्यास मजकडून कधीही आडकाठी नसते. उदाहरणार्थ, लग्नकार्यांत फाजील खर्च करूं नये हे त्यांचें मत मला पूर्णपणें मान्य आहे; व या बाबतीत माझें वर्तनही 'बोले तैसा चाले त्याचीं वंदावीं पाऊलें' या कोटीस शोभण्यासारखेंच आहे. परतु हुंड्यासंबंधानें मात्र तशी गोष्ट नाहीं. माझ्या मुलीचें लग्न आतां लवकरच व्हावयाचें आहे, तोपर्यंत कदाचित् सुधारकाच्या कोटिक्रमानें माझें यासंबधीं मत बदलले तर सांगवत नाही. कारण एक तर मनुष्यस्वभाव फार चचल असतो. दुसरें, माझें मन इतकें निःपक्षपाती आहे, कीं त्याची एकदां कोणी सप्रमाण रीतीनें कोणत्याही गोष्टीविषयीं खात्री करून दिली म्हणजे तिजप्रमाणें चालण्याची त्याची नेहमीं तयारी असते. बरें, त्याप्रमाणें एकदां ठाम मत झालें म्हणजे तें ब्रह्मदेव जरी खालीं उतरला तरी बदलावयाचें नाहीं अशांतलाही प्रकार नाहीं. बेबीच्या पाठचा माझा मुलगा जो बाळू त्याच्या लग्नापर्यंत पुनः हुंड्याला माझें अनुकूल मत झाल्यास कोणाला नवल वाटण्याचें कारण नाहीं.

हुंड्याकडे माझ्या मनाची धाव विशेष असण्याचें दुसरें एक कारण होतें. नुकतेच मी महाराणी व्हिक्टोरियाचें चरित्र वाचले होतें. त्यात त्याचें अलौकिक गुण वाचून माझ्या मनावर इतका कांहीं ग्रह झाला, कीं तेव्हापासून मला त्यांच्या मुखवट्याचा संग्रह करण्याचा फार नाद लागला. किती तरी वेळा कुळांकडून रक्कम आल्यावर मी तासचे तास राणीसाहेबांच्या मुखाकडे राजभक्तीनें सद्गदित होऊन पाहात बसलों आहे! राणीसाहेब तर आम्हाला सोडून गेल्याच, त्यांच्या रौप्यमय प्रतिमांचा तरी वियोग होण्याचा प्रसंग मजवर न येवो!

असो. नाही हो करिता करितां पाच हजार रुपये हुंडा ठरला. तो पदरात पडल्यावर लग्नात खर्च न करण्याविषयींच्या माझ्या मताची आठवण झाली; आणि लागलीच मीं त्यापैकी चार हजार रुपये सरकारी पेढींत टाकून आठशें रुपयाचे दागिने व बाकीच्या दोनशे रुपयात बुडित खर्च करण्याचा निश्चय केला. आप्तमित्रांना फारशीं आमंत्रणे करावयाची नाहींत, व पाठवावयाचीं तीं सुद्धा अगदीं वेळेवर, असेंही ठरविलें. आपण आमंत्रण केले म्हणजे नाही म्हणणें त्यांच्या जिवावर येईल व त्याना स्वतःची गैरसोय करूनही यावें लागेल या रीतीनें त्यांची गैरसोय करण्यापेक्षा ठरींव नमुन्याच्या निमंत्रण-पत्रिका कुंकुममंडित करून त्याचे आप्ताकरवीं विवाहमुहूर्तावरच करग्रहण करविणे किती चांगलें! अशानें शिष्टाचार राहून दगदगही चुकते. पत्रिकांत शब्दजालाची काटकसर मात्र बिलकूल उपयोगाची नाही सहकुटुंब सह-परिवार येऊन कार्यसिद्धि करावी, आपण आल्याने मंडपास विशेष शोभा येणार आहे, वगैरे शब्दांची अशी रेलचेल उडवून द्यावी, की यंव! मी तर मित्रमंडळीस व आश्रितसेवकांस घेऊन येण्याबद्दलही आग्रहपूर्वक विनंती केली होती. मात्र पत्रिका लग्नतिथीनंतर दोन दिवसांनीं आरामाने हाती पडाव्या, अशीही योजना केली होती. जर कोणी इष्टमित्र दशमीस निघून शेंदोनशें कोसाचा प्रवास करून अष्टमीच्या मुहूर्तास येऊन दाखल झाला असता तर पत्रिकेंत लिहिल्याप्रमाणे मला खरोखरच विशेष आनंद झाला असता.

सरते शेवटी आम्ही एकदाचे पुण्यास जाऊन पोहोचलो, व लागलीच दुसरे दिवशीं अक्षत निघाली वराकडील मंडळी जरी थोडी होती तरी वधूकडील बरीच असल्यामुळें अक्षतांची मिरवणूक अगदींच टाकाऊ नव्हती.

शिवाय गावातील आणखी दोनचार अक्षती आमच्याबरोबर चालत असून आम्ही, त्यानाही आपल्यापैकींच समजण्याइतकी, वसुधैवकुटुंबकवृत्ति धारण केली होती. अक्षत कसब्याच्या गणपतीस देऊन व गणपतीची चुकभूल होऊं नये म्हणून त्यास घटका, पळे वगैरे वारवार बजावून नंतर आम्ही समाधानानें घरीं सुखरूप परत आलों व्याह्याकडील मात्र दोन पुरुष व तीन बायका दुसऱ्याच एका अक्षतीबरोबर चुकून मिरवत गेल्या, त्या मागाहून मोठ्या कष्टानें पत्ता काढीत परत आल्या.

पुण्यातील देवाचीं जी मासलेवाईक नावे आहेत त्यापैकीं कसब्याचा गणपति हें सर्वांत सभ्यपणाचें आहे असें म्हणता येईल. भांग्या मारुतीचे मीं जेव्हा प्रथम दर्शन घेतलें तेव्हा, मारुतिरायाची स्वारी भांगेच्या तारेत डोळे लाल करून पडली असेल असा माझा तर्क होता, पण अखेरीस तो अगदी चुकीचा ठरला. खुन्या मुरलीधराचें व सोट्या म्हसोबाचें भक्तिभावानें दर्शन घेण्याला जेव्हा मी पहिल्यानेच निघालों तेव्हा पोलीसचे दोन हत्यारबंद शिपाई बरोबर घेतले होते; व छिनाल बालाजीचें किंवा शिनल रामजीचे दर्शन तर मी आपल्या कुटुबाला अजून घडूं दिलें नाही.

अक्षतीहून परत आल्यावर रात्रीं सीमंतपूजन झालें. हा शब्द मी तोपर्यंत चुकीने श्रीमतपूजन असा समजत आल्यामुळें तशा प्रकारच्या समारंभास गावातील गोळा झालेल्या श्रीमंत लोकांस मी नेहमी फार मान देत असें. पण माझ्या उपाध्यानीं माझी चूक दुरुस्त केल्यामुळें मी या खेपेस सर्व श्रीमत लोकाकडे तिरस्कारानें पाहात होतो

दुसरे दिवशीं देवदेवक बसविण्याचा विधि झाला माझी पत्नी गत झाली असल्यामुळें मला तिचे जागीं एक सुपारी बसवावी लागली. पण काय चमत्कार सागावा! ती स्थानापन्न होतांच माझ्या मनात तिच्याविषयीं खरोखरच पतिप्रेम उत्पन्न झालें, व मी भोंवतालच्या मंडळीचा डोळा चुकवून तिच्याकडे सलज्ज व भावपूर्ण नेत्रानीं अवलोकन करूं लागलो मागें रुईच्या झाडांशीं माझा विवाह झाला होता, त्या वेळीं तिजवर माझें जितकें निरपेक्ष प्रेम होतें तितकेंच सुपारीवरही बसलें. असो; हें प्रेमावलोकन चाललें आहे तोंच प्रतिकूल वायूमुळें होमांतील अग्नीची मजवर बहाल मर्जी होऊन त्याची स्वारी

जिभल्या चाटीत मजकडे वळली. या चुंबनविधींत माझ्या कल्याचे दोनचार केसही अग्नये स्वाहा झाले. मी गर्भगळीत होऊन जरा मागें सरलों. पण अग्नीवरील माझी भक्ति अणुमात्र कमी झाली नाहीं, किंवा त्यास तुपाच्या पळ्यावर पळ्या अर्पण करण्याच्या माझ्या क्रमातही खळ पडला नाहीं.

हळूहळू माझ्या जठरात क्षुधेचा प्रादुर्भाव होऊं लागला मातृकादि तेहतीस कोटी देवतांस पुष्पाक्षता वाहून वाहून माझ्या हाताचे, व 'मह्य', 'मम' इत्यादि शब्दांची पोपटपंची करून माझ्या तोंडाचे सांधेन् साधे अगोदरच खिळखिळे झाले होते. तशात अग्निनारायणाचे तर्पण करण्याचा तडाखा सुरू झाला. मधून मधून देवतास नैवेद्य अर्पण करण्याचे प्रसंगी तो नैवेद्य आपल्याच पोटांत जाईल तर बरें होईल अशीही अधार्मिक पण क्षणिक इच्छा मनांत उद्भवत होती अग्नीच्या हक्काच्या दोनतीन तुपाच्या पळ्या तर मी भटजी तंबाखू खाण्यात गुतले आहेत असें पाहून स्वार्पण केल्याच. प्रत्येकाच्या हृदयात परमात्मा वसत आहे, असा पोक्त विचार केल्यास, यांत फारसें पातक मानलें जाणार नाहीं अशी आशा आहे असो. जठराग्नीची तीव्रता तुपाच्या दोनतीन पळ्यांनी आणि भटजींच्या तमाखुसेवनांच्या व पंचामृतनैवेद्याच्या दर्शनानें फारच वाढली जवळ तर सुपारीचें खाडही दिसेना. सर्व सुपाऱ्या देवस्थानीं विराजमान झाल्या होत्या, व कोठवळ्यानें जरूरीपेक्षां एकही अधिक सुपारी पाठविली नव्हती. इतक्यात अवचित मला माझ्या नव्या पत्नीची म्हणजे सुपारीची आठवण झाली, व मी तिजकडे चुंबनसुखलालसेनें पाहूं लागलों. पण सुदैवानें या सधीस देवदेवकाचा विधि संपून माझी मुक्तता झाली, व मी फराळावर ताव मारण्याकरितां चालता झालो.

आमच्या धर्मविधींत जें साहित्य लागतें तें सिद्ध नसल्यास त्याचें प्रतिनिधित्व अक्षतांकडे ठेविले आहे. हा प्रकार सरकार देण्यासंबंधानें सुरू झाल्यास मोठी सोय होणार आहे. एखादा देशभक्त यासंबंधानें एखादा ठराव कायदेमंडळापुढें आणील तर, खचित तो लोकांचे मनःपूर्वक धन्यवाद सपादन करील.

देवदेवक बसल्यावर लग्नघरीं कोणीही स्मश्रु करावयाची नाहीं अशी मीं चोहोंकडे ताकीद फर्माविली. असें करण्यांत लग्नांत काटकसर करण्यासंबंधाच्या

सुधारकी मताचा थोडासा अंश होताच. अशा रीतीनें माझा वटहुकूम कुटुंब असतांही एका विधवेनें तो मोडण्याचें धारिष्ट केलेंच. तें ऐकून माझ्या तळव्याची आग मस्तकास जाऊन केशवपनाच्या चालीस मीं रागाच्या भरात शेकडों शिव्या दिल्या. त्याबद्दल मला मागाहून फार पश्चात्ताप झाला. त्याच दिवशीं तेलफळ, वाग्निश्चय व रुखवत होऊन सध्याकाळीं गोरज मुहूर्तावर लग्न लागले. लग्नाचे वेळीं नृत्य करण्यास वारांगना नव्हत्या हें सांगावयास नकोच. मला वाटतें, कीं विवाहप्रसंगीं म्हणावयाचीं मंगलाष्टकें जोशी लोक कमी बेसुरांत व तानलपेट घेण्याचा यत्न न करिता म्हणत जातील तर वारांगनांची आमच्यातील हौशी लोकासही आठवण होणार नाहीं.

दुसऱ्या दिवसांपासून व्याह्यांकडचीं प्रयोजनें सुरू झालीं, व बायकांच्या मिरवणुकी आदल्या दिवशीं सुरू झाल्या होत्या त्या दुप्पट जोरानें चालू राहिल्या ज्याप्रमाणें भुसावळसारख्या मोठ्या स्टेशनवर अनेक इजनें एक-सारखीं इकडून तिकडे तिकडून इकडे सहल करीत असतात, त्याप्रमाणें आमच्याकडील व व्याह्यांकडील दोनदोन चारचार बायका वारंवार मिरवत जाऊ लागल्या. त्यांच्या मिरवण्याचें कारण मात्र पुरुषमंडळींपैकीं एकाच्याही लक्षांत येत असेल तर शपथ. कधीं कधीं वाजंत्र्याच्या संख्येपेक्षाही मिरव-णारांची सख्या कमी दिसून येई. शिवाय, भर उन्हाळ्याचे दिवस असतां व डोक्यावर दोनप्रहरचा सूर्य तळपत असताही, जवानमर्द ब्राह्मण भाईंच्या वशांतील त्या शूर अबला, पायात जोडे न घालतां व सूर्याची थट्टा करण्या-करितांच कीं काय, अगावर शालजोड्या गुरफटून चालताना दिसत. ‘जोडा’ या शब्दास पादत्राण व दपत्य असे दोन अर्थ असल्यामुळें, वैवाहिक सुखात व्यत्यय येऊ नये असे इच्छिणाऱ्या आमच्या धोरणी पूर्वजांनीं, जिनें लक्षणेनेंही द्वितीय संबंधाची यत्किंचित् कल्पना येईल अशा वस्तूंशी संसर्ग ठेवण्याची गरती स्त्रियांना सक्त मनाई केली असावी तेव्हांपासून पायास चटके बसत असताही तें शांतपणानें सहन करणाऱ्या तारामतीचें अनुकरण आर्य स्त्रिया करीत आल्या आहेत. वेश्यांना मात्र कोणत्याही अर्थानें जोड्याला तुडविण्याची पूर्ण मोकळीक आहे.

दररोज सकाळीं व्याह्यांकडील बायका आमच्या बायकाकडे अंबोण घेऊन येत असत. त्यांत सरकी, वाग्यांचीं डेखें वगैरे म्हशीपुढें मांडण्याजोग्या

सामग्रीचा समावेश असे. मुख्य विहीण ही लग्नातील राणी [ महिषी ] आहे ही कल्पना आणि महिषी व म्हैस या शब्दाचा एकमेकाशी घोटाळा यापासूनच बहुधा हा प्रचार सुरू झाला असावा, असा माझा तर्क आहे. असे असूनही अबोण आले नाही तर मुख्य विहीणबाईस अतोनात घुस्सा येऊन ती खरोखरच मारक्या म्हशीप्रमाणें आपल्या विहिणीकडे पाहू लागते.

वधूगृही भोजन होण्याचे प्रसगीं वराला अगठीकरितां रुसविण्याची चाल आहे, ती आपल्या पूर्वजाच्या शहाणपणाची द्योतक आहे. तिजमुळें आमच्या मुलामध्ये रागासारखा मनोविकार हुकुमात ठेवण्याची सवय उत्पन्न होते. सोडमुंजीचे वेळींही मुलाला लटकें रुसविण्याची जी चाल आपणात दिसून येते तिचेंही रहस्य हेंच आहे. सुदैवाने एखाद्या मुलाची दोनचार लग्ने होण्याचा प्रसग आला तर, वाटेल तेव्हा राग आणण्याची कला त्याच्या हातचा मळ होऊन बसते या आर्य चालीस अनुसरून मी मुलास रागाची शिकवणी देऊ लागलो, तेव्हां तो लटके रागावण्याच्या ऐवजीं मजवर खरोखरीचाच रागावला. पण त्यामुळें त्याचा नूर बदलून जाऊन त्याचा माझ्या व्याह्यावर तत्काळ परिणाम झाला, व त्याने जावईबुवा नको नको म्हणत असता बळेंच त्याच्या बोटावर एक मूल्यवान् अगठी चढवून दिली

पुरुषाच्या पक्तीस आजपर्यंत पाळल्या गेलेल्या दोन महत्त्वाच्या सनातन चाली आहेत एक, निमंत्रितानी येण्यास उशीर करणे, व दुसरी, जेवणाऱ्या मंडळींची यजमानानें प्रार्थना करणें. जेवण्यास उशीर केल्यानें पानावरचा भात थड होऊन त्याच्या गारगोट्या होतात अशी कित्येकांची ओरड असते पण गारगोट्याच्या पोटीं अग्नीचा वास असतो हें कळण्याइतके या बुभुक्षितांस ज्ञान नसतें. यजमानानें पाहुण्याची प्रार्थना करावयाची ती तोंडावर एक प्रकारचें कृत्रिम हास्य उभे करून व हात जोडून ठरीव शब्दांनीं करावयाची असते. ती चांगली साधण्याकरिता मी लग्नापूर्वी मांडवातील खांबासमोर अनेक वेळा तिची तालीम केली होती. त्यामुळें प्रार्थनेचे सोंग बिनबोभाट पार पडलें.

ज्याप्रमाणें आगगाडीस–मग ती उतारूंची असो अगर मालाची असो– इंजन व ब्रेक असल्याशिवाय तिचें पाऊल पुढें पडत नाही त्याप्रमाणें लग्नांतील पंक्तीत–मग ती पुरुषाची असो अगर बायकाची असो-वर व वधू असल्या-

खेरीज ती पार पडत नाही. तेलफळ, रुखवत, पुरुषाच्या व बायकाच्या पंक्ती वगैरे यच्चयावत् प्रकारास त्या बिचाऱ्यास इतरांच्या बरोबरीनें भाग घ्यावा लागत असल्यामुळे त्याचे फार हाल होतात अजीर्णावर अजीर्ण होत असताही पच पक्वान्नावर ताव मारावा लागतो. नाटकातील फालतू पात्रापेक्षा नायक-नायिकाच्या भूमिका घेणारासच फार काम पडतें, त्याप्रमाणे लग्नातील बाजार-बुणग्यापेक्षा वधूवरासच विशेष दगदग सोसावी लागते इतराची—विशेषतः लहान मुलीची व म्हाताऱ्या पुरुषाची—घटकाभर करमणूक करण्याकरितां त्यास पंक्तींत परस्परास घास देण्याची व एकमेकाच्या नावानीं उखाणे घेण्याची आणि जेवणानंतर पानसुपारीच्या वेळीं एकमेकांच्या मुठी उघडण्याची, वस्त्रांस मारलेल्या गाठी सोडविण्याची व पानाच्या, खोबऱ्याच्या व रंगेल थेरड्यांचा आग्रह पडल्यास लवंगाच्याही विड्या तोडण्याची कवाईत करावी लागते उखाणे बहुधा तात्कालिक स्फूर्तीनेंच घ्यावयाचे असतात. म्हणून त्यास सामान्य काव्याप्रमाणें चमत्कृति, रस, रमणीय भाषा यांपैकीं एकाचेंही बंधन नसते त्याच्या चार चरणापैकी पुढील दोहोंचा मागील दोहोंशीं अनुप्रासाहून अधिक सबध नसतो. त्याचा पूर्वार्ध व उत्तरार्ध यानी एकमेकावर दुगाण्या झाडण्यास हरकत नसते त्याच्या पहिल्या चरणात ‘समोर असणारा कोनाडा’ व शेवटच्या दोन चरणात वधूवराचीं नावें असलीं म्हणजे वैवाहिक साहित्यशास्त्राची तक्रार नसते. पहिल्या चरणातील कोनाड्यात बोळक्यापासून सातमजली हवेलीपर्यंत कोणतीही वस्तु व मुंगीपासून हत्तीपर्यंत कोणताही प्राणी राहू शकतो. समोर कोनाडा असल्याशिवाय कोणत्याही वधूवरास काव्यस्फूर्ति होत नाही. उखाणे घेण्याची चाल सनातन असल्यामुळें आपणा-मधील वास्तुकलाही अत्यत प्राचीन असली पाहिजे.

पुरुषाच्या पक्तीपेक्षा बायकाच्या पंक्तींत आमच्या रूढीनें विशेष बारकाया ठेविल्या आहेत. पुष्कळदां विहिणीची थट्टा करण्याकरिता पक्वान्नात केळीचा काला घालण्याची वहिवाट आहे. तसेंच जेवताना उखाणे घेऊन उलट पक्षाचीं व्यंगे काढण्याचीही चाल आहे ज्याप्रमाणें आपणामध्यें सक्रातीप्रमाणे गोड बोलावयाचें व शिमग्याप्रमाणें शिव्या देण्याचे सण असतात त्याप्रमाणें लग्नविधीमध्येंही वधुवराच्या उखाण्यांप्रमाणे सुभाषितें व विहिणीकरवल्यांच्या

उखाण्याप्रमाणे दुर्भाषिते असतात. सुभाषिताचा वधूवरांचें परस्परावर प्रेम बसविण्यांत व दृढ करण्यात जसा उपयोग होतो तसा दुर्भाषिताचा उभय कुलांचें कायमचे वैर उत्पन्न करण्यात कधीं कधीं होत असतो. पण हें एक लहानसें वैगुण्य सोडिलें म्हणजे वरील दोन चालीचा उभय पक्षाचे अंगी चातुर्य, समयसूचकता वगैरे आणण्याचे कामी बराच उपयोग होतो हें कबूल करावे लागेल. उखाण्यात प्रास जुळवावे लागत असल्यामुळे बायकाचे अंगीं कवित्वाची स्फूर्ति होते ती निराळीच. शिवाय उभयपक्षास आपआपलीं व्यगें अशा रीतीनें कळल्यामुळें तीं त्यास सुधारता येतात ' निंदकाचें घर असावें शेजारी ' या अभंगचरणातील सर्व उपदेश या चालीत एकवटलेला आहे असें म्हणण्यास हरकत नाही

वर मीं जी उखाण्याची तरफदारी केली आहे ती नि.पक्षपातीपणाची आहे याचे प्रमाण याच लग्नांत एक लहान गोष्ट घडून आली ती होय. व्याह्याकडील एका चिमुरड्या करवलीने मला उद्देशून ' समोर होता कोनाडा त्यात होतें दही, खिंडारबक्ष नावाचे भले मिळाले व्याही ! ' असा उखाणा घेतला तरुणपणी माझे पुढील दोन दात पडले होते, व त्यावरून मला खिंडारबक्ष हें टोपण नाव मिळालें होतें, त्यावर हा टोमणा होता. माझ्या मुलाच्या लग्नाचे वेळी, वास्तविक म्हटलें तर, माझे इतर तीस दातहि पडले असून वरील व्यग पूर्णपणे नाहीसें झालें होतें, व तोंडास प्रमाणशीरपणा आला होता. असें असता त्याच नावानें मला हिणविणें फार अन्यायाचें होतें, व यामुळें मला मनस्वी रागही आला अजूनही त्या गोष्टीची आठवण झाली, कीं मन कावरेंबावरें होतें. मनाच्या अशा बेताल स्थितीतही ज्या अर्थी मी उखाण्याची कड घेत आहे, त्याअर्थी ती बरवरची आहे असें कोण म्हणेल ?

माझे दोन दात तरुणपणी पडले होते म्हणून वर सांगितलें ते पडण्यात माझा कोणताही दोष नव्हता हें खालील गोष्टीवरून उघड होईल. सुमारे तीस वर्षांपूर्वी आमच्या गावात इंग्रजी सुधारणा झपाट्याने सुरू होऊं लागली. त्यात एक क्रिकेटचा क्लबही स्थापन झाला. प्रत्येक पाश्चात्य गोष्टीचा तिटकारा करण्याकडे माझा जात्या कल असल्यामुळे मी प्रथम त्या क्लबाचा मेंबर होण्यास कांकू करूं लागलों. पण पाडुतात्यांसारख्या काहीं मित्राच्या आग्रहावरून अखेरीस माझें नांव वर्गणीदाराच्या पटात दाखल

करण्यास मी अनुमोदन दिले. एकदा मेंबर झाल्यावर मात्र माझ्या अंगांत वीरश्रीने एकदम सचार केला, व साहेब लोकामधील पटाईत खेळाडूंशी सामना देऊन विजय मिळविण्याचे मी मनातल्या मनात हजारों बेत योजू लागलो. ज्या दिवशी खेळास सुरवात होणार होती तो दिवस शेवटीं येऊन ठेपला. ठरलेल्या वेळीं आम्ही सर्वजण काचे मारून हातात ब्याटी घेऊन वीरश्रीचे मदात सर्व जगास तुच्छ मानीत क्रीडाभूमीवर गेलों लवकरच खेळास सुरवात झाली माझा उत्साह ओळखून माझ्या सोबत्यांनी मला मोहऱ्याच्या ठिकाणीं उभे केले होते आपण पुढे हिंदुस्थानातील नामांकित खेळाडू होऊ, तेव्हा आपलें रसभरित चरित्र प्रसिद्ध होईल, ते होण्यापूर्वी चरित्रकार चरित्रनायकाकडे माहितीकरिता येईल, व तेव्हा त्यास आपणास खेळाच्या पहिल्या दिवसाची तारीख वगैरे तपशील सागावा लागेल, असे विचार माझ्या मनात येऊन मी तावडतोब माझ्या स्मरणवहीत तारखेची नोद करून ठेविली, व चेंडू माझ्या बाजूस येण्याची उत्कंठेनें वाट पाहात राहिलों माझ्या मनोरथाची पूर्ति होण्यास फार वेळ लागला नाही. कारण सुमारें पाच मिनिटातच एक चेंडू मजकडे तोफेच्या गोळ्याप्रमाणे येताना दिसला त्यासरसे माझे भावी उत्कर्षाविषयींचे सर्व मनोरथ थिजण्याच्या मार्गाला लागले. तथापि मी आपल्या मनाला धीर देऊन व दोन्ही हाताची तोंडाजवळ ओंजळ करून चेंडू झेलण्याच्या पावित्र्यात उभा राहिलों. तो आडदाड चेंडू सू सू शब्द करीत जो आला तो थेट माझ्या दातावर आदळला, व ज्याप्रमाणे विकेट उडवून टाकावी त्याप्रमाणें त्यानें माझा एक दात मुळासकट उलथून पाडिला. त्या व्यथेनें घेरी येऊन मी मटकन् खालीच बसलो हे आकस्मिक विघ्न आल्यामुळे खेळ बद पडून आम्ही सर्व घरोघर परत आलो. दुसरे दिवशी खेळास निघते वेळीं माझे सोबती मला घरीं राहाण्यास आग्रहाने सांगूं लागले पण त्याने मी उलट ईर्ष्येला पेटून त्याचेबरोबर पुन्हा खेळण्यास निघालो मनात विचार केला, की एक वेळ चेंडू दातावर पडला म्हणून पुन्हा पडेल कीं काय? त्याचे अंगीं विचार-शक्ति थोडीच आहे! माझ्या दातांमध्येही अशी काहीं आकर्षणशक्ति नाहीं, की तिजमुळे चेंडू पुनः पुनः त्यावर येऊन आदळावे. आज त्या चेंडूवर सूड उगविण्याची आयती संधि आली आहे, ती विनाकारण दवडा का? आज जर

तो पुन्हा माझ्या दिशेकडे आला तर त्याला असा वरचेवर झेलून घेईन, कीं इतरानी वा' म्हणावे. असे विचार करीत खेळण्याचे जागीं जाऊन पोहोचलों. खेळ सुरू होऊन बराच वेळ झाला तरी चेंडू माझ्या बाजूस येईना. माझे भक्ष्य मला टाळीत आहे हे पाहून मी इतका उतावीळ झालों, कीं दोनचार वेळा आपले एकतीस दांत चावून मी आपल्या सोबत्यांच्या देखत आपली उत्सुकता प्रगट केली खेळ सपावयास आला तेव्हा मी आपल्या मनाशीं विचार करूं लागलों, कीं इतकी दुष्टबुद्धि मनात वागविणें चागले नव्हे. चेंडू मनांतून जर आपणास इतका भितो आहे तर केवळ एक दात पाडल्याबद्दल आपला तरी त्याजवर एवढा दात का असावा ? असे उदार विचार मनांत घोळत आहेत तोंच चेंडू माझ्या दिशेकडेच धावत आला. तें पाहून मलाही दिशेस जाण्याची प्रेरणा होऊ लागली, व आपलें तत्त्वज्ञान कर्त्या सुधारका-प्रमाणें अमलात आणून त्या चेंडूस मार्ग द्यावा असे वाटू लागले. तथापि माझे सोबती हसतील या भीतीने पूर्व दिवसाप्रमाणेंच त्याचें स्वागत करण्या-करितां मी उभा राहिलो. पण मला पुरता अवधि मिळण्यापूर्वीच तो चाडाळ माझ्या दातावर आपटून दुसरा एक दात आपल्या भावाच्या मागोमाग चालता झाला ! त्या दिवसापासून मी क्रिकेट खेळण्याचें अजिबात सोडून दिलें. तसें केलें नसतें तर आणखी तीस दिवसात माझ्या तोंडाचें बोळकें झालें असतें. त्या वेळेपासून मला चेंडूची इतकी दहशत बसली आहे, कीं क्रिकेटचे कॅटलॉगात चेंडूचीं वर्णनें वाचताना मी नेहमी तोंडावर हात ठेवीत असतों.

लवकरच वरातीचा व झालीचा समारभ झाला झालीचे प्रसंगी जें दिव्यांचें शिपतर वडील माणसाच्या डोक्यावर ठेवितात तें रत्नखचित मुकुटाप्रमाणें शोभत असतें शिपतर हलल्यास दिव्यातील तेलाचा डोक्यावर अभिषेक होतो तो निराळाच. तेल चक्राकार पागोट्याच्या कोंकातून डोक्यापर्यंत पोहोंचल्यास डोक्यावर घट्ट बसलेलें पागोटें त्यातून काढण्यास बरीच मदत होते.

आमच्याकडील विहिणींस तिकडील विहिणींनीं रात्रीं बारा वाजता पाय-घड्या घालून वाजत गाजत रासन्हाण्याकरिता मिरवीत नेले व नतर न्हाण्याचा थाट उडविला त्यात त्यांचेकडील एका करवलीनें अंगास खाज आणणारी वनस्पति आमच्याकडील एका विहिणीस लावून तिची खाजवून खाजवून पुरेवाट केली त्यामुळें मोठा तंट्याचा प्रसग गुदरून फिर्यादीअर्यादीपर्यंत मजल

पोहोंचणार होती. पण या चालीचें सनातनत्व लक्षांत घेऊन मीं आमच्या-कडील विहिणीची समजूत घातली.

रासन्हाण्यांचे वेळीं आमच्याकडील बायकांना परोपरीच्या बागड्या भरण्यात आल्या. त्यांचीं नावें कोठवर सांगूं? राजवर्खी, कनकतारा, छानछबेली, चटकचांदणी, इंडीगलास, तारामंडळ, राणीचा बाहुटा, केरवा, बायसिकल—फार काय सांगावें, सर्व सजीव निर्जीव सृष्टि त्यांचे हातीं होती म्हटलें तरी चालेल. पण अशा रीतीनें बायकाच्या हातीं किंवा मुठींत असणें हें सृष्टिनियमास विरुद्ध नाहीं हें माझे मार्मिक वाचन स्वानुभवावरूनही कबूल करितील.

---

## मुष्टि १० वी *

## श्रावणी

यापूर्वी प्रसिद्ध झालेल्या माझ्या 'शिमगा' या लेखात एकमेकांच्या अगांवर घाणेरडे पदार्थ फेंकण्याच्या सनातन चालीचा सर्व अगानीं विचार केला. आजच्या लेखात असे पदार्थ स्वतःच्या अगास फासल्यापासून किंवा भक्षण केल्यापासून काय परिणाम होतात हा विचार कर्तव्य आहे.

शिमग्यामध्यें सर्व हिंदूंना—मग ते ब्राह्मण असोत किंवा तदितर असोत—मिसळण्याची पूर्ण मुभा असते. ब्राह्मणानीं शूद्रावर शेण फेंकलें काय किंवा शूद्रानें ब्राह्मणीच्या नावाने पांचजन्य केला काय, दोन्ही गोष्टी ईश्वराच्या घरीं सारख्याच धार्मिकपणाच्या ठरतात. पण एखादा शूद्र श्रावणींत ब्राह्मणांच्या पक्तीला बसून शेण खाऊं पाहील तर मात्र त्याने अनाचार केला असें आम्ही समजू. त्याला नुसता शेण फेंकण्याचा अधिकार आहे. शेण खाण्याचा अधिकार केवळ परम पवित्र ब्राह्मणांनाच ठेविला आहे. या हक्काबद्दल आमचे ब्राह्मणेतर बंधु आमचा हेवा करणार नाहींत अशी आशा आहे. या हक्काच्या मोबदल्यात आम्हीं त्यांना मांसमद्य खाण्यापिण्याचा हक्क ठेविला असल्यामुळें आमच्यावर पक्षपाताचा दोष येऊं शकत नाहीं. आमचा शूद्र बंधु मांस चघळीत असतां किंवा दारू ठाशीत असता आम्ही ब्राह्मण लोक

---

* सुधारक, २२ व २९ आगस्ट सन १९०४.

कधींही जिभल्या चाटीत जवळ उभे राहात नाही. असें जर आहे तर आम्ही गोमय खाताना किंवा गोमूत्र पिताना त्यानें आपल्या तोंडास पाणी सुटू द्यावे हें अयोग्य आहे. बरें, हा जो हक्क आम्हीं आपणाकरिता राखून ठेवला आहे तो फारच आकुंचित आहे. कारण आम्ही फक्त गाईचें शेण व मूत्र चाखीत असतो. इतर प्राण्याचें मळमूत्र खाऊन खत महाग केल्याचा किंवा डुकरांना उपाशी मारल्याचा घाणेरडा आरोप कोणीही आमच्यावर आणू शकणार नाहीं. उलट आम्हीं आमच्या ब्राह्मणेतर बंधूना गाईशिवाय वाटेल त्या जनावराचें मास खाण्याचा व देशी दारूपासून तों तहत विलायती मद्यापर्यंत वाटेल तें पेय पिऊन उल्लू बनण्याचा विस्तृत हक्क दिला आहे. थोडक्यात म्हणावयाचें म्हटले म्हणजे, आमच्या हक्काचें क्षेत्र त्याच्या हक्कांच्या अपवादाच्या क्षेत्राइतकेंच मर्यादित आहे. दुसरे असें, की त्यांना ज्या सणांत आम्ही आमच्या बरोबरीनें मिसळण्याची पूर्ण मोकळीक ठेविली आहे तो ' शिमगा ' सणही श्रावणीचाच एक प्रकार आहे, इतकेंच नाहीं, तर श्रावणीपेक्षाही श्रेष्ठ आहे. कारण श्रावणी हा सण किती झालें तरी मनुष्यातला आहे, पण खुद्द ब्रह्मदेवाच्या मुख-बाहु-जंघा-चरणाच्या स्थानी समजल्या जाणाऱ्या ब्राह्मणादि जाती ज्या सणात एकमेकाच्या अंगास मळमूत्र फासतात, त्या सणास ब्रह्मदेवाची श्रावणी म्हटल्यास वावगें होणार नाहीं कारण गोमयस्नान हाही श्रावणीपैकींच एक महत्त्वाचा भाग आहे. आतां ब्रह्मदेवाचा दिवस जसा मानवी दिवसापेक्षा मोठा तशी ब्रह्मदेवाची श्रावणी ही मानवी श्रावणीपेक्षा मोठीच असायची, व याप्रमाणें मोठ्या सणात शूद्रादिकांस स्थान असल्यामुळें त्यांनीं लहान सणाचा अकारण हेवा करून पंचगव्यप्राशनांत आमचे वाटेकरी होऊं पाहाणें हा केवळ मत्सरबुद्धीचा प्रकार आहे.

आम्ही गाईशिवाय इतर कोणत्याही प्राण्याच्या मळमूत्रास स्पर्श करीत नाहीं, असें वर सांगितलें. आता गाईच्या मूत्रावर व शेणावर आमची इतकी भक्ति का असते याचा विचार करू गाईची आमच्या धर्मांत फार मोठी योग्यता आहे. याची अनेक कारणें आहेत पूर्वीच्या ऋषींच्या उपजीविकेचें साधन म्हणून तिची थोरवी वेदांत वर्णिली आहे. तसेंच पूर्वी पृथुराजाच्या अमदानीत पृथ्वीवर अवर्षण पडलें असतां, तिने गाईचें रूप घेऊन दोहनद्वारा संपत्तीची रेलचेल करून दिली, अशी कथा प्रसिद्ध आहे.

शिवाय जेव्हा जेव्हा जगावर एखादे संकट येते तेव्हा सुद्धां देवाची याचना करण्याकरिता पृथ्वीला गोरूपच धारण करावें लागते. याप्रमाणें गाय ही आमचें मुख आहे. अर्थात आम्ही हिंदु लोक गायमुखे आहोत. बिकट प्रसंगीं आम्ही ब्राह्मण आपला याचना करण्याचा हक्क बाजूस ठेवून गाईस पुढें करीत असतों. याप्रमाणें पवित्र ब्रह्मदेवाचे मुख जे पवित्र ब्राह्मण, त्याचे मुख जी गाय ती किती पवित्र असली पाहिजे याचा वाचकांनींच विचार करावा. ही पवित्रपणाची परंपरा गाईच्या मुखापर्यंत मात्र नेऊन भिडवितां येत नाहीं. याचें कारण लवकरच सागण्यात येईल असो, गाय पवित्र मानण्याचें तिसरें कारण, श्रीगोपालकृष्ण स्वत: गाई राखीत होता हें होय. स्वतः कृष्ण किती पवित्र होता याचे वर्णन मी करण्यापेक्षा ते वाचकाच्याच कल्पनेवर सोंपविलेलें बरें ज्या भगवताने असंख्य जारकर्मे केली असूनही तो बालब्रह्मचारी म्हणूनच प्रसिद्ध आहे, दहीदुधाच्या मडक्याच्या उतरंडी पळविल्या असूनही तो नामानिराळाच राहिला आहे, त्या भगवंताच्या पावित्र्याचें मी पामरानें किती वर्णन करावें ! अशा भगवताशीं संसर्ग पावलेली गाय तरी अपवित्र काय म्हणून राहावी ! गाईच्या पवित्रतेचें चवथे कारण, तिच्या नावाचे ' गायत्री ' वृत्ताच्या नावाशीं जे सादृश्य आहे तें होय

गाय याप्रमाणे पवित्र असल्यामुळे तिचे अवयवही पवित्र मानिले जाऊन त्याची नावे पवित्र पदार्थांस देण्यांत आलीं असल्यास नवल नाहीं. गोकर्ण तीर्थाचें पावित्र्य प्रसिद्ध आहे. गाईच्या पावलाचाही शेंडीचें माप घेण्यात उपयोग महशूर आहे. गोरज मुहूर्त सर्व मुहूर्तांत अग्रेसर असतो. गाईचें तोंड अपवित्र असताही मोठमोठ्या देवळांतून देवाच्या अभिषेकाचें पाणी गायमुखातून सोडण्याची व्यवस्था केलेली असते, व गोमुखींत हात घालून श्रीकृष्ण परमात्म्याच्या अतर्क्य लीलाचें चिंतन करिताना अनेक साधुसंत दिसून येतात. प्रथम प्रथम ' गौ ' शब्दाचा उपयोग पवित्र वस्तूसंबंधानेंच होत असे, तो पुढें पुढें सामान्य पदार्थांसंबंधानें सुद्धा होऊं लागला; व गवाक्ष, गोचर, गोरोचन, गोधूम, गोपद्म, गोपुर हे शब्द प्रचारांत आले. या रीतीनें वेदांत गाय, पुराणात गाय, व्यवहारात गाय, चोहोकडे गायच गाय होऊन आम्ही केवळ गोमय बनून गेलों आहोंत ' गौ ' शब्दापासून झालेले शब्द

अपवित्रपदार्थवाचक नसतात, यास 'गोमासी', 'गोचीड' असे थोडे शब्द अपवाद आहेत; त्यांपैकींच 'गोवध' हा शब्द होय. गोवधाचा प्रचार आम्हामध्यें अतिनिंद्य मानिला आहे, व तो बंद पाडण्यासाठीं गोरक्षणसभेचा अवतार झालेला आहे या सभेचे सभासद यथाशक्ति व्याख्यानें देऊन व पुस्तकें लिहून गाईची सेवा करीत असतात ही सेवा परमेश्वराकडे रुजू होत असते, व 'ये यथा मां प्रपद्यते तांस्तथैव भजाम्यहम्।' या भगवंताच्या आश्वासनानुरूप प्रत्येक गोभक्तास गोलोक प्राप्ति होणार ही माझी खात्री आहे. कांहीं गोभक्ताच्या व्याख्यानातील तर्कटपणा व बादरायण संबंध पाहून, बैलाचा जन्म येण्यापूर्वीं या जन्मींच शिंगें व शेंपूट वर्ज्य करून इतर सामुग्री त्यानीं आपल्या पुण्यबलानें पैदा केली आहे, व ते तद्रूप होण्याच्या मार्गाला चांगल्या रीतीनें लागले आहेत, असेंच प्रत्येकास कबूल करावें लागेल गोलोकास जाऊं पाहणाऱ्या या वाटसराची 'शिवास्ते पंथानः संतु' या शब्दानीं तूर्त रजा घेऊन पुढील विवेचनास लागतों

शेणाचा आपणास प्रत्यहीं अनेक प्रकारचा उपयोग दिसून येतो. त्याच्या साहाय्यानें जिनगरास चित्रें करिता येतात व वैद्यास व्रणस्फोटादि रोग बरे करिता येतात तें गृहिणीस सारवण्यास उपयोगीं पडतें व शेतकऱ्यास खता-ऐवजीं कामीं पडतें. याशिवाय गोंवऱ्याच्या रूपानें स्वैपाकापासून तों वैश्वदेवा-पर्यंत व होमापासून तों सरणापर्यंत त्याचा उपयोग होतो तो निराळाच हल्लींच्या काळीं तर त्यापासून मोठ्या शहरात धुराच्या दिव्यासही पोषण मिळतें. याप्रमाणें अग्नि व दीप याना जर शेण खाताना कांहीं दिक्कत वाटत नाहीं तर त्याच्या उपासकांना तरी तें सेवन करिताना कां वाटावी? 'महाजनो येन गतः स पंथाः' हा न्याय जर इतरत्र लागूं पडतो तर तो शेण खाण्या-तच कां लागू करूं नये! निदान गाईसारख्या पवित्र प्राण्याची विष्ठा सेवण्यास तरी कांहीं हरकत नसावी

गोमय व गोमूत्र अंगास फासल्यानें व पोटात घेतल्यानें सर्व पातकें लयास जातात, हा त्याचा सर्वांत मोठा उपयोग आहे. या विधानाची सत्यता दोन-तीन दृष्टान्तांनीं चांगली स्पष्ट करिता येते. काट्यानें कांटा निघतो, हा नेहमींचा अनुभव आहे तसेंच मातीनें माती निघते, हीसुद्धा रोजच्या पाहाण्यांतील गोष्ट आहे. ह्या दोन्ही गोष्टी जर खऱ्या आहेत तर, मळमूत्र सेवन करून

ारकवास तरी का चुकविता येऊं नये ? अशतः प्रायश्चित्त भोगल्या
समग्र प्रायश्चित्त टाळता येतें असा जो समज चोहोंकडे आढळून येतो, त
नेखालस खोटा आहे असे कोणीं म्हणावें ! याच समजामुळें फकीर
ोरागी आपल्या अंगास सुया टोंचतात व त्याजवर चाबकाचे फटक
उडवितात. गोपीचंदास जालंदरनाथाचा कोप आपल्या धातुमय प्रतिमाव
ोढून घेता आला येशू ख्रिस्तास स्वतः सुळीं जाऊन एकदर मनुष्यजाती
ायश्चित्त चुकविता आलें मृत्यूची खोटी बातमी उठवून खऱ्या मरणा
ुकांडा देता येते आजारी माणसाची क्रिया करण्याचा नवस करून त्याच
ृत्यु टाळता येतो गणेशचतुर्थीचे दिवशीं चंद्रदर्शन झाल्यामुळें येणा
ारोप नुसत्या शिव्या मिळवून टाळता येतो या सर्व गोष्टी जर खऱ्या, त
र्षांतून श्रावणीच्या व शिमग्याच्या रूपानें जिवंत नरकवास भोगून मरणा
ंतरचा नरकवासही उघड उघड टाळता येण्यासारखा आहे.

गोमयाच्या व गोमूत्राच्या द्वारे नरकवास टाळता येत नाहीं असें ज
ृहीत धरिलें, तरी त्याच्या सेवनानें तो सुसह्य तरी होत असला पाहिजे,
ोणासही नाकबूल करिता येणार नाही कोणत्याही गोष्टीची सवय केल
्हणजे ती अंगवळणीं पडून तिचे काहीं वाटेनासे होतें.

त्यातल्या त्यात गाईचें मळमूत्र सेवण्यात एक विशेष फायदा आहे. आप
जसें श्रावणीच्या दिवशीं अमंगळ पदार्थ खाण्यास कचरत नाहीं त्याचप्रमाणे
ाईलाही त्या बाबतीत विधिनिषेध नाही. तिची श्रावणी साऱ्या वर्षभर चा
असते. तिच्या विष्ठासेवनात कधीं खळ पडत नाहीं. यामुळे तिच्या शेणा
जगांतील सर्व प्रकारच्या विष्टाचा थोडा थोडा तरी रस उतरलेला असतो [गाई
ेण सर्व विष्टाची राष्ट्रीय सभा असून त्यात सर्वांचे प्रतिनिधि हजर असतात
े शेण खाण्याची आपणास चटक लागली म्हणजे आपण नरकाच्या बापास
ाद देणार नाही असें समजावें. कधीं कधीं ईश्वरदत्त बुद्धीच्या जोराव
्वरनिर्मित संस्थाही कशी कुचकामाची करून सोडिता येते, याचे हें चांग
उदाहरण आहे. देवाचे दात देवाच्याच घशात कसे घालता येतात
ाखविण्याकरिता का होईना, सुधारकांनीं श्रावणी करीत जावी अशी माझ
िफारस आहे

येथे नास्तिक सुधारक म्हणूं लागतील, कीं या युक्तिवादाने ईश्वरवाद्याची मात्र नीट समजूत होईल, पण जेथे देवावरील विश्वासाचाच अभाव तेथे हें पांडित्य कसे पटणार ? या धर्मबाह्य लोकाची खात्री व्हावी म्हणून गाईच्या मलमूत्रसेवनाच्या फायद्याचा स्वतंत्र दृष्टीनें विचार केला पाहिजे

इतर श्वापदाच्याप्रमाणें गाईच्याही शेणाचा व मूत्राचा वैद्यकी दृष्टीने मोठा फायदा आहे ही गोष्ट पाखंडी लोकासही नाकबूल करिता येणार नाहीं. प्रत्येक प्राण्याचे उदर हा एक औषधींचा कारखाना असून त्यात तयार होणारीं द्रव्ये धन्वंतऱ्यासही सिद्ध करणे दुर्घट आहे गाईशिवाय इतर प्राण्याच्या अमंगळ पदार्थांत काय काय गुणधर्म आहेत हे मला नीटसे माहीत नाहीं ते नाकाशीं आणिले असता ओकारी येते, यावरून त्या सर्वांत ओकून पाडण्याचा गुण आहे हें मात्र खात्रीने सागता येते. शिवाय त्याचे सेवन मधून मधून करीत गेलें असता आपल्या नेहमीच्या अन्नास चागली रुचि येईल असाही तर्क आहे. त्याचप्रमाणें त्यापैकीं एखादा बेशुद्ध मनुष्याकडून हुंगविला असता तो खडखडीत शुद्धीवर येईल अशीही खात्री आहे. अर्थात् हे पदार्थ त्याच्या शुद्ध अवस्थेत, म्हणजे त्या त्या प्राण्याना मूळव्याध, मधुमेह इत्यादि रोग नसतानाच घेतले पाहिजेत हे सारे उपयोग गाईच्या मळमूत्रातही अर्थात्च दिसून येतात.

इतर पशूच्याप्रमाणे गाईच्याही उत्सर्गाची खत या नात्याने योग्यता जगजाहीर आहे श्रावणीच्या दिवशीं ब्राह्मणाच्या मनावर नीतितत्त्वें रुजवितानाही गाईचे खत फायदेशीर दिसून येते हा इतर पशूच्यापेक्षा त्यात विशेष गुण आहे.

हिंदु लोकाची उपजीविका मुख्यत्वेंकरून गाईवर चालत आली आहे यामुळें आपल्या शास्त्रकाराना त्याच्या जीविताचें जितके रक्षण करवेल तितके करण्याची खबरदारी घ्यावी लागली गाय हें जनावर उपयुक्त असल्यामुळे त्याचे रक्षण करणें आपलें कर्तव्य आहे असा जर त्यानी स्पष्ट नियम घालून दिला असता तर तो कोणी जुमानला नसता, म्हणून तो अप्रत्यक्ष रीतीने अमलात आणण्याकरिता त्याना गोमयगोमूत्रसेवनाची शिफारस करावी लागली ज्याप्रमाणें, वधार्थ मारेकऱ्याच्या स्वाधीन केलेल्या मनुष्याचा हात त्यास खुणेबद्दल आणण्यास सागितलें म्हणजे वधासंबंधानें निश्चिती बाळगता येते

त्याप्रमाणे, वरील दुकल श्रावणीच्या दिवशी सेवन करावी असा नियम केल्याने गोरक्षणाचे आपोआपच काम होतें.

हिंदु धर्म व इतर धर्म यामध्यें पचगव्यसेवनाचे कुपण घातल्यामुळे परकी धर्मातील लोक आपल्या धर्मात येत नाहीत व त्यामुळे तो शुद्ध राहातो हाही फायदा लक्षात घेण्यासारखा आहे.

आता यापुढील फायदा सागण्यापूर्वी एक लहानशी कथा सागितली पाहिजे पूर्वी एकदा ब्रह्मदेव व विष्णु यामध्ये, दोघात मोठा कोण म्हणून तटा लागला. ब्रह्मदेव कमळ फोडून बाहेर निघालेला, व विष्णु तर वडाच्या पानावर यथेच्छ झोप घेणारा, याप्रमाणे उभयताची स्थाने जवळ जवळ सारखीच विशाल असल्यामुळे हा मोठेपणाचा वाद निघाला यात आश्चर्य वाटण्यासारखें काही नाही हा वाद जेव्हा वेदप्रणवादिकास मिटविता येईना तेव्हा तो तोडण्याकरिता महादेवानीं आपला हात आपटून काळभैरव नावाचा प्राणी उत्पन्न केला. त्यानें उभयता वादीप्रतिवादीस अनुक्रमे आपल्या डोक्याचा व पायाचा थाग लावण्यास सागून, जो निर्दिष्ट स्थळीं आधीं जाऊन पोहोचेल तो अधिक मोठा ठरेल असें बजाविलें. ब्रह्मदेवाने मस्तकापर्यंत जाण्याची आपणाकडून पराकाष्ठा करून पाहिली, पण काही केल्या त्याला यश येईना शिवाय त्या वेळीं आगबोटी, विमाने वगैरे साधनें उपलब्ध नसल्यामुळें त्यास मुखविवराच्या आखातातून, नाकाच्या व हनुवटीच्या डोगराळ मुलुखातून आणि दाढीमिशाच्या दाट जगलातून मार्ग काढणे कठीण पडू लागले इतक्यात सदैवाने एक गाय काळभैरवाच्या गालावरील कुरणांत चरताना आढळली हा काळपर्यंत गाईच्या तोंडास असत्य भाषणाचा किंवा दुसऱ्या कोणत्याही अमगळ वस्तूचा विटाळ झाला नव्हता, म्हणून तिची साक्ष विश्वसनीय मानली जाईल असा विचार करून ब्रह्मदेवानी आपण मस्तकापर्यंत जाऊन पोहोचलो अशाबद्दल खोटी साक्ष देण्याविषयीं तिची विनंती केली. गाईनेंही शिंगे हलवून ती मान्य केली. नतर ही सिद्धसाधकाची जोडी परत येऊन आधीं पाठ केलेला मजकूर शपथेवर सागूं लागली. तेव्हा काळभैरवानें रागानें ब्रह्मदेवाचें एक मुख छाटून [ यापूर्वी त्याला पांच मुखे असून ' पंचामुखी परमेश्वर ' या न्यायाने परमेश्वर ही संज्ञा शोभत होती ] तुझ्या ज्ञातीचे म्हणजे ब्राह्मण लोक दारोदार भिक्षा मागू लागतील असा शाप दिला.

पेशव्यांच्या ऐन भरभराटीच्या काळींही ते दिल्लीपतीपाशीं याचना करीत असत, यावरून या गोष्टीस बळकटी येते काळभैरवानें गाईसही असा शाप दिला, की आजपासून तुझें तोंड अपवित्र राहात जाईल.

ही गोष्ट काशीखंडातील आहे. पण तीच इतर ग्रंथांतही थोड्याबहुत फेर-फारासह दिसून येते. उदाहरणार्थ, वरील शाप अनुक्रमें राम व सीता यानीं दिले असें वर्णन रामायणात आहे. दुसऱ्या ग्रंथात विष्णु व ब्रह्मदेव याची सफर काळभैरवाच्या अवयवाची नसून शंकराच्या लिंगाची किंवा पृथ्वी-पर्यटनाची होती असें वर्णन आहे काहीं ग्रंथात गाईने एका ऋषीची पर्णकुटिका कुरतडल्यामुळें तिला हा शाप मिळाला असें वर्णन आहे. काहींत शापाचा संबंध भृगूच्या लत्तेशीं जुळविला आहे तरी पण या सर्व ग्रंथात गाईच्या शापासंबंधाने एकवाक्यता असल्यामुळे नुसत्या तपशिलाच्या भिन्नत्वा-मुळे त्या शापाच्या प्रामाण्याबद्दल बिलकूल शंका मानिता येत नाही. तो कुठे तरी, कोणाकडून तरी, केव्हा तरी व कसा तरी घडून आला खास गाईची व ब्राह्मणाची या बाबतीत जी गट्टी दाखविली आहे ती अजून दोघांनींही कायम ठेविली आहे, हें त्याना भूषणावह आहे गाय व बैल या जोडप्याच्या-पेक्षा सुद्धा गो-ब्राह्मणाची गट्टी जुनी व जिव्हाळ्याची आहे. याच्या मैत्रीसारखी दुसरी कोणाचीही मैत्री दिसून येत नाहीं. काही लोक दुसऱ्याचे स्नेही बनतात ते केवळ द्रव्याच्या किंवा खाण्यापिण्याच्या लोभामुळें, त्यास शाळू-सोबती किंवा पत्तीबारगीर म्हणतात दुसरे काही एकमेकाच्या गळ्यात गळा घालून नेहमीं राहातात, त्याना जीवश्च कंठश्च स्नेही असे नाव आहे परंतु गाय व ब्राह्मण परस्पराचें मलमूत्र खात असल्यामुळे त्याचा स्नेह इतर प्रकाराहून फारच निकट आहे हें स्पष्ट आहे. 'धन्यास्तदंगरजसा मलिनीभवंति' हा दुष्यंताचा उद्गार पुत्रवात्सल्यानें थबथबलेला आहे असें मानण्याची वहिवाट आहे. पण दुसऱ्याच्या मळकटपणामुळें आपले वस्त्र मलिन होऊं देणें याच्या वरची पायरी, प्रिय मित्राचें मलमूत्र खाणें ही आहे.

वरील कथेसंबंधानें एक गोष्ट विशेष लक्ष्यात ठेवण्यासारखी आहे. गाईवर जरी पूर्वी खोट्या प्रतिज्ञेचा आरोप आला होता तरी तिला राजसभेंत अजून बराच मान मिळतो, व अनेक भानगडीच्या फिर्यादींचा निकाल न्यायाधीशाच्या डोक्याऐवजीं गाईच्या शेपटानेंच केलेला दिसून येतो.

या बाह्यात्कारी अमंगळ वाटणाऱ्या प्रचारास आणखीही एक सबळ कारण दाखविता येईल पूर्वी गावसफाई करण्याम कमिट्याची स्थापना झाली नव्हती. तें काम गाई वगैरे गुराकडूनच करून घ्यावे लागे आता इग्रजींत ' लोकानीं तुला जसें वागवावे असें तुला वाटतें तसा तू त्याच्याशीं वागत जा.' अशा अर्थाचें एक नीतिमत्तेचें ठरलेलें तत्त्व आहे शहाणे म्हणून मिरविणाऱ्या इंग्रजाचे हें नीतितत्त्व आमच्या थोरणी पूर्वजाना पूर्णपणे माहीत होते, असें त्याच्या कृतीवरून दिसून येते कारण गाईनीं आपली विष्टा पार करावी अशी त्याना इच्छा होतांच त्यानी गाईची विष्टा पार करण्याचा क्रम चालविला, व त्याचेंच फळ श्रावणीचा मण होय.

पचगव्य जिभेस विशेष खुमारीचे लागते असें नाही असे असूनही बहूताना दर श्रावणीस पचगव्याचे घुटक्यावर घुटके मोठ्या हौसेनें प्राशन करीत असतात त्यांचें तर मत असें आहे, कीं पंचगव्य रंगरूपानें चहा-प्रमाणेंच दिसत असल्यामुळें, व प्रथम थोडेंसें बेचव खरे परतु मागाहून बरेंचसें गोड लागत असल्यामुळें धर्माभिमानी लोकानी ते सकाळी पिण्याचा प्रघात घालावा. पाहूतात्या त्याचें आचमन घेतलेसें दाखवून हातचलाखीने त्यांतील अर्धे अधिक ताम्हनात कोणास नकळत टाकीत असतात. श्रावणीस येण्यात त्याचा डोळा मुख्यत्वें करून सातूच्या पिठावर असतो. मी स्वतःही पचगव्य थोड्या प्रमाणातच घेत असतों. पण याचें कारण त्याची चव हें नसून ते इतराना मुबलक मिळावें अशी इच्छा होय.

श्रावणीच्या वेळीं पळ्यांचा खडखडाट, न्यास, तर्पण, सव्यापसव्य करणे, जानवीं सूर्यास दाखविणें, हीं इतक्या व्यवस्थित रीतीनें चालतात कीं, ब्राह्मणास कवाईत शिकविल्यास त्याची चागली पटाईत पल्टण तयार करितां येईल, अशी खात्री बाळगण्यास हरकत नाही.

यज्ञोपवीताचा एक उपयोग विंचू चावला असेल त्या ठिकाणीं बाधणें हा असून तो माझ्या अगोदर शर्विलकानें मृच्छकटिक नाटकात सागितला आहेच. या शिवाय विहिरीतून पाणी काढणें, गळ्यास फास लावणें वगैरे बऱ्यावाईट कामांसही त्याचा उपयोग केल्यास चालेल. त्याच्या गांठीचा पिशाचास पिटाळून लावण्यांत जो उपयोग होतो, त्याचा मला स्वतःला अनुभव आहे. एके दिवशीं रात्रीं मी दिव्याजवळ वाचीत बसलों असता सहज मागें वळून पाहिलें, तों

एक भली मोठी काळी पिशाचाकृति भिंतीवर पडलेली दिसली. मी जे जे हाताचे चाळे करी ते ते करून ती मला वेडावून दाखवूं लागली. तेव्हां मी तिच्यापुढें जानव्याची गाठ केली पण तिच्यावर दिव्याचा प्रकाश नसल्यामुळें ती पिशाचास दिसेना म्हणून डाव्या हाताने दिवा घेऊन उजव्या हातानें ती गाठ मीं पूर्ववत् समोर धरिली मात्र, तों तत्काल पिशाच अदृश्य झाले !

श्रावणीत मंत्र म्हणताना भिक्षुकाची व आमची जी तारांबळ उडत असते ती कांहीं विचारू नका. भिक्षुक मंत्रातील एक शब्द आमच्याकडून म्हणून होण्यापूर्वींच दुसरा आम्हाला सांगतात, त्यामुळें धड हा न धड तो अशी आमची स्थिति होऊन आपलें अज्ञान दिसू नये म्हणून आम्ही प्रतिध्वनिप्रमाणें शब्दांचीं पहिली अक्षरें तोंडातल्या तोंडात काढून पुढील मात्र स्पष्ट म्हणत असतों. मंत्राच्या अर्थासंबंधाने विचारलें तर त्याचे मर्म उपाध्याला व आम्हाला सारखेंच कळत असतें असे म्हटल्यास चालेल. आता असें अर्थ न समजतां मंत्रपठन करण्यास कोणी नावे ठेवूं लागतील, पण त्यालाही सयुक्तिक कारणें देतां येतील. एक तर, असें मंत्रपठन रोजचे रोज करीत गेल्यानें वेळ कंटाळवाणा वाटत नाही. नुसत्या करमणुकीच्या अभावामुळेच अनेकानीं आजपर्यंत आत्महत्त्या केली आहे. दुसरे असे, कीं मंत्रपठनामुळे दाताचीं मुळें आणि ओठाचे व जिभेचे स्नायु बळकट होतात तिसरें असें, कीं ज्याप्रमाणें जांभयामुळें प्रकृति निकोप राहाते असें काही डॉक्टरांचें मत आहे, त्याप्रमाणें तोंड वरचेवर उघडल्यानें व मिटल्यानेंही राहातें, असें सिद्ध करून देता येईल. चवथें कारण असें, कीं आपलें अर्थविषयक अज्ञान आपणास माहीत असल्यामुळें ते ते मंत्र म्हणतांना आपल्या अंगीं अभिमान मुळींच राहात नाहीं. 'देवा, मी अज्ञान आहें, मजवर दया कर' अशी तोंडानें नुसती बडबड करण्यापेक्षा, आपण प्रत्यक्ष आपलें अज्ञान जर ईश्वराच्या नजरेस आणून देऊं तरच त्याला आपली दया येण्याचा संभव आहे. याशिवाय आणखीहा इतकींच सबळ कारणें मीं दिली असतीं. पण मंत्रपठनाची उपयुक्तता इतकी उघड आहे, कीं तसें करण्याची आवश्यकताही मला दिसत नाहीं, व तसें करण्याइतकी मला फुरसदही नाहीं. सबब येथेंच आटपतें घेतो.

---

मुष्टी [illegible] वी*

# वर्तमानपत्रकर्ता

[illegible] वर्षापूर्वी मी आपल्या गांवी एक मिठाईचें दुकान [illegible]ले, काढण्याचा उद्देश केवळ स्वार्थसाधूपणाचा नसून तरुण पिढीचें लक्ष्य [illegible]धंद्याकडे वळवावे हा होता. त्याचप्रमाणें राष्ट्र अनेक व्यक्तीचें बनलें असून राष्ट्रहित साधण्याकरिता प्रत्येक व्यक्तीनें स्वहितार्थ झटले पाहिजे, [illegible] तत्त्व माझ्या मनावर पक्केपणी [illegible] असल्यामुळें, या धंद्यात होईल तितका पैसा मिळवून स्वहित साधावे व या रीतीने, पर्यायानें [illegible] होईना, स्वदेशहित साधावें हाही माझा [illegible] हेतु होता. दुकान थाटल्यावर कांहीं दिवसपर्यंत फारशी गिऱ्हाइके मिळेनात [illegible] केलेली मिठाई [illegible] खपल्यामुळें मला वाईट वाटले असें कधीच झाले नाही. एक तर, माझा स्वभाव फार समाधानी असे शिवाय लहानपणापासून माझी गोडावर फार भक्ति असल्यामुळें विक्री होऊन उरलेल्या पेढे, बर्फी, बासुंदी ( हे शब्द मी मिटक्या मारीतच लिहित आहें. ) वगैरे माझ्या आवडत्या पदार्थांचा झालेला अनादर मी त्याचा स्वतःच स्वीकार करून [illegible]त असें. गिऱ्हाइकाना शिळा माल विकावयाचा नाहीं असा माझा नेहमींचाच बाणा असल्यामुळें उरलेला माल स्वतः गट्ट करणे हें माझे एक पवित्र कर्तव्य आहे असें मी समजत असें, व या विचारामुळें वरील माल माझ्या घशाखाली उतरण्यास बरीच मदत होत असे. हळूहळू माझ्या दुकानाची विक्री वाढत चालली. ती शेवटीं इतकी वाढली, की पुडे बाधण्यास रद्दी कागद मिळण्याची मारामार पडू लागली. ही जी कागदांची टंचाई पडू लागली, तिच्यामुळेंच वर्तमानपत्र काढण्याचा विचार प्रथमतः माझ्या मनात आला, व तेव्हापासून तो माझ्या मनात सारखा घोळूं लागला. शेवटीं वर्तमानपत्रात मला फारशी प्राप्ति जरी झाली नाही तरी त्यात मला माझ्या मिठाईच्या दुकानाची जाहिरात देता येईल, वर्तमानपत्राचे अंक पुडे बाधण्यास उपयोगी पडतील, व अशा प्रकारें एका कामात दोन कामें साधतील, असा मी विचार केला, व तो अमलातही आणिला.

* वि. विस्तार, पु. ३५ अंक ९ [ सन १९०४ ]

एकंदर धंद्याचा सूक्ष्मपणें विचार केल्यास आपणास त्यापैकीं बरेच जोडधंदे आढळून येतील. येथे ' जोडधंदा ' याचा अर्थ जोड्याचा किंवा चांभाराचा धंदा असा न घेता धंद्याची जोड असा घ्यावयाचा. या जोडीपैकीं प्रत्येकाचें कांहीं साहित्य दुसऱ्याच्या उपयोगी पडत असल्यामुळें दोन्ही धंदे एकानें करणें सोइस्कर असतें. हा अर्थ पूर्णपणें मनात उतरण्याकरिता येथे कांहीं उदाहरणे देतो. ग्रंथकर्त्याचा व पुस्तकविक्रीचा हे जोडधंदे होत. ग्रंथकर्त्यास नवीन पुस्तकें लिहिण्यापूर्वी किताबखान्यातील पुस्तकें वाचता येतात, व किताबखान्यासही ग्रंथकर्त्यांच्या पुस्तकानीं शोभा येते. नाटककर्ता व नाटकमंडळीचा मालक याची जोडीही याच प्रकारची आहे सराफाचा व कुलपें करण्याचा या धंद्याची दुकलही जोडदुकलच म्हणता येईल. पैशाच्या पेट्याना कुलपें लागतात, व कुलपें बनविण्याचें साहित्य खरेदी करण्यास पैसा लागतो. याच प्रकार खाणावळ व दवाखाना याचा खाणावळींत जेवलें म्हणजे दवाखान्यास रोग्याचा पुरवठा होतो, व दवाखान्यात उपचार करून घेण्याकरिता बाहेरगावाहून आलेले रोगी खाणावळीस गिऱ्हाइके मिळतात. रोगी बरा झाल्यावर खाणावळींत जेवून परत आपल्या गावीं जाण्याकरिता निघणार तो त्यास हगवणीनें किंवा अमांशानें गाठलें म्हणून समजावें, व अशा रीतीनें एकदा खाणावळीच्या किंवा दवाखान्याच्या कक्षेत एखादें मनुष्य आलें, की तें दोहोंचें कायमचें गिऱ्हाईक होऊन बसतें. वकिलाचा व दरवडेखोराचा हे धंदेही याच मालिकेंत येतात. वकिलानें दिवसा वकिली चालवावी व रात्रीं दरवडे घालावे. असें केल्याने अहोरात्रींपैकी प्रत्येक क्षणाचा त्याला ईश्वरापाशी हिशेब देता येईल. दरवड्याबद्दल दुसऱ्या कोणास पकडलें तर वकिलास दरवडा पचून ते काम चालविण्यासाठीं फीही मिळते. बरें, तो स्वतःच पकडला गेला तर निराळा वकील करावयास नको, व कुळात भर पडते ती निराळीच ! या ठिकाणीं दरवडेखोराचा हलकट धंदा प्रतिष्ठित धंद्यात सामील झालेला पाहून कित्येक लोकास राग येईल खरा, पण वरील नियम व्यापक करण्याकरिता मला निढळाच्या घामानें व मनगटाच्या जोरावर चालविलेल्या सर्व धंद्यांचा विचार करावा लागला, व दरवड्याच्या धंद्याइतका निढळाच्या घामानें व मनगटाच्या जोरावर चाललेला असा दुसरा कोणताही धंदा आढळणार नाहीं. असो. तर अशांपैकींच वर्तमानपत्रकर्ता व मिठाईवाला ही दुकल आहे.

वर्तमानपत्रात मजकूर कमी पडला म्हणजे तेथें मिठाईच्या दुकानाची जाहिरात द्यावी, व पुढे बांधण्याचे कागद संपले म्हणजे वर्तमानपत्राचे अंक उपयोगांत आणावे. अशा रीतीनें मिठाईच्या गिऱ्हाइकास न कळत त्याच्या हाती नीतिपर लेख पडल्यानें देशहित किती होण्यासारखें आहे, व वर्तमानपत्रातील लेखांचें माधुर्य किती वाढेल, याची सहज कल्पना होईल

मीं काढिलेल्या वर्तमानपत्राचें नावही त्याच्या जोडधद्यास सर्वस्वी शोभण्यासारखे ' नीतिमेवा ' ठेविलें होतें एके दिवशीं ' नीतिमेव्या 'च्या अकात माझ्या दुकानचा मेवा घालून मीं तो पुडा मासल्याकरितां म्हणून रावबहादूर गाजरपारखे याच्याकडे पाठविला त्यानीं मेहरबानीनें पुड्यातील विषय गिळंकृत केल्यानतर ढेंकर देताना ' हा मेवा फार उत्कृष्ट आहे.' असे उद्गार काढीत पुड्याचा कागद माझ्या नोकराच्या हवालीं केला. तेव्हापासून माझ्या वर्तमानपत्राच्या शिफारसपत्रात मी वरील उद्गारांस अग्रस्थान देत आलों आहें, व त्यामुळें माझ्या पत्राचा खपही वाढला आहे. मिठाईच्या दुकानामुळें माझ्या वर्तमानपत्राचा किती फायदा झाला पाहा ! हे तिचे उपकार माझ्या पत्राने दर आठवड्यास किंवा दिवसास एक एक याप्रमाणें हजारों जन्म घेऊन तिची सेवा केली तरी फिटणार नाहींत येथें एवढें सागितलें पाहिजे, कीं पदरीं खोटेपणा येऊ नये म्हणून रावबहादुराच्या वरील शिफारशीचा उल्लेख मी ' आमच्या मेव्यावर अभिप्राय ' अशा संदिग्ध शब्दानीं करीत आलो आहे ज्या पुरुषाना नीतिविषयक पत्रें चालवावीं लागतात त्याच्यावर स्वत नीतिमार्गाने चालण्याची मोठी जबाबदारी असते, हें कोणीही कबूल करील.

' नीतिमेवा ' हे आखूड व मधुर नाव कोणीकडे, आणि अलिकडच्या इतर वर्तमानपत्राची लाबलचक व पांचट नावें कोणीकडे ! काही पत्रें आपल्या शहराच्या किंवा प्राताच्या नावापुढे ' समाचार ' हें भलें मोटें शेंपूट लावून इतस्ततः भ्रमण करीत असतात, पण त्यापैकीं बरीच पत्रे तेथील इत्थंभूत समाचार देण्याऐवजीं आपल्या व्यक्तिविषयक, खोडसाळ व कडक लेखांनीं त्याचा खरपूस समाचार मात्र घेत असतात. एखादें पत्र आपल्या ठिकाणच्या नावापुढें ' वैभव ' हा भव्य शब्द जोडतें. या शब्दामुळे मासी एकदां फार

फसगत झाली. नागपूर येथें राष्ट्रीय सभा भरली होती त्या वर्षी मी 'वर्तमानपत्रकर्ता' या उच्च नात्याने तेथे गेलो होतो नागपूर शहर दृष्टीस पडावे हाही निघतेवेळीं माझा एक उद्देश होता. परंतु कार्यव्यग्रतेमुळे अखेरपर्यंत शहरात फिरण्यास मला सवड मिळाली नाही, व मींहि त्याबद्दल फारशी फिकीर केली नाहीं, कारण 'नागपुरवैभव' पत्राचे कार्यालय पाहिलें म्हणजे सर्व नागपूर पाहिल्याचे श्रेय येईल अशी माझी समजूत होती. निघण्याचे दिवशी सदरहू कार्यालय पाहाण्याकरिता मी तेथे गेलो मात्र, तों पाचच मिनिटात आतील घाण, गैरव्यवस्था, आरडाओरड वगैरेंनी माझे मस्तक फिरून जाऊन त्या पत्राविषयींचें मस्तकातील मतही फिरून गेलें. त्यापूर्वी 'नागपुरवैभव' हा समास मी तत्पुरुष समजत होतो, व 'नागपुरचें वैभव' असा त्याचा विग्रह करीत होतो. पण तेव्हापासून तो बहुव्रीहि समास आहे असे माझ्या लक्षात येऊन 'नागपुर आहे वैभव ज्याचे' अशा रीतीनें तो सोडवू लागलों याशिवाय काही पत्रे लोकानीं वाखाणण्यापूर्वीच आपली तुलना नावाच्या द्वारें सूर्याशी, चंद्राशी, समुद्राशी करितात ती निराळीच !

'पत्रकर्ते'राव या बहुमानवाचक नावाची मला लहानपणापासून फार आवड असे, पण त्या नावाबरोबर पत्रकर्तेरावावर केवढी जबाबदारी येते याचें मात्र मला त्या वेळीं ज्ञान नव्हते. जेव्हा स्वतः तें काम करण्याचा प्रसग आला तेव्हा, छातीवर मोठी थोरली धोंड येऊन पडावी असें मला होऊन गेले. पहिला अग्रलेख लिहिण्याकरिता मी ऐटीनें मिशास पीळ भरीत व चिरूट ओढीत टेबलावर हात टेकून बसलों खरा, पण एक वाक्यही पुरें होईल तर शपथ ! मध्यतरीं, कागदच खराब आहेत, टाकच बरोबर नाही, शाई फिकीच आहे, अशा प्रकारें 'नाचता येईना अगण वाकडे' या न्यायाने मीं नोकर माणसास शिव्याही देऊन पाहिल्या. परतु सारे व्यर्थ ! शिव्या जितक्या सहज रीतीने तोंडास येत तितक्या शीघ्रतेनें भारदस्त शब्द येईनात. एक तास झाला तरी 'दयाळू इंग्रज प्रभूचे राज्य सुरू झाल्यापासून—' या ठराविक शब्दापलीकडे काही सुचेना. शेवटी कपाळावर घर्मबिंदु चमकू लागले, अंगास कंप सुटला, तोंडचें पाणी पळून गेले, डोळ्यात अश्रू आले, अगावरील केस ताठ उभे राहिले, याप्रमाणें काव्यग्रथात वर्णिलेल्या आठही सात्विक भावाचा माझ्या अंगीं उद्भव झाला. व या 'अव्यापारेषु व्यापारां'त

पडलो नसतो तर बरे झाले असते असे वाटू लागले परीक्षेंत एखादा काग
कठिण असला म्हणजे उमेदवाराची जी धादल उडून जाते तिचा अनुभव
परीक्षेस बसण्याची यातायात न पडता, मला आयताच आला. परंतु सव
आलें म्हणजे त्यातून सुटण्याचा उपायही आपोआप सुचतो मी आपव
ऐटदार बैठक मोडून घाईघाईने वाचनालयात गेलो, व तेथें वर्तमानपत्रां
दोनचार फाइले चाळून पाहिलीं. त्यातील बाष्कळ कोटिक्रम, घाणेरडे विच
व गचाळ भाषा पाहून मलाही तितपत लिहिता येईल असे वाटू लाग
फाइले चाळता चाळता 'आर्यभूमि', 'सुवर्णभूमि', 'मायदेश', 'मायभाषा
'मायधर्म', 'सनातन धर्म', 'सात्विक मनोवृत्ति', 'त्वाविदच्चरणारविं
मिलिदायमान', 'आकाशातील बाप', 'टारगे सुधारक', 'रावबहादुरे', 'अेरा
वर्तन', अहपिशाचिका', 'अलोट', 'स्तोम', 'खोडसाळ', 'पायमल्ली', 'हरता
लावणे', 'डोळ्यात धूळ टाकणे', 'सूर देणे', 'री ओढणें', 'गोडवे गाणे
'टिमकी वाजविणे' 'दाडोरा पिटणे' इत्यादि ठरींव शब्दाचे व अपशब्दा
मी टिपण केले त्याच्या साहाय्याने दोनचार रकाने भरण्याचा मीं निश्च
केला, व तो सिद्धीसही गेला पहिल्या अकात मी केशवपनापासून होणा
फायद्याचे विवरण करून त्यात सुधारकाची खूपच हजामत केली होत
त्यामुळें माझ्या पत्राला एकदम बरेचसे वर्गणीदार मिळाले. वर्गणीची रक्कम
सुधारकास दिलेल्या शिव्या याचा जन्यजनकसंबंध याप्रमाणे मला पहिल्या
खेपेस दिसून आल्यामुळे मी आजपर्यंत तोच क्रम अव्याहत चालू ठेवि
आहे, व वेळप्रसग न पाहाता व विषयान्तराचे भय न बाळगता सुधारक
शेलक्या शिव्याची लाखोली मी नेमाने वाहात आलों आहे, यास माझे वाच
साक्षी आहेत! 'शिव्याची लाखोली' या नावाचा 'विष्णुसहस्रनामा'च
धर्तीवर मी लिहिलेला ग्रथ लवकरच प्रसिद्ध होणार आहे. तो होतकरू सपा
कानीं अवश्य वाचून पाहावा त्याजवरून अपशब्दाच्या वाङ्मयाचे माझें अग
ज्ञान त्याच्या नजरेस येईल. या शिव्या सारख्या सारख्या अंतरानी लेख
पेरीत गेल्यास त्यापासून द्रव्याच्या रूपाने बरेंच मोठे पीक निघतें, ही मा
स्वानुभवाची गोष्ट आहे. आजपर्यंत शब्दाचे अनेक कोश झाले आहेत, '
अपशब्दाचा हा पहिलाच कोश आहे.

याखेरीजही वर्तमानपत्रांतील लेखाचें काही उगम असतात, असें अनुभव

माझ्या लक्षात येऊं लागले. यापैकी काही नित्य व इतर नैमित्तिक असतात. राष्ट्रीय सभा, धर्मपरिषद, गणपत्युत्सव, सामाजिक परिषद इत्यादि संस्थाच्या वार्षिक बैठकी ह्या नित्य उगमाखालीं येतात पहिल्या तिहींचे पोवाडे गाण्यात व चवथीची थट्टा करण्यांत वर्षांतून चार महिन्याच्या अंकांची सहज भरती होते. आता राहिले नैमित्तिक उगम. या सदराखाली लढाया, राज्यक्रांति, पार्लमेंटच्या निवडणुकी, मृत्यु, विधवाविवाह इत्यादि येतात. ईश्वरानें साम्राज्यवादी लोकात जें महत्त्वाकांक्षेचे बी पेरले आहे ते आम्हा पत्र-कर्त्यांच्या फार उपयोगी पडते. नुस्तें बोअर युद्धच माझ्या पत्रास सतत तीन वर्षे पुरलें. तिकडें आफ्रिकेंत बदुकाची फेर झडू लागली, की इकडे आमच्या लेखाचीही सरबत्ती सुरू होई. तिकडच्या रक्तपाताच्या बरोबरीनें इकडे आमची शाई खर्च होत असे. तिकडे छापे पडत, त्याप्रमाणे आमच्या-कडेही छापखान्यात पडत असत. तिकडे वेशींस व किल्ल्यास पडलेले भोसकें जसे सैनिक तातडीनें बुजवीत असत, तसे इकडे आम्हीही आपले रकाने भरीत असू. अखेरीस जेंव्हा तह होण्याचे घाटूं लागलें तेंव्हा मात्र आमचा निरुत्साह होऊ लागला. सारखी तीन वर्षे चेबरलेनवर कोरडे ओढल्यावर पुनः सुधारकावर तोंड सोडणें फारच मिळमिळीत वाटू लागलें पण ईश्वरास आमची दया, दुसरे काय ? दक्षिण आफ्रिकेंतील वैमनस्याची थोडी विझावीझ होते न होते तोंच, उत्तर आफ्रिकेंत वेड्या मुल्लानें धिगाणा सुरू केला, व पुढे तर रशिया व जपान यामध्येंही लढाई उपस्थित झाली, त्यामुळें आमच्या जिवात जीव येऊन पुन्हा अन्न पूर्वीप्रमाणें गोड लागू लागलें

एकदा कलकत्त्यास राष्ट्रीय सभेची बैठक भरणार होती. तिचा अध्यक्ष मुंबईचा एक प्रसिद्ध गृहस्थ होणार होता. त्याच्या चिटणिसाचा व माझा दाट परिचय होता त्याच्या द्वारे आपणास अध्यक्षाचे भाषण आयतें लिहिलेलें मिळून तें सर्वांच्या आधी जादापत्रकानें प्रसिद्ध करता येईल तर, आपण तारेनें बातमी मागविली असा लोकांचा समज होऊन आपल्या पत्राची किंमत वाढेल असें मला वाटलें, व मी तावडतोब त्या चिटणिसाजवळ ही गोष्ट काढिली. त्यानेंही मोठ्या आनंदाने त्या भाषणाची नक्कल करून माझ्या स्वाधीन केली बैठकीच्या पहिल्या दिवशीं मी ते भाषण छापून त्याच्या हजारों प्रती काढल्या. भाषणात मधून मधून 'ग्रल्या' 'हंशा' असे शब्द पसरण्याची मीं काळजी

घेतली होती व मथळ्यावर 'आमच्या खास बातमीदाराकडून मुद्दाम तारेने आलेली बातमी' हे शब्दही मोठ्या अक्षरानीं छापिले होते. संध्याकाळी माझ्या दुकानात नेहमीपेक्षांहि ज्यास्ती गर्दी जमली, तेव्हां माझा आनंद गगनात मावेना मी डोळ्यास चष्मा लावून डोकें वर करून प्रत्येकाकडे आपले कृपाकटाक्ष फेकूं लागलों. शेवटीं एकानें मला विचारलें, 'का हो पत्रकर्तेराव, आजच्या जादा पत्रकांत अध्यक्षांचं भाषण आलं आहे तें ताबडतोब मागविण्यास तुम्हांला बराच खर्च आला असेल, नाही?'

मी लगलीच बेपर्वाईचा व कांहींसा अधिकाराचाही आविर्भाव अगीं आणून प्रत्येक शब्दाचा तोल सभाळून व जरासें ठांसून उत्तर दिलें, 'निरपेक्ष देश-सेवेच्या पायीं पैसाच काय, पण प्राणही खर्ची पडला तरी हरकत नाहीं!'

पुनः त्यानें म्हटलें, 'मधून मधून योग्य स्थळीं टाळ्या व हंशाही दिला हे फार चांगलें झालें. मघाशी आम्हीं सर्वजण मिळून ते भाषण ऐकत असतां अगदीं त्याच स्थळी टाळ्या व हंशा उत्पन्न होत होतीं.'

मी म्हटलें, 'भाषण होईल तितके शब्दश देण्याचा व श्रोत्यांच्या मनोवृत्तिही यथातथ्य वर्णावयाचा प्रयत्न केला आहे खरा'

यावर त्याने प्रश्न केला, 'का हो, तुमचा बातमीदार भरपूर माहितीचा मनुष्य दिसतो?'

'माझी मनुष्याची पारख नेहमीं अशीच असते.'

'कधी कधी तर त्याला घडलेल्यापेक्षाही अधिक गोष्टींची माहिती आहे असे उघड दिसतें.'

'ते कसे!'

'काल अध्यक्षाचे भाषण न होताही ज्या अर्थी त्यानें तें सबंध पाठविलें आहे त्याअर्थी त्याची माहिती खरोखरच विलक्षण असली पाहिजे'

प्रथम मला या बोलण्याचा अर्थच कळेना. परंतु 'कालची राष्ट्रीय सभेची बैठक दोन दिवस लांबली आहे.' असें जेव्हा मला कळलें तेव्हां माझ्या फजितीला पारावर नाहीसा झाला, व ज्या टाळ्या व जो हशा मीं सर्व भाषणभर जरा सढळ हातानेंच पेरला होता तो मला प्रत्यक्षच सव्याज अनुभवण्यास मिळाला.

एखादी गोष्ट घडल्याबरोबर तिची तपशीलवार व पद्धतशीर माहिती ताबडतोब वर्तमानपत्रात येते याचे रहस्य हेंच असतें, की त्या माहितीचा लेख ती गोष्ट घडण्याचा कित्येक दिवस पूर्वी सावकाशीने लिहिलेला असतो. हे विधान मृत्युलेखास विशेषेकरून लागू पडते. जो मृत्यु घडल्याबद्दल लेखक आपल्या लेखात सखेदाश्चर्य प्रदर्शित करितो त्या मृत्यूबद्दलचा लेख त्यानें कित्येक वर्षांपूर्वी दारूच्या धुंदीत खरडलेला असतो, आणि मृताच्या प्रकृतीबद्दल धन्वंतऱ्यासही संशय येण्यापूर्वी, व तो आपल्या स्त्रीपुत्रासमवेत आनंदानें नांदत असता, लेखक त्याच्या मृत्यूच्या कारणाची मीमासा करीत असतो, आणि त्याच्या आत्म्यास शाति देण्याबद्दल परमेश्वरास आळवून त्याच्या कुटुंबाचे, पुढें कधी काळी होणाऱ्या हानीबद्दल कळकळीने व उदार बुद्धीनें समाधान करीत असतो!

वृत्तपत्रांस इतर गोष्टींपासून जो पुरवठा होतो त्याबद्दल येथपर्यंत विवेचन झालें. हा साठा संपला म्हणजे उपासमार होत असलेल्या लाडग्याप्रमाणे वृत्तपत्रें एकमेकावरच उदरनिर्वाह करू लागतात, आणि एकमेकाच्या लेखावर मनसोक्त टीका करून व एकमेकास मनमुराद शिव्या देऊन आपल्या अकांची भरती करितात

वर्तमानपत्रातील अग्रलेख व स्फुट लेख लिहिण्यास ज्या अडचणी येतात त्या दूर करण्याचे उपाय वर सागितले. या लेखाची जागा वजा केली म्हणजे बाकी राहिलेल्या जागेचा बराच भाग नोटिशींनीं व जाहिरातींनी व्यापिलेला असतो. या जाहिराती बहुतकरून औषधाच्या असतात यातच ' नारूवर वस्ताद, ' ' हॉलोवेचे मलम, ' ' इसबावर रामबाण औषध ' याचा अंतर्भाव होतो. या औषधानी जखमा कितपत भरून येतात हे सागवत नाहीं, पण पत्र-कर्त्यांच्या पिशव्या मात्र खात्रीनें भरतात. तसेंच नुइल्यमच्या पिक गोळ्यांनी रोग्यांची क्षुधा प्रदीप्त होते कीं नाही हें माहीत नाही, पण संपादकाची क्षुधा मात्र शात होते खरी साहेब लोकात नुइल्यमसाहेब व हिंदू लोकात आंजर्लेकर, बिवलकर, शास्त्रीबुवा या दोघाना मात्र जाहिरातीपासून होणारा खरा फायदा पूर्णपणें कळून चुकला आहे. तथापि या दोघाच्या जाहिरातींमध्येंही महदतर असतें बिवलकर वाचकास आपला अभिप्राय सरळ व स्पष्ट रीतीनें कळवितात पण नुइल्यमसाहेब एखादी गोष्ट

सांगण्याचा बहाणा करून व एखाद्या सुंदर स्त्रीस, रोटीवाल्यास किंवा खाणीं-तल्या मजुरास मध्यस्थी घालून आपला डाव साधतात. रजपुतांची समरां-गणावर उभे राहून लढण्याची पद्धत व मराठ्यांचा गनीमी कावा यांत जितकी तफावत असे, तितकीच या दोघांच्या जाहिरातींत असते. वुइल्यम-साहेबाच्या गोष्टी तर फारच मनोवेधक असतात. मीं जेव्हा त्यांच्या जाहिराती आपल्या पत्रांत देण्यास सुरवात केली तेव्हा कांहींजणानीं माझ्या त्या कृतीबद्दल पत्रद्वारें आपली नाखुषी कळविली, म्हणून मीं त्या जाहिराती बंद केल्या. पण त्या बंद करण्याचाच काय तो अवकाश, लागलींच मजकडे पत्रावर पत्रें येऊं लागली, कीं तुमच्या सबंध पत्रांत त्या जाहिरातीच काय त्या चांगल्या लिहिलेल्या असतात, व त्या बंद कराल तर आम्हीही पत्र बंद करूं. माझ्या अल्पसंतोषी वाचकाच्या मर्जीखातर मीं त्या पूर्ववत् चालू ठेविल्या आहेत

माझ्या पत्रात ज्या औषधाच्या जाहिराती येतात त्यापैकीं कांहींच्या गुणा-संबंधानें मला स्वतःला अनुभव आला आहे. माझ्या छापखान्यातील एका इसमाला सधिवात झाला होता, तो त्यावरील औषधाच्या जाहिरातीवरून रूळ फिरविल्यानेंच बरा झाला तसेंच माझ्या नोकरापैकीं एक कुणब्याचा मुलगा तोतरें बोलत असे, त्याला त्यावरील औषध देऊन पाहिलें, तेव्हा त्याचा तोतरेपणा समूळ गेला; इतकेंच नाहीं, तर तो मराठी भाषा शुद्धही बोलू लागला. कोडावरील मलमाची जाहिरात माझ्या पत्रात ज्या जागीं नेहमीं असते ती जागा दर आठवड्यास कमी कमी पाढरी होत चालली आहे; आणि रक्तपितीवरील औषध एका महारोग्यास देऊन पाहिलें तेव्हापासून त्याचा रोग समूळ नाहींसा झाला आहे, कारण तें रामबाण औषध पोटांत जाण्याला व त्याचा प्राण बाहेर येण्याला एकच गाठ पडली !

माझ्या पत्रातील वर्तमानसार जितके मनोरंजक करवेल तितके करण्याकडे माझा कल आहे. यामुळें माझे वाचक मजवर फार खूष असतात. वाचकास रजविण्याकरिता वेळेस मला पदरचें तिखटमीठ जरी लावावें लागलें तरी त्या पदरमोडीला माझी एका पायावर तयारी असते. यामुळें माझ्या पत्राचें फाइल चाळल्यास खालीलप्रमाणें माहिती जागोजाग सांपडेल:—

'अमेरिकेंत क्युमेल्स या गावीं एका बाईस एक तीन तोंडाचे मूल झाले. त्याच्या सर्वांगावर केंस असून एका तोंडावर कपाळाच्या मधोमध शेंपटी होती. मूल एक तासभर जिवंत होतें रावणाच्या अस्तित्वाविषयी संशय बाळगणाऱ्या सुधारकांचें तोंड या तितोंडी प्राण्यानें बंदच केलें म्हणावयाचें !'

'भोळेगाव येथील प्रसिद्ध देवालयांतील मारुतीस रामनवमीचे दिवशी दरदरून घाम सुटला. हें दुश्चिन्ह आहे असा ज्ञात्याचा अभिप्राय आहे. हा चमत्कार पाहाण्यास खूप गर्दी जमली होती. प्रत्येकापासून एक एक पैसा घेऊन आंत सोडण्यात येई. ही रक्कम जमता जमता शभर रुपयावर गेली आहे. मारुतीच्या निढळाच्या घामाच्या या रकमेचा विनियोग संकटनिवारणार्थ ब्राह्मणसंतर्पण करण्यात होणार आहे. धर्मद्वेष्ट्याचें इकडे लक्ष जाईल काय ?'

'लंबेडो येथें एक धरणीकंपाचा धक्का बसला त्यामुळें जमिनीला जी एक मोठी भेग पडली तिच्यांतून शेषाचें मस्तक दिसत होतें. शेषाच्या मस्तकावरील मण्यामुळें त्या भेगेंत चोंहोंकडे प्रकाशच झाला होता. याउप्पर आपलीं पुराणें खोटीं असें म्हणण्याचें धाडस कोण करील ?'

वरील गावें केवळ कपोलकल्पित आहेत, हें धूर्त वाचकांनीं ताडलेंच असेल. श्रीकृष्णाच्या मुखविवरात अर्जुनास जे चमत्कार दिसले त्या मासल्याचे माझ्याही कपोलांतील चमत्कार मी वाचकापुढें माडीत असतों.

एकदां एका सन्मान्य मासिकाचें अनुकरण करून मीं 'वर्तमानसार' या शब्दाबद्दल 'सारसंग्रह' हा शब्द योजावयास सुरवात केली. पण लवकरच माझ्या एका वात्रट वाचकानें त्या शब्दाच्या मागें 'अति' व पुढें 'णी' जोडून आणि त्याच्याच लगत 'मोर नाचू लागलेला पाहून लांडोर नाचूं लागली' हें वाक्य लिहून माझा अंक मजकडे परत केला. तेव्हांपासून मीं त्या शब्दाचा त्याग केला आहे.

एखादा मोठा मनुष्य मरण पावला म्हणजे मी त्याच्या सन्मानार्थ मोठ्या आनंदानें—आनंदानें कसचें ! दुःखानें—एक अक बंद ठेवीत असतों. महाराणीसाहेबाच्या मरणप्रसंगीं तर मी एक महिनाभर अंक बंद ठेवण्यास तयार झालों होतों. पण वाचकांपुढें इलाज चालेना.

मध्यंतरीं एक मासिक पुस्तक काढण्याचाही माझा विचार होता. पण मासिक पुस्तक बगीच्याप्रमाणें असून वर्तमानपत्र हें शेताप्रमाणें असतें;

म्हणजे मासिक पुस्तक अधिक सुंदर, व्यवस्थित व टिकाऊ असलें तरी त्याला आद्यापेक्षां खर्चच अधिक लागतो, आणि वर्तमानपत्र जरी तात्पुरत्या महत्त्वाचें असलें तरी तें उत्पन्नाला बरें असतें. शिवाय मासिक पुस्तक काढलें म्हणजे त्याबरोबरच अनियमित होण्याची जबाबदारी संपादकाच्या माथीं येऊन पडते. ज्याप्रमाणें राजास छप्परपलंगावरून उशिरानेंच निजून उठावें लागतें त्याप्रमाणें मासिकासही ग्राहकाच्या हातीं महिन्याच्या महिन्यास पडून उपयोग नाहीं. काही मासिकें तर, इतर सृष्टि दिवाळीच्या उत्सवात मग्न असता शिमग्याचा सण साजरा करीत असतात, व अवर्षणानंतरच्या पुढील सालीं पीक येऊन सुबत्ता झाल्यावरही दुष्काळाच्या विवंचनेत चूर राहून दुष्काळी कामाची व्यवस्था कशी असावी याची मुद्देसूद वाटाघाट करीत असतात. हा सर्व विचार करून मीं मासिक पुस्तक काढण्याचा आपला विचार रहित केला.

पत्रकर्त्याच्या स्थानाला लोकात बराच मान असतो हा या धंद्याचा एक मोठा फायदा आहे. त्याला वाटेल त्या सभेस जाण्याची पूर्ण मोकळीक असते. त्याच्याकरिता राष्ट्रीय सभेसारख्या परिषदात मुद्दाम निराळें आसन राखून ठेविलें असतें. शिवाय त्याला वाटेल त्या पुरुषास वाटेल तेव्हा उपदेश करिता येतो. एकदा तर मीं खुद्द बिस्मार्कसाहेबांस राज्य कसें हाकावें याचा उपदेश केला होता; व दुसऱ्या प्रसंगीं मॉर्लेसाहेबास ग्रंथरचनेच्या कामीं सूचना करून थोडेसे प्रोत्साहनही दिलें होतें. गावात नाटकमंडळी आली म्हणजे तिच्याकडून आम्हास दर नाटकास एकदोन पास ठरलेले असतातच. जर नाही आले तर आम्ही लागलीच मंडळीवर टीका करून तिला ' दे माय धरणी ठाय ' करून सोडतों ग्रंथकर्त्यांनीं नवीन पुस्तकें प्रसिद्ध केलीं म्हणजे आम्हाकडे त्यानीं एकएक प्रत पाठविलीच पाहिजे नाहीं पाठविली, तर आम्ही चाबूक ओढओढून मारे त्याच्या पाठींची सालडीं काढितों आमचा सर्वांत मोठा अधिकार म्हटला म्हणजे आम्ही आत्मनिर्देश एकवचनांत न करितां अनेकवचनांत करितों.

अजून माझ्या पत्राचा खप असावा तितका समाधानकारक नाहीं. वर निर्दिष्ट केलेल्या उपायाशिवाय लोकप्रियतेचा आणखी एक उपाय राहिला आहे, व त्याची प्रचीती मी लवकरच पाहाणारही आहें. तो उपाय कारागृह-वास हा होय. मला अशी विश्वसनीय माहिती मिळाली आहे, कीं संपादकाच्या

प्रत्येक बंदिवासास वर्गणीदाराची सख्या पाच हजारानीं तरी वाढते अलीकडे कांहीं लोकमान्य पुरुष कैदेंत गेल्यापासून कैदेचा दोषही कमी झाला आहे. आजपर्यंत मी कैदेंत जाण्याकरिता दोनतीन वेळा संभावित लोकाची अब्रू तिखटमीठ लावून चव्हाट्यावर आणली, पण व्यर्थ ! त्यांनी मजवर अब्रु-नुकसानीची फिर्याद आणिली नाही, व माझ्या हातापायाचा कंडू शृङ्खलानीं शमावयाचा तसाच राहिला. आता यापुढची पायरी म्हणजे चोरी होय, व तिच्यात मला हटकून यश येणार असें माझ्या होऱ्यात येत आहे जर चोरी पचली तर डबोलें हाती येऊन मी जन्माचा सुखी होईन, जर उघडकीला येऊन खटला झाला तर कैदेंत जावें लागून वर्गणीदार वाढतील ! याप्रमाणें एकीकडे सुखातिशयाचा आड तर दुसरीकडे विहीर असें होऊन मी त्यामध्यें मनांतल्या मनात आनदाच्या गटंगळ्या खात आहें.

---

मुष्टि १२ वी *

## मुंबईचा दीपोत्सव

१९०३ सालच्या जानेवारी महिन्यात दिल्ली येथें राज्यारोहणानिमित्त मोठा समारभ होणार असें आधीं बरेच दिवस प्रसिद्ध झाले होतें समारभ मोठा प्रेक्षणीय होईल याबद्दल मला शका नव्हतीच. पण तो कोणाला ? वाटेल तेतका पैसा खर्च करण्याची हिंमत असेल त्याला, माझ्यासारख्या सामान्य मनुष्याला नव्हे. मी जर वेडेपणानें दिल्लीस गेलों असतों, तर राजेसाहेबांच्या राज्यारोहणाचा व माझ्या स्वतःच्या अधःपतनाचा असे दोन्ही समारंभ मला बरोबरच पाहावे लागले असते. शिवाय जेथे माझ्यासारख्या असख्य तमास गेराचा जमाव जमावयाचा तेथें गर्दीत चिरडून जाण्याला कितीसा उशीर लागला असता ? अशा रीतीनें राज्यारोहणाबरोबर आपलेंही स्वर्गारोहण उरकून घ्यावें अशी राज्यनिष्ठेशीं विरुद्ध असणारी कल्पना साहजिकच मला शिवली नाहीं. ज्या समारंभांत सबंध आगगाड्या नापत्ता होत, तेथें बिचाऱ्या सुदाम्याचा काय पाड लागणार होता ?

---

* वि. विस्तार प. ३५. अंक ११ [ सन १९०४ ]

सुदैवानें दिल्लीच्या खालोखाल मुबईसही मोठा समारंभ होणार होता. मुबईपासून माझें गाव जवळ—म्हणजे लोहमार्गानें सुमारें १००—१५० मैलावर होतें मुंबईस माझे बाळमित्र रावसाहेब कृष्णाजीपंत चक्रपाणि हे प्रसिद्ध वकील होते. त्यांच्या येथे गेल्यावर समारभ पाहाण्याची काहीं चिंता करावयास नको ही माझी खात्री होती. याप्रमाणें पाचसात रुपयात प्रेक्षणीय समारंभ पाहांण्याची सधि आली असता ती दवडण्याइतका मी खास वेडा नव्हतों.

रावसाहेब माझे जिवश्चकंठश्च स्नेही असून त्याचें मजवर खरोखरच फार प्रेम असे. याचें कारण असें कीं, वर्गांत त्याचा पहिला नबर असून माझा शेवटचा असे, यामुळें ते व मी नेहमी समोरासमोर असू जी वस्तु सदा आपल्यासमोर असते तिजबद्दल आपल्या मनात एक प्रकारचा पक्षपात उत्पन्न होतो हे अनुभवसिद्ध आहे. म्हणून रावसाहेबास मजबद्दल प्रेम वाटावें यात नवल वाटण्यासारखें काहीं नाही. अद्वितीय पुरुषामध्यें नेहमीं एकमेकाबद्दल सहानुभूति असते, व रावसाहेब ज्याप्रमाणे कोणासही पहिला नबर पटकावूं देत नसत, त्याप्रमाणें शेवटचा नबर मीही सहसा कोणाच्या हातीं लागूं देत नसें, व या दृष्टीनें आम्ही दोघेही सारखेच अद्वितीय होतों.

मीं निघण्याचे दिवशीं बरोबर जरूरीस लागणारे थोडे जिन्नस घेतले. त्यांत एक, मळकटच का होईना पण नागपुरी रेशीमकाठी उपरणे होतें, व दुसरें पगडबंदाकडून नुक्तेंच बाधवून आणिलेले सुरेखसें पागोटें होतें. रावसाहेबासारख्या श्रीमान् पुरुषाकडे जावयाचे, तेव्हा ही सामुग्री आवश्यकच होती. त्याशिवाय काहीं फराळाचेंही बरोबर घेतलें होतें. प्रवास कितीही जवळचा असला तरी दशम्या व पिठले बरोबर घेण्याचा माझा नियम असे, व गाडींतल्या गाडीत सोंवळें नेसून त्याचे सेवनही मी शुचिर्भूतपणें करीत असें.

स्टेशनावर दोन घटे पूर्वी जाऊन पोहोंचलो. इंग्रजी ऐटीनें अगदी आयत्या वेळेस येऊन लगबगीने गाडीत चढण्यापेक्षा बराच वेळ आधीं आरामानें येऊन तिची वाट पाहात बसणें मी नेहमी पसंत करितों. त्यामुळें जरा थांबावें लागतें खरें; पण गाडी हटकून सापडते. कधीं कधीं तर मी गाडी येण्यापूर्वी सहा सहा आठ आठ घंटे स्टेशनावर तिष्ठत बसलों आहें. इतका वेळ गाडीची वाट पाहण्याने जो शीण येई त्याचा गाडीच्या धक्क्यावर टिवल्याबावल्या करीत फिरण्यानें परिहार होत असे.

या प्रसंगी गावोगावची बहुतेक मंडळी दिल्लीदरबाराला जाणार, म्हणून मुंबईच्या समारंभास जाणारा विरळाच सापडावयाचा, अशी माझी वेडी समजूत होती मुंबईला जाण्याची शक्कल ही माझ्याच डोक्यातलि 'पेटंट' आहे असे समजून मीं तिचा कोणालाही पत्ता लागू दिला नव्हता, व निघताना भलत्याच गांवाचें नाव सांगितले होतें. माझ्या गावाहून मुबईस जाणारा मी एकटाच होतो, यामुळे माझ्या समजुतीला बळकटी आली होती म्हणून मीं आपलें पागोटें एका कानावर कलतें ठेवून व उपरणें खांद्यावर टाकून जोडा फटफट वाजवीत स्टेशनावर इकडून तिकडे फेऱ्या घालीत होतों व 'तुम्ही कोठे जाणार ?' असा कोणी प्रश्न विचारिल्यास त्याच्याकडे वाकड्या डोळ्यानें पाहात त्याला 'बॉम्बे' असें इंग्रजीत ठासून उत्तर देत होतों. परतु गाडीची वेळ जसजशी जवळ येत चालली, तसतसे स्टेशनावर तांग्यावर तागे धडकूं लागले, व त्यामधून मजपेक्षा अनेकपटीने सुंदर पोषाख केलेले लोक उतरूं लागले. काहीं वेळानें सगळे स्टेशन माणसानीं गजबजून गेलें. थोड्या वेळापूर्वी जो मी ताठ्याने मिरवत होतो तो भ्यालेल्या सशाप्रमाणे एका कोपऱ्यात डोकें खुपसून बसलों. पुढे लवकरच गाडी येऊन दाखल झाली, व तीत उतारूंची चढण्याची एकच धादल उडून गेली. त्यात मीही चढावयास पाहू लागलों; पण कोठेही जागा सापडेना. दर डब्यात माणसाच्या लडींवर लडी खेंचून भरलेल्या होत्या मुगीला सुद्धा तेथें रिघाव नव्हता जिकडे तिकडे आतील उतारूकडून 'आमच्या डोक्यावर बसता कीं काय ?' असा ठराविक प्रश्न येई. खरोखर त्या वेळीं जर मला कोणीं डोक्यावर बसू दिलें असतें, तर मीं त्याच्या पायीं लोळण घेतली असती पण बसणाऱ्या व बसलेल्या उतारूंच्या नीतिमत्तेत जमीनअस्मानाचें अतर असते जो उतारू चढताना वसुधैवकुटुंबकवृत्तीवर व्याख्यान झोडीत असतो, तोच आत प्रविष्ट होऊन ऐसपैस पाय पसरल्यावर कायदेशीर बनतो. सरते शेवटी सर्व मंडळी गाडींत बसून मी व एक लठ्ठ मारवाडी मात्र बसावयाचें राहिलों. गार्डानें प्रत्येक डब्यात जाऊन पाहिलें, तेव्हां एका डब्यांत एका उतारूस मात्र उभें रहाण्यापुरती जागा आहे असें त्याला दिसून आलें. आता ही जागा आम्हा दोघांपैकीं कोणास मिळावयाची याबद्दल फारसा वाद होण्याचें कारण नव्हतें. म्हणून गार्डानें मला त्या जागीं उभें करून व जोरानें दरवाजा लावून घेऊन शिटी

फुंकली. उभें रहाण्यापुरती का होईना, अशा रीतीने जागा मिळाल्यावर मी त्या मारवाड्याकडे उपहासानें पाहूं लागलों. तो जेव्हा आपणास आत घेण्याबद्दल काकुळतीस येऊन हातींपायीं पडूं लागला, तेव्हा एक क्षणापूर्वी मी त्याशी समदुःखी होतों हे विसरून जाऊन मी अमर्याद रीतीनें हंसूं लागलो. त्या हंसण्याच्या उकळींत माझ्या डोक्याचें पागोटें खालीं पडून त्याचा चेंदामेंदा झाला, तेव्हा मात्र माझें हसे जागचे जागी जिरून गेले. इतक्यात गाडीही चालू झाली. मीं मोठ्या कष्टानें आपले पागोटे शोधून काढून डोक्यावर ठेविले. पण तें चेंगरून गेल्यामुळें त्याचें स्वरूप पूर्वीपेक्षा इतकें बदललें होतें, की मी ते डोक्यावर ठेवताच सर्व डब्यात एकच हंशा पिकला. म्हणून ते बगलेंत मारून मी तसाच बोडका उभा राहिलों.

एखादा उतारू मधील स्टेशनावर उतरून मला बसण्याइतकी जागा देईल, अशी गाडीत शिरल्यानतर बराच वेळ मला आशा वाटत होती. पण माझ्या डब्यातील सर्व मडळी मुंबईसच जाणार आहे असें चौकशीअंतीं कळताच तीही आशा मावळून गेली. शेवटपर्यंत डब्यात उभें राहण्याखेरीज इलाज नव्हता एक दोनघंटे याप्रमाणें उभें राहिल्यावर मला फारच थकवा आला, व थोडेंसे फराळाचें खाऊन घोटभर पाणी पिण्याची इच्छा झाली. पण फराळाचें पडले खालीं, व मी तर ताडाच्या झाडासारखा ताठ उभा राहिलेला ! हाताची व तोंडाची गाठ पडण्याचीही मारामार ! तेव्हां फराळाचा, हाताचा व तोंडाचा सयोग घडून फराळ होण्याचा काहीं सभव नव्हता सभव असता तरी आगगाडीत सुद्धा सोंवळे नेसून फराळ करण्याचा माझा हा वेळपर्यत जो परिपाठ चालत आलेला होता तो मोडावयाची पाळी येती. कारण भोंवतालचे उतारू मुसलमान, किरिस्ताव वगैरे जातीचे असून त्यांमध्यें औषधालाही जानवें मिळण्याजोगे नव्हते, व त्यांनीं स्वप्नातही गायत्री म्हटली नव्हती. गायत्रीचा जो काहीं वास त्याच्या जिव्हाग्री होता, तो आम्हां ब्राह्मणाच्याहून अगदीं निराळ्या अर्थाचा होता.

आमचें निघण्याचें स्टेशन व मुंबई यांमधील अंतर हळूहळू कमी होऊं लागलें. प्रत्येक स्टेशनावर येऊन मिळणाऱ्या नव्या नव्या उतारूंकरितां आमच्या गाडीस नवे नवे डबे जोडावे लागले. सरते शेवटीं या अग्निरथरूप मनुष्यमय पोळ्यानें एकदांची मुंबई गांठली. गाडी थाबल्याबरोबर एखाद्या

मोठ्या बाजाराचा जसा गोगाट व्हावा, त्याप्रमाणें उतारूंच्या उतरण्यामुळें होऊं लागला. मीं आगाऊ रावसाहेबास पत्र पाठविलें होतें, त्यामुळें त्यानी मजकरिता स्टेशनवर एक इसम पाठविला होता. त्याच्याबरोबर आमची स्वारी गाडींत बसून रावसाहेबाच्या बंगल्यावर गेली. रावसाहेब दाराशींच उभे होते. प्रथम त्यानीं माझ्या माभळभटी पागोट्यामुळें मला ओळखले नाहीं. पण मी जवळ जातांच त्याना ओळख पटली, व नमस्कारचमत्कार होऊन उभय पक्षांकडून कुशल प्रश्न विचारण्यात आले. उद्या सार्वजनिक दीपोत्सव होईल व परवा दारूकाम सुटेल, असें त्याच्या सागण्यांत आलें तें ऐकून मला अतोनात उत्कंठा उत्पन्न झाली. दोनप्रहरीं जेवणें आटोपल्यावर मीं चारपांच घटका वामकुक्षी केली. उठून पाहातों, तों माझं सर्वांग ठणकत आहे, व पायात मोठमोठे गोळे येत आहेत! हे गोळे म्हणजे माझ्या अभिरथरोहणाप्रीत्यर्थ सुटणारें दारूकामच आहे अशी कल्पना येऊन तशा अस्वस्थ स्थितींतही मला हंसू लोटलें. संध्याकाळीं रावसाहेबाबरोबर रबरी धावाच्या गाडींतून फिरावयास गेलों जाताना माझें आगगाडींतलेंच पागोटें उलट फिरवून घातलें होतें, त्यामुळें मी मुंबईच्या एखाद्या गुजराथ्यासारखा दिसत होतो. रावसाहेबाना माझा विनोदी स्वभाव पाहून बरेंच कौतुक वाटलेंसें दिसलें असो, अशा रीतीने रावसाहेबांना मिळणाऱ्या नमस्कारांचा व सलामांचा स्वीकार करीत मी त्यासह दिवे लागण्याचे सुमारास बंगल्यावर परत आलो.

अखेरीस दीपोत्सवाचा दिवस एकदाचा उगवला. त्या दिवशीं सकाळपासून आमचे बंगल्यांत मोठी गडबड सुरू झाली. घरातील वरकड मंडळीकरिता एक ट्रॅमगाडी मुद्दाम भाड्यानें ठरवावयाची होती. खुद्द रावसाहेब व मी त्याच्या घोड्याच्या गाडींतून उत्सव पाहाण्यास जाणार होतों आज कोणकोणत्या इमारतीवर दिव्याचा आरास विशेष होणार याबद्दल घरातील मंडळीमध्यें चर्चा सुरू झाली, व लहान मुलेंबाळें आनंदानें एकसारखीं नाचूंबागडूं लागलीं. मी रावसाहेबाबरोबर जाणार असल्यामुळें मला इतरापेक्षा विशेष मौज पाहावयास सांपडेल असें वाटून त्या मानानें माझा आनंदही इतराच्यापेक्षा अधिकच होता. पण माझ्या आनंदाचा इतरांस यत्किंचित् हेवा वाटत असल्याचें चिन्ह दिसेना रावसाहेबाची कुटुंबीय मंडळी त्यांच्यासारखी सुशील असल्यामुळेंच त्याना माझ्या सुखाचा हेवा वाटत नाहीं, असें मनाचें समाधान करून मीं त्यांच्या समाधानवृत्तीचें कौतुकच करीत राहिलों.

सध्याकाळी फराळ करण्याबद्दल मला रावसाहेबानी आग्रह केला; पण मी परत आल्यावर जेवीन असें माझें म्हणणें पडल्यावरून त्यांनीं आपला आग्रह सोडिला बरोबर साडेसात वाजता आम्ही सर्व पोषाख करून तयार झालों, व बायकामुलें, नोकरचाकर, झाडून सगळी मंडळी ग्रँटरोड टर्मिनसजवळ आठाचा ठेका पडतो तोच दाखल झालों आमची ट्रॅम आठ वाजून पांच मिनिटांनी निघणार होती व आमची मार्गप्रतीक्षा करीत रुळावर उभीच होती. ही ट्रॅम मुद्दाम राखलेली आहे व सार्वजनिक ट्रॅमगाड्या आज सुटणार नाहीत हें माहीत नसल्यामुळें पुष्कळ मुसलमान व पारशी लोक, कंडक्टर मना करीत असताही, तिजमध्यें चढून सुखवस्तुपणें वसाहत करून बसले होते आम्ही जाऊन पोहोंचताच त्यानी चडफडत ती रिकामी केली. तींत आमची सर्व मडळी जाऊन बसली व थोड्याच वेळात तिनें मार्ग क्रमण्यास आरंभही केला. त्याबरोबर आतील बालमंडळीनें मोठा जयघोष केला.

ट्रॅम दिसेनाशी होईपर्यंत रावसाहेब सारखे तिजकडे टक लावून पाहात उभे होते. ती दृष्टिआड झाल्यावर जवळच आमची व्हिक्टोरिया गाडी होती तिजमध्यें त्यानीं मजसमवेत प्रवेश केला, व लागलीच गाडी चालू झाली. चाकास रबरी धावा असल्यामुळें आम्हाला एवढासुद्धा धक्का बसत नव्हता; व आम्ही जलमार्गानें नौकेंतून किंवा अतरीक्षात विमानांतून प्रवास करीत आहोंत कीं काय असा भास होत होता. मध्यतरीं इतर गाड्याची गर्दी झाली असतांही त्यामधून आमचा गाडीवान चातुर्यानें वाट काढी. ज्या ट्रॅमगाडींत आमची मडळी निघाली होती तीही आम्हाला लवकरच वाटेंत भेटली; तेव्हा त्याच्या वाहनाच्या मंदगतीबद्दल मला त्याची फार कींव आली. ती ट्रॅम टाकूनही आमची व्हिक्टोरिया, आपल्या पुत्राचा राज्योत्सव पाहाण्याकरितांच की काय, वायुवेगानें पुढें चालू झाली.

या वेळीं मुंबई शहराने अपूर्व शोभा धारण केली होती. या शहराचा रोजचाच थाट इतर शहरांतील दिवाळीपेक्षांही भव्य असतो. मग प्रस्तुत-सारख्या विशेष प्रसंगीं तो अवर्णनीय असेल यांत नवल ते काय ? मोठमोठ्या हवेल्यांनीं दीपावलींच्या मिषानें सर्वांगावर पुष्पमाला धारण केल्या होत्या; दिव्यांच्या चकचकाटानें सर्व रस्ता, मध्यान्हींच्या सूर्यतेजामुळे नेत्रांना असह्य वाटणाऱ्या महानदीप्रमाणें शोभत होता. खिडक्यातून पुष्पहार लोंबत असून

त्याच्या सुवासानें व खिडक्याच्या आतून येणाऱ्या सुस्वर आलापांनीं चित्तवृत्ति तल्लीन होत होत्या रस्त्यानें दोन्ही बाजूस अठरापगड जातींचे लोक सुंदर पोषाख करून सभ्यपणाने व व्यवस्थित रीतीनें चालले होते. मोठ्या शहरातील लोकांच्या मुद्रावर साधारणपणें एक प्रकारचा सौम्यपणा व गभीरपणा दिसून येतो. तो बहुतकरून भोवताली पसरलेला अफाट जनसमुद्र व मनुष्याच्या बुद्धिमत्तेमुळें आजपर्यंत लागलेले व पदोपदीं दृग्गोचर होणारे अचाट शोध याच्या ससर्गाचा परिणाम असावा तशाच तऱ्हेचा भारदस्तपणा ज्या ज्या स्थळीं अनुपम सृष्टिवैभव दिसून येते तेथील रहिवाश्यातही दिसून येतो. प्रत्येक प्रकारात निसर्ग व कला या दोहोंतून कोणत्या तरी एकाच्या प्रचंडते-खाली मनुष्याचें मन दडपून गेलेलें आढळतें.

मुंबईच्या सामान्य भागात जर इतकी शोभा तर कोटात काय प्रकार असेल? तेथें तर सर्व इमारतींस आग लागल्यासारखी दिसत असेल! असा माझ्या मनांत विचार येऊन त्याविषयी फार कुतूहल उत्पन्न झालें. त्या दिवशी कोटात फार मजा उडणार असे मी ऐकिलें होतें त्यामुळें बोरीबदर, म्युनिसिपल ऑफिस, सेलर्स होम वगैरे इमारती केव्हा येतात इकडे माझें सर्व लक्ष गुंतून राहिलें

पण कोटाकडे जाण्याऐवजी आमच्या गाडीनें नीट भायखळ्याकडे आपला रोख वळविला, व गर्दी कमी होत चालल्यामुळें ती पूर्वीपेक्षांही अधिक वेगानें चालूं लागली पहिल्यानें मला वाटलें, कीं गाडीवान रस्ता चुकला आहे, व त्याप्रमाणें मी त्याला सुचविलेंही. पण त्यानें माझ्या सूचनेस हंसण्यापलीकडे उत्तर दिलें नाही. मला या कोड्याचा कांहींच उलगडा होईना कांहीं वेळानें आम्ही बाटलीवाल्याच्या इस्पितळाजवळील रस्त्यास मिळालों, तेव्हां त्या रस्त्यात इस्पितळाकडच्या बाजूस गाड्याची रागच राग लागलेली दिसली. त्या गाड्यांची तोंडें जिकडे होतीं त्याच्या अगदीं विरुद्ध दिशेला म्हणजे भायखळा स्टेशनाकडे आमच्या गाडीवानानें मोर्चा फिरविला. हें गौडबंगाल काय आहे हें कळण्याची इच्छा आतां माझ्या पोटांत मावेनाशी होऊन मीं रावसाहेबांस त्याचें स्पष्टीकरण विचारिलें. तेव्हां त्याच्या सांगण्यांत आलें, कीं ' ही समोरची गाड्याची राग परेळपासून तो तहत कुलाब्यापर्यंत पसरली आहे. या भागांतील गाड्यांनीं या रागेंत मिळूनच गेलें पाहिजे. मधून गाडी

काढूं म्हटले तर चालणार नाहीं आपली गाडी या वेळीं या रांगेतील शेवटच्या गाडीस मिळण्याकरिता जात आहे.'

मीं घाबरून विचारले, 'तर मग आपण या रस्त्याच्या डाव्या बाजूनें जितकें लाब जाऊं तितक्या लांबीचा पल्ला आपणास पुन्हा उजवीकडून घेतला पाहिजे ?'

रावसाहेबानी होय म्हणून मान हालविली आमचें हें बोलणे संपतें तोच आमच्या गाडीने सदरहू रांगेतील शेवटची गाडी गाठली व लागलीच तेथें मुक्काम केला

ही गाड्याची रांग म्हणजे मुबई शहराने आपल्या गळ्यात घातलेली इद्रनीलमण्याची एक विस्तीर्ण मालाच दिसत होती, व या मालेमध्यें त्याच्या रथ्यारूप असख्य हस्तकाकडून क्षणोक्षणी नवीन रथरूप रत्नें ओंविलीं जात होतीं. एकाहून एक सरस अशा गाड्यांची एवढी मोठी रांग मीं साऱ्या जन्मात पाहिली नव्हती गाड्याच्या कंदिलाचे एक निराळेच चिरागण रस्त्याच्या किनारीस झालें होतें. या गाड्यांमध्यें मुंबईतील सर्व संपत्ती, वैभव, विद्या, सौंदर्य ही गोळा झाली होतीं असें म्हणण्यास हरकत नाहीं.

लवकरच आमच्या मागेही शेंकडों गाड्या एकीमागून एक येऊन उभ्या राहिल्या. रस्त्याच्या दुतर्फा उभ्या असलेल्या गाड्या रहाटगाडग्याच्या अधोमुख व उन्मुख पोहऱ्याप्रमाणें दिसूं लागल्या गाड्यात बसलेल्या लोकात अपूर्व वैचित्र्य दिसत होतें एका गाडींत पिळदार मराठेशाही पगडी घातलेला संस्थानिक होता, तर दुसऱ्या गाडींत एक लठ्ठ भाट्या आपल्या मुलांबाळासह पेंगत होता. तिसरीत रोळीच्या किंवा महादेवाच्या पिंडीच्या आकाराच्या टोप्या घातलेले पारशी लोक आपल्या स्त्रियासमवेत गप्पा छाटीत होते. चवथींत ताम्हनपंचपात्रीच्या नमुन्याच्या टोप्या घातलेले सिंधी लोक गंभीरपणें विराजमान झाले होते पाचवींत एखादा साहेब व त्याची मड्डम तटस्थ वृत्तीनें अवलोकन करीत बसली होती. सहावींत अमेरिकन मिशनचे पाद्री लांब झगे घालून दाढ्यावरून हात फिरवीत अधिष्ठित झाले होते सातवींत एखादी बुरखा घेतलेली मिसरी स्त्री आपला चेहरा कोणासही न दाखवितां इतरांचे चेहरे अवगुंठनुरूप तटाच्या आडून सूक्ष्मपणें न्याहाळीत पतिसमागमें मुकाट्यानें

बसली होती. आठवीत लांब शेंड्याचे व चपट्या नाकाचे चिनी लोक, मुंबईत अलीकडे उंदीर व झुरळें मिळावीं तशीं खाण्यास मिळत नाहींत म्हणून हवालदिल होऊन बसले होते. साराश हिंदु, मुसलमान, बौद्ध, यहुदी, ख्रिस्ती, पारशी इत्यादि साऱ्या धर्मांचें, चाऱ्ही खंडातले अनेक भाषांचे, असंख्य वर्णांचे पुरुष, स्त्रिया, मुलें हीं एकाच हेतूनें प्रेरित होत्साती चाललीं होतीं. तें पाहून मनावर विलक्षण ग्रह झाल्यावाचून रहात नव्हता.

ही सर्व मौज बारकाईने पाहाण्यात सुमारे एक घटा लोटला असेल इतक्या आवकाशात आमची घरची मडळी दीपोत्सव पाहून परतण्याच्याही विचारांत असेल. आम्ही मात्र अजून त्या दिशेकडेही वळलो नसून कोरेच होतों कारण हा वेळपर्यंत गाड्या अगदीं स्तब्ध उभ्या राहिल्या होत्या. पण यानतर लवकरच सर्व गाड्या चालू झाल्या. त्याचा काळा रग व कंदिल यामुळें ही एखाद्या काळ्या पाठीची व पिंवळ्या पायाची अजस्र गोमच चालली आहे असा भास होत होता ही गाड्याची सेना आता लवकरच कोटात जाणार या विचारानें मला अत्यंत हर्ष झाला; पण तो फार वेळ टिकला नाहीं. कारण चार पावलें गेल्यावर पुन्हा ही पलटण एकदम थाबली व आणखी पधरा मिनिटें होत तोपर्यंत हालली नाहीं या प्रकरणामुळे माझ्या मनात दहशत उत्पन्न झाली. एखाद्या वरातींत अशा मुगीच्या पायानें मिरवत जाण्यात मला आनंद वाटला असता, पण गाड्याची या वेळची मद गति मला फारच अप्रासंगिक वाटली कोटात असख्य लोक दीपोत्सवाची बहार लुटीत होते, अशा वेळी आमची गाडी एका अधेऱ्या भागात हवा खात पडली होती! मला मनस्वी संताप आला. मीं सर्व प्रकारच्या गाड्यास म्हणजे शिग्राम, रेकला, फेटन, टांगा, दमणी, छकडा, एक्का, खाचर, वगैरेंस—व त्याच्या जनकास म्हणजे सुतारास हजारों शिव्या दिल्या. राजेसाहेबाच्या मातुश्रीचें नाव धारण करणाऱ्या गाडीस मात्र निर्लेप ठेविलें होतें. तसेंच पोलीसच्या शिपायांनाही मीं देऊ नयेत त्या शिव्या दिल्या त्यांनीं हा जो गाड्यांचा कडेकोट बंदोबस्त ठेविला आहे तो केवळ माझी निराशा करण्याकरितांच केला आहे अशीही अप्रयोजक कल्पना माझ्या डोक्यात एक वेळ आली. पण या अग्रहासाचा काय उपयोग होणार होता! मला चुरमुरे खात मुकाट्यानें जागचे जागीं बसावें लागलें.

पुन्हा १५ मिनिटे गेलीं, व गाड्या दोन पावलें पुढें सरून पुनरपि विश्राति घेत पडल्या सबंध दोन पावलांचा प्रवास एका दमात उरकल्यावर विश्राति न घेतील तर काय करतील बापड्या ? त्या प्रवास करण्याकरितां निर्माण झाल्या होत्या हें या वेळीं त्या पार विसरून गेल्या होत्या. त्या बिचाऱ्यांनीं तरी काय करावें ? त्याच्यासमोर हजारों गाड्याचा प्रवाह दोनतीन मैल पसरला होता, तो जेव्हा पुढें सरकणार तेव्हा कुठें आमच्या गाड्या हलावयाच्या ! मनुष्या-प्रमाणें गाड्यानाही पूर्वजाच्या प्रगतिशून्यत्वाचें प्रायश्चित्त भोगावें लागतें

माझे लक्ष घोड्याच्या खुराकडे सारखें लागलें होतें. ते दोन पावलें पुढें सरकले, की मला पगाराची बढती मिळाल्याप्रमाणें आनंद होई. अशा स्थितींत आम्ही रस्त्याची डावी बाजू संपवून परेळच्या उजव्या बाजूस एकदाचें वळलों. त्या वेळीं रहाटगाडग्यांतील अवनति संपून उन्नति होणाऱ्या पोहऱ्यामध्यें जसें पाणी शिरतें त्याप्रमाणें माझ्या शरीरात नवीन उत्साह शिरला. पण तो फार वेळ टिकला नाही कारण, गाड्याच्या गतींत विशेष फरक पडला नव्हता. अशा गतीनें आम्ही हल्लींच्या युवराजाच्या राज्याभिषेकप्रसंगींच्या दीपोत्सवकालपर्यंत तरी कोटात पोहोंचू की नाहीं याची मला शंकाच होती. मध्येच एखादी डावीकडची गाडी उजवीकडच्या गाड्याच्या दरम्यान अतर पाहून घुसत असे याप्रमाणें आगंतुक गाडीने आमची १५ मिनिटाची खोटी केलेली पाहून, ज्याप्रमाणे कनिष्ठ कारकुनानें आपणावर नबर पटकाव-लेला पाहून वाटावा त्याप्रमाणे, अपमान झालासा वाटून मला त्वेष चढत असे.

या रीतीने आम्ही आपला अमोलिक वेळ माशा मारीत दवडीत असता बाराचा ठोका पडला, व माझ्या पोटात क्षुधेनें प्रवेश केला. आपण दीपोत्सव पाहून लवकरच परत येऊ अशा खात्रीमुळें मीं निघते वेळीं काहीं खाल्ले नव्हतें. रावसाहेबानींही मजप्रमाणेच थंडा फराळ केला होता. पण त्याचें जठर पडलें जड ! व जड बुद्धीच्या मनुष्यास जसे ज्ञान, तसें जड पोटाच्या मनुष्यास अन्न लवकर पचन होत नाहीं. त्याना या वेळीं दुपारच्या जेवणा च्याच सुगंधी ढेकरा येत होत्या, व ते खुशाल डोळे मिटून गाडींत झोप घेत होते. ही त्याची डोळेझाक फारच अप्रासंगिक होती. त्यांच्या ढेकरांनी माझी क्षुधा प्रदीप्त केली कोटातील दिव्याच्या ऐवजी पोटातील आगीचा मला

अनुभव यावयास लागला, व डोळ्यापुढें काजवे दिसूं लागले. बरोबर पांघरूण आणिलें नसल्यामुळें अगाला थडी झोंबू लागली. तिची तीव्रता वाढविण्या-करिताच कीं काय, आमच्या गाड्यानींही आता मनावर घेतले, व त्या फारसा मुक्काम न करिता लवकरच राणीचा बाग, भायखळा स्टेशन, इस्पितळ वगैरे स्थानें घेत घेत ज्या ठिकाणीं आम्ही त्या रस्त्यास मिळालों होतों तेथे येऊन पोहोंचल्या. त्यासरसा मी एक दीर्घ सुस्कारा सोडला. यापुढें आम्हाला पायधुणी, क्राफर्ड मार्केट, बोरीबदर वगैरे सर्व ठिकाणें लागलीं पण गाड्याच्या व म्युनिसिपालिटीच्या कदिलाखेरीज आम्हाला एक दिवा दिसला असेल तर शपथ! चोहोंकडे गाढ अधकार पडला आहे हे पाहून आमचे घोडे, तो आम्हांला दाखविण्याकरिता, दुप्पट वेगानें चालावयास लागले, व ह्या वेळपर्यत त्यांना जी विश्राति मिळाली होती तिचें त्यांनीं चीज करून दाखविलें. या प्रकारचा विनाकारण शीण करून घेण्यापेक्षा आम्हीं मध्येंच गाडी परतवली असती, पण पोलीसच्या बदोबस्तामुळें आम्हांला गाड्याची राग सोडून जाता येईना. आम्ही रूढीच्या कचाट्यात पूर्णपणें सांपडलों होतों. म्हणून नुकताच झालेल्या प्रचंड दीपोत्सवाचा घोर अंधकाररूपी अवशेष पाहात आम्ही तीन वाजतां घरीं परत आलों

यानतर परत आपल्या गावीं आल्यावर मीं मुंबईच्या दीपोत्सवाचें खोटेंनाटें वर्णन आपल्या बगलेंतून काढून व त्यास तिखटमीठ लावून मित्रमडळी-समोर कित्येक वेळा तरी विस्तारानें मांडीत आलों आहे! परतु ‘ या दीपो-त्सवाच्या तोडीचा उत्सव आपण जन्मात पाहिला नाहीं!’ असें जेव्हां जेव्हा मी अभिमानपूर्वक म्हणतों तेव्हा या वाक्यांत दिसतो त्यापेक्षा अधिक खोल अर्थ आहे हें त्या बिचाऱ्यांच्या स्वप्नींही येत नाही. अंदरकी बात राम जाने!

---

मुष्टि १३ वी*

# माझे टीकाकार

माझे आजपर्यंत जे लेख प्रसिद्ध झाले त्यांवर माझ्या मित्राकडून व शत्रूंकडून अनेक अनुकूल–प्रतिकूल अभिप्राय आले. चमत्कार हा, कीं हे सर्व अभिप्राय धर्माभिमान्यांच्याच कंपूमधून आले माझे मित्र धर्माभिमानी असावेत यांत काहीं विशेष नाहीं, परंतु माझे शत्रूही धर्माभिमानीच आहेत हें ऐकून पुष्कळास आश्चर्य वाटेल. मी आजपर्यंत आपल्या धर्मांतील व आचारांतील असमर्थनीय प्रकारसुद्धा नवीन व बिनतोड प्रमाणांनीं नटवून व अनेक वेळा वडाची साल पिंपळास लावून सुधारकांपुढें मांडीत आलों आहे; व यास धर्माभिमान्यांकडून बक्षीस काय? तर कृतघ्नपणा! पण जग हें असेंच उलटें असावयाचें. सीझरचा नाश व्हावयास ब्रूटस् व येशू ख्रिस्ताचा व्हावयास ज्यूडास कारण झाला. नेपोलियन बादशहास त्याचे मित्र म्हणविणारांच्या कृतघ्नतेचा अनुभव आला. माझी स्थिति अशा महात्म्याच्याशीं समान आहे हें पाहून उद्वेगात सुद्धा मला आनंदाच्या उकळ्या फुटत आहेत.

ज्या अनेक बहाद्दरांनीं मजवर शिव्याचा भडिमार केला आहे त्या सर्वांचा असा समज झाल्यासारखा दिसतो; कीं मी एक प्रच्छन्न सुधारक असून माझा उद्देश धर्माची टवाळी करण्याचा आहे. हा समज माझ्या लेखांचा काहीं सुधारकांवर जो परिणाम झाला त्यामुळें उद्भवला असावा. मीं असे कित्येक निर्बुद्ध सुधारक पाहिले आहेत, कीं मी गोमयसेवनाच्या व शिमग्याच्या तर्फेनें लिहिलेल्या लेखानीं त्याचें मन धर्माच्या बाजूस वळण्याऐवजीं ते वेड्यासारखे हंसतच सुटले परंतु परिणाम अनिष्ट झाल्यामुळें मूळच्या सद्धेतूस हरताळ लावणें कधीही वाजवी होणार नाहीं. शिवाय, या कोटींतील वेडे पीर, वरील शून्यांची किंमत न धरल्यास, पांचसाताच्या पलीकडे फारसे जाणार नाहींत; व ते वगळले तर इतर सुधारकांवर माझ्या लेखांचा अनुकूल ग्रहच झालेला आढळून येईल. हजामतीच्या नीतिमीमांसेवरील माझा लेख वाचल्याबरोबर एका सुधारकानें आपल्या डोक्यावरील केसांच्या छपरास रजा दिली; व मी उवा झाल्यामुळें असें केलें अशी सबब जरी तो पुढें करीत असे तरी

*वि. विस्तार, पु. ३६ अंक ५ [सन १९०५]

त्याच्या डोक्यात झालेला हा विलक्षण फरक डोक्याच्या पृष्ठभागावरील कारणामुळे झाला नसून त्याच्या आत घडून आलेल्या मतांतरामुळेच झाला अशी माझी खात्री आहे. दुसऱ्या एका सुधारकावर माझ्या लेखामुळे यज्ञो-पवीताचें पावित्र्य इतकें ठसलें, कीं त्यानें पुष्कळ वर्षे शिकेकाईचा सस्कार न मिळालेले आपले जानवें ताबडतोब परटाकडे स्वच्छ धुण्याकरिता म्हणून पाठवून दिलें. तिसऱ्या एका सुधारकावर मीं लिहिलेलें गणपतिमहात्म्य इतकें बेबलें, कीं त्याने लागलीच बाजारांत जाऊन वक्रतुंड, लंबोदर इत्यादि मोहक वर्णन पूर्णपणें शोभेशी एक मूर्ति विकत आणून तिची आपल्या दिवाणखान्यांतील कोनाड्यात स्थापना केली, व तोंपर्यंत त्याची वृत्ति उदास असे ती त्यापुढें फार खुषींत राहू लागली असें मला खात्रीलायक बातमीवरून कळलें आहे. धर्मेतर विषयावर मी लिहिलेल्या लेखाचाही असाच परिणाम झालेला माझ्या शत्रूंस दिसून येईल. गवयांस केलेल्या माझ्या सूचना वाचून त्यांची प्रचीती पाहाण्याकरिता एका गवयानें एका रंगणवाल्याकडून एक शिकलेलें माकड खरेदी केलें, व तोंपर्यंत त्या माकडास मनुष्याकडून सरळ चालण्याबद्दल शिक्षण मिळत होतें तसें त्यापुढें तें माकड सदरहू मनुष्यास नित्यही नेमाने वाकडीं तोंडें करण्याचे शिक्षण देऊ लागलें. हल्लीं त्या गवयानें वेडीवाकडीं तोंडें करण्यात इतकें नैपुण्य संपादिलें आहे, की त्याला व त्याच्या शिक्षकाला जवळ जवळ बसविलें असतां मनुष्य कोणतें व माकड कोणतें हें ओळखण्याची पंचाईतच पडेल ! या मनुष्यास वाकोल्या व गाणें याच्या मिश्रणापासून होणारी प्राप्ति नुसत्या गाण्याच्या पैदाशीपेक्षा अनेकपटीनें मोठी आहे हें कळविण्यास संतोष वाटतो.

सुधारकाची धर्माकडे प्रवृत्ति करण्याकडे जर माझ्या लेखाचा उपयोग झाला, तर जेथें आधीच धर्माभिमानाची रोपें लागलेलीं होतीं तेथें तीं माझ्या लेखांमुळें दृढमूल झालीं असल्यास नवल नाहीं. या रोपाना मीं घातलेलें शेणाचें खत फार मानवलें असें दिसतें कारण गोमयगोमूत्रसेवनाच्या पक्षपातानें भरलेला माझा श्रावणीवरचा लेख वाचून बऱ्याच धर्माभिमान्यांनी नवीन गाई खरेदी केल्याचें माझ्या ऐकिवात आहे. काहीं उद्धारकांनीं तर रोज सकाळी चहाऐवजीं गोमूत्र सेवन करण्याचा सपाटा सुरू केला आहे. त्यापैकीं एकानें परवाच आपल्या इष्टमित्रास गोमूत्राची मेजवानी दिली. त्या प्रसंगीं मला

आग्रहाचें आमंत्रण आलें होते, पण त्याच वेळीं शेणसडा क्लबात शंखध्वनीची कवाईत करण्याचें ठरलें असल्यामुळें मला हजर रहातां आलें नाहीं याबद्दल वाईट वाटतें. शेणसडा क्लब ही संस्थाही माझ्या शिमग्यावरील लेख वाचून तो सण दर महिन्यास साजरा करण्याची प्रेरणा झालेल्या कांहीं धर्माभिमान्यांनीं काढिली आहे. तिचा उद्देश गावातील गटारें उपसण्याचा असून शिवाय शंखध्वनि, गालिप्रदान, कुलीन स्त्रियांचा अपमान वगैरे सनातन प्रकार, आहेत त्यापेक्षां अधिक प्रमाणावर प्रचारात आणण्याचा आहे.

हे लेख लिहीत असता माझ्या कांहीं धर्माभिमानी मित्रांकडून मला चागलें उत्तेजन मिळालें हें येथें कबूल करणे भाग आहे एका मित्रानें गोमूत्रगोमय-सेवनाची खालील उपपत्ति मला कळविली–‘ सद्‌गुणी मनुष्यास नेहमीं आपल्या इच्छेविरुद्ध बिकट कर्तव्यें करावीं लागतात आता ज्यांची मजल पचगव्यप्राशनापर्यंत गेली आहे तो वाटेल तें बिकट काम मोठ्या हौसेनें करील हें ध्यानांत आणूनच धर्मप्रवर्तकांनीं ही चाल काढिली असावी.’ आपल्या पुरातन चालींच्या तळाशीं असलेल्या खरपुड्याही खरवडून काढून त्या बुभुक्षित वाचकांपुढें मसालेदार मलई म्हणून माडण्याची जी कला मला अवगत झाली आहे ती या माझ्या मित्रानें साध्य करून घेतलेली पाहून संतोष होतो. दुसऱ्या एका मित्रानें वेश्येकडून मगलसूत्र ओवून घेण्याची जी आपणांत चाल आहे तिचा निर्देश मीं माझ्या ‘ लग्नसमारंभ ’ या निबंधांत न केल्याबद्दल मला ठपका दिला आहे. तो म्हणतो–‘ आमच्या विवाहसमारंभात वारांगनाना दोन कामात अग्रमान देण्याची चाल आहे, एक वधूचें मंगळसूत्र ओवण्याचे कामीं व दुसरें लग्न लागण्याचे व इतर प्रसगीं नृत्यगायनानीं निमंत्रिताची करमणूक करण्याकरिता. एकीकडे नायकीण मंगळसूत्राच्या द्वारें वधूवराची हृदय ग्रंथि बाधीत असते, तर दुसरीकडे तीक्ष्ण नेत्रकटाक्षानीं व स्वैर हावभावादिकानीं सभाजनाच्या स्त्रियांचीं मगळसूत्रें अदृश्य रीतीने खिळखिळी करीत असते. यावरून या गोष्टींत विरोध आहे असा एखाद्याचा समज होण्यासारखा आहे; पण सूक्ष्म दृष्टीनें विचार करणारास तेव्हाच दिसून येईल, कीं त्यांमध्यें विरोध नसून उलट कार्यकारणभाव आहे कारण मंगळसूत्र ओंवण्याची पात्रता फक्त अखंडसुवासिनीसच असावयाची, व मडपांतील सर्व प्रेक्षकाचीं मनें नृत्यगानादिकांनीं आकर्षिल्याशिवाय अनेकपतित्व व

अतएव अखंडसुवासिनीत्व मुळींच सिद्ध होत नाहीं.' 'स्थूल दृष्टीस एखाद्या गोष्टींतील मर्म न कळल्यास प्रसगी सूक्ष्मदृष्टीचा उपयोग केला पाहिजे,' हे तत्त्व माझ्या या मित्राने ओळखून उपयोगातही आणिलेलें पाहून 'शिष्या-दिच्छेत्पराजयम्' या न्यायानें मला परमावधीचा अभिमान वाटत आहे. याच मित्रानें व्याह्यांकडचे जिन्नस चोरण्याच्या उपयुक्त चालीचें जोरदार समर्थन न केल्याबद्दल मला दोष दिला आहे.

गोपालकृष्णाविषयीं माझा पक्षपात पाहून माझ्या एका मित्रास त्याच्या साहाय्यास धावून येण्याची स्फूर्ति झाली आहे. भागवत ग्रथ अलीकडचा असल्यामुळें त्यातील विधानें पुराव्यास ग्राह्य नाहींत अशा सबबीवर माझ्या मित्रानें श्रीमद्व्यासद्वैपायनासच खो दिला आहे या रीतीनें गचाड्या मिळा-लेल्या व्यासास आपल्या चरित्रनायकाचें वर्तन धुतल्या तादुळाप्रमाणे स्वच्छ झालेलें पाहून दुःखात सुख वाटेल यांत शका नाहीं. त्याप्रमाणेंच परस्त्रियाशी यथेच्छ केलेल्या लीलाचा याप्रमाणे अपहार झालेला पाहून श्रीकृष्णासही खेद होण्याचें कारण नाहीं. कारण अशा प्रकारच्या लीलाचें सर्वस्व चौर्य असते हें त्याला पूर्णपणें माहीत असलें पाहिजे, व केवळ परस्त्रियाच्या पतींपासूनच नव्हे, तर विसाव्या शतकातील वाचकापासूनही आपले गुप्त कृत्य छपलेले पाहून त्याला खेदाऐवजीं उलट आनंदच होईल.

पाखडी लोक जर व्यासप्रणीत ग्रथाचें प्रामाण्य मानण्याचा आग्रहच धरून बसले तर त्याचें समाधान करण्याच्या युक्त्याप्रयुक्त्याही माझ्या मित्रापाशीं मुबलक आहेत भागवत प्रमाण धरिले तरी त्यामध्यें कृष्णाच्या लीलाचे वर्णन, गवळ्याच्या सोंगास अनुरूप अशी नग्न गोपींची थट्टा व रासप्रसगीचें चुंबन, आलिंगन यापलीकडचें फारसे सापडणार नाही आता ज्याअर्थी कृष्ण त्या वेळी फक्त चारपाच वर्षांचाच होता, व त्याशी पत्नीचे नातें इच्छिणाऱ्या गोपी त्यापेक्षाही लहान अशा रागणाऱ्या पोरी होत्या, त्याअर्थी त्या रागणाऱ्या पोरी यमुनेच्या प्रवाहातस्वच्छदानें खेळत असता त्याशी केलेला विनोद कृष्णानें केवळ गोपींना पुष्कळ दिवसापासून जडलेली नग्न होऊन जलविहार करण्याची खोड मोडण्याच्या उद्देशानेंच केला असला पाहिजे. चुबनालिंगनादि प्रकारही अशा लहान वयात कामविकारापासून होणें मुळीच संभवत नाहीं. शिवाय बालकाचे अगीं आत्मसयमन करण्याची जी अजब

शक्ति असते ती कृष्णाचे ठायीही होती. अतएव रूपसंपन्न युवतींशी निकट संबंध घडविणाऱ्या रासादिक क्रीडा करीत असताही तो स्वतः अगदीं निर्विकार राहू शके. ही रासलीला गोपींस आत्मसंयमनाची संवय लावण्याचें एक साधन होतें, व ही लीला चालत असताना देखील, चुंबनालिंगनादि अपवाद सोडून इतर बाबतींत सर्वांनी परस्पराशीं सभ्यपणाने वागावें याबद्दल तो खबरदारी घेई

माझ्या मित्रानें श्रीकृष्णाच्या चरित्राचें याप्रमाणें समर्थन केलेलें पाहून मला पराकाष्ठेचे समाधान वाटले पण त्यावर एक दोन अल्प शंकाही आल्या. चारपाच वर्षांच्या मुलाच्या अगीं कामवासना जर अशक्य, तर अंगुलीनें गोवर्धनपर्वत उचलणेंही त्यास अशक्यच असलें पाहिजे. कृष्ण अलौकिक पुरुष होता म्हणून त्याचे ठायीं दुसरी गोष्ट जर संभवेल, तर पहिलीही संभवण्यास फारसी अडचण नसावी. दुसरे असें, की कृष्णाच्या व गोपींच्या अल्प वयामुळें कामविकार जर त्यांच्या स्वप्नींही येत नसत, तर कृष्णाची आत्मसंयमनाबद्दलची थोरवी व गोपींस अशा नाजुक मार्गांनीं आत्मसंयमनाची संवय लावण्याची जरूर कोठें राहिली ? तसेंच आत्मसंयमनाच्या संवयीचा प्रयोग पुरुष आणि म्हाताऱ्याकोताऱ्या व कुरूप स्त्रिया सोडून सुरूप बालिकांवरच करण्याचें काय प्रयोजन ? या व इतर काहीं किरकोळ शंका मीं आपल्या मित्रास कळविल्या, पण त्याचे उत्तर आलें, की मी सध्या गणपतीचें सौंदर्य सिद्ध करण्याच्या बिकट कामात गुंतलो असल्यामुळें मला तुमच्या शंकांचें समाधान करण्यास सवड नाहीं त्याच्या फुरसतीप्रमाणे उत्तर आल्यावर तें मी वाचकास जरूर सादर करीन

मी पाहुतात्याना आत्मसंयमनाचीं वरील साधनें जेव्हा सांगितली, तेव्हा त्यानी त्याची प्रचीती पाहाण्याचा निश्चय करून त्यांची अमलबारीही करण्यास सुरुवात केली. अजून त्याना आत्मसंयमनाचे कामीं म्हणण्यासारखे यश आलें नाहीं, व पुढें लवकर येईलसें दिसतही नाहीं. पण त्यानीं तेवढ्यानें आपली उमेद खचूं न देतां भगवान् श्रीकृष्णाचें आपल्या सामर्थ्यानुरूप अल्प अनुकरण चालू ठेवलेंच आहे

येथपर्यंत मी सुधारक नसून धर्माभिमानीच आहें व माझ्या मित्राच्या साहाय्यानें सनातन धर्माची कड घेऊनच लिहीत असतों, हें सिद्ध करून

दाखविले आता मी प्रच्छन्न सुधारक असून धर्माची नालस्ती करीत असतों हें माझ्या प्रतिस्पर्ध्यांचे विधान खरें धरूनही माझें वर्तन निदाई आहे की काय याचा विचार करू मात्र घटकाभर मी सुधारकच आहे अशी वाचकानीं कल्पना करावी

आपला हिंदु धर्म पूर्वीच्या काळीं कोणत्या स्थितीत असेल तो असो, हल्ली तो केवळ आचारप्रधान झाला आहे हे कोणासही नाकबूल करिता येणार नाहीं. सकाळीं शौचास जाण्यापासून तो रात्रीं बिछान्यावर पडण्यापर्यंतचीं आमचीं सर्व कर्मे धर्मात अतर्भूत होतात सूर्योपस्थानाचे वेळी तोंड कुणीकडे करावें, निजताना पाय कुणीकडे करावें, माजर आडवें गेल्यास काय फलप्राप्ति होते, वरून पाल पडली असता काय होते, लघुशकेचे वेळी जानवे कुठें ठेवावें, तर्पणाचे वेळीं कुठें वगैरे सर्व बारीकसारीक गोष्टीचा धर्मांतच समावेश होतो दिवसातले सर्व व्यापार जसे धर्माखाली येतात तसे सर्व स्थावरजंगम सृष्ट पदार्थही येतात घोडा, गाय, बैल, हत्ती, उदीर, माकड, कुत्रा, सर्प इत्यादि सर्व प्राणी व वह्या, शस्त्रें, दिवे वगैरे अचेतन वस्तुही आम्ही पूज्यस्थानी मानिल्या आहेत. अतर एवढेच, कीं वह्या, शस्त्रे वगैरे आम्ही समोर ठेवून पूजितों व सर्प, हत्ती वगैरेंची चित्राच्या द्वाराने पूजा करितों न जाणो खरा सर्प समोर स्थापून त्याला डोळे मिटून नमस्कार केल्यास दैवत प्रसन्न होऊन अंगसरपटीस यावयाचें ! स्त्रिया व शूद्र याशिवाय सृष्टींतील इतर सर्वांस पूजा ग्रहण करण्याचा अधिकार आहे. याप्रमाणे देवाने आम्हाला उत्पन्न करण्याऐवजी आम्हींच अनेक देवास उत्पन्न केलें आहे असे अनेक देव निर्माण झाल्यामुळें आम्हाला एकाही देवाबद्दल उत्कट भक्तिभाव उपजणें शक्य नाहींसें झालें आहे. शंकराची मर्जी बिनसल्यास आम्ही विठोबाला किंवा खंडोबाला आळवितों ते आम्हाला पाठमोरे झाल्यास म्हाळसा, सटवाई, जाखाई, जोखाई, मरीआई वगैरे देवताच्या पायीं लोटागण घेतों. ज्याप्रमाणें पुष्कळ मालकांची नोकरी करणारा चाकर एकाही मालकास मोजीत नाहीं, त्याप्रमाणें तेहतीस कोटी देवाचा भक्त एकाही देवाला जुमानीत नाहीं भवभूतीनें आपल्या एका नाटकाच्या मगलाचरणातु गणपतीची तारीफ करिता करिता त्याच्या सोंडेंत सर्प शिरल्यामुळें झालेल्या [illegible]ांदलीची अशी थट्टा केली आहे, कीं बिचाऱ्या सुदाम्याची थट्टा तिजपुढें कांहींच नाहीं

बरे, हे सर्व आचार कोणत्या तरी सर्वमान्य तत्त्वावर चाललेले असतात म्हणावें तर तेही नाहीं. रूढि हीच आमच्या आचाराची नियामक होऊन बसली आहे. एखादी चाल एक हजार वर्षांपूर्वी आपल्या देशात सुरू होती एवढीच गोष्ट ती पुढें चालू ठेवण्यास बस्स होते. वास्तविक पाहाता प्रत्येक समाजाच्या चालीरीती त्याच्या तत्कालीन परिस्थितीस अनुरूप असाव्या लागतात. चालीचें पुरातनत्व तिजविषयीं आदर वाटण्याऐवजी संशय येण्यास मात्र कारण व्हावें पण ही गोष्ट आम्ही विसरून जातों रूढीच्या सबबीवर तरुण जर रागूं लागला व वृद्ध जर विषयमग्न होऊन राहिला तर तें शोभेल का ? हाच दृष्टान्त समाजासही लागू पडतो. ही रूढि आपला अंमल हल्लीं इतक्या अरेरावीपणानें चालवीत आहे, कीं आमच्यातल्या प्रतिष्ठितासही होळीच्या दिवशी इष्टमित्रादेखत शंखध्वनि करावा लागतो, व शुचिर्भूतासही श्रावणीचे दिवशी, तोंड वेडेवाकडे करीत का होईना, गाईचें मलमूत्र सेवावें लागते मला तर अशी भीति वाटते, की काही दिवसानी आम्ही आपल्या पतित स्थितीसही रूढ म्हणून घट्ट मिठी मारून बसूं

शिमग्याचे दिवशी शंखध्वनि करणाराचे दोन प्रकार असतात एका प्रकारच्या लोकातील शंखध्वनि रुढीपुढे आमचें काहीं चालत नाही अशा अर्थाचा, व अतएव दौर्बल्यसूचक असतो, दुसऱ्या प्रकारच्या लोकाचा ही चाल आमच्या धूर्त पूर्वजानी आटोकाट धोरण बाधून मुद्दाम काढिली अशा अर्थाचा व म्हणून रणागणीच्या शंखध्वनीप्रमाणें जयघोषात्मक असतो दुसऱ्या प्रकारचे लोक इतरही हास्यास्पद किंवा अनर्थावह चालींसंबंधानें, त्या सद्धेतु-पूर्वक आहेत अशी स्वतःची समजूत नसली तरी, या बोटाची थुकी त्या बोटावर नाचवून व माजराचा पाय कुत्र्यास चिकटवून इतराची समजूत घालण्याचा प्रयत्न करितात. याचें कारण त्या चाली सोडण्याइतकें मनोधैर्य त्याच्या अगी नसतें हें इतरापासून लपविण्याची इच्छा हेंच केवळ होय.

अभिमानास थट्टेसारखे चांगलें अंजन नाहीं हा आपला नेहमींचा अनुभव आहे. वरील दुसऱ्या कोटींतील लोक बहुधा अशा प्रकृतीचे असतात कीं, त्याजवर मूर्खत्वाचा आरोप केला असता त्याना मनापासून संताप येतो, पण त्याना दुष्ट किंवा नीच म्हटलें तर विशेष राग आल्याचे चिन्ह दिसत नाहीं;

उलट धन्यता वाटते. स्वत:चे दौर्बल्य कबूल करण्याइतकें धैर्य नसता इतराच्या आपल्यातल्या वाईट चालींविषयीं खोटा ग्रह उत्पन्न करून देशाची सुस्थिति दिवसगतीवर लोटण्याचें धार्ष्ट्य करणाऱ्या या पंडितमन्य लोकाची आपल्या हातून शक्त्यनुसार पूजा व्हावी व त्या चालींचे अनिष्टत्वही ओघाने वाचकाच्या नजरेस आणावें हा, हे लेख लिहिण्याचा मुख्य उद्देश आहे

विनोदाची मीमासा केल्यास आपणास त्यात थोर व लहान किंवा भव्य व क्षुद्र या कल्पनाचा विरोध आढळून येईल वर वर्णिलेल्या व येन केन प्रकारेण खोट्याचे खरें करू पाहाणाऱ्या लोकाचे प्रचड धार्ष्ट्य व त्याच्या अभिमान-विषयीभूत चालींची व त्याचें पुष्टीकरण करण्याकरिता पुढे आणिलेल्या प्रमाणाची लघुता यांजमध्यें इतकें अतर असते, कीं त्याचे वर्णन हास्यास्पद करण्यास फार श्रम पडणार नाहीत असा मीं तर्क केला

विनोदी भाषापद्धतीचा पाश्चात्य देशात फार प्रघात आहे सबब व्हॉल्टेयर, स्टर्न, फील्डिंग, स्मालेट, मोलियर, रॅबेले, पास्कल, सर्व्हांटीज, मार्क ट्वेन वगैरे तिकडील पटाईत विनोदी लेखकाचा मी परिचय करून घेतला, व त्याचें अल्प अनुकरण करण्याचा उपक्रम चालविला.

परतु पौरस्त्य व पाश्चात्य दृष्टीमध्ये केवढे मोठे अतर आहे याची मला बरीच अटकळ होती फ्रान्स देशात विनोदास इतका मान आहे, कीं एखाद्या अपराध्यानेंही विनोदयुक्त भाषण केल्यास त्याला समाजाकडून त्याच्या अपराधाची क्षमा होते उलट आमच्याकडे विनोद इतका क्षुल्लक वाटतो, कीं सद्धेतुप्रेरित लेखकानेंही एखादा विषय विनोदाच्या मिश्रणानें मनोरजक करण्याचा प्रयत्न केला, कीं तो एक अपराध वाटून त्याच्यावर बाष्कळ, पोरकट वगैरे विशेषणाची पुष्पवृष्टि होते स्मॉलेटने आपल्या विनोदपूर्ण ग्रथो-द्यानात कुठे कुठें सोनखतही पसरले आहे, व ते तिकडील वाचकास नापसतही पडलें नाहीं परतु इकडे कोणी त्याचें अल्प अनुकरण करून पंचगव्यप्राशनाचें विनोदात्मक पृथक्करण केलें, कीं त्याला बक्षिसादाखल म्हणून खरोखरीच पृथक्कृत पचगव्याच्या म्हणजे, गोमयाच्या व गोमूत्राच्या वृष्टीचा लाभ होतो !

मनुष्यात कोणताही नवीन प्रचार रूढ होत जातो तो प्रथम विचारात, मग उच्चारात व तदनतर आचारात दिसून येतो पंचगव्यप्राशनाचा मात्र

काय उलट चमत्कार आहे पहा, कीं आम्ही गाईचें मळमूत्र मुखानें सेवन करण्यात महत्पुण्य मानितो, पण मुखाने त्याच गोष्टींचा उच्चार करण्यात मोठें पाप समजतो ! जे आपले तोंड शेण खाल्ल्याने विटाळत नाहीं तेंच आपण शेण खातो असें म्हटल्याने मात्र भ्रष्ट होतें !

मी वरील सर्व गोष्टींचा विचार केला व माझ्या पुराणमताभिमानी वाचकाच्या शिव्याशापाचा उपसर्ग मला स्वतःस लागू नये म्हणून ' सुदामा ' या नावाचा मानसपुत्र उत्पन्न केला, आणि आपल्या काहीं वेडगळ चालींची उपयुक्तता सिद्ध करण्याकरिता वर वर्णिलेले भीरुधृष्ट लोक ज्या बालिश व हास्यास्पद कोट्याचा अवलंब करीत असतात त्या खुशाल सुदाम्याच्या तोंडीं ढकलून दिल्या यामुळें झालें काय, कीं ज्याप्रमाणें जालंदराचें शापवचन धातुमय प्रतिमाच्या मागे उभा राहिलेल्या गोपिचंदास स्पर्श करू शकलें नाहीं, त्याप्रमाणें वेडगळ, पोरकट वगैरे जी मासलेवाईक विशेषणें माझ्या पुराणमता-भिमानी बधूंनीं दौर्बल्यजनित क्रोधानें दातओंठ खात मजवर फेकली तीं सर्व सुदाम्याच्या पुतळयास अडखळून सपशेल जमिनीवर पडलीं. यामुळें माझा अनुत्साह होण्याचे बाजूस राहून, उलट, मी पांघरलेला मूर्खपणा इतरास खरोखरीचा वाटू लागण्याइतका बेमालूम पांघरलेला होता या विचारानें मला दुप्पट उमेद आली एखाद्या नटाची शकाराची भूमिका पाहून प्रेक्षकाच्या तोंडून मूर्ख, वेडगळ वगैरे उद्गार निघाल्यास नटास विषाद वाटावा कीं आनंद ? असो. ज्याप्रमाणें पाश्चात्य देशात गटारातलें पाणी सुद्धा रासायनिक पद्धतीने शुद्ध करून सुवासिक जल बनविण्यात येतें त्याप्रमाणे, उलटी होऊन बाहेर आलेल्या पंचगव्याप्रमाणे, धर्माभिमान्याच्या मुखातून निघालेल्या घाणेरड्या शिव्या सुद्धा मी सुदामरूप पडद्यातून गाळून स्वीकारीत असे. क्वचित् प्रसंगीं एखाद्या मित्रानें संतोषप्रदर्शक उद्गार काढिले म्हणजे ते मात्र मी सुदाम्याच्या वाट्यास न जाऊं देता स्वतःच सेवीत असे. अशा रीतीनें पुत्राकडे घाणेरडे अन्न ढकलून स्वतः सुग्रास पक्वान्ने मटकावणारा पिता निर्घृण समजण्यात येईल अशी भीति बाळगण्याचेंही मला प्रयोजन दिसलें नाहीं कारण सुदामा माझा मानसपुत्र असल्यामुळे त्याला अपशब्दरूप विषाची भीति व स्तुतिरूप अमृताची लालसा या दोहोंपैकीं एकहीं शिवण्याचें कारण नाहीं हें मी पूर्णपणें जाणून होतों.

हास्य हा रस मिश्र असून उदात्त व क्षुद्र अशा दोन्ही कल्पना त्याचे घटकावयव असतात हें वर आलेंच आहे क्षुद्र कल्पनात बीभत्स व अश्लील कल्पनाचाही अतर्भाव होतो, आणि यामुळें पाश्चात्य विनोदी लेखात अनेक स्थलीं आपणास त्या प्रकारच्या कल्पनाचा थोडाबहुत शिरकाव आढळून येतो. आता अशा कल्पनाचें क्षुद्रत्व दाखविण्याकरिता का होईना, त्याना आपल्या लेखात होता होई तों थारा देऊ नये हा उत्तम मार्ग. तथापि ज्या गोष्टीवर आपणास विनोदास्त्र सोडावयाचे तीच बीभत्स किंवा अश्लील असल्यास मात्र हा नियम अर्थात् लागू पडत नाहीं बीभत्स चालीचा केवळ निर्देश करण्याकरिता सुद्धा जर बीभत्स शब्दाचा उपयोग करावा लागतो, तर तिचा उपहास करण्याकरिता करावा लागेल यात नवल नाहीं. अशा प्रसंगीं आवश्यक वाटणाऱ्या बीभत्स शब्दाचे श्रेय टीकाकाराकडे नसून टीका-विषयीभूत चालीकडे जात असतें. माझे पुराणाभिमानी बधु जर गोमय व गोमूत्र यथेच्छ सेवून ढेंकर देता देता मला ताकीद देऊ लागतील, की 'बाबारे, आम्ही हे पदार्थ खुशाल खाणार, तुला जर आमच्या वर्तनावर टीका करावयाची असेल तर तीही खुशाल कर, आमचे ह्यावर काही म्हणणें नाहीं; परतु टीका करताना जर का शेण हा शब्द तोंडातून काढलास तर खबरदार!' तर या ताकिदीची मीं पर्वा बाळगलीच पाहिजे असें नाही ज्याप्रमाणें मृत्युरूप द्वारानें प्रयाण करणारा प्राणी पुन. त्या द्वारानें परत येताना दिसत नाहीं, किंवा ज्याप्रमाणे काहीं यन्त्रात आत मात्र उघडणाऱ्या पडद्याची योजना केली असते त्याप्रमाणें तोंडाची गोष्ट नाही, की त्यामधून शेणास आत प्रवेश मात्र करिता यावा, पण तें शब्दरूपानेंही बाहेर पडू लागले कीं त्याला मज्जाव व्हावा. सेवन केलेल्या पदार्थांची ढेकर येऊ लागल्यास तिला प्रतिबंध करणें जसें अयोग्य त्याप्रमाणें त्यासंबधाच्या इतर उद्गारासही आडकाठी नसावी, व सेवन करणारें मुख निराळें व उद्गार काढणारें निराळे असे असल्यास तर ती नसावीच नसावी.

माझ्या एका लेखाचा मथळा 'हजामतीची नीतिमीमासा' हा आहे, व उच्चनीच कल्पनाचा विरोध हेंच विनोदसर्वस्व असतें या दृष्टीने त्यांत कांहीं वावगेंही नाहीं. परंतु माझ्या एका वाचकास तें न पटून वरील मथळ्याबद्दल निदान 'श्मश्रूची नीतिमीमासा' हा तरी मथळा मीं घालावयास हवा होता

अशी त्यानें टीका केली. आता माझ्या लेखाच्या डोक्यावरील 'हजामती'स फाटा देऊन त्याच्या माथीं 'स्मश्रू' स्थापिल्यास विनोदाच्या दृष्टीनें किती स्वारस्य येतें आणि माझ्या लेखाच्या मथळ्यात चूक आहे कीं तो फिरवू पाहाणाराच्या माथ्यात आहे, याचा निर्णय करणे वाचकावरच सोंपवितों. मात्र या शिरच्छेदाच्या सूचनेवरून अशा रीतीनें शब्दात फरक दिसल्याबरोबरच वृत्तींत चलबिचल होऊं देण्याचीं जी दुसरींही काहीं उदाहरणें माझ्या दृष्टीस पडलीं आहेत त्याची आठवण होऊन त्याचा या ठिकाणी उल्लेख केल्यावाचून रहावत नाहीं या प्रकारचे एक उदाहरण वर आलेच आहे तू पंचगव्य प्राशन करितोस असें म्हटल्यास कोणासही राग येत नाहीं पण तेच विधान प्राकृत रूपानें मांडिल्यास मात्र तळव्याची आग मस्तकास जाते. त्याचप्रमाणें गणपतीस वक्रतुंड म्हटलें की त्याची तारीफ होते. तेंच त्यास 'वाकडतोंड्या' असें प्राकृत वाणीनें आळविलें तर मात्र तो नाक [ऊर्फ सोंड] मुरडतो! जणू काय उच्चारलेल्या शब्दाचा तो अभिनयच करीत आहे! सामान्य लोकात साधारणतः असा प्रकार दिसून येतो, की कोणीं त्यास अज्ञात भाषेत शिव्या दिल्या तर त्याचा त्याना राग येत नाहीं पण देवादिकात याच्या अगदीं उलट प्रकार! त्याना प्राकृत भाषेंतील शिव्यापेक्षा स्वतःच्या म्हणजे गीर्वाण भाषेंतील शिव्याच पसंत पडतात! गणपतीच्या जनकाकडेच पाहा ना! त्यास बैलाचा धनी म्हटल्यास रागानें तृतीय नेत्र उघडावासा वाटू लागेल पण त्याच रागाचें शमन तत्काल पशुपति म्हटल्यानें होईल प्राकृत शिव्याच्या जखमेवर संस्कृत अपशब्द म्हणजे मलमपट्टीच म्हणावयाची!

स्मश्रूविषयक लेखाच्या मथळ्यात फेरफार करू पाहाणारा जो माथेफिरू टीकाकार वर नुकताच आला आहे त्यानें त्याच लेखाबद्दल दुसरेंही एक गाऱ्हाणें केलें होतें. एकदा हजामत करविल्यापासून तो पुन्हा हजामतीचा दिवस येईपर्यंत केंसाच्या वाढीबरोबर मनाच्या वृत्तीत कसे फरक होत जातात याचें मीं अत्युक्तिनुरूप वर्णन केलें होतें. सदरहू गृहस्थास मी एखादा इतिहासच लिहीत आहे असा भास होऊन त्यानें त्यांस दिसून आलेले अनेक ऐतिहासिक दोष सदरहू लेखात दाखविले. एका आठवड्याच्या शेवटीं जी डोक्याची पगडी क्षितिजाशी समांतर असते तीच पुढच्या आठवड्याच्या आरंभीं तोल जाऊन एका कानावर कलती होते असें मीं लिहिलें होतें. या

विधानाची कसोटी पाहाण्याचा निश्चय करून मशारनिल्हे गृहस्थानीं सबंध एक आठवडाभर आपली पगडी डोक्यावर ठेवून पाहिली, पण त्याच्या एकाही कानाचें गुरुत्वाकर्षण पगडीच्या काठावर घडण्याचें चिन्ह दिसेना. तेव्हा फार दिवस पगडीचें आच्छादन बाळगल्यामुळे उबून गेलेले मस्तक गरम झाल्यास नवल नाही. त्याचप्रमाणे स्मश्रू वाढल्यावर तोंडात संस्कृत शब्द अधिक येतात व तिचें उच्चाटन होताच प्राकृत शब्द स्वस्थानीं परत येतात असाही नियम मी ठोकून दिला होता माझ्या टीकाकाराने एक आठवडा याची मुद्दाम प्रचीती घेऊन पाहिली पण व्यर्थ संस्कृत भाषेने जे एकदा त्याच्या तोंडात आपलें ठाणे दिले तें उठविण्याचा तिचा विचार दिसेना ही अपरिचित पाहुणी आज जाईल, उद्या जाईल अशी त्या बापड्यानें बरीच वाट पाहिली. शेवटी त्रासून जाऊन या सर्व विपत्तीच्या मुळाशीं असलेल्या माझ्या लेखावर तोंडसुख घेण्याला त्याने तोंड उघडले मात्र, तो काय चमत्कार सागावा! ज्या प्राकृत शब्दाची तों चातकाप्रमाणें वाट पाहून पाहून थकून गेला होता तेच भक्तवत्सल शब्द सकटी धावून आले, व आपल्या ओघाखाली मला दडपून टाकून त्यानीं माझ्या नियमाची सत्यता अकल्पित रीतीने शाबीत केली!

मी आपल्या लेखात नेहमी आपल्याच देवाची व आचाराची निंदा करितो व स्वनिंदेपासून होणाऱ्या दुःखात परनिंदाजनित सुखाचा एक थेबही हाती लागू देत नाहीं असाही मजवर एक आरोप आहे या आरोपात बरेंच तथ्य आहे, हें कबूल करण्यास मला अभिमान वाटतो पाश्चात्य वेडगळ चाली किंवा देवपणा नसलेले देव हे विषयाच्या प्रतिपादनात ओघानें आले असता मी त्याची यथाशक्ति सभावना करीत नाही अशातला भाग नाहीं, पण आपली व्यंगें पाहून जसें अंतःकरण तुटतें तसें इतराच्या व्यगानीं तुटणे केवळ अशक्य आहे, व जेथें अतःकरणास पीळ बसत नाहीं तेथें असमाधानव्यंजक उद्गार कसे निघणार?

आपणात वेडगळ चाली आहेत त्याप्रमाणें शहाणपणाच्याही चाली आहेत, व कृष्णाप्रमाणें देव आहेत तसे रामाप्रमाणेंही आहेत. त्याजविषयीं माझ्या पुराणाभिमानी बंधूच्याइतकाच मलाही अभिमान आहे. पण त्याची स्तुति विनोदपर लेखांत अनाठायीं होईल त्यांची तिळमात्र थट्टा आपल्या हातून होऊं नये एवढी खबरदारी मात्र मी घेतों याबद्दल माझे टीकाकार देखील साक्ष देतील

कधीं कधीं टीकाकार टीका करण्याच्या भरात टीकाविषयींभूत दोष स्वतःचे अगीं आहे किंवा नाहीं याचा विचार न करता स्वताचे विचार जगापुढें आणण्याची घाई करितात, व मग ' मी हांसे लोकाला आणि XXX माझे नाकाला !' या न्यायानें त्याचें हंसें होतें असा प्रकार मुंबईच्या एका द्वैमासिकासंबंधानें झाला. सदर द्वैमासिक प्रथम षाण्मासिक असून प्रत्येक अयनास एक दौरा काढीत असे. पुढे ते त्रैमासिक झालें, व हल्ली तर प्रत्येक ऋतूस एकदां याप्रमाणे वर्षातून सहादा निघत असते. कुचेष्टेशिवाय प्रतिष्ठा वाढत नाहीं, या एका तत्त्वावरच सारी भिस्त ठेवून हे ज्या प्रमाणे षाण्मासिकाचें द्वैमासिक झाले तसे द्वैमासिकाचे मासिक होईल ही माझी खात्री आहे या द्वैमासिकास स्वतंत्र ग्रथरचनेची मोठी हौस आहे, व या बाबतीत त्यास नाव ठेवण्यासारखे काही नाही ते आपले रचनास्वातत्र्य ज्या मार्गांनी दाखवीत असते त्याबद्दल मात्र मतभेद होण्यासारखा आहे कारण तर्कशास्त्राच्या तत्रानें चालण्याचा या द्वैमासिकास कटाळा असावा असें दिसते या रचनास्वातंत्र्याचे कांहीं मासले वाचकाकरिता देतों:—

या द्वैमासिकाचें असें मत दिसते, की गुरुचरित्र, भक्तिविजय वगैरे जे ग्रथ भाविक लोकाकरिता लिहिले आहेत त्याची प्रामाण्यासबधाने इतिहासाइतकीच मातब्बरी आहे व भानुदासानें विठोबाच्या मूर्ति विजयनगराहून पढरपुरास एका रात्रीत पोहोंचविल्याची कथा व पानिपतची लढाई या दोन्ही गोष्टी सारख्यास विश्वसनीय होत प्रो जिन्सीवाले एकादशीचे व शिवरात्रीचे दिवशी पाढरी सुपारी न खाता ताबडी सुपारी खात, हा त्याच्या चरित्रावर कधीं न पुसता येण्यासारखा कलक आहे हे या द्वैमासिकाचे दुसरे स्वतंत्र मत होय बगाली व गुजराथी वाङ्मयापेक्षा मराठी वाङ्मय सहस्रपटीनें श्रेष्ठ आहे, हें तिसरें मत या द्वैमासिकाच्या आवडत्या स्वतत्र मतापैकीं आहे. या द्वैमासिकातील एका लेखकाचें मुबईच्या एका वृत्तपत्रात असेंही मत वाचलेलें आठवतें, की लेखकाने नेहमीं कडक भाषेचा उपयोग करीत असावें, सौम्य भाषा वापरणे हे अगी पुरुषत्व नसल्याचें किंवा अगात स्वदेशांतील रक्त खेळत नसल्याचें चिन्ह होय शेवटच्या मतावरून या लेखकास अश्लील भाषेवर टीका करण्याचा मुळीच अधिकार नाहीं असें सामान्य वाचकास

होईल. तें वाक्य असें:—' अधाला जसा सुस्वरूपस्त्रीमुखावलोकनापासू
होणारा आनद अनुभविता यावयाचा नाहीं, क्लीबास जशी रतिसौख्यापासू
उत्पन्न होणाऱ्या आनदाची कल्पनाही करिता यावयाची नाही...तद्वत्..
विस्तारकर्त्यास . रहस्य कळणें अशक्य आहे.' या वाक्यात अधाची उपम
पुरेशी न वाटून लेखकानें क्लीबाची उपमा दिली आहे. असो वर दिलेल्य
विचारसरणीवरून अनाधिकाऱ्याच्या हाती मासिके असणें हें भुताच्या हात
कोलित देण्यासारखें आहे हें उघड होईल. या द्वैमासिकाचें नाव जाणण्याच
वाचकास उत्कठा लागली असेल पण शेणाचें नाव लेखात काढणें हें ज
अप्रशस्त तर तितक्याच घाणेरड्या पुस्तकाचे नाव घेणेही अप्रशस्त होईल
तूर्त इतकेच मोघम सागणें पुरें होईल, कीं ते नाव एका स्त्रियाच्या संस्थेच्य
नांवावरून उचलले असल्यामुळे व त्यातील पूर्वार्ध एका स्त्रीचें नाव असल्या
मुळें तें या स्त्रैण द्वैमासिकास सर्वथा अनुरूपच आहे.

पदोपदी पुरुषत्वाची, रतिसुखाची आठवण करणाऱ्या या मासिका
मजवर अश्लीलत्वाचा आरोप आणिलेला पाहून कोणाही समजस मनुष्यास
हसूं आल्यावाचून राहणार नाही. अश्लीलत्वाची कोठें योजना करावी लाग
याबद्दलचें माझें मत मीं वर दिलेंच आहे, व त्या मताचें अतिक्रमण मजकडू
माझ्या लेखात झाले नाही अशी माझी खात्री आहे

बा द्वैमासिका ! तुला माझ्या लेखात अश्लीलपणा भरलेला दिसत आहे
दुर्योधनास सगळें जग दुष्ट दिसत, असे हा कशाचा परिणाम हे तुला माहीत
नाहीसें दिसतें. यापुढे माझे लेख तुझ्या हाती पडतील तेव्हा डोक्यातील
स्त्रीविषयक विचार पार काढून टाकून मग वाचण्यास आरभ करीत जा
प्रथम प्रथम तुला असें करणें कठिण जाईल, पण अभ्यासानें हाडींमासीं
खिळलेल्या संवईचाही बीमोड करता येतो.

तुला माझ्या लेखात मूर्खपणाही जागोजाग दिसत असतो पण मूर्खपण
निराळा व त्याचें सोंग निराळें हें तूं विसरतेस. माझ्या लेखनपद्धतीचा उद्देश
मूर्ख मनुष्य जसें लिहील तसें लिहून हास्यास्पद होण्याचा असतो. अश
रीतीनें मुद्दाम मूर्खपणाचा आव घालून लिहिलेल्या लेखात मौर्ख्यमूलक दो
दाखविण्याचा जर कोणी दीडशहाणा प्रयत्न करूं लागला तर तें लेखका

मी प्राजलपणे कबूल करितों, कीं माझ्या नकली मूर्खपणास तुझ्या अस्सल जातिवंत मूर्खपणानें खालीं पाहावयास लाविलें. पण कला व निसर्ग, किंवा कृत्रिमता व स्वभाव यामधील हे अतर नेहमीं कायम रहाणारच. ' नट तो होइल का नृप कधीं ? '

नुसत्या शिव्या देण्याने निबंधमालेची बरोबरी होत नसते हे तत्त्व तू लक्ष्यात ठेवशील तर तुझें कोटकल्याण होणार आहे. माझें म्हणणें तुला कदाचित् मत्सरमूलक वाटून भक्तिविजयातील कथेइतकें विश्वसनीयही वाटणार नाहीं, पण त्याला माझा नाइलाज आहे वास्तविक म्हणशील तर मी मनातून तुझा हितचिंतकह आहे तू मासिक होऊन तुझी छबी प्रत्येक महिन्यास झळकूं लागेल तर माझा आनद त्रिभुवनात मावणार नाही. कारण, हल्लीं मला लेखात मूर्खपणाच्या गोष्टी घालण्याकरिता डोके खाजवावें लागतें, पण तू लवकर लवकर निघू लागलेंस म्हणजे तुझी सबध पानें उतरण्यास मला ठीक पडेल.

वरील उपदेशातील काहीं शब्द तुला कडक वाटतील पण एक तर कडव भाषा हा तुझ्या दृष्टीनें गुणच आहे, किंवा गुण नसला तरी उपवासास ताबड सुपारी खाण्याइतका अक्षम्य दोष तरी नाही. शिवाय तूं ज्या शेलक्या शिव्याची मेजवानी पाहुण्यापुढे माडीत असतेंस तिचें सेवन करिताना यजमानानेंही आपणास पक्तीचा लाभ द्यावा असे त्यास वाटणे साहजिकच आहे.

असो, मी प्रच्छन्न सुधारक आहें या दृष्टानेंही माझ्या आक्षेपकास उत्तर दिलें. प्रत्युत्तराच्या सोईसाठी पहिल्यानें मी धार्मिक आहें या दृष्टीनें व दुसऱ्यानें मी सुधारक आहे या दृष्टीनें, असा दुहेरी विचार केल्यामुळें माझे वाचक बुचकळ्यात पडले असतील. म्हणून मी अंतर्यामीं दुर्धारकच [ चुकलों ! उद्धारकच ] आहे याबद्दल एक बिनतोड प्रमाण देतों काहीं दिवसापूर्वी एक साहेबानें एक गणपति विकत आणून त्याची थट्टेनें पूजा केल्याबद्दल त्यास देहातशासन मिळालें, ही गोष्ट चागल्या प्रसिद्ध वर्तमानपत्रातून वाचल्याचें माझ्या वाचकास स्मरत असेल आता मी गणेशचतुर्थीवर एक लेख लिहिला आहे हेही त्याना विदित आहेच. जर माझे आक्षेपक म्हणतात त्याप्रमाणें मीं त्या लेखात गणपतीची विटबना केली असती तर मींही साहेबमजकुराप्रमाणे प्राणास मुकलों नसतों का ? एक तर माझा लेख शुद्ध अंतःकरणानें लिहिलेला असला पाहिजे, किंवा गणपति हे दैवत जागृत नसून निव्वळ

थोताड असलें पाहिजे. अशा अडचणींत माझे धर्माभिमानी वाचक गणपतीचा निःसत्त्वपणा कबूल करण्यापेक्षा माझी वरील आरोपापासून आनदानें मुक्तताच करतील ही खात्री आहे.

बारा लेख लिहून काही दिवस विश्राति घेण्याचा माझा प्रथम विचार होता. पण सुदाम्याचे बारा बाजले या ओरडीस जागा देऊ नये म्हणून, व माझ्या टीकाकारास उत्तर न दिल्यास त्याची खप्पा मर्जी होईल हे जाणून हा तेरावा प्रत्युत्तर लेख लिहून सादर केला आहे. विविधज्ञानविस्ताराकरिता बारा लेख लिहिण्याचा उद्देश ईशकृपेनें आज पूर्ण झाला आहे आता यापुढे माझी व वाचकाची गाठ पुन्हा पडण्याचा योग आल्यास या गरीब मित्राची ओळख ठेवण्याची विनति करून त्याची व विस्ताराची रजा घेतों.

---

## मुष्टि १४ वी*

# मुंबईचें प्रदर्शन

मुंबईच्या दीपोत्सवासंबधानें माझी एकदा कशी खरपूस निराशा झाली होती हें वाचकास माहीत झालेच आहे त्या निराशेबद्दल मला मुंबईवर सूड उगवावयाचा राहिला होता १९०४ चे नाताळचे सुट्टींत मला तो उगविण्याची आयतीच संधि मिळाली. कारण राष्ट्रीय सभेच्या निमित्तानें मुंबई येथें एक जंगी प्रदर्शन खुलें होऊन त्याची विस्तृत व चित्ताकर्षक वर्णनेंही वर्तमानपत्रातून झळकू लागली होती तीं वाचून जो तो म्हणू लागला, कीं जन्माला यावे आणि मुंबईचे प्रदर्शन पाहावे. यापैकीं जन्माला येण्याचा माझा कार्यभाग तर यापूर्वीच उरकला होता राहता राहिलें मुंबईचें प्रदर्शन. तें पाहाण्याचा घाटही जुळवून आणण्याचा मी निश्चय केला या खेपेस मीं आपले परममित्र बडूनाना व पाडूतात्या यास समागमें घेण्याचें ठरविलें यात माझा हेतु असा होता, कीं मागील खेपेप्रमाणें याही खेपेस निराशाच होण्याचें जर माझ्या नशिबीं असले तर त्या निराशेंत वाटेकरी असल्यानें तिची तीव्रता कमी व्हावी, व यदाकदाचित् प्रदर्शनाची व माझ्या डोळ्याची

---

* करमणूक, १६ सप्टेंबर, सन १९०५.

गाठ पडलीच तर त्यापासून होणारा आनद त्रिगुणित व्हावा. दुःखाचे वेळीं आपल्या मित्रांची संख्या छेदाचे ठिकाणीं असते व सुखप्राप्तीचे वेळीं तीच अंशस्थानीं जाऊन बसते, हा नित्यातलाच अनुभव आहे.

मुंबईस जाण्याचें ठरल्यावर आम्ही बाधाबाधीच्या कामास लागलों. आम्ही तिघेही स्वदेशी कपड्याचे अभिमानी असून शक्य तितकें स्वदेशी कापड वापरण्याची आम्हीं शपथ घेतली होती. परंतु शक्यतेच्या मर्यादेसंबंधानें मात्र तिघाचें एकमत नव्हतें. बंडूनानानी आपली शपथ कडकडीत पाळली होती नागपुरी धोतरें व उपरणी, मुंबईच्या गिरण्यातील जाड्याभरड्या कापडाचे बदाचे अंगरखे व धाबळीच्या बंड्या, याच नेहमीं त्यांच्या वापरण्यात येत यंदा मुंबईला थंडी फार पडते असे ऐकिल्यावरून त्यानीं या खेपेस एक रूदार अगरखाही घेतला होता. पाडूतात्या जरा छानछोकी असल्यामुळें त्याची शक्यता बरीच सपुष्टात आली होती. त्यानी आपलें पागोटें व जानवे येवढीच काय तीं स्वदेशी ठेविलीं होतीं. बाकीचें त्याचें कापड विलायती असे मात्र इष्कीबाजपणाबरोबर त्याची सापत्तिक स्थिति समाधानकारक नसल्यामुळें ते आपले कपडे प्रतिवर्षी बदलीतच असें नाहीं. त्यामुळें काहीं कपड्यास धन्याच्या इच्छेविरुद्धही ठिकठिकाणीं ऐसपैस खिडक्या पडल्या होत्या. काहीं मूळचे काळे व जाड कोट पाढरे होऊन विरविरीत व जाळीदार बनले होते. काहीं मूळच्या पायघोळ विजारी तात्याच्या ‘ सुखद पदा त्यजुनी ’ इतक्या वर सरकल्या होत्या, कीं त्याच्या व आंखूड पायमोज्याच्या मधून तात्याचे काळे लठ्ठ पाय कधीं कधीं दृग्गोचर होत असत. येवढ्या सरजामातून मुबईच्या प्रवासास योग्य असे कमी छिद्राचे, वर्णत्याग न केलेले व एकदा तात्याच्या अगात शिरल्यावर न फाटतां काढता येण्यासारखे कपडे निवडणें फार श्रमाचें काम होतें त्यास तब्बल एक घटा लागला यात नवल नाहीं. त्यानंतर पाडूतात्यानीं वयाने स्वतःच्या बरोबरीचें व काळजीनें जपून ठेविलेलें असें एक बुद्रुक घड्याळ काढिलें त्याची तबकडी फुटली होती, व घंटेकाटा नाहीसा झाल्यामुळें कालगति मापण्यातही त्याचा मोठासा उपयोग नव्हता. घंट्यातलीं किती मिनिटे गेलीं हें मात्र त्यावरून बिनचूक कळे. पण तो कितवा घंटा व रात्रीतला किंवा दिवसातला याची दाद मात्र तें घड्याळ लागं देत नसे याप्रमाणें कालमानास अनकल अशी

घड्याळाची सुस्थिति जरी नव्हती तरी त्याच्या नादुरुस्तीवरून त्याचा जन्मास किती वर्षें झालीं असावीं याचा बराच अचुक अंदाज करितां येत असे; म्हणजे त्याच्या सुस्थितीपेक्षा दुःस्थितीनेंच कालमापन चांगलें होत असे. सुंदर साखळीस लटकावून खिशात सोडून दिलें असता तें काळाबरोबर स्वदोषाचाही पत्ता लागूं देत नसे. माझा स्वतःचा पोषाख नाना व तात्या याच्या पोषाखाची सरासरी होता म्हटलें तरी चालेल. म्हणजे त्यातील काही कपडे स्वदेशी तर कांहीं विदेशी होते. स्वदेशी कपडे मी नेहमीं विदेशी कपड्यांचे आतच बहुधा वापरीत असे याचा हेतु, स्वदेशी माल वापरण्याचा माझा तोरा मी लोकांसमोर मिरवीत आहे असें दिसू नये व स्वदेशी कपड्याचा वास नेहमीं स्वदेशभक्तीनें ओथबलेल्या माझ्या अतःकरणाजवळ असावा, हा असे.

मुंबईच्या दीपोत्सवापासून रावसाहेब चक्रपाणीबद्दल माझें मन बरेंच विटलें होतें, व म्हणून मुंबईस दुसरी सोय करिता येईल काय याबद्दल मी पाडु-तात्यांमार्फत त्याच्या तेथील एका मित्रापासून खुलासा मागविला होता. त्याचें उत्तर आलें, कीं " राहण्यासंबधानें तर ' सुखनिवास ' केवळ असुखनिवास होऊन गेलें आहे, व ' सरदारगृहा 'तही प्रत्येक खोलीत वीस-वीस सरदार कोंबले आहेत, खाण्यापिण्याची सोय मात्र त्यात चागली होईल. शौचमुख-मार्जनाची व स्नानाची सोय करण्याचें ग्रँटरोडवरील एका खाणावळवाल्याने कबूल केलें आहे, व उठण्याबसण्याकरिता भायखळ्यावरील एक खोली मिळण्यासारखी आहे, पण तेथें झाडझूड, दिवाबत्ती वगैरे करण्यास जवळपास गडी मिळण्यासारखा नाहीं, सबब गिरगावातला एखादा बाल्या अडकवून ठेवावा लागेल, व त्यास प्रत्येक खेपेचें ट्रॅममधून येण्याजाण्याचें भाडे द्यावे लागेल ' हें पत्र वाचून आमची तर छातीच दडपून गेली अशा रीतीने त्रिस्थळीं यात्रा करावी लागल्यास प्रदर्शन दिसण्याचा फारसा संभव नाहीं हें उघड दिसत होतें. सकाळीं उठल्याबरोबर कानावर जानवें ठेवून आळीपाळीनें भायखळ्याच्या ट्रॅममधून ग्रँटरोडवरील खाणावळींत जावयाचें व तेथें प्रातः-काळचे विधि आटपून पुनः ट्रॅमनें परत बिऱ्हाडी यावयाचे, बाकीच्यानीं गड्याची वाट पाहात घरींच ताटकळत बसावयाचें; नतर सर्वांनीं मिळून दहा वाजता बोरीबंदराजवळच्या ' सरदारगृहा 'स जाण्याकरिता कुलाब्याची ट्रॅम पकडावयाची; व जेवण झाल्यावर भरल्या पोटीं वामकुक्षी न करिता धादलीनें

परेळच्या ट्रॅमवर चढावयाचें, सध्याकाळी परत आल्यानंतर पुनः सकाळच्या-प्रमाणें गड्याची मार्गप्रतीक्षा करीत प्रत्येक ट्रॅमकडे पाहात बसावयाचें; व त्यानें दिवाबत्ती केल्यावर जेवणाची व्यवस्था करावयाची शिवाय ट्रॅमच्या दर खेपेस पायधुणी वगैरे मधल्या ठिकाणापाशी थांबावें लागलें तर मग विचारावयासच नको. अशा स्थितींत ट्रॅम, ' सरदारगृह ', खाणावळ व गडी यांखेरीज दुसरा पदार्थ दिसणार कुठून ? निजावयाचे एके ठिकाणीं तर स्नान करावयाचें भलतीकडेच, पोटाची खळी भरावयाची एके ठिकाणीं तर रिकामी करावयाची निराळीकडेच, अशा स्थितींत प्रदर्शन पाहाण्याइतकी मनाची स्वस्थता रहावी कशी !

शेवटीं मोठ्या नाखुषीनें रावसाहेबाकडेच उतरण्याचा बेत करावा लागला. त्याप्रमाणे मी त्याना ताबडतोब पत्र लिहिलें, कीं ' मागील खेपेस आपणास जशी [ माझा मनोभंग करण्याची ] तसदी पडली तशीच, परंतु कांहींशी विस्तृत प्रमाणावर, याही खेपेस द्यावी लागत आहे, व माझी खात्री आहे, कीं आपणांमुळें दीपोत्सव पाहाण्याची जशी माझी [ गैर ] सोय झाली तशी याही खेपेस प्रदर्शन पाहण्याची होईल ' रावसाहेबाच्या घरीं पाहुण्यांची विशेष गर्दी असल्यामुळें या खेपेस त्यांचें नकारार्थी उत्तर येईल अशी मला आशा होती, पण ती त्यांनीं फार वेळ टिकूं दिली नाहीं उलट डाकेनेंच त्यांचे अगत्याचे निमंत्रण आलें, व ती गोष्ट मीं हिरमुसल्या मुद्रेनें माझ्या मित्रास कळविली

आमचा आगगाडीचा प्रवास एकदरीनें बिनबोभाट पार पडला. गाडींतील प्रत्येक डब्यात अतोनात गर्दी असल्यामुळे सारे डबे छापखान्यांतलि खिळे भरलेल्या रकान्याप्रमाणें दिसत होते. आमच्या बांकावरील गर्दींत पाडूताल्याच्या पोटाची पाचर बसल्यामुळें तो तर कायमच्या ठशाच्या ओळीप्रमाणेंच झाला होता. त्यांतील एकही माणूस उठूं म्हणेल तर तें शक्य नव्हते. त्यामुळें इतर बांकावर जी गडबड व धांदल चालली होती ती आमच्या बाकावर मुळींच दिसत नव्हती प्रत्येक उतारूच्या जड व मंद श्वासोच्छ्वासावरून तो मुंबईचा उतारू नसून परलोकचा आहे असें वाटत होतें, व एकदांची जिवंतपणीं मुंबई गांठल्यास नशीब, असें त्यांस वाटत असल्याचें त्याच्या मुद्रेवरून दिसत होतें मध्येंच गाडी कलती होत असें, तेव्हां तात्यांच्या वजनामुळें गाडी उलटते की काय

अशीही धास्ती वाटल्यावांचून रहात नसे. पाडूतात्या मात्र अगदीं निर्धास्त बसले होते. आपल्यामुळें इतर लोक प्राणसंकटांत पडले आहेत हें त्याच्या गावींही नव्हतें गाडींत बसल्यावर लवकरच त्यानीं मुक्तकंठानें गाण्यास सुरवात केली, व थोड्या वेळात त्यांनीं असें एकही संगीत नाटक ठेविले नाही, कीं ज्याची कंठा ग्रत्ति त्याजकडून निघावयाची राहिली शाकुंतलातील नटीचें पद आपल्या कर्कश आवाजानें म्हणून नतर 'तुझ्या मधुर गानाच्या नादें वेडावुनी हा गेला.' ही सूत्रधाराची शाबासकीही त्यानी स्वतःच घेतली. इतर उतारूही आपल्या गाण्यानें वेडावून गेले आहेत हें विनयामुळें त्यांच्या लक्ष्यात आले नाहीं. यापुढीलही सर्व नाटक त्यानीं एकट्यानींच सपविलें. शेवटीं भरतवाक्य झालें तेव्हा तरी तात्या स्वत· विसावा घेतील व आम्हास देतील अशी मला आशा वाटू लागते न लागते तोंच त्यांनीं 'नमुनि ईशचरणां'स सुरवात केली तेव्हा आम्ही सर्वांनीं एकदिलानें किर्लोस्करांच्या कवित्वशक्तीस मनांतल्या मनात लाखोली मोजली. मध्यतरीं स्टेशनें केव्हा येत व केव्हां निघून जात हेही आम्हांला कळेना. कारण गर्दीमुळें इकडची मान तिकडे करण्यास सुद्धा रीघ नव्हती, व आगगाडीच्या शिट्याही पाडू तात्याच्या आवाजात मुळींच ऐकू येत नव्हत्या. या गाण्याबद्दल स्टेशनमास्तरापाशी कागाळी करण्याचें एका उतारूच्या मनात आलें होतें, पण बिचारा तसें करण्यास उठू लागला तों हलवून बळकट केलेल्या खुट्याप्रमाणें तो स्वस्थानीं पूर्वीपेक्षाही घट्ट रुतून बसला. आम्ही एका बाकावरील दहा माणसें मुबईस पोहोचत तोपर्यंत दशमुखी रावण बनतो की काय अशी आम्हास भीति वाटू लागली! काही वेळानें तात्यानीं आपण होऊनच गाणे बद केले पण गाण्याऐवजी आता त्याचे घोरणें सुरू झालें, व तें त्याच्या गाण्यापेक्षा विशेष गोड किंवा सुरेल नाही, अशी माझी लवकरच खात्री झाली. इतक्या एकाग्रतेने त्याच्या गाण्या-घोरण्याच्या सामर्थ्याचें चिंतन करण्याचा मला आजपर्यंत प्रसंग आला नव्हता, त्यामुळें त्याची मला नीटशी कल्पना नव्हती. सकटाशिवाय मित्राची पारख होत नाहीं म्हणतात ते अक्षरशः खरें आहे

शेवटीं आम्हीं एकदाची मुबई गाठली. आम्ही मुबई गाठली असें म्हणण्यापेक्षा मुबईनें आम्हाला गाठलें असें म्हणणेंच विशेष खरें होईल. कारण आमची गाडी अक्षरश. मुगीच्या पावलानें चालत होती. तिला आज

किती उशीर झाला आहे हे आम्हास कळण्याचें साधन नव्हते कारण एकट्या पाडुतात्याजवळ काय ते घड्याळ होते, व त्याचा दृश्यभाग म्हणजे सांखळीच काय ती सर्वांत दुरुस्त होती हें वाचकाना माहीत आहेच. मुबईस पोहों-चल्यावर आम्हाला कळून आले, की गाडीला आठ घंटे उशीर झाला आहे. इतका उशीर झाल्याबद्दल गार्डास कदाचित् आश्चर्य वाटलें असेल, पण त्यापैकीं सहा घड्याचे श्रेय एकट्या पाडूतात्याकडे आहे हे आमच्या डब्यातील प्रत्येक इसम जाणून होता गाडी उभी राहून समोरील बाकावरील माणसे उतरून गेल्यावर आता उतरावयाचें कसे हा प्रश्न आम्हापुढे उभा राहिला. परंतु त्यावर खुद्द तात्यानीच तोड काढिली. त्यानी प्रथम आपले पोट फुगवून थोडीशी अधिक जागा व्यापिली, व लागलीच त्याचा एकदम सकोच करून इतर उतारूंची स्थितिस्थापकता निदर्शनास येण्यापूर्वी ते चटकन् उठून उभे राहिले त्या एका क्षणांत त्यांनी आम्हा बाकीच्या उतारूस प्राणांतिक वेदनेचा व तन्मुक्ततेचा अनुभव आणून दिला. उतरल्यावर तात्याशिवाय प्रत्येकास आपले शरीर एक एक इचाने तरी कमी झाल्याचे दिसून आले. पण हें व्यग दोनचार महिने पौष्टिक औषधें घेऊन नाहीसें करण्यासारखे होते. आम्ही धडपणें येऊन पोहोचलों हीच गोष्ट विशेष होती, व तिजबद्दल आम्हीं परमेश्वराचे मनःपूर्वक आभार मानिले.

घरी आल्यावर तिघानी प्रातर्विधि उरकून रावसाहेबाबरोबर भोजन केलें. नतर वामकुक्षी करण्यासाठी लवंडतों, तों रावसाहेबाकडून त्याचा गडी चप्पी करण्याकरिता आला 'आता वर्षभर चप्पीची जरूर नाही' असे म्हणून आम्हीं त्याला निरोप दिला. निजून उठल्यावर मुंबईस भरणाऱ्या अनेक सभासंबधाने दिवाणखान्यात चर्चा चालली होती तिकडे जाऊन आम्ही ती ऐकत बसलो

राष्ट्रीय सभेच्या सुमुहूर्तावर सालाबादप्रमाणें या वर्षीहि सामाजिक परिषद भरणार होती. तिची टवाळी करण्याकरिता हजर राहण्याचा आम्हा त्रिवर्गांचा निश्चय झाला होता स्त्रियाची परिषदही भरणार होती, व तिला जाण्याचें सुद्धा आमच्या फार मनात होते. गावी असताना आम्ही असे ऐकलें होतें, की या सभेस पुरुषांस बसण्याकरिता चिकाच्या पडद्याची व्यवस्था करण्यात येणार असून त्यानीं मिशावरून वस्तरे फिरविल्यास व बुरखे घेतल्यास त्यास स्त्रियाच्या जागेंतही सोडण्यात येणार आहे. तसें करण्याची आमची

तयारीही होती पण मुबईस गेल्यावर ते सगळे खोटे ठरले याप्रमाणें झालेली निराशा आम्हीं [ स्वतःच्या बायका वगळून ] एकदर स्त्रीजातीस, [ खुद्दाच्या स्वाऱ्या वर्ज्य करून ] त्याच्या नवऱ्यास व सुधारकास शिमगा नसताही अनेक शिव्या देऊन भरून काढली. असो याच सुमारास पचांग-शोधनसभेच्याही बैठकी चालल्या होत्या पण उपोषणाचे दिवस, सण, घातवार, व्यतिपात इत्यादि किरकोळ गोष्टींशिवाय पचागाच्या एकाही अगाचें आम्हाला अंग नसल्यामुळे आम्ही त्या सभेच्या वाटेस गेलो नाहीं व या रीतीने तिला जरूर असणाऱ्या शाततेचा भग न केल्यामुळे तिने उकरलेल्या कार्यभागाचे अंतशः वाटेकरी झालें.

राष्ट्रीय सभेच्या पहिल्या दिवशीं तिच्या मंडपाकडे प्रेक्षकाच्या झुंडीवर झुंडी लोटतील व प्रदर्शनाकडे चिटपाखरू सुद्धा जाणार नाहीं असा आम्ही कयास बाधला होता, व सगळी मुबई अध्यक्षाचें न ऐकूं येणारें भाषण ऐकण्यात व त्यालाच उलट कानठाळ्या बसविणाऱ्या आपल्या टाळ्या ऐकविण्यात गर्क झाली असता, आपण त्रिवर्गानीं हळूच लपून जाऊन प्रदर्शनावर छापा घालावा व तेथील चमत्कार मनसोक्त लुटावे असा सकेत केला होता त्यास अनुसरून दुसऱ्या दिवशी आम्ही खरोखरच प्रदर्शन पाहाण्याच्या तयारीनें बाहेर पडलों तेव्हा रावसाहेबानी बरोबर एक वाटाड्या दिला. पण रावसाहे-बाच्या मदतीचा अर्थ मला आधीच पूर्णपणे कळून चुकलेला असल्यामुळे मी काही तरी सबब पुढे करून त्याला झुकाडी दिली.

बरोबर अडीच वाजता आम्ही ट्रॅममध्ये बसून रवाना झालो. मी नुकताच तीन वर्षापूर्वी मुबईस आलेला असल्यामुळे चुका करण्यापुरतें तेथील रस्त्याचे ज्ञान व झालेल्या चुका नाकबूल करण्याइतके धाडस मी पैदा केलें होतें. त्यामुळें माझ्या मित्राच्या वाटाडेपणाचा पत्कर मीच आपल्या शिरावर घेतला; व बसल्या वेळेपासून तों कोटात पोहोंचेपर्यंत जे जे रस्ते, इमारती वगैरे प्रकार दिसले त्याबद्दल काल्पनिक गोष्टी ऐतिहासिक म्हणून सागून त्याचें अज्ञान माझ्या स्वतःच्या अज्ञानाच्या तोडीस आणून बसविले. पायधुणीची व नळबाजाराची व्युत्पत्ति मी अशी केली, की वल्लभी पंथाच्या स्त्रिया आपल्या गुरूचे पाय धुण्याकरिता रोज पायधुणीपाशी जमतात, व त्या चरणतीर्थाचे जे पाट वहातात त्याचें पाणी नळाच्या द्वारें नळबाजारात येऊन तेथें जाहीर लिलाव

पुकारून विकले जाते. हे ऐकत असता पाडूतात्यास त्या धर्मगुरूचा हेवा वाटत असलेला दिसला. पायधुणीपाशीं बाटलीवाल्याच्या इस्पितळावरून आलेला रस्ता मिळतो या बाटलीवाल्याबद्दल मीं अशी गप्प झोकून दिली, कीं हा बाटलीवाला बाटलाभाईचा निस्सीम भक्त असून त्याच्या रिकाम्या बाटल्याची सख्या शेवटी इतकी झाली, की त्याचे एक स्वतन्त्र इस्पितळ करण्यात आले. हें माझें बरळणें त्या वेळी नाना व तात्या याशिवाय ज्यानीं ज्यानी म्हणून ऐकले असेल त्यांनी मी बाटलीवाल्यावर केलेला आरोप मनातल्या मनात मजवरच केला असेल खास असो. आम्ही पायधुणी सोडून क्राफर्ड मार्केट-जवळ जेव्हा येऊन पोहोंचलो तेव्हा मी माझ्या मित्राना त्याबद्दल बेधडक असें सागितलें, कीं येथे एक साहेब लाचाचा बाजार भरवीत असत व त्याची कृष्ण कृत्ये उघडकीस यावी म्हणूनच येथे विजेचे दिवे लावण्यात येऊ लागले. हे स्पष्टीकरण चाललें असताना ट्रॅमचा गाडीवान व तिकिटें विकणारा याज-मध्यें आम्हासबंधाने नेत्रसकेत चालले होते, व इतर उतारू लोकही तोंडास रुमाल लावून आपले हंसूं दाबीत होते. आणि खरोखरीच त्याच्याकडे फारशी चूक नव्हती कारण बहूनानाच्या डोक्याच्या रुमालाचें एक टोंक पाठीवर मोकळे लोबत असून शिवाय शेंडीची एक बटही वरून बाहेर डोकावीत होती, व लघुशकेकरिता कानावर ठेविलेले जानवे अजून जसेच्या तसेंच टागलेलें होते. इकडे पाडूतात्याही मुंबईच्या भव्य इमारतींवरील मोठी घड्याळें समोर दिसत असताही वारवार आपले घड्याळ खिशाबाहेर अर्धवट काढून पाहात होते त्याच्या मुद्रावरून व कृतीवर हे कोणी तरी अस्सल गावढळ असावेत अशी प्रत्येकाची खात्री होऊन चुकली होती.

आमची ट्रॅम कोटात गेल्यावर लवकरच तिच्यातील बहुतेक मंडळी खालीं उतरली ती राष्ट्रीय सभेस जाणारी असावी असें मला प्रथम वाटलें, पण पुढें कंडक्टरास विचारता त्याजकडून कळलें, कीं ते प्रदर्शनास जाणारे लोकच होते. ते ऐकताच पाडूतात्या एकदम जागेवरून उठले, आणि ट्रॅम भरधाव चालत असताच त्यांनी उलट दिशेनें खाली उडी टाकिली व हा हा म्हणतां भुईवर लोटांगण घातलें! थोडक्यात चुकले, नाहीं तर समोरून वेगानें येणारी एक गाडी तात्यांच्या अंगावरून जाऊन तिला चागलाच अपघात झाला असता तात्या पडलेले पाहून तमासगीर लोक खो खो करून हसूं लागले.

या वेळीं तात्याना दोन अर्थानी दे माय धरणी ठाय असें झाले होते. तीं त्यांची अवस्था पाहून मीही घाईघाईनें पण तेवढ्यातल्या तेवढ्यात 'सबूर एकदम' असा ठासून हुकूम सोडून खाली उतरलों व तात्यास हात देण्याकरिता धावलों. पण मी पोहोचण्यापूर्वीच तात्या अकल्पित चपळाईनें दोन पायावर उभे राहिले होते त्यानी उठल्याबरोबर चोहोकडे एकदा दृष्टि फेंकली मुबई नेहमीप्रमाणेच गजबजलेली पाहून त्याची निराशा झालेली दिसली. नतर अगावरचा धुरळा झाडून व मुबापुरस्थ लोकाच्या असभ्य वर्तनाबद्दल त्याना शिव्या हसडून ते आम्हाबरोबर प्रदर्शनाकडे निघाले.

प्रदर्शनापाशी जाऊन पोहोचल्यावर दरवाज्याबाहेर मीं तिकिटे घेतलीं, व एक एक इसम सोडावयाची योजना केलेल्या अरुद लोखडी फाटकातून आम्ही आत गेलो पाहूतात्या क्षणभर फाटकात अडकून राहिले होते, पण शिरावयास उतावळे झालेल्या मागील लोकानी पुढे लोटून त्याची मुक्तता केली. आत जाऊन पाहिलें, तो चोहोकडे अत्यत गर्दी झालेली दिसली, व आम्हासारखे हजारो राष्ट्रभक्त राष्ट्रीय सभेस गोते खात ठेवून प्रदर्शनाकडे झुकलेले दिसले

यापुढे प्रदर्शनात आम्हाला काय काय चमत्कार दिसले हें कोठवर सागू? चोहोंकडे सर्व हिंदुस्थानातील निसर्गनिर्मित व मनुष्यकृत सुदर सुदर व उपयुक्त वस्तु व्यवस्थित रीतीने माडून ठेविल्या होत्या आपण सुवर्णभूमीने तयार केलेली गौरीची आरासच पाहात आहोंत असा क्षणभर भास झाल्यावाचून रहात नव्हता. तिकडे राष्ट्रीय सभेच्या मडपात प्रत्येक प्रातातील उत्तमोत्तम मनुष्यें जशीं एकवटलेली होती त्याप्रमाणे इकडे सर्व भागातील अचेतन सुदर वस्तु गोळा झालेल्या दिसल्या. एकीकडे आत पाणी कोडणारा पाषाण होता तर दुसरीकडे पारा गाळणारा पेला होता. एकीकडे रुप्याचा चिमुकला हत्ती होता तर दुसरीकडे एक लोखडाचा अजस्र नाल होता. एकीकडे राजस्त्रियाची तर दुसरीकडे अनाथ बालकाची कारागिरी होती. एकीकडे पाणीदार माणकें होती, तर दुसरीकडे माणकाच्या पाण्याचीं कारजीं होती. एकीकडे राजवाड्यात शोभण्यासारखे कापड तर दुसरीकडे कापडी राजवाडा होता. स्त्रियाच्या कलाभवनात हुबेहुब स्त्रियासारखीं चित्रे होती. तर युरोपियन लोकाच्या दुकानांतून चित्रासारख्या स्त्रिया होत्या. एकीकडे तत्काळ

प्राण घेणारे बोटभर सर्प तर दुसरीकडे प्रेक्षकाच्या वाटेस न जाणारा साखरेचा प्रचंड सिंह होता. या सिंहास पाहून आमच्या तोंडचे पाणी पळण्याऐवजी उलट तोंडास पाणी सुटले मात्र, व आपण त्याच्या पोटात जाऊ या भीतीऐवजी तो आपल्या पोटात जावा अशी इच्छा झाली. जे बहुनाना थोड्या वेळापूर्वी काचेच्या कपाटांत ठेविलेल्या विषारी सर्पापासून दूर अंतरावर व वेळ पडल्यास पळून जाण्याच्या तयारीने उभे होते ते या सिंहाच्या पाठीवरून ममतेने हात फिरवूं लागले पाहुतात्यांनीं तर हा खरोखरीच साखरेचा आहे की काय हें पाहण्याकरिता त्याच्या शेपटीचें टोक नकळत लाववून आपल्या तोंडात टाकण्यासही कमी केलें नाही. पण तो गंभीर प्राणी या ग्रामसिंहाची सलगी मुकाट्यानें सोशीत निश्चळ उभा राहिला. जवळच मिठाईच्या सुंदर सुंदर चिमुकल्या इमारतीही होत्या. त्याचें काम फारच कुसरीने केलेले होते तें करणारे शिल्पी लोक भूकतहान विसरून अनेक दिवस काम करीत असावे असे सहज दिसून येत होतें एखादे वेळी पोटात कावळे ओरडू लागल्यास फार तर इमारतीचा एखादा मजला गट्ट करीत असतील तेवढाच काय तो !

आजपर्यंत आमची अशी समजूत होती, कीं बायकाचे काम काय तें चुलीपुढचेच, आणि झारा व पळी हींच काय ती त्याचीं हत्यारें. अशा स्त्रियांच्या हातचे काम प्रदर्शनात मांडले जाणार आहे असें जेव्हा आम्हीं आपल्या गावी ऐकिले होते तेव्हा आम्हीं त्याची बेसुमार थट्टा केली होती. पण खरा प्रकार पाहिल्याबरोबर आमचे डोळे दिपून गेले, व आमची खात्री झाली, कीं स्त्रियाचा हात नुसत्या दागिन्याच्याच बाबतीत पुरुषाच्या हातापेक्षा काकणभर अधिक नसून कलेच्या दृष्टीनेंही आहे. अशी खात्री होऊनही त्याच्या योग्यतेबद्दल विनाकारण नसत्या शंका काढण्याचें व्रत मी अजून चालूच ठेविले आहे. कशाही संकटास न जुमानता, इतकेंच नाहीं तर आपले दात आपल्याच घशात जाण्याचा प्रसंग आला असताही, स्त्रियावर खरे नसले तरी शाब्दिक वर्चस्व स्थापण्यातच खरा पुरुषार्थ आहे असें मीं आपल्या मनास सांगतच असतो.

आमच्यावर प्रदर्शनाचा परिणाम झाला तसा आमचाही प्रदर्शनावर झाला. पाहुतात्याच्या निष्काळजीपणामुळे प्रदर्शनातील वस्तु बऱ्याच वेळा अस्ता-

व्यस्त होत, व त्याबद्दल रखवालदारांकडून आम्हाला बोलून घ्यावें लागे पण या बोलण्याचा तात्यावर मुळींच परिणाम होत नसे. ते शिष्टाचाराची पर्वा न करिता, व बायकापोरें न पाहाता, आपल्या सरळ व लांब नाकासमोर बेधडक चालत असत, मार्गांत ज्या माणसाची चेंगराचेंगर होई त्याच्या शिव्या फुलाप्रमाणें मानीत, एखाद्या विजयी वीराप्रमाणें विजयानंदानें पुढें सरसावत असत, आणि एखाद्या महात्म्याप्रमाणें स्वकृत मार्गापासून एक केसभरही ढळत नसत. प्रदर्शनांत आंधळ्यांनीं डोळसाप्रमाणें केलेले काम पाहून तेथील प्रेक्षकगण खूष होऊन जात असे पण बिचाऱ्या पाडूतात्यांनीं डोळस असून आंधळ्याप्रमाणे केलेले काम पाहून कोणींही कौतुक केलें नाहीं !

प्रदर्शनांत मनोरंजनाचीं जीं स्थानें होतीं त्यापैकीं एक आरसेमहाल फार प्रेक्षणीय होता त्यांत ठेविलेले आरसे प्रेक्षकाचें स्वरूप एखाद्या निंदकाप्रमाणे भेसूर करून दाखवीत असत. त्याचेसमोर सुंदर स्त्रियांची तर लाजेनें पुरेवाट होई आम्ही प्रथम ज्या आरशापाशीं उभे राहिलो त्यांत तीन कुरूप, लठ्ठ व ठेंगण्या आकृती पाहून मनस्वी हसू लागलों. त्याबरोबर त्या तीन आकृतिही विकट हास्य करूं लागल्या तेव्हां या आकृती आपल्याच आहेत हे कळून आम्ही आपापल्या मनांत विरून गेलों. यानंतर जलक्रीडास्थानाकडे गेलों. तेथें उतारूनीं भरलेल्या नौका एका उंचवट्यापासून रुळावरून गडगडत खालीं पाण्यात पडत असत आम्ही जेव्हां एका नौकेंत जाऊन बसलो तेव्हां बहूनाना भीतीनें गर्भगळित होऊन गेले, व त्यांनीं मरणोत्तर आपल्या जिंदगीची काय अवस्था करावयाची हे मला घाईघाईने सांगितले. पाडूतात्यांनी मात्र नौका सुटावयास एकदोन मिनिटांची अवधि आहेशी पाहून तेवढ्यातल्या तेवढ्यांत डोळे मिटून स्वस्थ झोंप घेतली. इतका या दोघांच्या स्वभावांत विरोध आहे !

एके ठिकाणीं आम्हांला अनेक प्रकारचे व लाखो रुपयांचे जवाहीर मांडलेले दिसलें, परंतु सर्व प्रकारचे भोग नाशवंत आहेत असा पोक्त विचार करून आम्हीं तें खरेदी करण्याचें साफ नाकारिलें.

संध्याकाळीं साडेसात वाजता आमचे सर्व प्रदर्शन पाहाणे व स्वतःचें प्रदर्शन दाखविणें संपून गेलें. चोहोंकडे सारखें फिरत असल्यामुळे आमचे पाय दमून गेले होते. व आम्हांस भकही सपाटून लागली होती. सबब

फराळाच्या दुकानीं जाऊन उपाहार करण्याचें आम्ही योजिले. तेथे गेल्यावर शोध करिता पुऱ्या, भजी, बासुंदी, भाज्या, चटण्या, चहा, कॉफी, आइस्क्रीम, कोल्ड्रिंक वगैरे सर्व तयार असल्याचें कळून आले पण मी व बङूनाना पडलों कडकडीत सोंवळ्याचे, यामुळें आम्हास त्याचा फारसा उपयोग होण्यासारखा नव्हता. शेवटीं भवति न भवति होऊन मीं व बंडूनानानी नुसतें आटीव दूध घ्यावें व पाडूतात्यानी सगळ्या साहित्याचा यथाशक्ति समाचार घ्यावा असें ठरले आत गेल्यावर पाटाऐवजी खुर्च्या टेबलें माडलेलीं दिसून आलीं खुर्चीवर पाडूतात्या मोठ्या आनदानें व आम्ही दोघे नाखुषीने जाऊन बसलो. लागलीच आम्हापुढे आटीव मसालेदार दुधाचे पेले व पाडूतात्यापुढे पुऱ्याची बशी आली. पदार्थ आणणारा इसम चटण्याभाज्याची दुसरी बशी आणतो तो, त्यास पुऱ्याची बशी कोरी करकरीत असलेली दिसून आली. आपण कदाचित् ती बशी विस्मृतीमुळे न वाढताच आणिली असेल, अशी शका येऊन ती त्याने पुन वाढून आणण्याकरिता आत नेली व पुऱ्या भरून परत आणिली तोंपर्यंत तात्यांनीं भाज्या व चटण्या मटकावल्या होत्या अशा रीतीनें तात्यानी त्या वाढप्यास पाचदहा फेऱ्या करावयास लाविलें, आणि पुऱ्याची व तोंडी लावण्याची पोटाबाहेर गाठ म्हणून पडू दिली नाही. मध्यतरी दुसऱ्या एका गिऱ्हाइकाकरिता एक वाढपी पुऱ्याची चळत नेत होता, ती आपल्याकरिताच आहे अशा समजाने तात्यानी ती त्याच्या हातातून ओढून घेऊन, त्या उमेटाच्या तक्रारीकडे लक्ष्य न देता, क्षणार्धांत आपला राग व पुऱ्या ही बरोबरच गिळून टाकिलीं. या अन्नहोमाचा शेवटी असा परिणाम झाला, की तात्याच्या वाढप्यावर पुऱ्या सपल्या असे सागण्याची पाळी आली. तेव्हा तात्यानी म्हटलें, 'काही हरकत नाहीं. आपणाला काय? पुऱ्या नाही तर दुसरे काही तरी' वाढप्याने लगबगीनें जाऊन आइसक्रीमच्या चार बशा व कोल्ड्रिंकचे दोन पेले आणिले. त्यानें परत पाठ फिरविण्याचाच काय तो अवकाश, तात्यानीं दोन्ही पेल्यातील ऐवज आपल्या पोटात रिचवून पेले परत त्याच्या स्वाधीन केले, व आणखी चार पेले आणण्यास त्यास फर्माविलें. वाढपी आश्चर्यानें तात्यांच्या तोंडाकडे पाहातच राहिला, पण त्या चार बशा पार होण्यापूर्वी आपणास चार पेले आणावयाचे आहेत याचें स्मरण होऊन तो तातडीनें निघून गेला. इकडे आम्ही तात्याचा हा भ्रष्टाकार पाहून त्याना

अनेक दूषणें देऊं लागलों, आणि मरणानतर यमराज तापलेल्या तव्यावर उभे करतील व खाचेत फेंकून देतील अशी अनेक प्रकारे दहशत घालूं लागलों. काही वेळ तात्याना आमच्या धमक्या ऐकून घेण्यास फुरसतच सापडेना. समोर आल्या त्या सगळ्या वस्तूना पोटात जागा दिल्यावर ते आम्हाकडे वळून म्हणाले, 'तुम्ही ज्या खाचेची मला भीति दाखविता ती या पोटाच्या खाचेइतकी खोल असेल का? तुम्ही ज्या आगीची बडेजाव सागत आहात ती या जठराग्नीइतकी जाज्वल्य आहे काय!'

आम्हासही तात्याच्या पोटाकडे पाहून त्याचे बोलणे पटले तरी आपला असा जिवलग मित्र एकटाच नरकात होरपळत पडणार याबद्दलची तळमळ काही केल्या राहीना इतक्यात वाढप्याने पुनः कोंटिङ्कचे चार पेले आणिले. त्यातील रगदार पाणी पाहून तात्याबद्दलची अंतर्यामीची हुरहुर दुणावली, व मी बहूनानास म्हटले, 'नाना, तात्याच्या कपाळींचा नरकवास काही केल्या चुकत नाही. प्रश्न इतकाच राहिला, की त्यानीं एकटेच खितपत पडावे कीं त्याना त्यान्या मित्राची संगत असावी ते अग्निकुडात एकटेच होरळपळत पडले तर आपल्या मैत्रीचा त्याना काय उपयोग?'

लागलीच आम्हा दोघाच्या तोडातून एकदम असे उद्गार बाहेर पडले, की 'तात्या, या डोळ्यादेखत तुम्हाला एकट्यांना नरकात जाताना पाहावत नाही. आमच्यासाठीही दोन दोन पेले व दोन दोन आईस्क्रीमच्या बशा आणवा कसे!'

पाहूतात्या हे ऐकून येवढ्या मोठ्यानें हसले, की भोवतालच्या टेबलापाशी बसलेले सर्वजण आमच्याकडे टकमका पाहू लागले तात्या नुसते हंसूनच राहिले नाहीत. ते आपल्या राक्षसी आवाजाने म्हणाले, 'अरे वा! तुमचा उद्धारकपणाही माझ्या देशी कापडाच्या अभिमानासारखा बराच लवचिक आहे तर! ठीक आहे तुमची इच्छा असेल तर याच्याही पलीकडचे पाव, बिस्किटें वगैरे खुसखुशीत पदार्थ मागविण्यास माझी हरकत नाहीं!'

हे त्याचें बोलणें चाललें असताना आम्ही लाजेनें खाली पाहात होतों केवळ मित्राच्या कल्याणाकरिता आपलें पारमार्थिक अकल्याण करून घेण्यास तयार झालेल्या मनुष्यावर जिव्हालौल्याचा आरोप आला तर त्यानें लाजूं नये तर काय करावें?

रगहून फराळ झाल्यावर आम्ही मोठ्या दरवाजासमोरील सुदर कारंजा-पाशी गेलों व तेथील एका बाकावर बसलो या कारंजाभोंवतीं इतके थोडे बाक माडिले होते, की उपहारगृहात पक्वान्नाचे दिवाळे काढण्यात बहुतेक मडळी गुतली नसती, तर आम्हाला तेथे बसण्यापुरतीही जागा मिळाली नसती असो या वेळचा देखावा फारच सुंदर दिसत होता. चौफेर विजेच्या दिव्याची रोषनाई केली होती विजेच्या सहाय्यास इद्रधनुष्य आलें आहे असें भासविण्याकरिताच की काय, कारज्यातील उडणाऱ्या पाण्यावर ताबडा, गुलाबी, निळा, हिरवा, अस्मानी, जाभळा असे नाना रंगाचे किरण पाडण्यात येत होते. त्यामुळे आपण मेघाच्या उदरात प्रवेश केला आहे असे क्षणभर वाटल्यावाचून रहात नसे पाण्यावर पडणारा प्रकाश वारंवार बदलण्यात येई. त्यामुळे ‘ पानी तेरा रग कैसा ! जिसमें मिलाया वैसा ’ या म्हणीत वर्णिलेला पाण्याचा स्वभाव क्षणोक्षणी दृग्गोचर होत होता हा सर्व प्रकार स्वप्नसृष्टीतील एकामागून एक दिसून तत्काल नाहींशा होणाऱ्या सुदर व विचित्र चमत्काराच्या घटोत्कची मायेप्रमाणे होता. कारजातील पाण्याचे हजारों शीतल तुषार आमच्या थकलेल्या अवयवाना सुख देत होते. मधून मधून अनेक सुदर स्त्री–पुरुष चारुवेष घेऊन व परोपरीचे अलकार घालून सचार करिताना दिसत होते. त्याच्या कपड्याचा सुवास चारी बाजूस दरवळून राहिला होता. जवळच वाजत असलेलीं सुस्वर वाद्यें कर्णास अनुपम आनद देत होतीं या सर्व अनुभवात नुकत्याच सेविलेल्या अमृततुल्य पक्वान्नाचे अजून जिभेवर रेगाळत असलेले माधुर्य मिळविलें, म्हणजे आमची पंच ज्ञानेंद्रियें एकसमयावच्छेदेकरून स्वर्गसुख भोगीत होतीं असे म्हटल्यास कोणासही अतिशयोक्ति वाटावयास नको असें सर्वोत्तम सुख सद्गुणी मनुष्यास मरणानतर खास मिळणार, अशी जर प्रत्येक मनुष्याची खात्री होईल तर जगात पाप औषधाकरिताही दृष्टीस पडावयाचे नाहीं

रात्री नऊ वाजण्याचे सुमारास आम्ही बी. बी सी. आय्. आगगाडीच्या पहिल्या वर्गाच्या डब्यातून घरीं परत आलों आगगाडीतून येण्याचें कारण हे, की दुपारपासून आमच्या मनात ट्रॅमगाडीबद्दल एका विशेष कारणामुळें प्रतिकूल ग्रह झाला होता. पहिल्या वर्गांतून येण्याचें कारण असे, कीं चर्चगेट स्टेशनापासून ग्रॅंटरोडपर्यंत पहिल्या वर्गाच्या तिकिटास फारच कमी पैसे

पडतात, व अशा लहान भाड्यात आम्हाला फार मोठा फायदा होण्यासारखा होता. तो हाच, की आम्ही कधीं कधीं पहिल्या वर्गानें प्रवास करितों अशी शपथ वाहण्यास आम्ही मोकळे होणार होतों. मला खोटे बोलण्याचा किती कटाळा आहे याचा वाचकास पूर्ण अनुभव आहेच.

---

मुष्टि १५ वी *

# चोरांचें संमेलन

आजकालच्या काळ सभा, परिषदा, संमेलने याचा आहे. राष्ट्रीय, सामाजिक व धार्मिक सभा तर प्रसिद्धच आहेत, पण याशिवाय विशिष्ट धंदेवाल्याच्या व जातीच्या सभाही नेहमी होत असलेल्या आपण पाहातों हे काय, तर म्हणे ग्रंथकाराचे समेलन, तें काय, तर म्हणे नाटकवाल्याचे संमेलन, ही काय, तर मुसलमानाची परिषद, ती काय, तर महार लोकाची सभा, गिरणीवाल्याचे, तारवाल्याचे वगैरे संप हेही या सहतिपर चळवळीचेच प्रकार आहेत. फरक इतकाच, कीं सभाचा प्रवृत्तीकडे आणि संपाच्या निवृत्तीकडे कल दिसून येतो

या चळवळीना अलीकडे इतका ऊत येण्याचें कारण काय? आमच्या लोकाच्या मनात दिवसेंदिवस जुटीचें खरें महत्व चागल्या रीतीनें बिंबू लागलें आहे की काय? किंवा आमची वृति उत्सवप्रिय आणि या सभाही उत्सवाच्याच नमुन्यावर होत असल्यामुळे आम्ही त्याकडे वारवार आकर्षिले जात आहोंत? अथवा आमच्यातील तीर्थाटनेच्छु किंवा नाविन्यप्रिय मंडळीला आपली तलफ या सभाच्या निमित्तानें पुरी करिता येत असल्यामुळें त्यांना इतकी गर्दी जमत असते? अगर निरुद्योगी माणसाना आपला अमोलिक [म्हणजे ज्याचे मोल कवडीच्याही किंमतीचें नसतें!] वेळ दवडण्याला या सभा उत्कृष्ट साधनें असल्यामुळें त्यांजकडे इतका समूह लोटत असतो? या सभापासून लभ्याश पाहूं गेले तर आगगाड्याचें उत्पन्न अतोनात वाढण्यापलीकडे फारसा दिसणार नाही दूरदूरच्या सभासदाना तर

* मनोरजन, पु. १८, अंक १ [सन १९०८]

या सभा म्हणजे, काल व दिशा पाहाता पाहाता एकदम नष्ट करण्याचा एक उत्तम मार्गच सापडला आहे.

ही सभाची साथ समाजाच्या शिखरापाशीं उद्भवून खाली पसरत पसरत हल्ली किती खोल जाऊन पोहोंचली आहे हें मला नुकतेच पाहावयास सापडलें. गेल्या महिन्याचे आरंभापासून आमच्या गांवात रोज नवे नवे चेहरे दिसावयाला लागले. या साऱ्या चेहऱ्याचे बहुधा एकच वळण असे. सर्वांचा काळा वर्ण व राठ केस ! सर्वांचे गाल वर आलेले, माना जाड व आखूड, आणि दृष्टि चचल ! पहिल्यानें तर या आगंतुक पाहुण्याचा आम्हाला उमजच पडेना आणि त्याच्या ठावठिकाणाचाही पत्ता लागेना पण ते गावात येण्याला आणि गावातील चोऱ्याची संख्या वाढण्याला एकच गांठ पडली, यावरून आम्ही लवकरच तर्क बाधला, की या साऱ्या महात्म्याचा कटाक्ष दुसऱ्याच्या समृद्धीवर असून गावकऱ्याना आपापल्या मालमत्तेसबधानें अधिक दक्षता शिकविण्याच्या उच्च हेतूनेच हे येथें आले आहेत जों जों याचे देशबाधव अधिकाधिक सपन्न होतील तों तो या उदारधीना आनंदच वाटावयाचा, आणि

'या निशा सर्वभूताना तस्या जागर्ति सयमी'

या वर्णनातील सयम्याप्रमाणे इतर लोक निद्रावश असताना स्वतः जागून आणि अगाने खपून इतराची सचितधनविषयक चिंता दूर करावयाचा हा उदात्त व्यवसायच यानी अंगिकारिला आहे. आमची सर्वांची त्याच्या व्यवसायाबद्दल खात्री होताच आम्हीं लागलीच पोलिसात वर्दी दिली. उद्देश हा, की त्यानी या योगिराजाना त्याजकडून भाडे न घेता त्याच्याजोगे एकान्तवासाचें सुख मिळवून द्यावें परतु पोलिसानी, त्याना सोडून, ग्रामवासी लोकानाच बिनभाड्याच्या घरात पोहोचविण्याचा सपाटा सुरू केल्यामुळें 'भीक नको पण कुत्रा आवर' असें आम्हाला होऊन आम्ही तो नाद सोडून दिला.

सगतीचा केवढा महिमा आहे पहा ! जोपर्यंत आमच्या पाहुण्याची सख्या कमी होती तोंपर्यंत आमच्या गावाची नीतिमत्ता शाबूत होती. पुढें ती संख्या वाढता वाढता इतकी झाली, की ते यजमान व आम्ही पाहुणे शोभू लागलो, आणि आम्हाला आपल्या सावपणाची लाज वाटू लागली ! पहिल्यानें गावकऱ्याच्याच काय त्या चोऱ्या होत असत, पण हळूहळू त्या कमी होत जाऊन पुढें पुढें तर चोरच आपापसात चोऱ्या करू लागले. आम्हीं आपले नीतिधैर्य

बरेच दिवस थोपवून धरिले होतें. पण मूर्खांच्या समाजात शहाणपणास ज्याप्रमाणें मूर्खपणाचेच स्वरूप येतें त्याप्रमाणें त्या चोराच्या समाजात भावाची किंमत हळूहळू कमी होत जाऊन आमची प्रवृत्ति चौर्यकर्माकडे होऊं लागली. माझ्या पहिल्या चोऱ्या अल्पस्वल्पच असत. उदाहरणार्थ, एखादा चोर जवळून जात असल्यास मी नुसते आपले अंगच चोरावें. नंतर मी स्वत च्याच पैशाची चोरी करू लागलों, म्हणजे असें, की या पेटीतला पैसा त्या पेटीत ठेवावा आणि त्या पेटीतला दागिना या पेटीत दडवावा, आणि हे कृत्य चालले असताना कोणी मजकडे पाहात आहे कीं काय म्हणून चोहोंकडे सभय दृष्टीने पाहावें. होतां होता मीं बंडूनानांच्या घरचा फाटका जोडा चोरण्यापर्यंत मजल आणिली. बडूनानानाही मजप्रमाणेंच चोरीची संवय जडू लागली होती. मीं जो जोडा त्याचे घरून चोरून आणिला म्हणून सागितले तो वास्तविक मूळचा माझाच असून त्यानीं चोरीच्या लहरींत माझ्या घरून पळविला होता याप्रमाणें गावांतील सारेच चोर बनल्यामुळे चोरीपासून कोणाचेंही विशेष नुकसान होईनासें झालें. कारण एकानें दुसऱ्याचे पागोटे चोरले, कीं त्यानेही त्याचा रुमाल लाबवून फिटफाट करून घ्यावी याप्रमाणे गावात, कोणाचेंच नफा-नुकसान न होता, प्रत्येकाला वैचित्र्याचा आनंद मात्र मुबलक मिळू लागला

पण हे इतके चोर आमच्याच गावात तळ देऊन का राहिले आहेत आणि त्याचा मुक्काम किती दिवस आहे याचा आम्हाला काहीच अदाज करिता येईना. आमचे गाव लहान असून त्यात डल्ला मारण्याजोगे फारसें वित्तही नव्हतें तेव्हा एक तर हे आम्हाला अगदीच अजागळ समजून सापडेल त्यावर हात मारायला आले असावे किंवा या गावचे धूर्त रहिवाशी चोराच्या सगतीला योग्य आहेत असे समजून तरी आले असावे. दोहोंपैकी एकही विचार आमच्या स्वाभिमानाला रुचण्यासारखा नव्हता अखेरीस आमच्या गावांतल्या एका हुषार सोनारानें त्याच्या पोटात शिरून त्यांच्या आगमनाचें कारण हुडकून काढिलें. त्याच्या सांगण्यात असें आले, की लवकरच या गावीं चोराचें एक मोठें संमेलन भरणार असून, त्याकरिता हिंदुस्थानातल्या सर्व भागातील चोर, भामटे, उचले, डाकेखोर, दरोडेखोर वगैरे शातता प्रिय लोक आपापले प्रतिनिधी पाठविणार आहेत, या संमेलनाच्या बैठकीचा मान आमच्याच गावास मिळण्याचें कारण 'असें, की हिंदुस्थानच्या मध्यभागास

ऽबरपट्टथाप्रमाणें वेढणाऱ्या विंध्याद्रीस आमचें गाव बरेंच जवळ असून उत्तरेकडील व दक्षिणेकडील चोरांस एकत्र जमण्यास आणि प्रसगीं पहाडात ळून जाण्यासही फार सोईचे आहे. आमच्या गावाची कोणत्याच दृष्टीनें ोग्यता नाहीं म्हणून हा वेळपर्यंत आम्हांला फार खती वाटत असे, पण गा वेळेपासून, चोराचें का होईना, पहिलें संमेलन आपल्या गावीं भरणार या वेचाराने आम्ही मोठ्या शहराचा हेवा करीतनासें झालों स्वागतमडळाच्या अध्यक्षाचे काम आमच्याच गावातील संभ्या रामोशी याजकडे दिलें होतें. ही निवड चुकीची होती असें कोणालाही म्हणता आलें नसते. कारण संभ्यास वार वेळां चोरीकरिता सक्त मजुरीची शिक्षा झालेली असून त्याने एकदरींत तीस वर्षे कैद भोगली होती तेव्हा या संमेलनाचा तहाहयात सभासद होण्याचीही त्याची निःसंशय योग्यता होती संमेलनाचें अध्यक्षस्थान सराव्या भिल्ल सुशोभित करणार असून त्याचे योग्यतेनुरूप स्वागत करण्यास सारी चोरसेना फार तत्पर दिसत होती.

समेलनाबद्दल रोज नव्या नव्या बातम्या कानावर येत. आज मुंबईच्या सोनेरी टोळीचा नाईक आला, उद्यां दिल्लीच्या सोद्याचा मुख्य येणार, परवां पुणेरी भामट्याचें स्वयसेवकाचें पथक येणार, अशा एक कीं दोन हजारों बाजारगप्पा चोहोकडे पसरून माझ्यासारख्या उतावळ्या मनुष्याची ताराबळ उडवीत होत्या. मंडपाचे व वसतिस्थानाचें काम जारीने चाललेच होतें. एकदोनदा तर घरीं बसल्याबसल्याच मंडपाच्या कामाची मजल आम्हांला कळली उदाहरणार्थ, माझा एक आणि बंडूनानाचा एक असे डोक्याचे दोन रुमाल एका रात्रीत एकदम नाहींसे झाले, तेव्हा त्याची योजना आमच्या डोक्याच्या मागाहून मडपाच्या मस्तकावर छताऐवजीं झाली असावी असा आम्हीं तर्क बाधिला, आणि तो खराही ठरला. कारण मडपाच्या छताच्या एका भागावर बंडूनानाच्या तंबाखूचे डाग आणि माझ्या विड्यामुळे पडलेले चट्टे मागाहून आढळून आले. दुसऱ्या एका खेपेस आमचीं पागोटींच लुप्त झालीं, त्याबरोबर मडपाला झालर लावण्याच्या कामास सुरवात झाली असा आम्ही तर्क केला. एकदां तर बंडूनानाची शेंडीच कोणी पळविली ! प्रथम आम्हाला असे होण्याचें कारण कळेना, पण आम्ही त्यानंतर एक दिवस मडप पाहाण्याकरिता बरोबर गेलों असतां दाराशींच कांहीं जनावराचीं चित्रे

उभीं केली होती त्यापैकीं एका बोकडाच्या दाढीऐवजी बडूनानाची शेंडी अडकविलेली दिसली! आमचे गावकरी अगदीं नखशिखान्त पाहुण्यांच्या आदरातिथ्यात गुंतले होते हें वाचकास निराळें सांगावयास नकोच

शेवटीं एकदाचा संमेलनाचा दिवस उगवला! अध्यक्षमहाराज त्याच दिवशीं सकाळी येऊन पोहोंचणार होते. त्याना किती तरी लोक सामोरे गेले होते! त्याच्या गाडीचे बैल सोडून ती स्वतः वाहण्यास व ती वाहतां वाहता तोबऱ्यातून दाणा खाण्यासही स्वयंसेवकानीं कमी केले नाही एकंदर मिरवणूक फार थाटाची झाली. मात्र तिच्या धामधुमींत अध्यक्षमहाराजांची एक आंगठी आणि एक घड्याळ नाहींसे झाले. पण हे सामान त्यांच्या वडिलोपार्जित जिनगीपैकी नसल्यामुळे त्याबद्दल त्याना फारसे वाईट वाटत असल्याचे दिसत नव्हते. शिवाय त्याच दिवशी रात्रीं माझे घड्याळ आणि बडू-नानाची आंगठी चोरीला जाऊन अध्यक्षाच्या नुकसानीची पूर्ण भरपाई झाली.

आम्ही सर्वजण चोरीच्या कामात तरबेज होत चाललो असल्यामुळे आम्हाला प्रेक्षकाची तिकिटे मिळण्यास अडचण पडली नाहीं असो. प्रथम स्वागतमंडळाच्या अध्यक्षानीं संमेलनाची आवश्यकता प्रतिपादिताना व अध्यक्षाची ओळख करून देताना फार सुरस भाषण केलें. ते म्हणाले —

“ चोरीच्या धंद्यास समाजाकडून मिळावे तसें उत्तेजन मिळत नाहीं ही शरमेची गोष्ट आहे [ धिक्कार! धिक्कार! ] अर्थशास्त्राचा एक मोठा सिद्धान्त आहे, की देशाची भरभराट होण्यास त्यातील संपत्ति देशातले देशात फिरत राहिली पाहिजे चोरीचा धंदा नसता तर हे तत्त्व पुस्तकांतल्या पुस्त-कातच राहिले असतें संपत्तीचे स्थलांतर होण्यास अनुकूल असा चोरीशिवाय दुसरा एक तरी धंदा दाखविता येईल का? [ नाहीं! नाही! ] कंजूष मनुष्य कवडी कवडी करून जमविलेला आपला सारा पैसा जमिनीत गाडून टाकितो सावकार कुळाना फसवून मिळविलेला पैसा तिजोरीत अडकवून टाकितो. बायकाच्या दागिन्याच्या रूपानें देशातील किती तरी भांडवल अडकून राहिलें आहे. सभासदहो, या तुंबलेल्या पाण्याचा प्रवाह फोडून ते साऱ्या देशात मोकळेपणानें वाहातें करण्याचें सारें श्रेय आपल्याच धंद्याकडे नाहीं का?, चोरीमुळें नवीन माल तयार करावयाला कारागिराना उत्तेजन येते, हा

अर्थशास्त्राच्या दृष्टीनें त्यापासून दुसराही एक महत्त्वाचा फायदा आहे. या धंद्याची भरभराट पुरातन काळीं या देशांत बरीच होती असें दिसतें. श्रीकृष्ण-परमात्मा लहानपणी गोरस चोरीत असत, याची साक्ष पुराणें देतील. विश्वामित्रासारख्या राजर्षीला वसिष्ठाची कामधेनू चोरतांना आणि दुर्योधनासारख्या राजाधिराजास आणि त्याच्या वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध सेनापतीस विराटाच्या गाई चोरताना त्यात कांहीं वावगें दिसलें नाहीं. पूर्वीच्या राजास अर्थशास्त्राचीं तत्वें याप्रमाणें चागली कळलीं असून ते तीं तत्त्वें स्वतःही यथाशक्ति अमलात आणीत असत परतु हल्लींचे राजे सुधारलेले म्हणवीत असूनही त्यांनीं चोरीला भारी शिक्षा ठेविली आहे! ठकबाजीचा तर त्यांनीं नायनाट करून टाकिला, हे पाहून कोणत्या सहृदय मनुष्याचें अंतःकरण तिळतिळ तुटणार नाहीं! [ धिक्कार !] शभर वर्षांपूर्वी आमच्या राजाचा, ठकबाजीच्या या निव्वळ स्वदेशी धंद्याला चागला आश्रय असे. ते पदरीं पेंढारीही बाळगीत असत. पाश्चात्य देशातही पूर्वी चोरीची चांगली जोपासना होत असे. परंतु हल्लीं तो मनु बदलला आहे नाहीं म्हणावयाला सध्यांच्या युगात चोरीचीच बहीण लाचलुचपत इचा संचार देशभर व्हावयाला लागला आहे, ही त्यांतले त्यांत समाधानाची गोष्ट आहे. परंतु लाचलुचपत मालकाच्या संमतीनें होते आणि चोरी त्याच्या इच्छेविरुद्ध घडून येते, हा एक त्यामध्यें मोठा फरक आहे. आपल्या धंद्यात मालकाला पश्चात्ताप होण्याला जागाच रहात नाहीं. चोरी पकडली गेलीच तर तिची जबाबदारी एकट्या चोरावरच असते; तो आपणा-बरोबर मालकालाही घेऊन पडत नाहीं. आपल्या कृत्याची मालकावर जोखीम न ठेवता हल्लीं समाजात चोरी होत असेलच तर ती सोनार, शिंपी वगैरे धंदेवाल्याकडून आणि ग्रंथकर्त्यांकडून मात्र होते. या साऱ्या धंदेवाल्यानीं आपलें व्रत, अल्प प्रमाणावर का होईना, अखंड चालविलें असल्यामुळें त्याना आपले सभासद होण्यास हरकत नसावी, अशी सूचना आपणांपुढें लवकरच ठेवण्यांत येणार आहे असो चोरीपासून कल्पकतेचें पोषण होतें हा तिजपासून सर्वांत मोठा फायदा आहे. चोरी करिताना आपणाला किती धोरणें सभाळावीं लागतात हें, मीं आपणाला सांगणें म्हणजे, अपरंपार समुद्रात एक चूळ टाकण्यासारखेंच आहे हें मी जाणून आहें; व यामुळें त्याबद्दल मी फारसा विस्तार करीत नाहीं. माझा कटाक्ष विशेषें करून एकंदर समाजात

होणाऱ्या कल्पकतेच्या वृद्धीवर आहे. चोर जर नसते तर तिजोऱ्या आणि कुलुपें निघालीं असतीं का? यंत्रकलेतील पहिला शोध निःसशयपणें कुलूप हाच होय. आगगाड्या, तारायंत्रें वगैरे जीं हजारों यंत्रे आपण साप्रत काळीं पाहातों त्याचा उगम कुलपांतच आहे हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे या यंत्राचें जनक कुलपें, आणि कुलपाचे जनक आम्ही! असें असता आगगाड्यांना राजरोसपणें ओरडत आरडत जगभर फिरण्याची मोकळीक असून आम्हाला मात्र दऱ्याखोऱ्यांत लपून रहावें लागतें. [हंशा.] मित्रहो! अशा संकटानी आपला धैर्यमेरु न डगमगू देता आपण आपलें व्रत अबाधित चालू ठेवाल ही माझी खात्री आहे.

"आता अध्यक्षमहाराजाबद्दल चार शब्द बोलण्याची मला परवानगी असावी. त्याचें स्तुतिस्तोत्र आपणापुढें गाण्याचा माझा मुळींच उद्देश नाही कारण त्याच्या गुणाचें वर्णन जर मी लिहूं लागलो तर, त्या वर्णनाला पुरेसे कागद आणि शाई पैदा करण्याला मला जन्मभर त्या दोनच जिनसाची चोरी करीत रहावें लागेल. [टाळ्या.] त्याच्याबद्दल तूर्त इतकेंच सागतों, की मृच्छकटिकांतील शर्विलक हे याचे अव्वलचे पूर्वज होत. त्यानी स्त्रीलोभानें जो व्यवसाय पत्करिला तो त्यांच्या वशजानीं निर्लोभपणें आजपर्यंत अव्याहत चालविला आहे. हातून चोरी झाली नाही अशी त्याची एकही रात्र वाया गेली नाही. अध्यक्षमहाराजांनींही तेंच व्रत चालू ठेविलें आहे हें निराळे सागण्याची जरूर नाहीं. यांचें हें व्रत चालण्याला या संमेलनामुळे विघ्न येईल असें कोणी समजू नये कारण आज रात्री येथल्या रहिवाश्याना आपलें हस्तलाघव दाखविण्याचा याचा निश्चय झाला आहे. [हा निश्चय इतरापेक्षा माझ्या आणि बंडूनानाच्या अनुभवासच विशेषेंकरून आला हें वाचकांना माहीत आहेच.] याच्या कुळांत जे पुरुष होऊन गेले त्या साऱ्यानीं कर्तव्याकरितांच आपले प्राण खर्ची घातले. कारण, त्यापैकीं प्रत्येकजण दरवड्यात सांपडूनच फांसावर लटकत आला. फाशी जाण्याची चाल या वशात पिढीजाद चालत आल्याचा परिणाम असा झाला आहे, कीं याच्या कुळात जन्मलेल्या प्रत्येक मुलाच्या गळ्याभोवतीं खिराडीच्या पन्हळीप्रमाणें एक करकोचा असतो. अध्यक्षमहाराजांचें हस्तलाघव त्यांच्या बाललीलांतही दिसत असे. आई त्याना पाजण्याकरितां घेऊन बसली, कीं त्यांनीं तिच्या गळ्यांतील दागिनेच पळवावेत.

[ टाळ्या ] तेव्हापासून हळूहळू उचल्या, भामटा, चोर, घरफोड्या, दरोडे-खोर या पदव्या मिळवीत मिळवीत हल्ली या मानाच्या जागेला ते सर्वस्वीं पात्र झाले आहेत नुकाच त्याच्यावर जन्मठेपेचा प्रसग येऊन हे आम्हाला सोडून जातात की काय अशी भीति पडली होती. पण देवाला आमची काळजी ! त्यामुळें याच्या वकिलाच्या अश्रान्त परिश्रमास येश येऊन त्या खटल्यातून हे सुखरूप पार पडले. विशेप सागण्यासारखी गोष्ट ही, कीं यानी आपल्या वकिलास, उदार होऊन ज्या पन्नास हजार रुपयाचें बक्षीस दिले ते रुपयें वकीलसाहेबाच्याच घरीं चोरी करून मिळविले होते. असो. तर चौर्यकर्मात असे अद्वितीय कौशल्य सपादिलेल्या सद्‌गृहस्थास आपण सर्व एकदिलाने अध्यक्ष निवडाल ही माझी खात्री आहे."

या भाषणानतर टाळ्याचा जो गजर झाला त्यात आमचे हात गुतलेले पाहून एकदोघानी आमच्या काही जिनसा लाबविल्याच ! यानतर अध्यक्ष-महाराजाची रीतसर निवड होऊन त्याचे आवेशयुक्त भाषण झालें; व त्यानतर काही ठराव सभेपुढे माडिले जाऊन सर्वानुमतें मजूर करण्यात आले. त्यातील काही महत्त्वाचे ठराव खाली देतो —

ठराव १ ला — प्रतिवर्षी समेलनाबरोबर चोरीच्या हत्याराचें आणि इतर साधनाचे एक प्रदर्शन भरविण्यांत यावें.

ठराव २ रा — गाठीच्या तापामुळे लोक घरेदारें सोडून झोपड्यावर रहावयास जाऊ लागल्याकारणानें चोरीच्या धद्यास जें उत्तेजन मिळत आहे ते पाहून या सभेस संतोष होतो.

ठराव ३ रा — चोरी होताना घरमालकाकडून चोराना हत्यारानी इजा होण्याचा फार संभव; परतु हत्याराचा कायदा करून ती भीति दूर केल्या-बद्दल ही सभा सरकारचें मनःपूर्वक आभार मानिते.

ठराव ४ था — या सभेचे सभासद कोणत्याही गांवावर दरोडा घालण्यास गेले असता गावकरी लोक जमा होऊन त्याजवर दगडांचा मारा करितात, या त्याच्या नीच वर्तनाचा ही सभा धिक्कारपूर्वक निषेध करिते

ठराव ५ वा — अधाऱ्या रात्रीं म्युनिसिपालिट्याचे कदील तेवत ठेवल्यास दुराचाऱ्यास त्याचीं सकेतस्थळें सहज सापडून मदत होते, व बोगद्यातून आगगाडी जाताना डब्यातील दिवे जळत असल्यास त्यात कोंडलेला धूर

पेटण्याचा सभव असतो, म्हणून त्या त्या वेळीं दिवे न लावण्याबद्दल म्युनिसिपालिट्याकडे व रेल्वे कपन्याकडे अर्ज करण्यात यावे.

ठराव ६ वा — सुधारलेल्या पंचागात स्थूल व सूक्ष्म मानाच्या भिन्न भिन्न अमावास्या देण्याचा ठराव झाल्याबद्दल ही सभा सतोष प्रदर्शित करिते, व कृष्ण पक्षातल्याप्रमाणें शुक्ल पक्षातही दोन अमावास्या मंजूर करण्याची ही सभा ज्योतिषसंमेलनास आग्रहाची शिफारस करीत आहे

ठराव ७ वा — स्वदेशी चळवळीस उत्तेजन देण्याच्या हेतूनें ही सभा असा ठराव करिते, कीं चौर्यकर्मात दोरी, शिडी, कानस, कुऱ्हाड वगैरे जें सामान वापरावयाचे तें प्रत्येक सभासदाने स्वदेशीच वापरलें पाहिजे परदेशी मालावर बहिष्कार घालण्यात यावा. इतकेंच नाही, तर परदेशीय लोकावरही बहिष्कार घालण्यात यावा यापुढें चोरी करावयाची ती या देशातील रहिवाश्याची करावयाची, गोऱ्या लोकाची कधींही करावयाची नाही. त्याचप्रमाणे स्वदेशी वस्तूचीच चोरी करावयाची, परदेशी वस्तूची करावयाची नाही

ठराव ८ वा — दारू पिऊन चोरी केल्यास पुष्कळदा यश येत नाहीं. सबब ही सभा मद्यपानाचा जोराने निषेध करीत आहे

ठराव ९ वा — चोर व ग्रथकार या उभयताचा हेतु अर्थचौर्याचाच असल्यामुळे दोघाचें एकच समेलन भरविण्यात यावे, अशी ग्रथकाराच्या संमेलनास विनंति करण्यांत यावी.

ठराव १० वा — गावोगाव पोलिस शिपायाची सख्या कमी करणे काटकसरीच्या दृष्टीनें, व चलनी नोटा बद करणे अर्थशास्त्राच्या दृष्टीने अत्यत इष्ट आहे, चलनी नोटा ठेवावयाच्याच असल्यास त्याजवर नबर तरी घालू नये अशाबद्दल सरकारास एक अर्ज करण्यात यावा.

ठराव ११ वा — या सभेचा सभासद होण्यास उमेदवाराने पूर्वी दहा घरीं तरी चोरी केल्याबद्दल घरमालकाची शिफारसपत्रें अर्जासोबत पाठविली पाहिजेत. कार्यकारीमंडळात प्रवेश होण्यास उमेदवारानें सरकारी तिजोरीवर एक तरी मोठा दरोडा घातला असला पाहिजे, व त्या मंडळाच्या अध्यक्षपदास पात्र होण्यास त्यानें एकदा तरी फांसावर लटकलें असलें पाहिजे.

हे व आणखी कांही किरकोळ ठराव पसार होऊन अध्यक्षाचे आभार मानिल्यानतर सभा बरखास्त झाली. सभेचें काम चार दिवस चाललें होते.

त्या अवकाशात गावांत चोऱ्या इतक्या झाल्या, की पुढील सालच्या संमेलनाचा मान आमच्या गावापासून जितका दूर जाईल तितका बरा असें आम्हाला वाटू लागले पाहुणे परत जाताना आम्ही त्याना गावाच्या वेशीपर्यंत पोहोचाविण्यास गेलों होतो. प्रत्येक पाहुणा तोंडात, खिशात किंवा बगलेत काहीं तरी लपवीत आहे असे दिसत होतें गावकऱ्यास प्रेमालिंगन देता देताच कित्येकाच्या अगावरून चोरीचा माल पडला ! त्या वेळी त्याचे गळे दाटून आलेले दिसले, मग तें आमच्या विरहामुळें असोत, किंवा त्या मालाच्या विरहामुळे असोत !

याप्रमाणे पाहुण्याना बिदा करून आणि पाहुण्याचा जरी आपणास चिरवियोग झाला आहे तरी, यापुढे आपल्या वित्ताचा वियोग होण्याची भीति उरली नाही या विचारानें दुःखित मनाचे कसें तरी शातवन करीत करीत आम्ही जड अत करणानी, पण हलक्या खिशानिशीं घरोघर परत आलो.

---

## मुष्टि १६ वी*

# याचक

जे लोक इतरापाशी फुकट किंवा मोबदला न देऊन द्रव्यांची किंवा इतर वस्तूची आपण होऊन याचना करितात, त्या सर्वांना येथें याचक म्हटले आहे. आपल्या देशातील दारिद्र्याबरोबर याचकाचीही सस्था दिवसेंदिवस वाढतच चालली आहे असा एकही दिवस जात नसेल, कीं ज्या दिवशीं असले दोन-चार तरी याचक, आपल्या इच्छेविरुद्ध, आपणाकडे येऊन जड होऊन परत गेले नाहींत. हल्ली चागले पगार देऊनही आचारी पाणके मिळत नाहींत इतर नोकरचाकरही महाग झाले आहेत. पूर्वी यांचा सुकाळ असे, इतकेंच नाहीं, तर ते गुणी व इमानीही असत पण हल्ली ते गेले तरी कोठें ? या प्रश्नास एकच उत्तर आहे. या एकनिष्ठ सेवकाचें सांप्रत केवळ लुब्रेपणावर पैसा मिळवणाऱ्या मधुकरवृत्तीच्या याचकात रूपान्तर झाले आहे. दहा घरें भटक्या मारून रुपया रोज मिळत असता व संभावनेबरोबर यजमानांकडून

* मनोरंजक, पु १५, अक ४. [ सन १९०८ ]

सत्कारही होत असता, दहा रुपये महिन्यावर दुसऱ्याचीं बोलणी सोशीत काबाडकष्ट करणे कोणाला आवडेल ? साहजिकच गुण व इमान कमी कमी होत जाऊन आळस व लोंचटपणा वाढला एखादा सभावित, विनयशील, आणि अल्पसतोषी भिक्षुक आपणाकडे आला असता आपण देऊं त्यावर सतुष्ट होऊन आपणास आशीर्वाद देत तो निघून जातो, म्हणून अशा भिक्षुकाची आपण फारच थोड्यावर बोळवणी करितों. पण एखादा लोचट, निर्लज्ज आणि हावरा ब्राह्मण येऊन त्याने एकदा चर्पटपंजरी सुरू केली, कीं त्याची ब्याद टाळण्याकरिता तरी आपणास त्याला तृप्त करून वाटेस लावावें लागतें. अशा जबरीच्या दानात पुण्यांश होण्याचें एकीकडेच राहून उलट आळसास व दुर्गुणास उत्तेजन दिल्यामुळे पापाचे मात्र आपण वाटेकरी होतों

एखादा गरीब फेरीवाला सचोटीने व्यापार करण्याच्या इरादाने आपला माल घरोघर डोक्यावर नेऊन खपवू लागला, तर त्याला त्याच्या श्रमाच्या मानाने किती तरी कमी प्राप्ति होते ! शिवाय त्याला गिऱ्हाइकाची दुरुत्तरें ऐकावी लागतात ती निराळीच ! तेच त्याने डोक्यावरील हारा फेकून देऊन कपाळी गध लाविले व हातात पळीपचपात्री घेऊन गळ्यात जानवें अडकविले, म्हणजे त्याला घरचे यजमान सामोरे जाऊन उच्चासनावर बसवितात आणि त्याने इच्छा दर्शविताच त्याला पचपक्वान्नाचे भोजन देऊन वर दक्षिणाही देतात. असा प्रकार जोंपर्यंत चालू आहे तोपर्यंत व्यापाराचा उत्कर्ष व आळसाचा नायनाट व्हावा कसा ? याचकाचे खरे जनक यजमानच होत

या फुकटखाऊंबरोबर अनेक शास्त्री, पुराणिक, कथेकरी, गवई, जादूगार, गारोडी इत्यादि याचकही आपणापासून पैसे घेऊन जातात पण त्याना पैसे मिळविण्यापूर्वी काहीं तरी करामत दाखवावी लागते, व आपापल्या धंद्या-करिता काहीं ना काहीं तरी पूर्वतयारी करावी लागते शिवाय त्यापासून संभावनेचा मोबदला म्हणून आपणास ज्ञान किंवा करमणूक प्राप्त होते. पण केवळ एकदोन वेदमत्राच्या जोरावर जो भिक्षुक घरोघर दक्षिणा उपटीत फिरतो त्याला गंधापलीकडे भाडवल लागत नाहीं, आणि दहा घरें फिरण्या-पुरते मजबूत पाय व बडबड करून यजमानास शरण आणण्यासारखें भक्कम तोंड यांपलीकडे अंगची तयारी लागत नाहीं. त्याचें खरें भाडवल व खरी

तयारी इतराची श्रद्धा व भोळसरपणा ही असून ती त्याच्यासाठीं ब्रह्मदेवानें पूर्वीच निर्माण केलेली असते.

याचकास दक्षिणा मिळण्यापूर्वी यजमानाजवळ जी बडबड करावी लागते ती यजमानाच्या किंवा दातृत्वाच्या स्तुतीनें ओतप्रोत भरलेली असते. ती ऐकून यजमानास आपण खरोखरच कर्णाचे अवतार आहोंत असे भासू लागतें. पण या [ लब ] कर्णावताराच्या हें लक्षात येत नाही, की ज्या भिक्षुकानें कधीं आपलें तोंडही पाहिलें नाही व रुपयावरील राजेसाहेबाचा मुखवटा पाहाण्याची जर आशा नसती तर आपलें तोंड पाहाण्याची ज्याला आमरण इच्छा झाली नसती, त्याला आपण प्रयत्नाने लपविलेला दातृत्वगुण इतरापूर्वी नेमका दिसून आला कसा ? वास्तविक पाहिले असता यजमानाचें दातृत्व अशा स्तुतीचें कारण नसून कार्य असते

एकदा एक भिक्षुक मजकडे येऊन म्हणू लागला, कीं ' मी आपलें नाव व कीर्ति ऐकून दूर देशाहून मुद्दाम आलों आहे ' त्याला त्याचें राहण्याचें गाव विचारता ' काशीक्षेत्र ' हें उत्तर मिळालें. काशीहून मुद्दाम मजकडे भिक्षुक यावा व तोही माझे नाव ऐकून, हे पाहून मला फार धन्यता वाटली व मी मनातल्या मनात आपल्या पाठीवर बऱ्याच शाबासक्या घेतल्या. इतक्यात मजजवळ बसलेल्या पाडुतात्यानीं त्या भिक्षुकास माझ्या नावाचा उच्चार करण्यास सागितलें; त्याबरोबर तो गोंधळून गेला. अर्थात् त्याला नुसतें हात हलवीत परत जावें लागले मात्र जातांना त्यानें मला व पांडूतात्यांना शिव्याची लाखोली वाहिली. दक्षिणा मागताना नाहीं तर नाहीं, पण शिव्या देताना तरी, माझ्या व माझ्या पितराच्या नावाचें ज्ञान आपणास असते तर बरें झालें असतें असे त्याला वाटत असल्याचें त्याच्या चेहऱ्यावरून स्पष्ट दिसत होतें.

दक्षिणा मागताना लोंचटपणा व चिकटपणा करण्यात तेलगभट फार पटाईत असतात. हे बहुधा चांगले पढिक असतात. वेदाचा अर्थ समजण्याचें सामर्थ्य मात्र याजमध्यें व यजमानामध्यें सारखेंच असते पण त्यासंबंधानें त्या दोघात एक मोठेंच अंतर असतें तें असें, कीं तेलंगभटास जटा, घन, माला, रेखा इत्यादि नांवाखालीं आधींच दुर्बोध असलेल्या वेदवाक्यातील अक्षरें दोनदोनदा तीनतीनदा उलटीं सुलटीं आडवीं तिडवीं म्हणून चांगल्या

पंडिताना सुद्धा वेद स्वत-इतकाच अगम्य करिता येतो, व यजमानास पाठान्तर नसल्यामुळें तसें करण्याची सोय नसते. असे जटाघनपाठ एकदां सुरू होऊन वेदाच्या चिंधड्या होऊं लागल्या म्हणजे असें वाटूं लागते, की हे जटापाठी घनपाठी जातीनें ब्राह्मण नसते तर त्याच्या जटा धरून व पाठीवर घण मारून त्या पाठींच्या तशाच चिंधड्या उडविल्या असत्या.

तेलगभट याचनेला निघतात ते बहुधा दोघाचौघांच्या जमावानें निघतात त्यामुळें यजमानाला इतक्या लोकास नकार देण्याचा लाजेमुळें व भीतीमुळें धीर होत नाहीं. बरें, त्यानें जर धीर केलाच, तर ती भिक्षुकाची सेना आळीपाळीनें शिळे संस्कृत श्लोक म्हणून व त्याच्या सुगम अर्थाची फोड करकरून यजमानाचा इतका वेळ घेते, कीं सरते शेवटीं, मागितलेल्या दक्षिणे पेक्षा फुकट जाणऱ्या वेळेची किंमत शतपटीनें अधिक आहे अशी त्याची खात्री होऊन, तो निमूटपणे त्यांची खंडणी त्याच्या पदरात घालतो. ती देताना जरी त्यानें त्यास शिव्या दिल्या तरी त्या भिन्न भाषेंतील असल्यामुळें आपणास कळतच नाहींत असे ते दाखवितात कारण आपली स्तुति यजमानाच्या कानांवर घालण्याचा जसा त्याचा निर्धार असतो तसाच त्याची निंदा न ऐकण्याचाही असतो.

एखाद्या खमंग यजमानास वेळेचीही किंमत नसली तर हे भूदेव त्रागा करून प्राणत्याग करण्याची भीति दाखवितात, हेतु हा, कीं ब्रह्महत्त्येच्या किंवा दहनाच्या खर्चाच्या भीतीनें तरी यजमानानें दक्षिणा द्यावी. या भीतीच्या जोडीस ब्रह्मसमंध होण्याची धमकी दिली म्हणजे उपाय हजार हिश्शानीं फलद्रूप होतो. पण अशा धमकीसही एका वस्ताद यजमानाने दाद दिली नाही भिक्षुक रागारागानें विहरींत उडी टाकून जीव देतो असें म्हणून विहरीजवळ जातो तोंच यजमानानें त्याच्या मागोमाग जाऊन व त्यास पकडून त्याच्या कंबरेस दोर बांधिला आणि त्याला पुनः पुनः पाण्यात बुचकळून वर काढण्याचा सपाटा सुरू केला. अखेरीस पाचव्या खेपेस तो बेदम होऊन प्राण देण्याचें सुख कसें काय असतें याबद्दल त्याची पुरी खात्री झाली. तेव्हां पुन्हा त्रागा करणार नाहीं अशी त्याच्यापासून शपथ घेववून यजमानानें त्याला सोडून दिलें तेव्हापासून तो सत्यनिष्ठ भिक्षुक मुळीच त्रागा करीनासा झाला, इतकेंच नाहीं, तर उठल्यासुटल्या देवास विहरींत बुडवून संकटांत टाकण्याची त्याला

जी खोड जडली होती तीही त्यानें सोडून दिली. फार काय सांगावें! देवास अभिषेक करितांनाहि त्याचा हात थरथर कापूं लागला.

काही याचक एखाद्या धर्मसंस्थेच्या किंवा धर्मकृत्याच्या नावाखालीं पैसा उकळीत असतात 'अमक्या गावास धर्मशाळा बांधावयाची आहे' 'तमक्या गावीं देवळाला कळस चढवावयाचा आहे.' 'फलाण्या साधूची समाधि बांधावयाची आहे' या त्याच्या नेहमीच्या सबबी असतात. या सबबींवर भोळ्या भाविकाकडून बराच पैसा काढिल्यानंतर त्यांना 'दानधर्मास स्वत:च्या संसारापासूनच आरंभ केला पाहिजे.' या अर्थाच्या एका इंग्रजी म्हणीची आठवण होते, आणि जमा झालेले सर्व पैसे गिळंकृत करून व त्याजवर स्वत:चा संसार थाटून, ते आपल्या बायकापोरांस अन्नवस्त्राचा धर्म करीत कालक्षेप करितात. देवाचें किंवा धर्माचें नांव घेत गेलें म्हणजे कशाचीही वाण पडत नाहीं, या तत्त्वाचा त्यांच्याइतका अनुभव इतरांस क्वचितच येत असेल

आमच्या गांवांत हसनभाई या नांवाचा एक गरीब मुसलमान रहात असे. त्यानें दोन दोन चार चार महिन्यांनीं धावऱ्या-धावऱ्या येऊन केंविलवाण्या मुद्रेनें, आपल्या कुटुंबापैकीं कोणी तरी नुकतेंच मृत होऊन पडलें आहे व त्याला मूठमाती देण्यास पैसे नाहींत असा बहाणा करून, आम्हापासून वर्गणी गोळा करीत जावें. हा क्रम दोन चार वर्षें चालल्यानंतर आम्हाला त्याच्या बतावणीबद्दल संशय येऊं लागला, आणि याच्या घरीं माणसें तरी किती आहेत, याच्याच घरची माणसें नेहमीं कां मरावीं, घरचें माणूस मरून लांकूड होईपर्यंत याचें पैशाची सोय कां पाहूं नये व जी माणसें पुरण्यास पैसे नसतात तीं पोसण्यास तरी पैसे कोठून येतात, असे अनेक प्रश्न आमच्या मनांत उपस्थित होऊं लागले. पण हसनभाई गोषा पाळीत असल्यामुळें त्या प्रश्नांचें समाधान होण्याचा मार्ग नव्हता, व तो नेहमीं इतक्या तातडीनें येत असे, कीं त्याची याचना व आमची वर्गणी यामध्यें विचाराला अवसरच मिळत नसे! अखेरीस आमचे पाहूतात्या या फसवणुकीला त्रासून गेले, व एक दिवस हसनभाई आपली बायको मरून पडली असून तिचें दफन करण्याला पैसे नाहींत असा कांगावा करीत धावत आला असतां ते त्याला त्रासून म्हणाले, 'हें पहा हसनभाई! तुझें कधीं लग्न झालेलें आम्हीं पाहिलें नाहीं, व तुला कधीं मूलबाळ झालेलेंही आम्हीं ऐकिलें नाहीं. बायकापोरें पैदा न

करिताच त्याना पुरण्याचा तू जो सपाटा लाविला आहेस, त्या थांबण्याचं मुळीच चिन्ह दिसत नाही, आणि तुझ्या साऱ्या माणसाना पुरून उरण्याइतका आमच्यापाशीं तर पैसा नाहीं. आता तुला एकच निर्वाणीची गोष्ट सागतों, की यापुढे तुझ्या स्वतःच्या दफनाकरिताच तुला आम्हाकडून पैसा मिळेल. त्याशिवाय एक कपर्दिकही मिळण्याची आशा बाळगू नकोस ! '

भिक्षुकाना दानधर्म करण्यासंबंधाने माझे काय मत आहे तें येथवर सागितलें. पाहूताल्या दातृत्वाच्या कामीं माझेच सख्खे बधु शोभतील फरक इतकाच, कीं ते साफ नाहीं म्हणून सागतात, आणि मी ' आज सुतकच आहे ', ' उद्या माझा घातवारच आहे ', अशा तऱ्हेचें ढोंग करून वेळ मारून नेतों. बहूनानाचे विचार व आचार प्रथम प्रथम आमच्या अगदी विरुद्ध असत. ते अतीत अभ्यागतास सहसा रिक्त हस्तानें परत पाठवीत नसत. त्याच्या घरी नेहमी एखादा साधु, बैरागी, गवई, कथेकरी, शास्त्री किंवा पुराणिक पडलेला असे. त्याच्या दातृत्वाची हलुहळू इतकी कीर्ति झाली, कीं त्याच्याकडे एका वेळीं दोनदोन तीनतीन याचकही राहू लागले नानाचा कुटुंबविस्तार मोठा असून त्यात या आगतुक पाहुण्याची भर पडल्यामुळे त्याच्या कुटुंबास स्वैपाकाची व इतर कामाची मनस्वी दगदग पडू लागली. पण करते काय ! बिचारीनें ती सारी निमूटपणे सोसावी. कालगतीनें ही याचकचमू वाढता वाढता नानाच्या कुटुंबीय माणसापेक्षा सख्येने अधिक झाली, व पाडित्य, व्युत्पन्नता, गायन इत्यादि सर्व गुण ' सर्वे गुणाः काचन-माश्रयन्ते ' या उक्तीच्या उद्दिष्ट अर्थाहून निराळ्या अर्थानें त्याच्या घरी जमा झाले. तेव्हा त्याना स्वतःच्या मालकीच्या घरातही राहण्यास संकोच वाटूं लागला. जेवणापुरतें घरीं येऊन बाकीचा काळ ते स्नेह्याच्या घरीं काढू लागले. त्याच्या येथें दर वेळेस नुसत्या पाहुण्याकरिताच एक पायलीचा भात लागूं लागला शिवाय पाहुणे यजमानाच्या आग्रहाची वाट न पाहाता पर-स्परांस आग्रह करून अन्नाची तूट पाडीत ती निराळीच ! हे पाहुणे बहुधा तब्बेतखोर असत. शिळे अन्न, जाड तादूळ व वासाळ तूप त्याना मुळींच खपत नसे. त्याच्यामध्यें नाना पथ व अनेक व्रतें असल्यामुळें, रोजचे रोज निराहाराचा, धान्यफराळाचा व साध्या जेवणाचा असे तीन स्वैपाक तयार करावे लागत; आणि सर्वांत मौज ही, कीं त्यांच्या जेवणापेक्षा उपासासच

खर्च अधिक लागे, व निराहारावर राहिलेल्या पाहुण्यास दुसरे दिवशी हटकून रेचक घ्यावें लागे ही सर्व लूट डोळ्यासमोर चाललेली बिचाऱ्या नानानी मुकाट्याने पाहावी. बरें, इतका खर्च होऊन त्याच्या घरी सुखसमाधान तरी असे म्हणावे, तर तेंही नाही. एकाच काळी दोनदोन चारचार भिक्षुक किंवा गवई जमल्यामुळें ते एकमेकाचा हेवा करून पाडाव करण्याचा प्रयत्न करीत या स्पर्धेने एकासही नीट प्राप्ति न होता सर्वजण खट्टू होऊन नानास मनातल्या मनात शिव्या देत निघून जात पण त्यानीं रिकामी केलेली जागा भरण्यास नवे नवे याचक खऱ्या योद्धयाप्रमाणें एका पायावर तयार असतच

एके समयीं नानाकडे चार भिक्षुक, तीन पुराणिक, दोन शास्त्री, दोन गवई, दोन कथेकरी, एक ज्योतिषी, एक अष्टावधानी व एक बहुरूपी इतके पाहुणे गोळा झाले होते, आणि त्यानीं आपल्या अनियमितपणानें, भाडखोर-पणानें, लोंचटपणाने व खादाडपणाने साऱ्या घरात गोधळ माजवून दिला होता प्रत्येकाचा नानाच्या मागे वर्गणीचा लकडा चाललाच होता. नानाचा एकेक मित्र वर्गणीच्या भीतीनें त्यांच्याशी परकेपणानें वागू लागला होता. त्याची सर्व प्रकारें इतकी हानि होत असूनही त्याच्या पाहुण्याचे तिकडे लक्ष नसे. अष्टावधानी बोवास इतक्या गोष्टीकडे अवधान ठेवावें लागे, की नानाच्या सोईकडे अवधान देण्यास त्याना फुरसत सापडत नसे यात काही नवल नाही, पण इतराचाही तोच प्रकार असे. नानाच्या औपचारिक भाषणास अनुसरून ते सारे, त्याचें घर ते आपलेंच घर असे मानूं लागले होते. गवयाच्या तानात, भिक्षुकाच्या पाठात, शास्त्र्याच्या वादविवादात नानास आपले स्वतःचे बोलणेंही ऐकू येईनासें झालें, व त्या गर्दीत पोराबाळाची व त्याची दोनदोन दिवसात गाठही पडेनाशी झाली

नानाच्या संकोचामुळें त्याचे घर या रीतीनें धर्मशाळेप्रमाणें झालेले पाहून त्याच्या मित्रमडळीस फार त्वेष आला; व त्याना या आपत्तींतून मुक्त कसें करावें याबद्दल उपाय योजण्यात येऊं लागले प्रथम नवीन येणाऱ्या याचकाना बंदी करण्याकरितां नानाच्या देवडीवर एक अक्राळविक्राळ व वाऱ्याशीं भाडणारा चावरा कुत्रा बाधून ठेविला. पण तो कुत्रा 'हा घरचा, हा बाहेरचा' असा पक्तिप्रपच करीत नसे. यामुळें बाहेरचे याचक आत येणें बंद झालें

त्याप्रमाणें आतीलही बाहेर जाणें बंद झालें, व जे पाहुणे सारे दोन–चार दिवसाचे सोबती होते त्यानीं कुत्र्यानें दिलेला वेढा उठेपर्यन्त घरातल्या घरातच तळ देण्याचा विचार केला. त्याच्या बजबजपुरीच्या गोंगाटात कुत्र्याच्या भुंकण्याची आता एक नवीनच भर पडली. कुत्र्याच्या भुंकण्याचा आणखी एक असा अनपेक्षित परिणाम झाला, की गवयाचे व कथेकऱ्याचे आवाज पूर्वी कर्कश वाटत ते त्या भुंकण्यामुळे मधुर लागावयास लागून खुद्द यजमानच त्याच्या नादीं लागले.

शेवटी आपल्या युक्तीचा असा अदाजाबाहेर विपरीत परिणाम झालेला पाहून आम्ही त्या कुत्र्याला दूर केले व पाहुण्यास बाहेरून त्रास देण्यापेक्षा आतूनच देण्याचा निश्चय केला त्याकरिता पाचसहा विंचू वरून आणून ते रात्रीं निजावयाच्या दिवाणखान्यात अशा खुबीनें पसरले, की त्या सर्वांनीं मिळून निरनिराळ्या पाहुण्यास आपापल्या नांग्याचा मासला दाखवावा. त्यापैकी एक विंचू अशा बेताने ठेविला, कीं ज्योतिषीबुवास, वृश्चिकराशीचे स्थान हुडकण्याचे श्रम न पडता, वृश्चिकानेच त्याचें स्थान शोधून काढून त्याच्या राशीस लागावे दुसऱ्या एका विंचवास अशा ठिकाणी दबा धरून बसविलें, की त्यानें गवईबोवाच्या शरीरात विषाचा संचार करवून त्याच्याकडून शोकरसाचे आलाप काढवावेत, की तसे त्याच्या कंठातून कोणीही ऐकिले नसतील. एका पुराणिकबोवानीं एक दिवस नाना मस्तकशूळामुळे व्याकुळ झाले असतां त्याना आपले दुःख विवेकाने आवरण्याचा उपदेश केला होता, त्याच्या वळकटीच्या उशाशी तिसऱ्या विंचवास उभें केले. उद्देश हा, की त्यानें बोवाच्या मस्तकात आपले अतर्याम खुलें करून पुराणातील वाग्यांचा त्याना घटकाभर तरी विसर पाडावा. अशा प्रकारे सर्व विंचू अतराअतरानें उभे केले. त्यानीं आपला पराक्रम दाखविल्यावर पाहुण्याची जी गंमत होईल ती पाहण्याकरिता मी, पाडूतात्या व बडूनाना त्याच दिवाणखान्याच्या एका कोपऱ्यांत पडून राहिलों दिवे मालवून चोहोकडे सामसूम झाल्यावर, कोपऱ्यात लपण्याच्या आपल्या नेहमींच्या वहिवाटीस अनुसरून म्हणा किंवा अपरिचित पाहुण्यापेक्षा गावकऱ्याचाच आश्रय पसंत पडल्यामुळें म्हणा, सर्व विंचवांनीं एक दिलानें नांग्या उभारून आम्ही जेथें गालातल्या गालात हंसत झोंपेचें सोंग घेऊन पडलों होतों तिकडेच आपला दौरा काढिला, आणि

ऱ्याच वेळात त्यापैकीं दोघांदोघांनीं आम्हांपैकीं प्रत्येकास नांग्याचे असे
ाखे लगाविले, कीं त्याची आम्हांस जन्मभर यादच रहावी! आम्ही
ाजण एकदम ओरडतच उठलों पण आमच्या आरडाओरडीनें परान्नावर
ाशय्येचा अनुभव घेणाऱ्या व घोरण्यात एकमेकांची साथ करणाऱ्या
मच्या पाहुण्याची झोपमोड होण्यास बराच वेळ लागला. एकदा जागे
ऱ्यावर मात्र ते निजलेलेच बरे होते असे त्यानी आपल्या धादलीनें व
रडण्यानें आम्हाला वाटावयास लाविलें. पुराणिकबोवानीं पुन्हा नानास
पल्या दुःख आवरण्याबद्दलच्या उपदेशाची आठवण दिली. ज्योतिषीबुवा
कालाचें भविष्य वर्तवून, व तो योगच वृश्चिकदंशाचा होता असें सिद्ध
ःन, त्या औपत्तीचा 'वरातीमागून घोडें' या न्यायानें इशारा देऊं लागले,
णि कथेकरीबुवा 'जे आहे त्तें'नें सुरुवात करून वृश्चिकदंशाच्या पूर्वकालीन
तक्या खऱ्याखोट्या गोष्टी आठवतील तितक्या आठवून इतरास सागूं
ाले अशी चोहोकडे एकच गडबड उडाली.

यानतर या सर्व खुशालचदास घरातून पिटाळून लावण्याकरिता आम्ही
; दिवशी नानाच्या एका जवळच्या नातलगाच्या मृत्यूची खोटीच बातमी
ाविली खोटी म्हणण्याचें कारण असें, कीं नानांना तो नातलगच नव्हता
णि त्याना त्याचें अस्तित्व व मरण याचें ज्ञान बरोबरच झाल्यामुळें विशे
ाट वाटण्याचे कारणही नव्हते पण या खोट्या वार्तेने नानास व त्याच्य
ुंबास जे खोटें अशौच धरावे लागणार त्यामुळें पाहुण्याचें उच्चाटन मात्र
खरेच घडून येणार ही आमची आशा मुळीच निराधार नव्हती, आणि त्या
ोच्या मनोराज्यात आम्ही यथेच्छ विहार करू लागलों. परंतु, मनोरथाची
त्र नेहमीं सत्यापलीकडची असते, याचा या बाबतीतही प्रत्यय आला.
नानावरील हा अकल्पित घाला ऐकिल्यावर पाहुण्यानी ताबडतोब कूच
ावयाचें एकीकडेच राहिलें, उलट, अशा संकटात आम्ही यजमानास एकटे
डून कधींही जाणार नाही असा ज्याने त्यानें हट्ट धरिला, व लागलीच त्या
भाईनीं घरातील सर्व कारभार आपल्या हातीं घेतला हा वेळपर्यंत पाहु-
ची मजल स्वैपाकघरापर्यंत गेली नव्हती, पण बंडूनानाचें कुटुंबही या कृत्रिम
ाकात असल्यामुळें चुलीचेंही स्वामित्व या आगातुकांकडे गेलें त्यांनीं लव-
च प्रत्येक फडताळांत, कोनाड्यात, पोत्यात, पिशवींत, रांजणांत, डब्यांत,

बरणींत काय काय चमत्कार भरले आहेत याचा बारकाईनें शोध केला, व त्या सर्वांचा भार भराभर हलका करण्यास सुरुवात केली. नानाना दुःखाचा विसर पडावा हें निमित्त पुढे करून त्यानीं, 'आपला हात आणि जगन्नाथ' या न्यायाने रोजचे रोज पच पक्वान्नाचें जेवण तयार करण्यास सुरुवात केली ते पाहून नानाच्या तोंडचे पाणी पळाले. इतक्या परिश्रमाने केलेल्या पाक-सिद्धींतील एक घासही त्याच्या घशाखाली उतरेना, हें पाहून पाहुण्याच्या सहानुभूतीस अधिकच भरतें येऊन त्यानीं घरातील गूळ, तूप, साखर, सपीट, बेदाणा, ओले नारळ, वेलदोडे, लवगा, केशर इत्यादि सामुग्रीचा फडशा उडविला व एक वर्षाची सामुग्री दहा दिवसातच फस्त करून टाकिली. बिचाऱ्या नानास ही सर्व लूट निमूटपणें दहा दिवस उघड्या डोळ्यानी पाहावी लागली त्या दहा दिवसात आपल्या प्रत्यहीं होणाऱ्या हानीचा विचार येऊन त्याच्या डोळ्यास अनेकदा पाणी येत असे. अशा वेळी तोंडात बदाम व खडीसाखर चघळीत पुराणिकबुवानी म्हणावे, 'नाना, असा शोक करून कसें चालेल! तुमच्या या हानीमुळे तुम्हाला एकट्यानाच वाईट वाटत आहे असें नाहीं. तुमच्याप्रमाणेंच आम्हालाही अन्न गोड लागत नाही,' व हे सप्रयोग सिद्ध करण्याकरिता बोवानी तोंड वेडेवाकडें करीत तोंडाचा तोबरा खडी-साखरेनें पुन्हा काठोकाठ भरावा!

हें लटके सुतक सपून बंडूनानाच्या शोकाचे कारण नाहीसे झाल्याबरोबर त्यानीं आपण होऊन सर्व ग्रामस्थाची एक जाहीर सभा बोलाविली व तिच्यात खालील ठराव सर्वानुमतें पास करून घेतले. तेव्हापासून मात्र याचकाचा पक्का बदोबस्त झाला या ठरावांचा एक तक्ता प्रत्येक ग्रामस्थाने आपल्या बैठकींत टागून ठेविला, व जो जो याचक त्यातील नियमाप्रमाणे वागण्यात चुकेल त्याला ते नियम दाखवून त्याची त्याजवर ताबडतोब अमलबजावणी करण्यात येऊं लागली. ते ठराव येणेंप्रमाणें —

१ कोणीही ग्रामस्थाने आपल्या घरात याचकास सहासा बिऱ्हाड देऊ नये देणे झाल्यास रोजच्या प्राप्तींतून रहाण्याबद्दल रोजीं चार आणे, जेवणाबद्दल रोजीं आठ आणे व तितकेच भंगीपट्टीबद्दल देत जाईन अशा अर्थाचा त्याच्या-कडून प्रथम लेख घेन जावा.

२ याचकाने कोणाचें शिफारसपत्र आणिल्यास त्याला कोणी कवडीही देऊं नये. 'मी अमक्याच्या घरीं उतरलों आहें.' हें सांगणेंही शिफारसपत्र दाखविण्यासारखेंच मानावें.

३ यजमान देईल त्यांत याचकानें संतोष मानिला पाहिजे. न मानिल्यास दिलेली दक्षिणा परत घेण्यात यावी.

४ याचकाने यजमानाचा पांच मिनिटाहून अधिक वेळ घेता कामा नये. घेतल्यास मिळावयाच्या दक्षिणेतून दर पांच मिनिटामागे एक आणा याप्रमाणें दंड कापिला जाईल.

५ एकापेक्षा अधिक याचक एकदम आल्यास, पहिल्याचे निमपट दुसऱ्यास व पावपट तिसऱ्यास, अशी दक्षिणा देण्यात यावी. याचक यापेक्षा अधिक असल्यास त्यानीं हात हलवीत परत गेलें पाहिजे.

६ एकच याचक एकाच यजमानाकडे वर्षांतून दोनदा आल्यास त्याला तेथें कांहीं मिळणार नाहीं, इतकेंच नाही, तर त्याला गावात इतराकडून मिळालेली दक्षिणाही त्यानें ज्याची त्यास परत केली पाहिजे.

७ याचकानें त्रागा करून प्राण दिल्यास त्याच्या दहनाचा खर्च सर्व ग्रामस्थानी सोसला पाहिजे, व त्याच्या सरणाभोंवतीं पांचजन्य करण्यास सर्वांनीं एका पायावर तयार असलें पाहिजे.

---

मुष्टि १७ वी *

## म्हातारपणाचे फायदे

या विलक्षण जगात प्रथमदर्शनीं त्याज्य वाटणाऱ्या प्रत्येक वस्तूंत विचारातीं कांहीं ना कांहीं तरी ग्राह्यांश सापडतोच. कडूजहर औषधापासून मोठमोठे रोग नाहीसे होतात, अति घाणेरड्या पदार्थांपासून उत्कृष्ट खत तयार होतें; लाखो रुपयाच्या मालमत्तेची व हजारो माणसाची आहुति घेणाऱ्या आगी-पासून हवा शुद्ध होते, फार काय, पण भ्रम व मरण या ज्या सर्वात मोठ्या आपत्ति गणिल्या आहेत त्यापासूनही संसारातील दुःखाचा लय हा एक मोठा फायदा होतो.

---

* मनोरंजन पु. १५ अंक ६ [ सन १९०८ ]

उलट पर्क्षी अशी एकही मोहक वस्तु सापडणार नाही, कीं जिच्यात एकही उणीव नाही अंगीं सौंदर्य असणें, म्हणजे दुर्गुणास पाचारण करणेंच होय, कीर्तिमान् पुरुषाच्या जिवास स्वप्नातही स्वस्थता ठाऊक नसते, श्रीमत मनुष्यास द्रव्यरक्षणाची काळजी नेहमी वहावी लागते, आणि शक्तिमान् पुरुषाच्या हातून अनेक अन्यायाचीं कामें होतात.

याचें कारण असे आहे, कीं एखाद्या चित्रांतल्याप्रमाणें विश्वातही प्रत्येक वस्तूत विश्वकर्म्यानें सद्रूप प्रकाश व असद्रूप छाया वाटून दिली आहे. त्याचीं स्थानें भिन्न वस्तूत भिन्न असतात इतकेंच काय तें, पण केवळ प्रकाशमान किंवा नुसता अधकारमय असा आपणास एकही पदार्थ सापडावयाचा नाही. प्रकाश व छाया निर्माण करणाऱ्या सूर्यबिंबात सुद्धा जर छाया प्रकाशाच्या जवळ अर्धांगीप्रमाणें दिसून येते, तर इतर वस्तूंची कथा कशाला पाहिजे !

सुखदु खाची वाटणी याप्रमाणें निःपक्षपात बुद्धीने केली असल्यामुळे कोणासही कुरकुर करण्यास फारशी जागा रहात नाहीं. अठराविश्वें दारिद्र्य अनुभवणारास मध्यान्हीची भ्रात असली, तरी अग्निमाद्याचे भय बाळगण्याची जरूर नसते, लगड्यास धावण्याच्या शर्यतींत अडखळून पडण्याची फिकिर करण्याचे कारण नसते, ! आधळा सुरूपदर्शनापासून होणाऱ्या आनदास ज्याप्रमाणे कायमचा मुकलेला असतो, त्याप्रमाणे अद्वितीय कुरूपपणापासून त्याच्या डोळ्यास त्रासही होण्याचा संभव नसतो, आणि बहिरा जसा सुस्वर आलापास, तसा बेसूर गाण्यासही पारखाच असतो, निर्धनास सुख नसतें, व धनवानास झोंप नसते. एकूण सुखाची झोंप दोघापैकी एकाच्याही नशिबी नसते.

असे असता जगात सौंदर्य, तारुण्य, सामर्थ्य इत्यादि गुणाचीच नेहमी वाहवा होत असून कुरूपपणा, वृद्धत्व, दौर्बल्य, इत्यादि गुणाची इतकी उपेक्षा कां व्हावी ? याचें वर्णन करण्याला एकही भाट पुढें सरसावूं नये काय ? याचें माझ्या मते एकच कारण आहे कविजन बहुधा कुरूप, वृद्ध व दुर्बल असतात. यामुळें स्वतःच्या अगी वसणाऱ्या गुणाची थोरवी गाण्यापेक्षा इतराच्या गुणाची अवास्तव स्तुति करण्याकडेच, नैसर्गिक विनयाच्या योगानें, त्यांची प्रवृत्ति दिसून येते.

माझ्या ओळखीचा एक दीडशें वर्षांचा म्हातारा भिक्षुक नुक्ताच मरण पावला त्याचें नाव बचंभट असून त्याचा जन्म नानासाहेब पेशव्याच्या

अमदानींत पुणे मुक्कामी झाला. थोरल्या माधवरावसाहेबाच्या मुजींत हा त्याच्या पक्तीस मुंजा होता. पानिपतच्या लढाईनंतर रणागणीं पतन पावलेल्या वीराचीं जी अनेक श्राद्धे झालीं, त्याच्या भोजनप्रसगीं याचे हात ओले झाले होते माधवरावाची पत्नी सती गेली तेव्हा तिला आशीर्वाद देण्यास हा पुढे सरसावला होता पुढें नारायणरावाच्या वधामुळें राघोबादादास झालेल्या पातकाचे क्षालन करण्याला ज्या भटाचें पादतीर्थ कारण झालें, त्यात हा प्रमुख होता. यानतर दुसऱ्या बाजीरावाच्या वेळीं, पुण्यास वेढा पडला असताना तोफामधून निघणाऱ्या अग्निमय गोळ्याचें शमन करण्याकरिता, त्यानें लाडवाच्या गोळ्याचीं जीं सतर्पणें चालविलीं त्यात यानें आडवा हात मारिला इग्रजानी पुण्यात प्रवेश केल्यावर त्याचा विटाळ होऊ नये म्हणून ज्या भिक्षुकानीं श्रीमताबरोबर ब्रह्मवर्तास कूच केलें, त्यातही हा सामील होता सत्तावन सालच्या बडानतर जे हजारों और्ध्वदेहिक विधि झाले, त्यात बरीच दक्षिणा सपादन करून आपली जन्मभूमि पहाण्याच्या इरायाने बचभट पुन्हा पुण्यास परत आला. तेथें पुनर्विवाहाविरुद्ध जी प्रथम चळवळ झाली, तिच्यात त्याने पुढाकार घेतला. परतु कालगतीबरोबर वाहातां वाहाता पुढे त्याचें मत इतके बदललें, कीं एखादा इतिहासप्रिय बाप आपली गतभर्तृका मुलगी या ऐतिहासिक पुरुषास अर्पण करण्यास कबूल झाला असता तर, बचभटाची तीन पायावर [ अलीकडे त्याला काठी लागत असे ] तयारी असती त्याच्या डोक्यावरील केंसात तर फारच क्राति झाली. ज्या डोक्यावर शभर वर्षांपूर्वी गाईच्या खुरास लाजविण्यासारखी चिमुकली शेंडी असे त्या डोक्यावर गाईचे सबध खिल्लार मावेल इतकी गर्द केसाची छाया झाली. पण ज्या मनुष्याचे वाट्यास नाना फडणवीस व माधवराव रानडे या उभयताशीं गप्पागोष्टी करण्याचे भाग्य आले होतें, त्याला डोक्यातील फरक क्षम्य होता.

बारशास व बाराव्यास जेवण्याची सारखीच तयारी असणाऱ्या या भिक्षुकाचे हव्यकव्या पलीकडे जर किंचित् लक्ष्य असतें तर आजमितीस किती वादग्रस्त ऐतिहासिक गोष्टीचा उलगडा झाला असता ! पण त्याचें तिकडे लक्ष्य नसे इतकेंच नाही, तर त्याच्या इतिहासविषयक समजुतींत बराच घोटाळाही होता. पुरदरचा तह पुरदऱ्यानीं घडवून आणिला, खर्ड्याचे लढाईत रक्तापेक्षां शाईच अधिक वाहिली; सुमेरसिंग हा फत्तेसिंग गायकवाडाचा पुत्र व रणजित-

सिंगाचा नातू होता [ सांबरशिंगाशी सबध न जोडण्याचे कारण केवळ सत्यप्रीति ! ], थोरल्या शिवाजी महाराजानीं कोल्हापूर येथें निराळी गादी स्थापण्याचें कारण साताररच्या रस्त्याना चढउतार असल्यामुळें त्याना गुडघी रोग झाला होता, नानासाहेब पेशवे इतके समंजस असत, की सत्तावन सालच्या बडाचा इतिहास जर एक वेळ त्याच्या दृष्टीस पडता तर त्यानीं त्या बंडाचें निशाण कधीही उभारिले नसतें, अशी मनास चटका लावणारी माहिती अनेकदा त्याच्या तोंडातून लीलेनें निघे. ही माहिती खोडण्याचे धैर्यही आम्हाला बहुधा होत नसे कारण, आमच्या आक्षेपावर 'चक्षुर्वै सत्यम्' हा त्याचा जबाब ठरलेलाच असे.

यमराजास विस्मृति पाडिलेल्या या भिक्षुकानें इतकीं वर्षे जगात घालवून एक गोष्ट निःसशयपणें पैदा केली होती. ती गोष्ट म्हातारपण ही होय. इतक्या पूर्ण स्वरूपाचें म्हातारपण पृथ्वीच्या पाठीवर दुसरे कोठेही नसेल. स्वतःचा समानोदक पाहण्याचें भाग्य आजमितीस दुसऱ्या कोणाचेंही नसावे, ते या भिक्षुकाच्या वाट्याला आलें होतें परन्तु असे असूनही तो नेहमीं चिंताक्रान्त असे. याचें कारण त्याच्या अगच्या दिवसेदिवस वाढणाऱ्या गुणाचें म्हणजे वृद्धपणाचें वर्णन करिताना त्यानें कोणासही ऐकिले नव्हतें विश्वासराव, थोरले माधवराव इत्यादि अल्पायुषी पुरुषाचीं नावें अजरामर व्हावीत व आपणासारख्या अजरामर पुरुषाचें नाव अल्पायुषी असावें, याबद्दल त्याला सारखा खेद होत असे. या काळजीनें त्याची कबर अगदी वाकून गेली, चेहरा फिक्कट होऊन त्यावर सुरकुत्या दिसू लागल्या व शेवटीं या काळजींतच त्याचा अन्त झाला त्याच्या आत्म्यास थोडें तरी समाधान व्हावें म्हणून हा लेख लिहीत आहें, व हा त्याच्या वर्षश्राद्धास प्रसिद्ध करण्याचा इरादा आहे

म्हातारपणाचा पहिला मोठा फायदा म्हटला म्हणजे त्यानें दात घासण्याची दगदग नाहींशी होते, आणि त्यामुळें राखुडीचा व दतमजनाचा खर्च वांचतो राखुडीच्या पायीं तरुणाकडून शेंकडों गोंवऱ्या अग्नये स्वाहा करण्यात येतात व दतमजनाच्या शेंकडों डब्या फस्त होतात पण म्हातारा कनवाळूपणानें गोंवऱ्याच्या वाटेस जात नाहीं हें ऋण गोंवऱ्याही शेवटी फेडतातच दुसरा फायदा असा, कीं म्हातारपणीं दाढा मुळीच दुखत नाहींत, व दातातून

रक्तही येत नाही, आणि यामुळे औषधाप्रीत्यर्थ होणारा खर्च वाचतो. ठेंच लागून पडल्यास दात पडण्याची म्हाताऱ्यास मुळींच भीति नसते शिवाय म्हाताऱ्यावर 'दात कोरून पोट भरण्याचा' कोणी आरोप ठेवीत नाहीं, किंवा 'याच्यापाशी दातावर मारण्यास एक पैसाही नाहीं.' अशा दारिद्र्याचाही आळ त्याजवर येत नाहीं. दुसऱ्यावर 'दात ठेवण्याचा' किंवा 'दातीं तृण धरून शरण जाण्याचा' संशयही त्याच्याबद्दल कोणी घेत नाही त्यानें कोणाची कितीही आगळीक केली, तरी त्याला त्याजकडून 'बत्तिशी रंगविण्याची' धमकी मिळत नाहीं. त्यानें कोणाचा कितीही उपहास केला, तरी त्याला 'दात का विचकतोस?' असें म्हणण्याची त्याची छाती होत नाहीं. तसेंच, त्याने सागितलेली गप्प केवळ 'दतकथा' आहे असें त्याच्या तोंडावर कोणासही सागता येत नाहीं, व त्याचीं गालफडें बसलेलीं आसल्यामुळे तीं 'कपोलकल्पित' आहे असेंही म्हणवत नाहीं

म्हातारा ठेंगण्या दारातून जाताना त्याच्या कपाळास कधींही टेंगूळ येत नाही, व जमिनीवरचा पदार्थ उचलताना त्याला कधींही मुद्दाम वाकावे लागत नाही. तसेंच त्याला कधी राग आल्यास कपाळाला मुद्दाम आठ्या घालावयास नको व पसती अगर नकार दर्शविताना मान मुद्दाम हलविण्याची तसदी घ्यावयास नको. डोक्यास टक्कल पडले असल्यास त्याचा हजामतीचा खर्च वाचतो, तो निराळाच!

म्हाताऱ्याचे सावे धरल्यामुळें त्याला घरातून बाहेर पडता येत नाही व यामुळें रस्त्यानें धावणाऱ्या गाड्याखाली चेंगरून जाण्याची भीति नसते. त्याला धड झोंप येत नाहीं, यामुळें तो चोरीबद्दल निर्भय असतो. अंगात रक्त नसल्यामुळें ढेकूण त्याच्या वाटेस जात नाहींत, व बाहेर निघालेल्या नाकाच्या व हनुवटीच्या बुजगावण्याला भिऊन चिलटेही त्याच्या तोंडा-भोंवतीं घिरट्या घालीत नाहींत.

एका एकडोळ्या मनुष्यानें एका दोन डोळ्याच्या माणसास म्हटलें, कीं 'तुला फक्त माझा एकच डोळा दिसतो, पण मला तुझे दोन दिसतात; अर्थात् तुझ्यापेक्षा मी अधिक डोळस आहें!' याच न्यायानें म्हाताऱ्यालाही तरुणास हिणविता येईल, कीं 'बाबारे! तुला समोर फक्त हाडांचा सापळा व तोंडाचें बोळकें दिसत आहे, पण मला समोर बाधेसूद व मांसल शरीर

आणि सुंदर व तेजस्वी चेहरा पहाण्यास मिळत आहे तेव्हा तुझ्यापेक्षा मीच सुखी नाही काय ?'

डोळ्यास अंधत्व व कानास बधिरत्व आल्यामुळे आणि त्यात विस्मृतीची भर पडल्यामुळें म्हाताऱ्याला किती तरी फायदे होतात ! म्हातारा निर्धन असल्यास त्याला त्याचा धनको व तो सधन असल्यास त्याचा गरीब नातलग वाटेंत भेटल्यास त्याला त्यानें ओळखिलें किंवा त्याची मागणी त्याला ऐकू आली असें क्वचित्‌च घडतें. रिणको व श्रीमंत नातेवाईक यासंबंधाने मात्र हा नियम खात्रीनें लागूं पडेल असे नाहीं. तरुण स्त्रीचा चेहरा पहाताना किंवा भाषण ऐकताना मात्र दृष्टीस व कानास एकदम माद्य येऊन म्हातारा तिच्या तोंडाजवळ तोंड नेताना कधीं कधी दिसून येतो अशा प्रसगीं क्वचित् त्याला आपल्या म्हातारपणाचा विसरही पडतो मुलाकरिता वधू पाहण्यास आलेला म्हातारा बाप, तिला पाहिल्याबरोबर, आपल्या येण्याचा हेतुही विसरून, तिला स्वत च सनाथ करिताना एखादे वेळी आढळून येतो म्हातारपणची विस्मरणशक्ति एवढी जबर असते !

म्हातारपणींच्या विस्मृतीमुळे पुष्कळदा आधले दिवशीं वाचलेली गोष्ट दुसरे दिवशीं म्हाताऱ्याच्या लक्ष्यात रहात नाहीं, यामुळे तेंच तें पुस्तक त्याला दर खेपेस तितकेंच मनोरंजक वाटूं लागतें, व या रीतीनें नवीं नवीं पुस्तके घेण्याचा उपद्व्याप व खर्च वाचतो. एका म्हाताऱ्याला एक वर्षभर एकच गोष्ट रोज रोज त्याच त्या शब्दानीं सागताना मीं पाहिलें आहे नित्यपठणामुळें ती गोष्ट त्याला लवकर तोंडपाठ झाली, परंतु ती शिळी असून आपण पूर्वी कधी सागितली आहे ही गोष्ट मात्र त्याला कधीं आठवत नसे पुष्कळ म्हातारे प्रतिवर्षी आपलें तेंच तेंच वय सागताना दिसतात, याचे कारणही मधील लोटलेल्या काळाची त्याना विस्मृति पडते हेंच असावें. अशा वृद्धाचे कालास जसें विस्मरण पडतें तसें कालाचे त्याना पडल्यास नवल कोणतें ?

म्हातारपणामुळे नीतीवर जो संस्कार होतो तो लक्षात ठेण्यासारखा आहे म्हाताऱ्याच्या अंगी ताठा असल्याचें किंवा त्यानें काठीचा उपयोग मारण्याच्या कामीं केल्याचें अजून माझ्या ऐकिवात नाहीं म्हातारा दुसऱ्याला चावताना कधीं दिसणार नाहीं व तो परस्त्रीकडे ( आरशीशिवाय ) पहातानाही कधी

सापडावयाचा नाही त्याला आपल्या सौन्दर्याचा किंवा सामर्थ्याचा अभिमान झालेला क्वचितच पहाण्यात येतो तरुण मुलीनी त्याला ' बाबा ' किंवा ' आजोबा ' या नावानें संबोधिलें असता या बहुमानास आपण पात्र नसल्याचें तो प्राजलपणे कबूल करील आपलें उरलेले आयुष्य देशसेवेत घालविण्याचा निर्धार करणे त्याला मुळीच जड वाटत नाही. एका ऐशी वर्षाच्या म्हाताऱ्यानें असा संकल्प करून तो मरेपर्यंत म्हणजे सबध दोन महिने पार पाडल्याचें मीं प्रत्यक्ष पाहिले आहे अशा देशसेवेस वाहिलेल्या म्हाताऱ्यास जन्मठेपेची किंवा फाशीची शिक्षा कस्पटासमान असते !

पंचेचाळीस वर्षापलीकडे मजल मारलेल्या म्हाताऱ्या गुन्हेगारास कायद्यानें फटक्याची शिक्षा ठेवली नाही, याचें कारण त्याची मृत्यूबद्दलची बेफिकिरी हेच असावेसें दिसतें. अशा निमित्तास टेकलेल्या म्हाताऱ्याच्या कृश तनुलतेवर वेत्रलतेचे फटकारे पडून त्याने ताबडतोब राम म्हटला, तर त्याच्याकडून पुन्हा तो गुन्हा होऊ नये हा कायद्याचा उद्देश कदाचित सिद्धीस जाईल, परंतु त्या गुन्ह्यापासून इतरास परावृत्त करण्याचा मुख्य हेतु मात्र विफल झाल्यावाचून रहाणार नाही. कारण एक तर अशा मृत्यूचें खापर त्या गुन्ह्यावर न फुटता म्हाताऱ्याच्या दुर्बलतेवर फुटेल, किंवा त्याला चोरीसारख्या क्षुल्लक गुन्ह्याकरिता मृत्यूची शिक्षा झाली हें पाहून, गुन्हेगाराचा कल लहान गुन्ह्यापेक्षा तितकीच शिक्षा असलेले खुनासारखे मोठे गुन्हे करण्याकडेच राहील

तरुण पुरुष जेव्हा मरण पावतो तेव्हा त्याच्या वारसास त्याच्या अगावर आगठी व भिगबाळी याशिवाय एकही मूल्यवान् वस्तु आढळून येत नाहीं. परतु म्हातारा साहाजिकच फार नाजुक काळजाचा असल्यामुळें त्याच्या वारसास त्याच्यापाशी खोट्या दाताची कवळी, आरशी, कानास लावण्याचे शिग व काठी ही हजार हिरश्यानीं दिसून येतात, व त्याची त्याच्या जिनगीत भर पडते. फार कशाला ? केसाला लाविलेला कलपही वारस धुऊन नेऊ लागला तरी म्हातारा हू कीं चू करणार नाहीं !

म्हातारणापासून सर्वात मोठा फायदा होतो तो हा, कीं म्हाताऱ्याशीं तरुण मुली अगदीं मोकळ्या व निष्कपट मनानें वागतात. जी कुंदकळ्या-सारखी दंतपक्ति तरुणास कपिलाषष्ठीच्या योगावरच दिसावयाची, ती

म्हाताऱ्याचें दर्शन होताच ओष्ठरूप पाने बाजूस सारून दृग्गोचर होऊ लागते. आयुष्याची दोन टोकें जीं बाल्य व वार्धक्य त्याना दंतहीनता, बोबडे पण, दुर्बलत्व, परवशता व अकारण चेष्टा या गोष्टी जशा समान आहेत तशी तरुणींचा विश्वास हीसुद्धा आहे

---

मुष्टि १८ वी*

## चित्रगुप्ताचा जमाखर्च

आपण स्वप्नात ज्या गोष्टी प्रत्यक्ष म्हणून अनुभवितो, त्या जागेपणी अनुभविलेल्या गोष्टींपेक्षा किती तरी निराळ्या असतात! घराचा आसरा नसल्यामुळे रस्त्यात पडलेला व केवळ थकव्यामुळें झोंपी गेलेला भिकारी स्वप्नात तोंड विटून जाईपर्यंत पचपक्वान्नावर ताव मारतो, व जागेपणीचा लक्षाधीश स्वप्नात चौपदरी घेऊन दारोदार भीक मागत हिंडतो! अनेक पोराबाळाचें लटाबर बाळगणारा कुटुंबवत्सल स्वप्नात अंगाला राख फासून गंगातीरावर पर्णकुटिकेंत ध्यानस्थ होऊन बसतो, तर आजन्म ब्रह्मचारी वैवाहिक सुखाचा अनुभव घेत असतो! जागृतावस्थेंत काळजीपूर्वक अभ्यास करणारा विद्यार्थी स्वप्नात परीक्षक बनून उमेदवाराना नापास करितो, व विद्यार्थीदशा संपवून, चाळीसपन्नास वर्षे संसाराचा गाडा हाकलेला म्हातारा स्वप्नात परीक्षेची तयारी नसल्यामुळें नापास होत असतो! स्वप्नसृष्टीतले हे प्रकार आपणास त्या त्या वेळी इतके खरे वाटत असतात, की आपणास त्याचा अनुभव येत असता कोणी जागें केल्यास आपला त्याजविषयीं, इष्ट वस्तु हिराविल्याबद्दल रोष किंवा अनिष्ट आपत्तीतून मुक्तता केल्याबद्दल कृतज्ञताभाव उत्पन्न झाल्यावाचून रहात नाहीं. जसे नाटकात अंतर्नाटक तसें स्वप्नातही स्वप्न पडण्याचा अनुभव आलेला अनेकास आठवत असेल!

गेल्या गणेशचतुर्थीस दोनप्रहरीं मोदकाचें सुग्रास जेवण आटोपून तांबूल-सेवन केल्यावर अंग जरा आडवें करण्याची इच्छा झाली. वामकुक्षीसारख्या

---

* मनोरंजन, पु. १५, अंक ८ [सन १९०९]

साध्या व निवृत्तिपर गोष्टीस बाह्य उपकरणाची फारशी जरूर नसते. डोक्याखाली एक उशी व अंगावर उपरणे घेऊन पडतों न पडतों, तोंच मजवर झोंपेचा अमल बसला, व एक मला स्वप्न पडलें. ते असें —

उदरावर आरूढ झालेली लंबोदर गजाननमहाराजाची मूर्ति मजपुढें उभी राहिली व म्हणाली, ' मी आजपर्यन्त पुष्कळ भक्त पाहिले, पण तुझ्यासारखा निस्सीम भक्त एकही पाहिला नाहीं आज दुपारच्या भोजनप्रसंगी केवळ मला प्रिय म्हणूनच तू इतके मोदक खाल्लेस, कीं तुला पोट फुटून मरण आल्यास मला नवल वाटणार नाहीं या तुझ्या भक्तीवर मी प्रसन्न झालो आहे मी तुझें काय प्रिय करावे तें सांग.' या वचनास उत्तरादाखल मी एखाद्या नाटकातील भरतवाक्य म्हणणार, इतक्यात जागृतावस्थेत केव्हाही न झालेली एक इच्छा मनात उद्भवून मी म्हणालो, ' मंगलमूर्ते ! आजच्या सुग्रास अन्नामुळें कोणतीही इच्छा तृप्त व्हावयाची राहिली आहे असें मला वाटत नाहीं, पण, त्या भोजनाचा व मरणाचा आपण जो संबंध जुळविला त्यावरून, मनुष्यास मरणोत्तर कोणती अवस्था भोगावी लागते हे कळण्याची मला फार उत्सुकता झाली आहे आपण विद्यादाते आहा, त्याअर्थी त्या ज्ञानाची याचना पूर्ण करणें आपणास मुळीच जड जाणार नाहीं ' हें ऐकून किंचित् चिंतन करून गणपतिमहाराज म्हणाले, ' ठीक आहे तूं माझ्यापुढे उदरावर बसून डोळे मिटशील तर क्षणार्धात परलोकचा अनुभव तुला आणून देतों.' मी वाहनीभूत उदराकडे पाहून अडखळत म्हटले, ' महाराज, मी या उदरावर स्वार होऊन परलोकयात्रा करावयास निघालों तर, परलोक प्रेक्षकाप्रमाणें पहावयास न सापडता, मला त्याचा अनुभव रहिवाशी म्हणूनच घ्यावा लागेल ' यावर गजानन म्हणाले, ' भक्तश्रेष्ठा ! तूच नाही का माझ्या उदराच्या सामर्थ्याचें वर्णन केलेस ! अशा आणीबाणीच्या वेळी जर हातपाय गाळिलेस तर बोलक्या सुधारकाना हसण्याचा तुला काय अधिकार राहिला ? ' मीं म्हटलें, ' स्वामिन् ! आपली आज्ञा शिरसावंद्य आहे पण मला डोळे मिटावयास न लावता ते उघडे ठेवण्याची मला परवानगी असावी. म्हणजे आसनभ्रष्ट होताच मला दुसऱ्या आश्रयाची सोय पहाता येऊन माझे डोळे कायमचे मिटलेले राहणार नाहीत डोळे न मिटल्यामुळें परलोक क्षणार्धांत न दिसता उशिराने दिसला

तरी चालेल.' आपलें गडस्थळ हालवून व 'तथास्तु' असे म्हणून लंबो दरानीं मला आपल्या चार हातांनीं उचलून आपल्या उदराशी बसविलें व आपलें वाहन चालू केलें परलोकच्या वाटेवर माजर आडवे न आल्यामुळे उदरानेंही आपली गति अखेरपर्यंत कायम ठेविली, व मार्गांत कोणतेंही विघ्न आलें नाहीं.

परलोकास जाणाऱ्या राजमार्गास अनेक पायवाटा येऊन मिळाल्या होत्या व त्यामधून असंख्य जीवात्मे मुख्य मार्गास येऊन मिळत होते त्या आत्म्याचे देह अंगुष्ठमात्रप्रमाण असून त्याचे वेष त्याच्या त्याच्या देशा प्रमाणें व जातीप्रमाणें भिन्नभिन्न होते. तो सर्व देखावा शिलगणासारखा दिसत होता, आणि खरोखर तें मृत्युलोकचे सीमोल्लंघनच होतें प्रत्येक सामान्य गावांत फार झालें तर एखादे दुसरें मनुष्य रोज मरावयाचें, पण त्याचा प्रेतसंस्कार किती थाटानें करण्यात येतो! तें हिंदु असल्यास तिरडी मडकें, गुलाल, गोवऱ्या, शंखध्वनि इत्यादि व तें मुसलमान असल्यास पुष्पमाला, मधुर गायन इत्यादि उपकरणानी त्या प्रसंगास एक तऱ्हेचा चित्त वेधकपणा येत असतो पण परलोकच्या वाटेवर श्रीमत–गरीब, मालक-गुलाम, हिंदु–मुसलमान, पारशी–ख्रिस्ती, झाडून साऱ्या मृताचे जीवात्मे साध्या पेहेरावानिशीं एकमेकास खेटून तातडीनें प्रवास करिताना दिसत होते कित्येकाचीं अंतःकरणे आप्तेष्टजनात किंवा वित्तात गुंतून राहिल्यामुळेंच कीं काय, ते वरचेवर आशाळभूतपणानें मागें वळून पहात होते. त्यापैकी एकजण, दूरदेशाहून आपल्या प्रियतमेस भेटण्याकरिता आगबोटींतून जात असता ती बोट फुटल्यामुळें, समुद्रात बुडून मरण पावला होता, व दुसरा एकजण आपल्या लहान अर्भकाचे प्राण वाचविण्याकरिता आगींत उडी टाकून गतप्राण झाला होता, परंतु तें अर्भक मात्र कर्मधर्मसंयोगाने आगी पासून बचावलें होते असें मला गजाननमहाराजाकडून कळलें आत्महत्या केलेले जीवात्मे मात्र क्षणभरही मागें पाहण्यास न थांबता धूम पुढें पळत चालले होते. एका पत्नीरूप जीवात्म्यानें आपल्या पतिरूप जीवात्म्याच्या मरणानंतर लागलीच शोकानें प्राण सोडल्यामुळे तें दंपत्य हातात हात घालून आनंदानें गुजगोष्टी सांगत चाललें होतें. त्याच्या चेहऱ्यावरून कोणासही वाटे असतें, कीं त्यांच्या दृष्टीनें हा मरणोत्तरकाल नसून जीवनारंभकालच आहे.

प्रत्येकाच्या पाठीशी एकएक बोचकें होतें. 'या बोचक्यात प्रत्येकाच्या पुण्याचा व पापाचा संचय आहे' असा माझ्या पाठीशी लागलेल्या उपधान रूप उदरातून ध्वनि निघाला. सर्वांचीं बोचकीं जवळ जवळ सारख्याच प्रमाणाचीं होतीं त्यावरून प्रत्येकाकडून घडणाऱ्या पुण्याची व पापाची बेरीज जवळ जवळ सारखीच असते हें सिद्ध होत होतें परतु अद्यापि त्याचें पृथक्करण झालेलें नसल्यामुळें, पुष्कळास आपलें बोचकें नुसतें पुण्यानेंच भरलें आहे असें वाटत होतें, व इतका पुण्याचा वाटा आपणाकडे कसा आला याचा जो तो आपापल्यापरी आपल्या शेजाऱ्यापाशी उलगडा करीत होता. स्वप्नात असभाव्य गोष्टीही आपणास खऱ्या वाटू लागतात, याचें एक ठळक उदाहरण या वेळीं माझ्या प्रत्ययास आलें. तें असें कीं, त्या जीवात्म्याच्या चमूपैकीं दोन जीवात्म्याचे चेहेरे हुबेहुब बडूनाना व पाडूतात्या याच्या चेहेऱ्यासारखे दिसत होते. त्याची मैत्री मरणोत्तरही पूर्ववत् कायम राहिलेली दिसून आली बडूनाना पाडूतात्यास म्हणतात, 'तात्या, तुमचे आणि माझें बोचके सारखेंच जड दिसत आहे, त्याअर्थीं उभयताची योजना बहुतेक एके जागीच होईल बरें झालें, कीं आपण आजपर्यंत धर्माचे शुद्ध वळण गिरवीत आलों नास्तिक लोक यास अन्धश्रद्धा म्हणोत, पण जी श्रद्धा स्वर्गात नेमकें नेऊन बसविते ती अन्ध नाही खास आपण सकाळ-सध्याकाळ किती तरी भक्तीनें सध्या केली! एकादण्ण्या व अभिषेक करून आपण किती तरी पाणी देवाच्या डोईवर ओतलें! आपला शिमग्यातला व सरणाभोंवतींचा शखध्वनि कधीही चुकला नाहीं पचगव्याचे तर अनेक राजण आपण घशाखालीं ओतिले! श्राद्धपक्ष करून पितराचा सतोष नेहमीं राखीत आलों. देवास मुरळ्या वहाण्याच्या चालीला नेहमीं उत्तेजन देत आलों. शुद्धाचरणी महाराचाही स्पर्श झाल्यास स्नान केल्याशिवाय कधीही राहिलों नाहीं. सोंवळ्यात असताना पायाखालीं सूत सापडलें कीं, सचैल स्नान केल्याशिवाय अन्नास बहुधा शिवलों नाहीं. विधवा स्त्रिया सोंवळ्या करण्यासाठीं आपण जिवापाड मेहनत केली. ह्या बोचक्यातला निम्माअधिक भाग तर त्याच्या केसानींच भरला असेल.'

यावर पाडूतात्या उत्तर करितात, 'नाना, तुमच्यापाशी म्हणूनच सागतों, कीं या सगळ्या गोष्टी मी तुमच्याइतक्या भक्तीनें करीत नसें.

बाहेरून मात्र धर्माचा इतका आव आणी, की बिचारा ईश्वर तो पाहून फसलाच असला पाहिजे त्रिसुपर्ण किंवा मंत्रपुष्पांजलि म्हणताना माझ्या-इतक्या आरोळ्या तुम्हीं सुद्धा ठोकल्या नसतील. श्रावणीच्या वेळीं माझ्या पळीचा खडखडाट सर्वांत मोठा असावयाचा, व शेणमाती वगैरे पवित्र पदार्थ वाटावयाचें काम माझ्याकडेच असावयाचे. होळीच्या वेळचा माझा शंखध्वनि ऐकून गाढवानींही लाजेने खालीं माना घालव्या नास्तिकाशीं वादविवाद करिताना मी मुद्दाम येवढ्या मोठ्याने ओरडत असें, कीं ईश्वर जरी जन्म-बधिर असून एका कोसाच्या अन्तरावर असला तरी त्याला तें समग्र ऐकू जाऊन त्याच्या नादानें त्याने पूर्वीपेक्षाही बहिरें व्हावें. सत्यनारायणाचा प्रसाद व गणेशचतुर्थीचे मोदक मी इतराच्या चौपट पाचपट खात आलों. या सगळ्याचे फळ आता मला स्वर्गात निःसंशय प्राप्त होणार. स्वर्गांतलें अमृत बासुन्दीपेक्षा हजारपटीनें गोड असलें पाहिजे, आणि अप्सरांचें गाणेंही आमच्या चन्द्राजीच्यापेक्षा कदाचित् मधुर असेल. पण नाना तेथे कांद्याची भाजी आणि लसणीची चटणी मिळेल ना? नाहीं तर गोडाने तोण्डाला मिठी बसून जावयाची! एक वेळ तें अमृत आणि गाणें नसलेलें चालेल, पण चमचमीत भाजी आणि चटणी असल्यावाचून आपले स्वर्गांतही चालावयाचें नाहीं.'

अशीं त्याचीं बोलणीं होत आहेत, तोंच चित्रगुप्ताची कचेरी येऊन ठेपली. या कचेरीस दगडाऐवजीं पाषाणहृदयीं जीवात्म्यांचीं हृदये लाविलीं होती, व दीर्घोद्योगी पुरुषाच्या चिकाटीच्या चुन्यानें सांधिली होती या कचेरीच्या उजव्या बाजूस स्वर्ग व डाव्या बाजूस नरक असून तीं दोन्हीं स्थानें त्या कचेरींतून दृग्गोचर होत होतीं स्वर्गलोकांतील शोभा फारच रमणीय दिसत होती तेथें उज्ज्वल पण शीतल प्रकाशात एकापेक्षा एक उच्च अशा असंख्य आसनपंक्ति मांडल्या होत्या, व त्यांतील आसनावर कोट्यवधि पुण्यात्मे विराजमान झाले होते सर्व वातावरण मधुर सुवासानें व सुस्वर गीतानीं भरून गेलें होतें.

मला आश्चर्यसागरात पोहताना पाहून गजानन म्हणाले, 'ज्या जीवात्म्याचा पुण्यसंचय पापसंचयापेक्षा अधिक असतो, त्याना मात्र तेथें स्थान मिळतें. जे जीव स्वकर्तव्यक्षेत्राच्या बाहेरही इतरांचें कल्याण करण्याकरिता निरपेक्षपणें किंवा स्वतः झीज सोसून झटतात, ते पुण्य

संपादन करितात, जे कर्तव्यात चुकतात किंवा प्रतिकारबुद्धीहून निराळ्या बुद्धीने इतराचे नुकसान करण्याचा प्रयत्न करितात, ते पापार्जन करितात जे केवळ कर्तव्याचरण करितात किंवा स्वार्थासाठीं [ उदाहरणार्थ, कीर्तीच्या किंवा सपत्तीच्या लोभानें ] इतराचा उत्कर्ष करण्याची खटपट करितात, आणि जे अपकाराचा प्रतिकार करण्याच्या हेतूनें तेवढ्यापुरती इतराची हानि करितात, ते पुण्य व पाप यापैकीं एकाचेही वाटेकरी होत नाहींत केवळ सौंदर्याचा उत्कर्ष करण्याकरिता अहोरात्र खपणारे चित्रकार, मूर्तिकार, कवि व इतर कारागीर, केवळ सत्याच्या उत्कर्षाकरिता झटणारे टीकाकार, ग्रथकार, शास्त्रज्ञ व तत्त्वज्ञानी आणि नीतिप्रसारास सर्वस्वी वाहिलेले उपदेशक हेही आपापल्या उद्दिष्टाप्रीत्यर्थ केलेल्या निरपेक्ष प्रयत्नानुरूप पुण्यसचय करितात, व जे या गोष्टीचा नाश करू पाहातात ते पापाचे धनी होतात पुष्कळदा मनुष्यें एखादें कृत्य करिताना तें इतराच्या सुखासाठीं किंवा उत्तमोत्तम ध्येयाच्या उत्कर्षार्थ करीत आहों असा आपला समज करून घेतात, पण तो त्याचा निव्वळ भ्रम असतो, तें कृत्य बहुधा स्वहितासाठींच झालेलें असतें. जे कृत्य काहींसे स्वहितार्थ व काहींसें परहितार्थ घडलेलें असतें त्याला त्या मानानें पुण्याश मिळतो मनुष्याच्या हातून पापापेक्षा पुण्यकर्म थोडें जरी अधिक झालें, तरी त्याचा स्वर्गातील आसनावर हक्क पाहोंचतो पुण्याचें आधिक्य फारच अल्प असल्यास त्याला स्वर्गातील नीच आसन मिळतें, इतकेंच काय तें. ज्याचे सारे आयुष्य परहितार्थ वेंचिलें असते त्याच्याकडून प्रसगीं काहीं पापाचरण जरी झालें असले तरी त्याच्या पापपुण्याची वजावाट होऊन जी पुण्यराशि शिल्लक रहाते तिच्या बलावर त्याला स्वर्गांत उच्च आसन मिळतें जिवतपणी अगदी नीच स्थितींत असलेला मनुष्यही सुकृताच्या जोरावर स्वर्गात बऱ्याच उच्च आसनावर बसलेला दिसून येतो बुद्धासारखे धर्मसस्थापक, तुकारामासारखे धर्मसुधारक, शिवाजीसारखे देशभक्त, आर्यभटासारखे ज्योतिषी, पाणिनीसारखे वैय्याकरण, कालिदासासारखे कवि, तानसेनासारखे गायक, जगाला थक्क करून सोडणाऱ्या लेण्यासारख्या इमारतीचे शिल्पकार, साराश, ज्यानीं ज्यानीं म्हणून निरपेक्षपणें लोकाचे कोटकल्याण केलें किंवा एखाद्या उदात्त तत्त्वाचा

विकास केला, ते सर्व तुला येथे जमलेले दिसतील. येथे तुला जातिभेद आढळणार नाहीं बुद्ध येशू ख्रिस्ताशी, तुकाराम ल्यूथरशी, कालिदास शेक्सपियरशीं, शिवाजी वॉशिंग्टनशी प्रेमालाप करिताना येथें दिसून येतील स्वदेशार्थ लढणारे व युद्धात परस्पराच्या हस्ते मारिले गेलेले योद्धे येथें देशभक्तीचे पोवाडे एकाच स्वराने गाताना आढळतील ज्या महात्म्यानीं गुलामाचा व्यापार बद करण्यासाठी जिवापाड श्रम केले त्याना स्वर्गात बरेंच उच्च स्थान मिळालेलें तुझ्या पहाण्यात येईल. स्वर्गातील उच्च स्थान रिकामें असलेले पाहून तुला अचबा वाटेल त्या स्थानाचा अधिकारी, स्वर्गलाभ-प्रसगी त्यावर लाथ मारून व जोंपर्यंत एकहि प्राणी दु खात किंवा पातकात लोळत आहे तोंपर्यंत, जन्ममरणाच्या फेऱ्यातच अविच्छिन्नपणे रहाण्याची परवानगी मागून पृथ्वीवर ती हलकी करण्याचा दीर्घोद्योग करीत आहे. हे स्वर्गस्थ जीवात्मे येथे दीर्घकालपर्यंत सुख भोगून पुन्हा जगाच्या उद्धाराकरिता पृथ्वीवर जन्म घेतील, व तेथील आपले अवतारकृत्य सपविल्यानतर पुन्हा स्वर्गवास करण्याकरिता परत येतील याप्रमाणें त्याचा अनेक युगे क्रम चालू राहील नरकातील जीवात्म्याना सुद्धा पुन्हा जन्म घेऊन आपलीं चरित्रे शुद्धतर करण्याची परवानगी मिळून पुन पुन त्याना त्याच्या सचिताप्रमाणे उत्तरोत्तर कमी कमी कष्टाची जागा मिळत जाईल, व अखेरीस त्याचा स्वर्गात प्रवेश होईल. सर्व जीवात्मसृष्टि स्वर्गात प्रविष्ट झाल्यानंतर स्वर्गातील उच्च स्थानाचा अधिकारी सतोषाने आपल्या स्थानाचा अगिकार करील, व तेव्हापासून दु.ख हा पदार्थ कोणाच्याही प्रत्ययास येणार नाही.'

गजाननानी आपल्या भाषणाच्या अखेरीस जो नरकाचा निर्देश केला त्यामुळें, तो प्रदेश कसा काय आहे हे पहाण्याची मला प्रबल इच्छा होऊन, मी चित्रगुप्ताच्या कचेरीच्या डाव्या बाजूस जाऊन पाहिले. तों तो प्रदेश अन्धकारमय व भयाण दिसला. आतून दु खविव्हल प्राण्याच्या किंकाळ्या ऐकू येत होत्या आत चोहोंकडे गर्द अन्धकार पसरला असूनही तेथील जीवात्म्याची यातनामुळे भेसूर व केविलवाणीं झालेली तोंडे स्पष्ट दिसत होती तो सर्व देखावा असह्य होऊन मी परत चित्रगुप्ताच्या आसनापाशी गेलो. त्याच्या जमाखर्चाच्या वह्याचे कागद सज्जनाच्या धवल कृत्याचे केलेले असून ते प्रणयीजनाच्या प्रेमरज्जूनीं एकत्र बाधलेले होते.

त्याच्या दांतीतील शाई दुर्जनाच्या कृष्ण कृत्याच्या कषायापासून बनविली होती. त्याच्या तराजूची दांडी, पापपुण्याची पर्वा न बाळगणाऱ्या मनुष्याच्या मगजाची घडविली असून ती पारड्यातील वजनास मुळीच दाद न देण्या सारखी भक्कम होती त्या तराजूचा काटा चचल मनुष्याच्या स्वभावापासून निर्माण केला होता चित्रगुप्तासमोर नुकतेच प्रविष्ट झालेले जीवात्मे आपापल्या पापपुण्याची झडती देऊन त्यानें दिलेल्या निकालाप्रमाणें स्वर्गाची किंवा नरकाची वाट धरीत होते प्रथम एका रानटी देशातील राजाची आपल्या गुलामास अमानुष क्रूरपणाने वागविल्याबद्दल ताबडतोब नरकात रवानगी झाली एका धर्मगुरूने सुनीतिप्रचार करण्याऐवजी भ्रष्टाचार माजविल्यामुळें त्यालाही त्याच्या मागोमाग पाठविण्यात आलें. त्यानतर लोकास त्राहि त्राहि करून सोडणारा एक पटाईत डाकेखोर, खोटे दस्तऐवज करून व जमाखर्च ठेवून कुळास सपशेल बुडविणारा एक सावकार, त्याला मदत करणारा एक अर्जनवीस, स्त्रियाच्या पातिव्रत्यावर घाला घालून त्याच्या ससाराचे मातेरें करणारा एक कामाध नराधम, आपल्या वैद्यकीय ज्ञानाचा दुरुपयोग करणारा एक वैद्य, लाच घेऊन गब्बर झालेला एक न्यायाधीश, त्यास कुळातर्फे लाच देणारा व कधीं कधीं तर लाचाच्या रकमा मधल्या मध्यें स्वत:च गडप करणारा एक वकील, खोटे खटले उपस्थित करणारा व छळ करून खोटे कबुलीजबाब वदविणारा एक पोलिस अधिकारी, गिऱ्हाइकाच्या डोळ्यात धूळ टाकून कोटिनारायण बनलेला एक व्यापारी, याचीही लागोपाठ तिकडेच योजना करण्यात आली.

यानतर बड्डूनाना व पाडूतात्या याची दुक्कल पुढें आली प्रथम नानास आपल्या पाठीवरील बोचकें सोडण्यास सागितलें. ते उघडून पहाता आतील जिनसाचे एकदम शुभ्र पुण्यराशि व कृष्ण पापराशि असे दोन पृथक् भाग झाले. पापापेक्षा पुण्य अधिक असलेलें पाहून बड्डूनानास व मलाही फार आनन्द झाला नतर प्रत्येक राशीपैकीं एकेक वस्तु घेऊन तिची शहानिशा करण्यात आली नानानीं कृपाळूपणानें एका अतिशूद्राची मरणापासून केलेली मुक्तता, पढरपूरच्या अनाथाश्रमास त्यानीं केवळ दयेमुळें दिलेली देणगी यासारख्या कांही गोष्टी पुण्यराशींत येतील असे नानाच्या स्वप्नीही नसता त्या तेथे दिसून आल्या. पण त्याचें नुकतेंच जे मनोराज्य चाललें होते

त्यातील एकही गोष्ट पुण्यराशीत किंवा त्याच्या खात्यात जमेकडे दिसून आली नाहीं, उलट त्यापैकीं काहीं गोष्टी पापराशीत मात्र दिसून आल्या पण त्याबरोबर त्याना समाधान वाटण्यालाही एक कारण झालें एकदा सोंवळ्यात असताना सुतावर पाय पडूनही त्यानीं भोजन केलें होते, दुसऱ्यादा त्यानीं एकादशीच्या दिवशींही ताबडी सुपारी खाल्ली होती व तिसऱ्यादा लघुशकेच्या वेळीं कासोटा सोडिला नव्हता, पण हीं महापातकें चित्रगुप्ताच्या चुकीमुळे नानाच्या खात्यात खर्चीं पडलीं नव्हतीं. असो, बहूनानाचा स्वर्गावरील हक्क शाबीत झाल्यावर तो प्रेमळ मित्र आपण बाहूतात्याच्या समागमेच आत जावें असा विचार करून त्याचा निवाडा होण्याची वाट पहात तिष्ठत उभा राहिला. पण तात्यासबन्धानें नानाची च माझी सारखीच निराशा झाली त्यानीं आपलें गाठोडे सोडल्याबरोबर एक मोठा काळाकभिन्न ढीग व त्या मानाने अगदींच लहान दिसणारा पाढरा गोळा असे त्याच्या संचिताचें पृथक्करण झालें पुण्याचा थोडा तरी अश गांठोड्यास चिकटून राहिला असेल, या भोळ्या आशेनें तात्यानी तें दहादा झाडलें, परतु त्याचा त्यास मुळींच सुगावा लागेना शेवटीं चित्रगुप्त म्हणाले, ‘ तुझें सर्व आयुष्य ख्यालीखुशालींत गेले आहे दुसऱ्याच्या सुखदुःखाकडे लक्ष्य देण्याला तुला मुळींच फुरसत झाली नाहीं. तू कर्तव्यातसुद्धा पावलो-पावली चुकत गेलास अर्थात् कर्तव्यापलीकडची परोपकारासारखी सत्कृत्यें तुजकडून मुळीच घडलीं नाहींत.’

तात्या घाबरून म्हणाले, ‘ असे कसें होईल ? माझ्या खात्यात काही रकमा जमेकडे माडावयाच्या अजिबात राहिल्या आहेत. उदाहरणार्थ, सत्यनारायणाचा प्रसाद व गणेशचतुर्थीचे मोदक ’

चित्रगुप्त म्हणाले, ‘ त्याचें सेवन हें पुण्यकृत्य आहे असें मानिले तरी त्याला कारण तुझे जिव्हालौल्यच झालें. त्या वस्तूचा उच्चार करताना अजूनसुद्धा तुझ्या तोंडास पाणी सुटत आहे ’

‘ नुक्तीच मीं कोटिलिंगार्चनाची व यज्ञाची खटपट करून अनेक ब्राह्मण-सतर्पणें घडवून आणिलीं, तीही वायाच गेली तर मग ? ’

‘ ती सुद्धा स्वत·ची व स्वत·सारख्याच पोळाची काहीं दिवस चागळ चालावी म्हणूनच होतीं त्यातला एक तुकडा तरी अनाथाच्या पदरात पडला का ? ’

'गोरक्षणसभेचा चिटणीस या नात्यानें मी गाई पोसण्याकरितां स्वत चें शरीर झिजविलें, तेंही व्यर्थच झालें म्हणावयाचें !'

'अर्थात्‌च वर्गणीचे पैसे खाऊन त्यावर स्वतःचे शरीर बैलामारखे, पुष्ट केलेस, यात एका अर्थानें गोरक्षण असलें तरी शरीर झिजविण्याचा प्रश्न मुळीच नाहीं. तुला जर मुक्या प्राण्याबद्दल इतकी कळकळ होती तर यज्ञात गरीब बिचारा बोकड का मारविलास? आणि प्रतीवर्षी दसऱ्यास रेडा मारविण्याबद्दल तरी तुझा इतका आग्रह का असावा?'

'शास्त्राज्ञेप्रमाणे वागण्यांत माझें कुठे चुकले महाराज?'

'त्या वागण्यांत तुजकडून पाप घडले नाही हे खरें. पण कीर्तीच्या किंवा द्रव्याच्या लोभानें गोरक्षणसभेची चिटणिशी पत्करण्यात तुजकडून पुण्य घडलें नाहीं हेंही तितकेंच खरें आहे'

'अरे देवा! मग मी त्या चिद्‌घनस्वरूप साधूस वर्गणी जमवून दिली तेंही सारे कष्ट निष्फळच गेले असतील?'

'ते कष्ट तू मोबदल्यादाखल वर्गणीचा चवथा हिस्सा मिळण्याचें अभिवचन मिळाल्यावरच केलेस ना? शिवाय त्या साधूच्या शिष्यिणींपैकी एकीवर तुझी पापी दृष्टि होती हे तूं विसरला असशील, पण मी नाहीं विसरलों'

'बरें, माझी त्रिसुपर्णाची व देव्याची गर्जना?'

'ती नुसती अर्थशून्य बडबड होती.'

'बरें, माझे पचगव्याचे राजण? महाराज, कृपा करा व जमेकडे त्याचा एखादा घुटका तरी सापडतो का पहा माझ्या खात्यात जमेकडील बाजूस थोडीशी घाण दिसत आहे, ती बहुतकरून पचगव्याचीच असावी.'

चित्रगुप्त म्हणाले, 'तुला भीतीमुळें दृष्टिभ्रम झाला आहे. तुझ्या पचगव्यप्राशनाची गणना पापातही नाहीं व पुण्यातही नाहीं'

'महाराज, आता निरवाणीला माझा होळीचा शखध्वनि तरी माझ्या खात्यात पहा'

'ही पशुवृत्ति सुद्धा या वह्यात सापडावयाची नाहीं.'

'अरेरे! तर मग शिमग्यात वृथा इतका कंठशोष केला! महाराज, पचगव्याचा एखादा थेंब किंवा शंखध्वनीचा प्रतिध्वनिही जमेस नाहीं ना? नशीब माझें!'

हें त्याचें संभाषण पुरें होत आहे तोंच, चित्रगुप्ताचे दूत तात्याना गचाड्या मारीत नरकलोकात घेऊन गेले. माझ्या मनास अत्यन्त उद्वेग होऊन मीं माझ्या वाटाड्यास म्हटले, 'बुद्धिदाते महाराज, मनुष्याला पाप करण्याला जर आपणाकडूनच बुद्धि मिळते, तर त्याबद्दल त्याला इतकें घोर शासन का?'

पण हे शब्द माझ्या मुखावाटें निघतात न निघतात तोंच वक्रतुंडानीं माझ्या पाठीवर भला मोठा शुंडाप्रहार केला. त्यासरसा जागा होऊन पहातों, तों काय चमत्कार! बडूनाना माझ्या पाठीवर चापट्या मारीत असून पाडूतात्या 'भले महाराज! आज तुम्हाला कुंभकर्णाचीच झोंप लागली आहे! चला, सध्याकाळ झाली. देवे म्हणावयाचे नाहीत वाटतें?' असें आपल्या कर्कश आवाजाने म्हणत आहेत!

---

मुष्टि १९ वी *

## लेखनकलेंतील स्थित्यन्तरें

मुलाचे पाय पाळण्यात दिसतात, ही म्हण शब्दशः जरी नसली तरी तात्पर्यतः अगदीं खरी आहे नेपोलियनसारख्या जगद्विजयी पुरुषाने पाळण्यात असता त्यावर टांगलेलें खेळणे हस्तगत करण्याच्या प्रयत्नापलीकडे पराक्रम केला नसेल व खुळखुळ्यापेक्षा भयकर शस्त्रही हाती धरिलें नसेल; टोगोसारख्या जलयुद्धविशारद वीरानें बालपणीं कागदाच्या होड्यावरच करमणूक करून घेतली असेल व गोट्यानीच नेम मारिले असतील, हॉवर्ड-सारख्या उदारधीनें लहानपणीं वडिलास 'पापा' देण्यापलीकडे दानशूरता दाखविली नसेल; व लॉर्ड बुइलबरफोर्ससारख्या दास्यविमोचनार्थ झटणाऱ्या महानुभावानें आरभीं स्वतःची गर्भवासातून मुक्तता करण्यापलीकडे त्या कामीं फारशी मजल मारिली नसेल मोठेपणींचा गवई वाकटेपणीं रडण्यात

---

* मनोरजन, पु. १४, दिवाळी–अक [सन १९०९]

आरोहावरोह घेईल तेवढेंच काय तें त्याचें गाणें, व पाळण्यातल्या ग्रंथकाराच्या ऑजारामुळें जरी त्याचा ग्रंथ समाप्त होण्याच्या बेताला आला तरी त्यानें ग्रंथ आरंभिल्याचा दाखला मात्र सापडणार नाहीं या साऱ्या गोष्टी जरी खऱ्या आहेत, तरी मुलाच्या शैशवकालीन लीलांत पुढील आयुष्यक्रमाचें सूक्ष्म तरी बीज सापडते यात काहीं संदेह नाहीं शिवाजीमहाराजाचा युद्धव्यवसाय फार लहानपणीं सुरू झाला हें प्रसिद्ध आहे, व शंकराचार्य, ज्ञानेश्वर, गेटी, पोप, मेकॉले इत्यादि प्रसिद्ध ग्रंथकाराची मूळाक्षराशीं व ग्रंथरचनेशी बरोबरच ओळख झाली असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं.

मोठमोठ्या ग्रंथकाराच्या पुढील कर्तबगारीचें आधींच स्वप्न पडून जर कोणी त्याच्या लेखनकलावृद्धीचा इतिहास लिहिला, तर तो फार मनोरंजक व बोधप्रद होईल. चिमुकला ग्रंथकार ग्रंथलेखनाचा ओनामा करितो तेव्हा त्याच्या तद्विषयक कल्पना बऱ्याच अस्पष्ट व चुकीच्या असतात. ग्रंथविस्तार व पृष्ठसंख्या हीच त्याच्या मते लेखनपटुत्वाची खूण असते. वाक्याची योग्यता तो तसूनें मोजीत असतो. वाक्यरचना जरी व्याकरणशुद्ध नसली, कर्तरिप्रयोगात कर्ता पुल्लिंगी तर क्रियापद स्त्रीलिंगी अशी, व्याकरणापेक्षा संसाराच्याच धाटणीवर जरी शब्दाची सांगड असली किंवा रामासारखा एकवचनी कर्ता पण क्लिओपाट्रासारखें अनेकवचनी क्रियापद अशी गंगाजम्नी जरी शब्दयोजना असली, एका व दुसऱ्या वाक्याची सान्निध्यापेक्षा जरी मुळीच संगति नसली व त्याच्या क्षेत्राची मर्यादा दाखविण्याकरिता 'असो' या शब्दाचे बांध जरी पदोपदीं घातलेले दिसले, शब्दाच्या व अर्थाच्या कार्पण्यामुळे एकच अर्थ त्याच त्या शब्दानीं जरी वारंवार व्यक्त केलेला असला, शब्दाच्या उच्चाराबरोबर हृदयास घरे पडण्याऐवजी त्याच्या कर्कशपणामुळें कानास जरी पडू लागले, तरी जोंपर्यंत पुस्तकाचें वजन अधिक आहे तोपर्यंत त्याच्या गुरुत्वाकर्षणाने बाललेखकाची मान हाल्ल्याशिवाय रहाणार नाही शेक्सपियरनें तिसावर नाटकें केलीं स्कॉटने तितक्याच कादंबऱ्या लिहिल्या, या गोष्टींचें त्यास जितकें आश्चर्य वाटतें तितकें त्याच्या कृतीतील गुणसमुच्चयानें वाटत नाही. देवानें आयुष्य दिल्यास आपणही मेंदूच्या टाकसाळीतून इतकेच ग्रंथ पाडावयाचे असा तो मनाशीं संकल्प करितो; परंतु ग्रंथात शरीराच्याप्रमाणें आत्म्याचेही वास्तव्य असावे लागतें हें त्या

वेळीं बिचाऱ्याच्या स्वप्नीही नसतें. बाल्यावस्थेतील या पोटकाळांत ग्रथाची पारख चर्मचक्षूच्याच साह्यानें होत असल्यामुळें त्यास दृष्टिकाल म्हटल्यास चालेल. या काळात ग्रथाच्या स्थूलपणाबरोबर त्याच्या छपाईकडे, बाधणीकडे व किंमतीकडेही बाललेखकाचें चित्त वेधून जात असते आपण चार दिवसात एक पुस्तक लिहिले या गोष्टीची त्यास या काळात फार धन्यता वाटत असते, व बेडकानें आपले पोट बैलाच्या पोटाइतकें फुगविल्याच्या या चमत्काराबद्दल पुढे कोणास सशय वाटू नये म्हणून, तें पुस्तक प्रसिद्ध करण्याची त्यास घाई झालेली दिसून येते.

अल्लड वयातील लेखकास ही बाळसेदार रचना एखादे वेळीं शोभून जाते. पण तिचा अवलब प्रौढावस्थेतील लेखकाकडून होऊं लागल्यास ती केवळ तिरस्करणीय होते अलीकडे मासिकांच्या संपादकाकडून लेखाचा मोबदला त्यातील ओळींच्या सख्येवर ठरविण्यात येऊं लागल्यापासून अशा चर्वित-चर्वणरूप, फुगीर व निःसत्त्व रचनेस बराच ऊत आला आहे. एकदा एका सपादकानें आपल्या लेखकाच्या लेखाची दीर्घता प्रमाणाबाहेर वाढत चाललेली पाहून त्यास मूल्यादाखल रुपये देण्यापूर्वी ते घणानें ठोकून पसरट व पातळ करण्याचा उपक्रम सुरू केला. तेव्हापासून त्याच्या मासिकातील लेख पुन्हा पिळदार, बाधेसूद व जोरकस दिसू लागले. हा प्रयोग इतर संपादकानींही करून बघण्यासारखा आहे

बाल्यावस्थेतील याच्या पुढच्या पोटकाळास शुद्धतेचा काळ म्हणण्यास हरकत नाहीं. या काळात ग्रथकार वाक्यें व्याकरणदृष्ट्या होतील तितकी शुद्ध करण्यास झटत असतो, व पद्यात मात्रादोष व यतिभग येऊं नयेत अशी खबरदारी घेत असतो या काळात व्याकरण, वृत्तदर्पण व कोश हेच त्याचे मार्गदर्शक असतात आपलें व्याकरणाचें ज्ञान दिसावें म्हणून तो व्याकरणात अपवादाखालींच आढळून येणारें शुद्ध पण बोजड रूप घालील, वृत्ताच्या ज्ञानाचें प्रदर्शन करण्याकरिता आपणास अवगत असलेलीं सारीं वृत्तें, प्रसगास अनुकूल किंवा प्रतिकूल आहेत याचा विचार न करता वाचका-पुढें माडील, व कोशातील शब्दाच्या ज्ञानाचा प्रकाश पाडण्याकरिता अप्रसिद्ध कर्णकटु शब्द रचनेत गोवील

बाळपणी वाचनाने किंवा अवलोकनानें मिळविलेल्या ज्ञानाची पुजी फारच थोडी असते, व यामुळें ती फार विपुल आहे असे भासविण्याची बाल-लेंखकाला फार हौस असते नुक्तेच कळू लागलेल्या इंग्रजीचे किंवा संस्कृताचें ज्ञान मिरविण्याकरिता तो एखाद्या सोप्या व लहान इग्रजी गोष्टीचें भाषान्तर करील व अर्धवट समजलेल्या सस्कृत श्लोकाचे अप्रासगिक अवतरण देईल, एखाद्या बागेचें वर्णन करावयाचें झाल्यास स्वतःस माहित असलेल्या साऱ्या झाडाची, लताची, झुडपाची विस्तृत जत्री देईल, भोजनप्रसंगाचें वर्णन द्यावयाचें असल्यास पात्रातील सर्व पदार्थांची याद तिला शोभेशा लाबलचक कटावात दाखल करील, नायिकेचे रूपवर्णन कर्तव्य असल्यास सुभाषितरत्न-भाडागाराच्या त्या भागाचे शब्दश भाषातर देईल, साधे व शिळे सिद्धान्त स्थापन करण्याकरिता जाड्या जाड्या ग्रथकाराची नावे व वचनें देईल, ज्या शब्दाचे ज्ञान स्वत.शिवाय इतर सर्वास आहे त्याचे चुकीचें स्पष्टीकरण देण्याकरिता शेकडो टीपा खर्ची घालील, नायिकेच्या मुखास कमलाची किंवा चद्राची उपमा देण्याची एकही सधि सहसा वाया जाऊ देणार नाहीं, शृङ्-गारादि ज्या रसाचा अजून अनुभव नाहीं त्याचे चित्र रेखाटण्याचें अवसान आणील, व शेवटीं स्वत च्या अज्ञानप्रदर्शनानें हास्यरसाच्या उद्भवास मात्र कारण होईल एका बालकवीने तर नायिकेच्या विरहज्वरावर काढेचिराईत देऊन तिला पाचव्या अकाच्या आत खडखडीत बरी केली आहे, व नायकास हृदयात टोंचत असलेले मदनबाण, सग्रामात भात्यातील बाण सपल्यावर त्याजकडून हृदयातून काढवून प्रतिनायकावर फेंकविले आहेत !

या काळान ज्ञानाचा सचय फार अल्प असल्यामुळें बाललेखकाचा विशेष भर स्फूर्तीवर असतो. आपणाहून अधिक शिकलेल्या लेखकाचें एखादे पुस्तक त्याच्या वाचनात आल्यास ते नाकें मुरडतात. विद्या व कविता याचें जन्मसिद्ध हाडवैर, व बाललेखकाचें व विद्येचेंहि हाडवैर, याप्रमाणे वैराचें अधिकरण एक असल्यामुळें बाललेखक व कविता याचा सहजच स्नेह जमून येतो. अशा स्थितीत विद्येकडून पराभव झाल्यास कवितेने या लेखकाशिवाय इतर कोणाच्या गोटाचा आश्रय करावा ? लेखकही यथाशक्ति कवितेचा समाचार घेतात व तो चालू असता तिला किंवा स्वतःला विद्येचा सपर्कही लागू देत नाहीत.

या काळात मार्मिकतेला मुळींच अवसर नसतो मार्मिकता म्हणजे अनुरूप वस्तूची निवड. ही निवड अर्थात् पुष्कळ वस्तूंतून थोड्या वस्तूंची करावी लागते. पण जेथे वस्तुज्ञानाचाच दुष्काळ, तेथे निवडीची गोष्ट दूरच राहिली! यामुळे या काळातील भाषा बऱ्यावाईट, उच्चनीच झाडून साऱ्या शब्दास व विचारास आश्रय देत असते.

या अवस्थेंतील लेखक रसादि मनोविकार वठविताना त्यांच्या उत्कटतेकडे जितके लक्ष्य देतात तितके त्याच्या स्वाभाविकपणाकडे, प्रासंगिकपणाकडे व योग्य प्रमाणाकडे पुरवीत नाहीत रसाविर्भावप्रसगीं त्याच्या पात्रानीं क्षुल्लक कारणावरूच थैमान केल्याचे व गाजराच्या चोरीबद्दल फाशीची शिक्षा दिल्याचें आपल्या वारंवार दृष्टोत्पत्तीस येतें

या काळात लेखकास इतर वस्तूंपेक्षा स्वतःचीच महती वाटत असते आपल्यासारख्या अल्पवयी मनुष्याने येवढा प्रचड ग्रथ लिहावा, या चमत्कारापुढें जगातील इतर सर्व चमत्कार त्याला तुच्छ वाटत असतात यामुळें प्रसंग पाहून व कधी कधीं प्रसग नसताही आत्मचरित्रातील जे जे भाग स्वतःस चटकदार वाटतील ते ते फुगनून जगाच्या कल्याणाकरिता मधून मधून वाचकास अर्पण करण्याचा मोह त्यास आवरत नाही तसेंच 'माझे मत असें आहे' 'प्रत्येक सूज्ञ मनुष्य कबूल करील' अशा प्रत्यक्षत किंवा परोक्षतः अहमन्यभावदर्शक शब्दप्रयोगाचा उपयोग करिताना त्यास दिक्कत वाटत नाहीं थोडीशी शका वाटलीच तर तो 'माझ्या अल्प बुद्धीस वाटतें' असा शब्दात थोडा फरक करितो, म्हणजे आत्मगौरवाबरोबर विनयाचेंही श्रेय पदरात पडते याच काळात कवीकडून सूत्रधाराच्या तोंडीं आपली यथेच्छ स्तुति घालण्यात येते कविनिर्मित सूत्रधारानें जन्मदानाचें ऋण पितृगौरव करून फेडिलें तर त्यात वावगे काय झाले, असें त्यास वाटत असावें

या काळानतर लेखकास दुसऱ्याच्या उसन्या नावावर स्वतःच्या ज्ञानाची मशाल पाजळण्याची लाज वाटू लागते पूर्वी दुसऱ्याच्या नावाखाली वाटतील तीं स्वकपोलकल्पित मते खपविण्यात त्यास जें कौतुक वाटे, तेंच त्यास यापुढें आपल्या नावाखाली इतराचे विचार विकण्यात वाटावयास लागतें. काहीं ग्रथकार तर अरिस्टॉटल, शेक्स्पिअर इत्यादि जगत्प्रसिद्ध ग्रथकाराची प्रसिद्ध वचने तोंडपाठ करून आपलीं म्हणून धीटपणानें इतरावर लादू

लागतात, व ही चोरी कोणीं पुराव्यानिशीं शाबित केल्यास दोन भिन्नकालीन लेखकास एकच कल्पना सुचणे शक्य आहे असें प्रतिपादन करितात तरी पण पूर्वकालीन ग्रथकाराने आपली चोरी केली असे कुभाड न घेण्यापुरते सौजन्य मात्र त्याच्या अगी असते, हे येथें प्राजलपणें कबूल केलें पाहिजे! असो. यानंतर या ग्रथकाराच्या ज्ञानाची व विचारशक्तीची हळूहळू वृद्धि होत जाऊन ते प्रसगवशात् स्वतत्र विचारही प्रगट करू लागतात परतु अजून मार्मिकपणा आणि तारतम्यज्ञान याची तितकी वाढ झाली नसल्या कारणानें त्यांच्याकडून आपली अपरिपक्क मतें सर्वमान्य ग्रथकाराच्या मताबरोबर माडण्याचा अप्रयोजकपणा होत असतो.

या काळात लेखकाच्या हृदयात कल्पकतेविषयी जो आदर उत्पन्न होतो तो मुख्यत्वेंकरून दोन मार्गानी आविर्भूत होतो:—टीकात्मक लेखानी दुसऱ्याच्या कृति हाणून पाडून आणि स्वतत्र कृतीत स्वत ची कल्पना चालवून. या काळात मानसिक सिद्धता चागल्याशा नवीन कृतीला पुरेशा नसल्यामुळें बरेच ग्रथकार पहिल्या मार्गाकडेच वळतात इतराच्या अगीं कल्पकतेचा पूर्ण अभाव आहे हें सिद्ध केल्याने आपल्या अगच्या त्याच गुणाच्या अभावाचे एक प्रकारचें समर्थन केल्यासारखे होतें शिवाय, टीकाकाराला स्वत.स ‘ आम्ही ’ या अनेकवचनी सर्वनामानें सबोधण्याची व टीकेच्या भरात इतरास मुबलक उपदेश करण्याची सोय असल्यामुळें पहिला मार्ग दुसऱ्यापेक्षा मोहक वाटतो यात नवल नाहीं. काहीं ग्रथकाराकडून स्वतत्र ग्रथरचनेत यश न मिळाल्यामुळेच या मार्गाचा स्वीकार करण्यात येतो, व पूर्वाश्रमीं इतरानीं आपल्या अगावर जो उपहासाचा व अपशब्दाचा वर्षाव केला असेल त्याचा अर्क काढून तो त्याजकडून आपल्या पूर्वाश्रमींच्या यशस्वी प्रतिस्पर्ध्यांस अर्पण करण्यात येतो. या किंवा इतर टीकाकाराकडून जी टीका करण्यात येते ती बहुधा विधायक नसून विध्वसक असते, साहाय्यक नसून प्रतिबधक असते. टीकाविषयीभूत ग्रथाची सालडी काढून त्यावर अपशब्दरूप लवणाचा मारा करण्यातच आपलें सारे कसब आहे असें या वर्गाचे मत असतें. टीकाकारानें आपला लेख आपल्या नावाखाली सहीनिशीं प्रसिद्ध न करण्याची खबरदारी घेतली म्हणजे त्याचें नाव उकिरड्यावर येण्याची भीति बाळगण्याचेंही त्यास कारण नसते. टीकाकारात जे अंमळ घोरणी असतात ते निंदाग्नीच्या वर्षावांत

मधून मधून एखाद्या शीतल स्तुतिकणाचेही सिंचन करितात त्याने त्या निंदेस यथार्थतेचे स्वरूप येऊन त्यास स्वत कडे नि पक्षपातत्वाचें श्रेय घेण्यासही सापडते

जे धाडशी ग्रथकार यापेक्षा कठिण अशा स्वतंत्र ग्रंथरचनेच्या मार्गास लागतात त्याचें ध्येय प्रथमतः बुभुक्षित वाचकापुढे चटकदार उपमा, कल्पना व विचार माडणें हें असते, मग ती प्रसगोपात्त ओघानें आली नाहींत किंवा त्यात सत्याश फार थोडा असला तरी त्याची त्यास पर्वा नसते. ती असभाव्य अर्थाच्या किंवा परस्परविरोधी अर्थाच्या रूपानें व्यक्त करिता आल्यास त्याच्या आनंदास सीमा रहात नाही

या काळातली विशेष गोष्ट म्हटली म्हणजे ग्रंथकाराची हा वेळपर्यंत अहंमन्यतेमुळे जी अतर्मुख दृष्टि असते ती लोपत जाऊन तिच्या जागी इतरास प्रसन्न करण्याची बहिर्मुख दृष्टि उद्भवू लागते ही होय. ग्रथकार व रसिक याचें तोपर्यत जे स्वामिसेवकाचे नातें वाटत होतें तें यापुढें त्यास विपर्यस्त रूपानें भासावयास लागतें थोड्या व सुलभ शब्दात विपुल अर्थ आणणें, कोणत्याही वस्तूच्या शाखाविस्तारातून तिचें मर्म हुडकून काढणें, वर्ण्य विषयाची व्यवस्थित माडणी, त्याच्या अगाची मुख्यार्थपोषक व परस्परानुकूल रचना, रसादींची मनोरम निवड व व्यवस्थित योजना इत्यादि चित्ताकर्षक गोष्टीवर तो परिश्रम घेऊं लागतो या सुमारास त्याची साहित्य-शास्त्रांतही गति होऊ लागते प्रथम प्रथम त्याचा भर शब्दालंकारावर असतो, तो हळूहळू अर्थालकारावर होत जातो, व त्याच्या लिहिण्यात अनेक मनोवेधक भाषाप्रकार येऊं लागतात. सुदर अर्थ सुदर भाषेनें व्यक्त करणें हेंच या काळात त्याचें कर्तव्यसर्वस्व होऊन बसतें

ज्या लेखकास लेखनकलेच्या जोरावर फारसें मनोरजन करिता येत नाहीं ते, व कधीं कधी तर ज्याना तें उत्तम रीतीनें करिता येतें तेही, ते रंजन-विषयाच्या किंवा निरूपणाच्या द्वारें न करिता वाचकाच्या अहभावाच्या द्वारें करिताना दिसतात वाचक ज्या वर्गापैकीं असतात त्या वर्गाची स्तुति केली किंवा त्याच्या मताचा अनुवाद केला व त्याच्या मागें 'सुज्ञ' या विशेषणाचें शेंपूट लाविले, कीं ते अगदीं गारीगार होऊन जातात, व त्यांस

आपल्या मनाची प्रसन्नता लेखात भासावयास लागते इतर देशाच्या मानानें आपला देश फार श्रेष्ठ आहे, वर्तमानकालापेक्षा गत काल फार श्रेष्ठ होता, अशीं मतें प्रतिपादिलेलीं त्याच्या अवलोकनात आलीं, कीं त्याच्या पूर्वग्रहास धक्का न बसता त्याचें स्वत विषयीं जें उच्च मत असतें त्याचेंही पोषण होतें, व या लाभाचें ऋण ते त्या लेखाची तारीफ करून फेडून टाकितात. या ' अहोरूपमहोध्वनि ' च्या प्रकारानें लेखक व वाचक या उभयताची मान्यता होऊन एकाच्याही कुरकुरीस जागा रहात नाहीं.

यापुढील पायरीस सत्यान्वेषण काल म्हटल्यास चालेल. या काळात ग्रथकाराकडून भाषेच्या किंवा विचाराच्या लालित्याची उपेक्षा होते असें नाही. इतकेंच, की त्याजकडून उत्तरोत्तर सौंदर्याच्या बरोबरीनें सत्यासही महत्त्व देण्यात येऊ लागते. बाह्य किंवा आतर सृष्टींतील आपण वर्णिलेले प्रकार वस्तुस्थितीस धरून किंवा सोडून आहेत याचा विचार करणें त्यास आवश्यक वाटू लागतें. अर्थात्च सृष्टिरूप [ विशेषतः अत सृष्टिरूप ] खाणींत जे जे गूढ परतु उच्चाराबरोबर चित्तास पटणारे चमत्कार भरून राहिले आहेत ते शोधून काढून त्याची सुदर भाषेच्या कोंदणात स्थापना, स्वभावरूप प्रकृतीचें व रसकृत्यादि कार्याचे सोपपत्तिक वर्णन, हीं त्याच्या ग्रंथात दिवसोंदिवस अधिकाधिक विपुलतेनें यावयास लागतात. सत्याचें व सौंदर्याचे आविष्करण हेच त्याचे कर्तव्य बनून त्याच्या एकीकरणामुळें त्याच्या कृतींस चिरस्थायित्व प्राप्त होतें कालिदास, शेक्सपियर, गेटी, मोलियर, सॅव्हेंटीज, शेख सादी ही भिन्न भिन्न देशातील नररत्नें वाङ्मयसोपानाच्या या शेवटच्या पायरीवर विराजमान झालीं आहेत. त्यास गुरुस्थानी मानून त्याचें शक्य तितकें अनुकरण करणें हेंच होतकरू लेखकाचें आद्य कर्तव्य होय.

प्रत्येक नावाजलेल्या ग्रथकाराच्या लेखनकौशल्याच्या वृद्धींत वर वर्णिलेलें अवस्थात्रय पहावयास सापडेल. पहिल्या अवस्थेंत ग्रंथकाराची दृष्टि सत्य व सौदर्य यापैकीं एकाकडेही नसून केवळ विस्ताराकडे असते, व तो स्वतःच्या प्रौढींतच चूर असतो दुसऱ्या अवस्थेंत त्याचें साधन म्हणून सौंदर्याकडे विशेष लक्ष्य असून रसिकमनोरंजन हें उद्दिष्ट असते तिसऱ्या अवस्थेंत त्याचें चित्त सौंदर्याबरोबर सत्याकडेही वेधिलेलें असतें. ' सत्यं ब्रूयात् प्रियं ब्रूयान्न ब्रूयात् सत्यमप्रियम् ' हें वचन नीतिशास्त्रापेक्षा साहित्यशास्त्रातच

विशेष शोभण्यासारखे आहे. या तीन अवस्थाचा शैशव, तरुण व परिणत असा क्रमनिर्देश किंवा सात्विक, राजस व तामस असा व्युत्क्रमनिर्देश केल्यास वावगें होणार नाहीं ह्या अवस्था प्रत्येक चागल्या ग्रथकारास त्याच्या मगदुराप्रमाणें कमी अधिक काळ भोगाव्या लागतात कित्येक ग्रंथकारास परिणतावस्था लवकर येते, इतरास अखेरपर्यंत एखाद्या पूर्वावस्थेतच कुचबत रहावें लागतें. काहीं ग्रथकार भाषेच्या बाबतींत पहिल्या अवस्थेंत तर विचाराच्या बाबतींत शेवटच्या अवस्थेंत दिसून येतात, व कित्येकाचा याच्या उलट प्रकार पाहण्यात येतो हा भेद नैसर्गिक शक्तीतील भेदामुळें घडून येतो.

या तीन काळाच्या पुढील काळ म्हणजे ग्रथकर्त्याचा देहावसानकाळच होय पण त्याचा संबंध त्याच्या लेखनाशीं नसून विधिलिखिताशी असल्या-मुळें त्याचा येथे विचार करण्याचें प्रयोजन नाहीं. परिणतावस्थेतील ग्रथकाराच्या देहावर जरी काळाची सत्ता असली तरी त्याच्या कीर्तीवर मुळीच नसते, हा सिद्धान्त आजपर्यंत अबाधित चालत आला आहे.

---

मुष्टि २० वी*

## आमचे बैठे खेळ

मौजेकरिता किंवा तात्पुरत्या कारणाकरिता केलेली हलकी गोष्टही कधी कधी कर्त्यास डोईजड होऊन त्याच्या सर्व भावि चरित्राची नियामक होऊन बसते ही अनुभवाची गोष्ट आहे औषधाच्या निमित्तानें केलेले मद्यपान कालातरानें व्यसन होऊन बसते, केवळ नक्कल म्हणून केलेलें अगविक्षेप अस्सल बनून नकल्याच्या अगीं कायमचें वास्तव्य करितात, नुसतें घटकाभर मनोरजन व्हावे म्हणून पाहिलेल्या नाटकप्रयोगातील नटी प्रेक्षकाची गृहिणी होऊन त्यावर मालकी गाजवूं लागते करमणुकीच्या खेळाचाही हाच प्रकार आहे. फुरसदीच्या वेळांत खेळलेले खेळ खेळणारावर लवकरच अस्मानी-सुलतानी गाजवावयास लागून त्यालाच आपले खेळणे करून सोडतात व

त्याच्या महत्त्वाच्या उद्योगास बाजूला सारून त्याचा सारा वेळ आपणच स्वाहा करितात अशा रीतीनें खेळाचे अंकित झालेले अनेक लोक एरवी मोठ्या योग्यतेचे असताही केवळ व्यसनाने कुचकामाचे म्हणून ठरले आहेत खरे हत्ती घोडे वागविण्याची ज्याची योग्यता असावयाची असे वीर पुरुष अकालीं खेळण्याच्या नादी लागल्यामुळे लाकडी चतुरंगसेना नाचविण्यातच कृतार्थता मानिताना दिसतात, व खऱ्या राजेराण्यास मुठींत वागविण्यासारखी ज्याची बुद्धि, असे जन्मसिद्ध मुत्सद्दी कागदी राजेराण्याचीं लग्ने लावण्यातच सार्थक झालें असे समजताना आढळतात

माझी क्रिकेट खेळण्याची हौस थोड्याच काळात कशी करपून गेली हें मी एकदा वाचकास सांगितलेंच आहे त्यानंतर काहीं वर्षांनी आपलें हस्तकौशल्य टेनिसच्या खेळात तरी अजमावून पहावे म्हणून मी रोज नेमानें टेनिसच्या आखाड्यावर जाऊ लागलों कोणतीही कला हस्तगत करावयाची झाल्यास त्या कलेंत निष्णात अशा पुरुषाशींच संबध ठेवावा, असें मीं कोठेंसें वाचिले होते, त्या नियमास अनुसरून मी पटाईत खेळाडूशीच खेळण्याचा परिपाठ ठेविला. परंतु हा परिपाठ एकदोन महिने चालू राहूनहि माझी खेळात प्रगति होण्याचें चिन्ह दिसेना याचीं कारणे अनेक होतीं. प्रतिपक्षाचे बहुतेक चेंडू मजकडे इतक्या वेगाने येत, कीं ते आखाड्याच्या बाहेर गेल्यावरच मला दिसत, किंवा त्यापैकी एखादा त्यापूर्वीं जरी दिसला तरी त्यास टोला मारण्याचा मला हिय्याच होत नसे. कारण पूर्वानुभवावरून त्याला माझा टोला लागण्या ऐवजी मलाच त्याचा लागण्याचा संभव अशी एक दहशत माझ्या काळजात बसून गेली होती, आणि टेनिसचा चेंडू जरी क्रिकेटच्या चेंडूच्या मानाने फार मवाळ असला तरी माझ्या शरीराच्या मानानें फार अंमळ जहालाच होता. मनुष्यजन्म काही वारवार येण्यासारखा नाहीं, तेव्हा शरीर कमविण्याकरिता करावयाच्या व्यायामात शरीर गमावून बसणें मला शहाणपणाचे वाटेना, व म्हणून समोरून येणाऱ्या चेंडूच्या मी बहुधा वाटेस जात नसे एखादा चेंडू लोचटपणानें माझ्या वाटेस जाऊंच लागला तर मी त्यास सभावितपणानें वाट देत असें वाट देण्याइतकाही अवकाश त्यानें ठेविला नाहीं तर त्यावर नाइलाजास्तव बॅटीचा प्रयोग करावा लागे. पण अशा प्रसगीं चेंडू एक दिशेस तर बॅट भलत्याच दिशेस असा

प्रकार हटकून व्हावयाचा. चेंडूचा नेम मात्र माझ्या नेमापेक्षा अचूक असे. कारण माझ्या दिशेस येऊन त्यानें माझा एखादा अवयव त्या दिवसापुरता निरुपयोगी करून टाकिला नाही असें क्वचितच घडे बॅटीने खेळण्याऐवजीं अगानेंच खेळण्याचा जर नियम असता तर मला नाहीं वाटत, एकही चेंडू माझ्या देहाच्या तावडींतून [ किंवा माझा देह त्याच्या तावडींतून ] निसटला असता! पण तसा नियम नसल्यामुळे चेंडूनें मला व्यायाम मिळून श्रमपरिहारार्थ अगाची चम्बीही चागली होई याप्रमाणें मी हवेत व चेंडू माझ्या अगावर प्रहार करीत असता प्रेक्षक निर्दयपणे खिदळत बसत तें पाहून अगाचा कसा भडका होत असे! शेवटीं इतराना फुकटचा तमाशा दाखविण्यापेक्षा आपल्या बरोबरीच्या सामनेवाल्याशीं खेळण्याचा माझा निश्चय झाला व तोंडावरील माशीही हलणार नाही असा एक सभावित खेळाडू निवडून मी तो निश्चय अमलात आणिला आता मात्र सगळे पारडें फिरलें माझ्या प्रतिपक्षाचे चेंडू मजकडे फार सावकाश सहल करीत येऊं लागले. त्यामुळें त्याना मारण्याकरिता पवित्र्यात उभे रहाण्यास मला मुबलक फुरसद सापडू लागली, व प्रत्येक चेंडूस माझी बॅट स्पर्श करू लागली. हें पाहून माझा आनद गगनात मावेना. येवढे मात्र खरें, की माझ्या बॅटीकडून चेंडूस परत गति मिळाल्यावर तो माझ्या सामनेवाल्याच्या क्षेत्रातच पडेल असा मुळींच नेम नव्हता कधीं कधीं तो जाळ्याच्या अलीकडे माझ्या पायाशींच लोळण घेई, तर कधी कधी शर्यतीच्या घोड्याप्रमाणें प्रतिपक्षाचें क्षेत्र ओलाडून पलीकडे पडत असे, आणि कधीं कधीं तर तो वर आकाशात उडून माझ्या डोक्यासर झाप घालीत असे पण शभरातून पन्नास वेळा तो आखाड्याच्या बाजूच्या रेषांशी समातर गतीनें प्रवास न करिता तिरकस गतीनेच करी, आणि खरोखरच देवाच्या दयेनें अफाट दुनिया मोकळी असता त्यानेंच बिचाऱ्यानें आपली गति मर्यादित का करून घ्यावी? अशा प्रकारें चेंडू जेव्हा जेव्हा म्हणून माझ्या क्षेत्राच्या पार्श्वरेषाशीं नव्वद अंशाचा कोण साधून जात असे, तेव्हा टेनिसचा आखाड्याचा आखाडा जर यंत्रानें चेंडूच्या दिशेस फिरविता आला असता तर किती चागलें झाले असतें असा विचार माझ्या मनात आल्यावांचून रहात नसे पण माझ्या मनाच्या धावेइतकी यात्रिक शोधाची धाव थोडीच रहाणार आहे! अर्थात् चेंडूचा

स्वैर संचार स्वस्थ चित्तानें पहाण्यापलीकडे काहींच करिता येण्याजोगें नव्हतें. पूर्वी चेंडूदांडूची दिवस दिवस गांठच पडत नसे ती आता पडते तरी, एवढ्यावरच मी मनाचें समाधान करून घेई.

जरी आमच्या स्वदेशभक्त चेंडूनी याप्रमाणे टेनिसच्या आखाड्यावर पूर्ण स्वस्थता ठेविली होती, तरी भोंवतालच्या प्रदेशांत त्यांनी कहर उसळून दिला होता एका चेंडूनें तमासगिरांपैकीं एकाचें पागोटें भिरेदिशीं उडवून दिलें, तर दुसऱ्यानें दुसऱ्या एकाची चाळिशी फोडून टाकिली. एक तमासगीर डोक्यावर फार उंच उडालेल्या चेंडूकडे आ करून पहात बसला असता चेंडू अवचित खालीं उतरून त्याच्या तोंडांत घुसला, व तो शस्त्रक्रियेनेच बाहेर काढावा लागला. दुसरा एक आमच्या ओळखीचा तमासगीर एक दात अजून शिल्लक आहे अशा सबबीवर दाताची कवळी विकत घेण्याचें दिवसगतीवर ढकलीत होता, पण आमच्या एका चेंडूनें त्याचा उरलेला दात उपटून टाकून ती सबबच नाहींशी केली याप्रमाणे कोणाची बत्तिशी तर कोणाची चाळिशी, कोणाची पगडी तर कोणाची बरगडी स्थानभ्रष्ट करण्याचा आमच्या चेंडूंनीं सपाटा लाविला आमच्या टेनिसच्या आखाड्यापासून अर्ध्या मैलाच्या टापूंत बॅट घेतल्याशिवाय कोणीहि फिरकेनासा झाला तेव्हा-पासून मूल खोड्या करीत असल्यास आई आमच्या चेंडूचा धाक दाखवूं लागली, व घोडा पाणी पीत नसल्यास घोडेस्वार त्यास 'तुला पाण्यात टेनिसचा चेंडू दिसतो की काय?' असा प्रश्न विचारूं लागला.

अशा खेळानें भोंवतालच्या लोकास कितीही व्यायाम घडला, तरी आम्हा खेळणारास घामाचें टिपूसही येत नसे त्यापेक्षा प्रेक्षक या नात्यानें बाकावर बसूनच अधिक व्यायाम होतो असें माझ्या अनुभवास येऊं लागलें प्रेक्षकास पटाईत खेळाडूंनी लागोपाठ मारिलेल्या चेंडूच्या धोरणानें डोळ्याबरोबर मानही उजवीकडून डावीकडे व डावीकडून उजवीकडे फिरवावी लागत असल्यामुळें त्याच्या मानेचे मणकेन् मणके मोकळे होतात, असें दिसून आल्यापासून मी टेनिसचा खेळ पाहण्यातच वेळ घालवूं लागलो. त्यामुळें थोड्याच दिवसात माझी गर्दन झटकून उंच दिसूं लागली, व गळ्यास वळकट्या दिसत होत्या त्याही नाहींशा झाल्या. तें पाहून एक स्नेही एके

दिवशी मला म्हणाले, ' तुम्ही आजपर्यंत बुदबळातले घोडे दिसत होता, ते आता थेट उंटासारखे दिसायला लागलात.'

कधी कधीं एखाद्या क्षुल्लक गोष्टीमुळेंही आयुष्यक्रमाला निराळेच वळण मिळाल्याचे अनेक दाखले इतिहासात सापडतात. मिसर देशाच्या एका राणीचे नाक सरळ होते म्हणून जगाच्या इतिहासात मोठमोठाल्या घडामोडी झाल्या असें म्हणतात. तसाच काहीसा प्रकार माझ्या मानेबद्दलच्या या उद्गारानी घडवून आणिला. त्यामुळे बुदबळाचा डाव असतो तरी कसा याबद्दल मला उत्कंठा उत्पन्न झाली लागलीच मीं बाजारात जाऊन हत्ती, घोडे, उंट, प्यादे, वजीर, राजा आदिकरून सर्व चतुरंग सेना तिच्या रणक्षेत्रासह १–१॥ रुपयात खरेदी केली, आणि बहूनानाबरोबर रोज नेमानें बुदबळे खेळण्यास सुरुवात केली या चतुरग सेनेस रहाण्याचा व खाण्याचा खर्च तर मुळीच लागत नव्हता खेळणें आटपले म्हणजे हत्तीची सोंड वजिराच्या कमरेभोवतीं व उंटाची मान राजाच्या गळ्यात, अशा थाटाने मी त्या सर्व सैन्यास रणक्षेत्रात कोंडून ठेवीत असें. पण त्यापैकीं एकानें तरी हू की चू केले असेल तर शपथ ! एकदा तर उदबत्त्याच्या सोंगट्या कमी पडल्या असें पाहून मीं प्रत्येकाच्या डोक्यास एक एक छिद्र पाडून त्यात एक एक उदबत्ती ठेवून दिली, तरी एकानेही कुरकुर केली नाहीं, व आमचे जेवण चाललें असता हत्तीनें सोंड किंवा उंटानें मान लाबवून एक पक्वान्नही पळविलें नाहीं खेळ चालू असताना तांबडी आणि हिरवीं मोहरी एकमेकास वैऱ्यासारखीं लेखीत खरीं, पण खेळ आटोपल्यावर भारती योद्धयानींही त्याच्यापासून धडा घ्यावा असें त्याचे परस्पराशी सालसूदपणाचे वर्तन असे.

हत्ती समोर व उंट तिरकस गतीने वाटेल तितका दूर एका झपेसरसा जातो, घोडा अडीच घरें चालतो, इत्यादि गतींचे नियम प्रथम मला ग्रहगतींच्या किंवा दैवगतींच्या नियमापेक्षाहि विलक्षण वाटले, पण लवकरच ते परिचयानें पूर्णपणें अंगवळणी पडून गेले, इतके कीं, खऱ्या हाडामासाचा उंट रस्त्यानें सरळ चालू लागला की त्याच्या बुद्धिमांद्याबद्दल मला विलक्षण तिरस्कार वाटू लागला, व चालताबोलता हत्ती वाकड्या रस्त्यानें जाऊं लागला कीं, त्याच्या वाममार्गी वर्तनाचा मी जोरानें निषेध करूं लागलों. एकदा मीं एका गल्लीनें जात असता समोरून एक उंट येताना पाहिला, परंतु

तो वाकड्या रस्त्यानें जाईल अशी मला खात्री वाटत असल्यामुळें मीं आपली सरळ वाट सोडली नाहीं. या माझ्या गफलतीबद्दल मला देहदंडरूप प्रायश्चित्तही मिळाले असतें पण इतक्यात मागें आवाज झाल्यावरून वळून पाहिलें, तों एक धिप्पाड हत्ती त्याच गल्लीनें माझ्या मागून येत आहे असें दिसले आता आपली मुळींच धडगत नाहीं असें वाटून मी चटकन् जवळच्या एका बोळात शिरलों त्यामुळे माझी हत्तीच्या तावडींतून तर मुक्तता झालीच, पण तिजपेक्षाही शर्थीचा बचाव उंटाच्या लाथेपासून झाला कारण मी एकीकडे झालों तेव्हा उंटाचा पाय माझ्या अंगावर पडण्याच्या बेतातच होता. उंटाची मान वर असल्यामुळे त्याला मात्र याची वार्ताही नव्हती! जो मी हत्ती उंटास खव्यांप्रमाणे बोटानीं खेळवीत होतों, त्यासच त्यानीं राक्षसाप्रमाणें पायाच्या बोटाखालीं लाथाडण्याचा प्रसंग यावा ना! ईश्वरेच्छा बलीयसी! दुसरें काय?

हळूहळू बुदबळाच्या खेळानें मला इतकें वेड लाविलें, की नित्यकर्म करितानाही समोर एखादे मोहरे नसलें म्हणजे मला करमत नसे. जेवताना समोर मोहरीं दिसावीं म्हणून मी रोज उदबत्त्या लावून जेवावयास बसू लागलों कचेरींत जाताना कागदावर ठेवावयास वजनें पाहिजेत हे निमित्त पुढें करून एकेक खिशात एकएक हत्ती घेऊन जाऊं लागलों. इतकेंच नाहीं, तर निजतानाही हत्तीच्या सोंडेवर किंवा उंटाच्या मानेवर मान टाकून मी पडू लागलों 'अँड्रोक्लीज आणि सिंह' ही गोष्ट ज्यानी वाचिली असेल, त्याना या गोष्टीचें आश्चर्य वाटणार नाहीं. उशाशीं उंट व हत्ती घेण्याचा हा क्रम मीं चालू ठेविला नाही याचें कारण इतकेंच, की एका रात्रीं एका उंदरानें एक उंट व एक हत्ती आपल्या बिळामध्ये लांबविले, आणि मी जर त्याच्या अंगावर घोडा फेंकला नसता तर त्याने दुसऱ्याही हत्तीची तीच वाट लाविली असती.।

हळूहळू मला जेवणाचाही विसर पडू लागला संध्याकाळचे जेवण होण्यास रात्रीचे बारा बारा दोन दोन वाजू लागले, इतकेच नाही, तर आदल्या दिवशींचे संध्याकाळचें जेवण दुसऱ्या दिवशी सकाळी नऊ दहा वाजताही होऊं लागले पण तें त्याच दिवशीचें आहे असें वाटून मी बायकोस जरा टोंचून म्हणावे, 'मी रोज उशिरानें जेवतों अशी तुझी नेहमी टुरटुर असते आज पहा बरें किती वाजले आहेत ते!' याप्रमाणें सकाळचे दहा वाजण्याचें जेवण संध्या-

काळीं आठ वाजता व संध्याकाळचे आठ वाजण्याचें जेवण सकाळीं दहा वाजता होऊं लागलेलें पाहून बिचाऱ्या बायकोलाही मनातून समाधान वाटूं लागलें

खेळाकडे एकदां तद्री लागली कीं भोवतालचें जग बुडालें म्हणून समजावें. एकदा मी खेळता खेळता कुटलेली सुपारी तपकीर म्हणून ओढल्याचे व तपकीर सुपारी म्हणून तोंडात टाकल्याचे आठवते, दुसऱ्यादा तर मी विडी म्हणून उंटच तोंडात धरून पेटवूं लागलो होतों पाङ्तात्यानीं एकदा सबंध हत्ती सुपारी म्हणून तोंडात टाकिला, आणि तो दातानीं फुटेना म्हणून दुसरा हत्ती अडकित्याने कातरून गट्ट केला या गजानन-महाराजास प्रायश्चित्त म्हणून लवकरच हस्तिरोग [ Elephantiasis ] जडला, हें येथे सागणें अवश्य आहे पण या सर्वांपेक्षाही गमतीचें वर्तन बङ्नानाकडून घडलें त्यानी पिण्याकरिता म्हणून पाण्याचा एक पेला जवळ ठेविला होता व एक निकडीची चिठ्ठी पाठविण्याचें कारण पडल्यामुळें दौतही जवळ घेतली होती, परतु सारें लक्ष्य खेळाकडे लागल्यामुळे त्यानीं चिठ्ठी पाण्यानें लिहून व घाईघाईने बद करून पाठवून दिली, आणि नतर दौत तोंडास लावून तिच्यातील शाई घटाघट पिऊन टाकिली शाई प्याल्यावर त्याच्या शरीरावर असा विलक्षण परिणाम झाला, कीं त्यानतर लवकरच त्याचें सर्व सफेत केस काळे कुळकुळीत झाले, आणि काहीं दिवस त्याच्या अंगातून जो घाम जात असे तोही शाईसारखाच असे, इतका कीं कचेरींत जाताना घातलेला पाढरा कोट परत येईपर्यंत काळ्या परमाच्याच्या कोटासारखा दिसू लागे !

आमचें व्यसन याप्रमाणें अमर्याद वाढलेलें पाहून आमच्या सर्व स्नेह्यास मोठी चिंता पडली. शेवटी सर्वानुमतें असें ठरलें, कीं एक व्यसन सोडविण्याकरिता दुसरें व्यसन जडविले पाहिजे, त्याशिवाय गत्यंतर नाही पाङ्तात्यासबधानें या नियमाचा खरेपणाही त्याच्या नजरेस आला होता. त्याना एका काळीं विडी पिण्याचें मनस्वी व्यसन होतें, परतु त्याना दारू पिण्याचें व्यसन जडविल्यापासून विडीचे व्यसन पार नाहींसें झालें होतें. शेवटीं मला सोंगट्याच्या पटाचें व्यसन लावण्याचा त्यानीं निश्चय केला. परतु फाशांच्या खेळात पोबारा व वाकडे तेरा, छ तीन नऊ व पाच चार

नऊ, छ दोन आठ व पाच तीन आठ, इत्यादि दुकलातील बारकाया लक्ष्यात ठेवण्याची यातायात आम्हाकडून होण्याचे दूरच, उलट फाशातील हस्तिदंतामुळें बुदबळातील हत्तीची आम्हाला आठवण मात्र व्हावयाची, म्हणून कवड्याचा खेळच आम्हाला शिकविण्याचे त्यानी ठरविले. 'हातात कवडी, विद्या दवडी' या म्हणीच्या बागुलबुवाची भीति आम्हापैकीं कोणालाच कधी वाटली नाहीं. कारण आमच्या ठिकाणीं तिचें अस्तित्व शपथेला मोकळें रहाण्यापुरतेंच होतें. त्या विद्येवर कवड्याचा फुटक्या कवडीइतकाही परिणाम होणें शक्य नव्हतें !

झालें लागलीच सोंगट्या, पट, पाऱ्याने भरलेल्या कवड्या वगैरे सर्व साहित्य गोळा होऊन आम्हाला सोंगट्यांच्या खेळाची दीक्षा मिळाली. पहिला डाव दहाचा किंवा पचविसाचा नसल्यास तो देव गजाननास नैवेद्या-दाखल अर्पण करण्याचा प्रघात आहे सकटसमयीं देव भक्ताच्या रक्षणार्थ धावून येतो, या नियमाची सत्यता येथे जशी दिसून येतें तशी इतरत्र क्वचित्‌च दिसत असेल. आजपर्यंत खेळाडूनीं देवास बहाल केलेले सर्व नैवेद्य गोळा केले तर दोन, तीन इत्यादि किरकोळ दानाची एक भली मोठी रासच आढळून येईल या भक्तांत सगळेच स्वार्थपरायण असतात असें मात्र कोणीं समजूं नये. मला जेव्हा जेव्हा म्हणून लागोपाठ तीन दहा किंवा तीन पंच-वीस पडत तेव्हा तेव्हा त्यातील पहिला दहा किंवा पचवीस मी भक्तिपूर्वक देवाला देऊ करी. पण या कलियुगातले लोक इतके नास्तिक, कीं मला तसे कोणीही करू देत नसे

इतर खेळातल्याप्रमाणे सोंगट्यातही माझ्या हाताला किंचित् कमी यश असे. मला दान पडत नसे असें नाहीं, पण ज्या वेळेस जें पडावयाचें त्या वेळेस तें पडत नसे इतकेंच काय ते. माझा हात लागण्याकरिता व सोंगट्या लावण्याकरितां किंवा कटावर बसविण्याकरिता भारी दानाची जरूर असे तेव्हा मला दोन तीन पडत, मग शत्रुपक्षाकडील सोंगट्या आडव्या होऊन धोरू लागल्या आणि आमच्याकडील सोंगट्या जख्ख म्हाताऱ्या होऊन त्याची गति कुंठित झाली म्हणजे मजकडून दहापचविसाचा धूमधडाका सुरू होई, इतकेच नाहीं तर त्याचा कोट ढासळून पडू नये म्हणून मधून मधून सहाचें लुकणही मला मिळत असे. अशा वेळीं दान देणाराची अगदी

पुरेवाट होत असे, व व्यवहाराल्याप्रमाणें खेळातही दान देणारापेक्षा घेणाराच सढळ हाताचा दिसून येत असे. जेव्हा जेव्हा मला दहा पाहिजे असत, तेव्हा तेव्हा मी धावत धावत रस्त्यावर जाऊन हातास धूळ लावीत असें, व हातातील कवड्या जुळवून जमिनीसरशा दूरवर लोटीत असें किंवा त्याच्या-खालून हात हलकेच मागें ओढीत असे, आणि जेव्हा तीनचारच पाहिजे असत तेव्हा हाताचें मुटकुळे करून कवड्या अलगत ठेवीत असे पण इतकें करूनही इष्ट दान न पडतां प्रत्येक वेळी निराशाच पदरी येई मनात योजिलेलें दान मला अगदींच पडत नसे असेंही नाहीं दान पाहिजे किती याचा अंदाज करितांना जेव्हा मजकडून पटावरील घरे मोजण्यात चूक होई तेव्हा दान अचूक पडून मला हर्षवायु होण्याच्या बेताला येई, पण दान देताना ते अपुरें किंवा फाजील दिसून येऊन ती आपत्ति टळे. दान घेण्यांत माझा असा स्वतत्र बाणा दिसूं लागल्यापासून इतर खेळाडू मला आपल्या पक्षाला घेण्याबद्दल प्रथम अर्धवट पण पुढें पुढें पुरी नाखुषी दाखवू लागले होमरच्या जन्मस्थानाचा मान आपणास मिळावा म्हणून अनेक गावामध्ये जशीं रणें माजून रहात, तशीच निकराची रणे आपल्या पक्षाला हा गडी नको अशाबद्दल त्याजमध्यें माजू लागली शेवटी एकदा यासबबानें आमच्या व उलट पक्षामध्यें इतक्या निकराचें भाडण झालें, कीं आमचा पक्ष आपल्या सर्व म्हाताऱ्याकोताऱ्या सोंगट्या व उलट पक्ष आपल्या निजलेल्या सोंगट्या परस्परावर फेकू लागले उलट पक्षाच्या सोंगट्यापैकी एक सोंगटी भूत होऊन वाटेंत सापडेल त्याचा घात करीत उलट्या पावलानीं पटावर सचार करीत होती, ती एका मनुष्याच्या डोक्यावर बसून त्याच्या अगात पिशाचाचा सचारही झाला पिशाच्च घालविण्याचे कामीं अल्पदानानीं चवताळलेल्या गजाननाचाही काहींच उपयोग होण्यासारखा नव्हता हा सारा अनर्थ झालेला पाहून मीं पुन्हा खेळण्याकरिता हातात कवड्या घेणार नाहीं अशी शपथ वाहिली खेळण्याशिवाय इतर कामाकरिता कवड्या हातीं धरण्यास या शपथेने अर्थात् काहींच हरकत येत नाहीं हे येथे सागून ठेविलें पाहिजे.

यानतर आम्ही खेळण्याकरिता दशावतारी गंजिफा घेतल्या. हा वेळपर्यंत आमचा देवादिकाशी संबंध पहिल्या हातापुरताच असे शिवाय तो ऐच्छिक असून एकापेक्षा अधिक देवास दान देण्याची आम्हाला मुळींच सवलत नसे

देवगजाननास आम्हीं दान देत असू तेंहि मनःपूर्वक नसून केवळ हलके दान त्याच्या माथीं मारण्याकरिताच देत असूं ज्याप्रमाणें सुया व वस्तरे हीं शिवण्याचीं व श्मश्रूचीं यंत्रे म्हणून, किंवा मुखपृष्ठावर गणपतीचें चित्र असलेलें चोपडें सचित्र पुस्तक म्हणून गिऱ्हाइकावर लादण्यात येतें, त्याचप्रमाणे तोही निव्वळ फसवेगिरीचा व्यापारी कावाच असे पण यापुढें दशावताराचें चित्र-द्वारा दर्शन व स्पर्श हीं आम्हाला नेहमींच घडूं लागलीं प्रथम प्रथम जरी वराहाच्या दंष्ट्रेची व नारसिंहाच्या नखांची आम्हाला भीति वाटत असे तरी लवकरच आम्हीं त्याना करतलावर लीलेनें नाचवूं लागलों. आम्हापैकीं एकजण मत्स्याहारी होता, त्याला तर मत्स्याचीं पाने पाहून तोंडाला पाणीही सुटू लागलें, जणु काय तो मत्स्याच्या जीवनाचीच तयारी करीत आहे! आम्हापैकीं ज्याच्या अगात पिशाच्चाचा सचार झाल्याचें वर सांगितलें आहे त्याला तर गंजिफाच्या खेळाने चागलाच फायदा झाला कारण त्याला प्रत्यहीं रामावताराचें दर्शन घडत गेल्यामुळें त्याच्या अगातलि भूत कोंबडीच्या बळीवाचूनच चालतें झालें.

याप्रमाणें आमचें जरी या खेळापासून हितच झाले तरी खुद्द देवाची स्थिति फारशी समाधानकारक नव्हती मातृद्रोही परशुराम व बहुपत्नीक कृष्ण याच्यामध्ये वसलेल्या मातृभक्त व एकपत्नीक रामाची मला पुष्कळदा मनापासून कींव येत असे तसेच ‘अहिंसा परमो धर्मः’ या उदात्त तत्त्वाचा कैवारी बौद्धावतार एकीकडून कृष्णाचे सुदर्शनचक्र व दुसरीकडून कलंकीची तरवार याच्या कात्रींत सापडलेला पाहून मी कधीं कधीं त्याच्या जवळचीं पाने लवकर लवकर काढून टाकून त्याला सकटातून सोडविलें आहे.

या खेळाचा शेवटही धार्मिक स्वरूपाचा आहे. ज्याप्रमाणे देहावसान-समयीं मुखात, कोणत्याही निमित्तानें का होईना, रामनाम आले म्हणजे प्रारब्धसंचिताचा लोप होऊन मोक्षप्राप्ती होते, त्याप्रमाणें गजिफाच्या खेळात अखेरचा हात जिंकला म्हणजे सर्व डाव जिंकल्याचें श्रेय येते. परतु मृत्यूची आठवण होताच विवेकी मनुष्याच्या मनास जसा दचका बसतो, तसा माझ्याही मनास त्या खेळात अव्वलपासून अखेरपर्यंत बसून राही,

व दुकला, देण्याघेण्या, सरी, उताऱ्या इत्यादि पर्याय चालू असता अखेरीच्या विचारानें माझ्या मनात धस्स होत असे बरें, अखेरी साधण्याची इतकी सावधागिरी बाळगूनहि ती साधण्याचा योग फारच क्वचित् घडून येई. एकदा अखेरीचें पान कलकीचा एक्का असता मी त्याजकरिता मत्स्याचा पजा राखून ठेविला ! बरे झाले, की मी तो पजा खालीं न टाकता हातातूनच दाखविला, नाहीं तर कलकीच्या तरवारीने त्याचे तुकडे तुकडे केले असते. दुसऱ्या एका खेपेस रामाची दुर्री हें अखेरीचे पान असता मी रामएक्काच उराशीं बाळगून ठेविला होता ! ही चूक कशी झाली हे मला या घटकेस सागता येत नाहीं. कारण कोणतेही कार्य परशुरामादिक धीमान् पुरुषानीं करावयास घेतल्यास त्यांच्या सख्याधिक्याने त्यास यश प्राप्तीचा सभव अधिक असतो, पण तेंच मत्स्यादि निर्बुद्ध पाण्यानीं घेतल्यास संख्याधिक्याने बजबज पुरी माजून यश दुरावते, हा नियम मीं चागला तोंडपाठ करून ठेविला होता. राम एकबाणी, एकवचनी असल्यासच बलिष्ठ असतो अशी विजातीय कल्पना त्या डावात माझ्या डोक्यांत खेळत असल्यास नकळे अशा चुकीनें काडी लागून माझें आधीच विरक्त झालेलें मन पूर्णपणे विटून जावे यात नवल नाही.

आमच्या बैठकीपैकी दुसऱ्या अड्ड्यातील खेळाडू पत्ते खेळताना राजेघराण्याची लग्नें लावीत, तें पाहून मला त्याचा हेवा वाटू लागला. त्या राजेराण्याच्या सौंदर्याची मी आमच्या गजिफातील वराहनारसिंहाच्या सौंदर्याची तुलना करून पाहूं लागलों तेंव्हा तर मला गजिफाबद्दल फारच तिटकारा वाटू लागला. पत्याच्या डावातील एकटी राणी जरी घेतली तरी तिच्या डोळ्यात मत्स्य, गतीत कूर्म, कटीत नारसिंह, बाध्यात वामन, हृदयात परशुरामाचा परशु, भिवयात रामाचे धनुष्य, काळ्या व कुटिल केसात कृष्ण, गळ्यात बौद्धाचा शख व जिव्हेत कलकीची तरवार, याप्रमाणें बहुतेक सर्व अवतार तिच्या ठायीं वसत असतात मग पत्त्यांचा सबध जोड गजिफाच्या जोडापेक्षा मला अनेकपटीने हृदयगम वाटू लागला यात नवल कसचें ? शेवटी एक दिवस मजवर काडी लागलेली पाहून मीं अत्यंत दुःख झाल्याचा बहाणा केला व गजिफाच्या खेळास कायमची रजा देऊन पत्ते हातीं घेतलें कोणतीही गोष्ट मनापासून करावयाची असल्यास तिला काडीचेंही निमित्त पुरें होतें याचें हें चागलें उदाहरण आहे.

पत्त्याच्या जोडात व खेळात मला जितकें वैचित्र्य दिसून आलें तितकें इतर कोणत्याही खेळात व त्याच्या साहित्यात दिसून आलें नाही. काहीं डावातील पानें रुक्ष असूनही स्निग्ध मित्राप्रमाणें एकमेकाच्या सहवासापासून सहसा दूर होत नव्हतीं, तर काहीं डावातील पानें गुळगुळीत असून बर्फावरून धावल्याप्रमाणें एकमेकावरून घसरत असत. काहीं पानाच्या पाठींवरील नक्षी साधीच असे, तर काहीच्या पाठीवरील नक्षी चाबकानें सडकलेल्या पाठीवरच्यासारखी बरीच घोंटाळ्याची दिसून येई. काहीं पानाचीं टोकें साधी तर काहीच सोनेरी असत. काहीं पानावरील चित्रें कुशल चित्रकारानीं काढलेली व इतकीं सुदर असत, की तीं पानें खाली टाकणें अवश्य असूनही तशीच हातात ठेवावींशी वाटत, व काहीं पानावरील चित्रें इतकी कुरूप असत, कीं ती पाने भराभर फेंकून देऊन त्यापेक्षा हलकीं पानें हातात ठेवणें पत्करे काही चित्रातील स्त्रीपुरुषास दोनदोन तोंडें असून पाय मात्र मुळींच नसत. या दुतोंडी पन्नगाची मला प्रथम प्रथम फार भीति वाटे काही स्त्रीपुरुषाचे वेष दक्षिणी तर काहींकाचे गुजराथी, काहींकाचे मल्याळी व काहीकाचे मुसलमानी व साहेबीही दिसून येत पुराणमताभिमानी बहूनाना परधर्मीय लोकाच्या पेहरावाचीं चित्रें भीतभीतच हातीं घेत व खेळ आटोपल्यावर सचैल स्नान करीत, आणि परधर्मीय राणी हिंदु राजानें किंवा हिंदु राणी परधर्मी राजानें मारून घेणें हे त्याना अकबराच्या कारकीर्दीतील मिश्र विवाहाइतकेंच अश्लाघ्य वाटत असे. नानाच्या या मताचा फायदा इतर खेळाडू चागलाच घेत असत. कारण असा भ्रष्टाचार करण्यापेक्षा डाव हरणे बेहत्तर असें नानाचे मत असल्याबद्दल त्याची खात्री झालेली होती

या सर्व वैचित्र्यात खेळापासून होणारें वैचित्र्य मिळाल्यावर मन गोंधळून जावें यात नवल नाहीं काही खेळात पत्त्याचे चार जोड लागतात तर काहींत एकच व काहींत अर्धामुर्धा जोडच उपयोगात येतो. काहीं खेळात प्रथमच साऱ्या पानाची वाटणी होते तर काहीत मध्यें पानाची गड्डी ठेवून दर हातास एकएक पान उचलावे लागतें. काहीं खेळात उजवीकडून डावीकडे तर काहीत डावीकडून उजवीकडे पानें वांटावीं

लागतात. हें सव्यापसव्य लक्ष्यात न राहिल्यामुळें पुष्कळदा हास्यास्पद प्रकार घडून येतात. उजव्या हाताप्रमाणें डाव्या हातानें किंवा पायानेही पानें वाटण्याचा प्रकार एखाद्या खेळात असतो की काय हे माहीत नाही नसल्यास तो अवश्य सुरू करण्यासारखा आहे. पानाच्या किंमतीसबधानेंही खेळाखेळात अन्तर असतें काही खेळात दहिल्या नहिल्याच्या वर, तर कित्येकात तो एक्क्याच्या खाली असलेला दिसून येतो काहीं खेळात एखादा हुकूम सागावा लागत असल्यामुळे एखाद्या रगासच महत्त्व येते, व इतरात सर्व रंग सारख्याच किंमतीनें विकतात. काही खेळात हातात कमी किंमतीचीं पाने असणेंच इष्ट असतें आणि काहीत अधिक किमतीचीं असावीं लागतात. काहीं खेळात अधिक किंमतीच्या पानाचा उपयोग दुसरी पानें मारून हात जिंकण्याच्या कामी होतो व कांहीं खेळात नुसत्या गुणाची [ Marks ] संख्या वाढविण्याकडे होतो काहीं खेळात हातातील पानाची सख्या कमी असणें बरें, तर काहींत ती अधिक असणें श्रेयस्कर काही खेळात हातातील पानें खालीं उघडीं ठेवून व काही खेळात तीं हातात गुप्तच ठेवून खेळ चालतो. काही खेळात पानें जोडप्या जोडप्यानीं तर काहीत तीं एकएकटींच पडतात. काही खेळात सर्व गडी शेवटपर्यंत असतात, व काहींत ते एक एक गळत जातात हात सपल्यावर त्यातील पानें काही खेळात उच्छिष्टवत् त्याज्य असतात, व काहींत त्यापैकी कित्येक पाने उकिरड्यातील रत्नाप्रमाणें मूल्यवान असतात काही खेळात एका डावाचा पुढील डावाशीं काहीं सबंध नसतो, व काहीत एका डावातील पाने किंवा गुण दुसऱ्या डावात फेडावे लागतात पत्त्याच्या खेळाचे पिसणी, गुलामचोर, गद्धेकोट, बिझिक इत्यादि अनेक प्रकार आहेत गद्धेकोटात हरणाराच्या अगावर गाढवाचें कातडे चढतें असा माझा आरभी तर्क होता, व अखेरीस उरणाऱ्या दोन उमेदवारापैकीं कोणास गर्दभ ही पदवी मिळते हे पहाण्यासाठीं मी प्रत्येकाच्या कानाकडे पहात होतों पण डाव सपत आला तरी एकाचाहि कान लाबत असलेला दिसेना इतक्यात डाव संपला व एकदम गाढवाच्या ओरडण्यासारखा अनेकाच्या हसण्याचा ध्वनि कानावर आला त्याबरोबर गद्धेकोट याचा अर्थ गाढवाचें पाघरूण हा नसून, गाढवाचें कोंडाळे हा आहे हें मला कळून चुकलें.

पत्त्याच्या डावांत मला यश मिळावें म्हणून मी अनेक युक्त्या योजू लागलों. मोठ्या किंमतीचीं पानें पाठीमागूनही ओळखता यावींत म्हणून मी त्याच्या पाठीवर खुणा केल्या, व त्या माझे गडी पांडूतात्या यान। चागल्या पढवून ठेविल्या परतु या युक्तीचा फारसा उपयोग होत नाहीं असें लवकरच दिसून आलें. राजाने पिकाचा सहावा अश घ्यावयाचा असतो, म्हणून राजाच्या पाठीवर मीं सहाचा आकडा लिहिला होता, व राणी त्याची अर्धांगी म्हणून तिच्या पाठीवर तीन हा आकडा ठेवून दिला होता. पण त्या आकड्याचा फारच घोटाळा होऊ लागला. माझ्या हातीं राणी असता पांडूतात्यानी तो राजाच आहे असे समजून एखादें हलकें पान खेळावें, व त्यावर मीं राणी खेळताच माझ्या पुढील गड्यानें राजा टाकून तिला पादाक्रात करून घेऊन जावें असा प्रकार होऊ लागला. दहिल्याच्या पाठीवर मी वरून खाली एक रेघ ओढली होती व एक्क्याच्या पाठीवर खालून वर अशी ओढली होती परतु दोन्ही रेषा एकसारख्या दिसावयास लागून आमच्या प्रत्येक डावात घोड्याएवढाल्या चुका होऊं लागल्या शेवटी पानाच्या पाठीवर खुणा करण्याचा नाद सोडून देऊन आम्ही त्याऐवजी स्वत.च्या मुद्रानींच खुणा करण्याचा क्रम सुरू केला जीभ बाहेर काढली म्हणजे लाल बदाम, डोक्याच्या केंसाकडें हात नेल्यास काळा बदाम, एक डोळा मिटला म्हणजे किलावर, तोंड पोस्टाच्या पेटीसारखें उघडे ठेविलें की चौकट, मिशावर ताव दिला म्हणजे राजा आणि डाव्या नाकपुडीवर बोट नाचविलें म्हणजे राणी, याप्रमाणें आमचा सकेत ठरला पण या सकेताचाही फारसा उपयोग होईना. पांडूतात्याचे केंस पाढरे होऊ लागले तसा त्याच्या हातातील काळा बदाम ओळखणें मला जड जाऊ लागलें. एके दिवशीं माझ्यासमोर एक एकाक्ष खेळावयास बसला होता, व त्याला आमची संकेताची भाषा मुळींच माहीत नव्हती. पण तें माझ्या लक्षांत न राहता मीं किलावरची पानें टाकण्याचा सपाटा चालविला. पांडूतात्या एकदा क्षेत्राहून क्षौराविधी उरकून परत आले त्यानतर एक दोन महिने त्यास ओठावरून हात फिरविताना केसाचे खुट टोंचत असल्यामुळें त्यानीं तसें करणें अजिबाद सोडून दिलें. पण त्यामुळें त्याच्या हातीं चारी रंगाचे राजे असताही त्याच्या

आगमानाची वर्दी मला लागेना, व शेवटीं डाव आमच्यावरच लागत. संसारात काय किंवा खेळात काय, खोटेपणापासून यश नाही हेंच खरें!

पत्त्याच्या खेळापूर्वी मला ज्या ज्या खेळाचे व्यसन जडले होते ते ते खेळ मीं कोणत्या ना कोणत्या कारणानें सोडून दिले पण पत्याचें व्यसन मात्र कधींही सुटेल अशी आजमितीस आशा वाटत नाहीं पत्ते पिसण्याचा माझ्या हाताना इतका चाळा लागला आहे, कीं मी रिकामा बसलों असलो तरी माझ्या हाताचे चलनवलन चालूच असतें. एकदा मी स्वप्नात 'अरे हा बघ गुलाम चोर' असें बरळलों, व खरोखरच चोरी करावयास आलेला चोर ते शब्द ऐकून हातातील थैली तशीच टाकून धूम पळत सुटला, आणि एकदा तर झोंपेंत 'हे पहा मी लग्न लावितों' असे उद्गार काढल्यामुळें माझें आणि बायकोचे निकराचें भाडण झालें या सर्व गोष्टींवरून मला अशी भीति वाटू लागली आहे, कीं जोंपर्यंत जिवात जीव आहे तोंपर्यंत माझ्या हातीं पत्ते राहावयाचेच, व माझा ससाराचा खेळ व पत्त्याचा खेळ हीं बरोबरच पुरी व्हावयाची मी पूर्वी स्वर्गसुखाच्या कल्पनेंत अमृतपान, अप्सराचे नायन, पारिजातकाचा सुगंध याच गोष्टींचा समावेश करीत होतों पण अलीकडे असें वाटू लागलें आहे, कीं स्वर्गात पत्त्याचा डाव नसला तर त्या साऱ्या वस्तु मला नीरसच वाटतील, आणि तो डाव असला तर त्या वस्तूची मला कधींही आठवण होणार नाही! कदाचित् तेथें गद्देकोटास ऐरावतकोट म्हणत असतील, व राण्याबद्दल तिलोत्तमा, उर्वशी इत्यादिक अप्सराचीं व राजाबद्दल चित्ररथादि गधर्वांचीं चित्रे असतील कदाचित् तेथें लाडिसाच्या खेळाला विमानाचा खेळ म्हणत असतील कदाचित् तेथे सहस्रनेत्र इद्रास सरपंचाचें [ Umpire ] व बृहस्पतीस गुणगणकाचें [ Marker ] काम करावें लागत असेल कसेही असले तरी स्वर्गवास व पत्त्याचा खेळ या कल्पना माझ्या डोक्यात परस्पराशीं इतक्या सलग्न झाल्या आहेत, की त्या दूर करणें मला या जन्मीं तरी शक्य वाटत नाहीं!

---

मुष्टि २१ वी*

# यांत्रिक चमत्कार

विचारी मनुष्यानें जगातील घडामोडींकडे दृष्टि फेकल्यास त्याला असें दिसून येईल, कीं प्रतिवर्षी, प्रतिदिनीं, किंबहुना प्रतिक्षणीं निसर्ग व कला यांचा जंगी सामना चालला असून त्यांत कला निसर्गाचा एक एक प्रांत सावकाश पण हटकून काबीज करीत चालली आहे. जमीन कसदार नसली तर तिच्यांत अनेक खतें घालून ती सुपीक करितां येते पाऊस पडत नसला तर तोफांच्या साहाय्यानें कृत्रिम पाऊस पाडितां येतो. फार काय, पण कल्पक पुरुष वनस्पतींच्या मिश्रणापासून नवीन नवीन सुंदर फळें व फुलेंही उत्पन्न करूं शकतात जो प्रकार वनस्पतिसृष्टींत, तोच मानवी सृष्टींतही दिसून येईल कुरूप स्त्रियांचीं व्यंगें लपविण्यासाठीं किंवा सुरूप स्त्रियांचें लावण्य खुलविण्यासाठीं प्रतिवर्षी नवे नवे अलंकार निर्माण होत आहेत. निसर्गानें जरी एखाद्यास म्हातारा ठरविला तरी कलेस त्याला पुनः तरणाताठा बनवितां येतें. चंद्रसूर्य जरी अस्तंगत झाले तरी त्यांच्या तेजाशीं स्पर्धा करणारे धुराचे व विजेचे दिवे तळपत ठेवितां येतात एकीकडे हजारों खंडी माल पाठींवर घेऊन आगगाड्या रुळावर वायुवेगानें सरपटत आहेत तर दुसरी-कडे त्यापेक्षा कमी ओझें घेऊन का होईना, रुळांच्या आधारावांचून मोटारी व पायगाड्या तितक्याच वेगानें धडपडत आहेत. एकीकडे तारायंत्रें पृथ्वीच्या एका टोंकाचा संदेश तारांच्या मध्यस्थीनें दुसऱ्या टोंकाला पोहों-चवीत आहेत तर दुसरीकडे बिनतारी वार्ताहर यंत्रें तो संदेश भूमीच्याच मध्यस्थीनें पोहोंचवीत आहेत मनुष्याचा ध्वनि यंत्रानें पुष्कळ अंतरावर ताबडतोब पोहोंचूं शकतो, त्याप्रमाणें तो पुष्कळ काळपर्यंत यंत्रांत जशाचा तसाच राहूंही शकतो मनुष्याचें स्वरूप व कृति हींही यंत्रानें चिरकालिक करितां येतात, व तीं दूरदूरच्या प्रदेशांत जशींचीं तशीं दिसावींत असें यंत्र या घटकेस बाहेर येण्याच्या बेतांत आहे यंत्राच्या साहाय्यानें दूरदूरचे गोल जवळ दिसतील व जवळच्या वस्तूचे परमाणु एकमेकांपासून विरळ दिसतील असें करितां येतें यंत्राच्या आधारानें समुद्राच्या पृष्ठभागीं व

---

* मनोरंजन, पु. १७, दिवाळी–अंक, [ सन १९१२ ]

उदरात जलचराप्रमाणे सचार करिता येतो व हवेत पक्ष्याप्रमाणें उडता येतें. साराश 'मूक करोति वाचल पंगुं लघयते गिरीन्' इत्यादि ईशसामर्थ्यवर्णन पर वाक्यें यंत्रकलेसही लागूं करिता येतील यात संशय नाहीं अतर इतकेच की, ईश्वर आपले चमत्कार केवळ मनुष्याच्या सुखाकरिता करितो व यत्र-कलेचे चमत्कार मनुष्याच्या कल्याणाप्रमाणें दुःखासही कारण होतात. एका मिनिटास शेंकडो प्राण घेणाऱ्या बदुका आणि एका जाभईबरोबर शेकडों शरीरें छिन्नभिन्न करणाऱ्या तोफा मनुष्याच्या कल्पकतेचेच फळ असून त्या आगगाड्याच्या व आगबोटीच्या सख्ख्या बहिणीच होत एका वर्गातील बहीण या जगातल्या एका प्रदेशाहून दुसऱ्या प्रदेशास पोहोंचविते व दुसऱ्या वर्गातील बहीण या जगाततून दुसऱ्या जगात पोहोचविते, इतकेंच काय तें या दोन वर्गांमध्यें अतर आहे हे अतर लक्ष्मी व अवलक्ष्मी या सख्ख्या बहिणींमधील अतरासारखेंच आहे असें म्हटल्यास चालेल

प्राण्यापेक्षा यत्रात केवळ सामर्थ्यच अधिक असतें असें नाही, तर त्याच्या अवयवाचे सूक्ष्म ज्ञान झाल्यास त्याचा उपयोग योग्य दिशेनें व अचूक करिता येतो उलट पक्षीं मनुष्याकडून किंवा जनावराकडून काम करून घ्यावयाचें असल्यास ते काम अनेकदा त्याच्या इच्छेवर व आवडी-नावडीवर अवलबून रहातें. मालगाडीत धान्याचीं हजारों पोती भरलीं तरी त्यातील एकही पोतें डब्यानें गिळल्याचें ऐकू येत नाही, पण गड्याच्या हातीं बाजारातून चार आबे आणविले तर त्यापैकी एखादा तरी हरवल्या-शिवाय रहात नाही ध्वन्युद्गारक यत्र एकदा किल्ली देऊन सुरू केलें, की गाणें किंवा भाषण पुरे होईपर्यंत तें थाबावयाचें म्हणून नाही उलट एखादा गवई गाण्यास बसविला तर कांहीं वेळ तबुऱ्याची आणि नंतर त्याची स्वत.ची तारच लागत नाही, आणि एखादा प्रमुख नट अडून बसल्यामुळें अनेक प्रसगीं नाटकाचा प्रयोग बद ठेवावा लागतो कधी कधीं अनिच्छेमुळें असा बिघाड होतो तर कधीं कधीं फाजील कळकळी मुळेंही होतो एखादा वक्ता बोलावयास उभा राहिला तर आपणाशिवाय इतर वक्ते अजून बोलावयाचे आहेत व श्रोत्याच्या फुरसदीस किंवा सहन-शीलतेस मर्यादा असते या गोष्टी तो अजिबात विसरून जातो मधून मधून त्याला त्या गोष्टींचें स्मरण झालेंच तर तो फार तर अध्यक्षांना व

श्रोत्याना थोपवून धरण्याकरिता मधूनमधून 'मला आता फारच थोडे सागावयाचें राहिले आहे,' 'शेवटी सागावयाचें म्हणून इतकेंच,' 'आपला अमोल वेळ मीं घेऊं इच्छित नाहीं.' अशा वाक्याचे मधाचे बोट लावितो, व या आमिषास भुलून बिचारी श्रोतृरूपी सावजे भाषणाच्या चऱ्हाटात अधिकाधिक आवळली जातात भाषण सपल्याबरोबर टाळ्याचा मोठा गजर करण्याच्या इराद्यानें श्रोते अनेक वेळा हातावर हात धरून बसलेले दिसतात, पण त्याचा उपयोग हात चोळण्याच्या कामीच त्याना करावा लागतो अशा तऱ्हेने एक प्रहरभर चऱ्हाट वळून व काहीं प्रेक्षकाना अर्धमेले व इतराना पिसाळलेले करून वक्त्याची स्वारी एकदाची खाली बसते, तेव्हा जो टाळ्याचा कानठळ्या बसविणारा भडिमार होतो व 'भाषणाचा शेवट तर फारच गोड वाटला बुवा!' असे जे चहुकडे एका दिलानें व अत करणपूर्वक उद्गार निघू लागतात त्यानी त्याला पुढील खेपेस पुनः श्रोत्याचा समाचार घेण्यास प्रोत्साहन मिळतें! अशा वेळीं यत्राच्या श्रेष्ठतेचा प्रत्यय येतो.

मनुष्याची जर ही स्थिति, तर श्वापदाची गोष्ट विचारावयासच नको! मला एकदा एका गावी जावयाचें होते पायगाडी किंवा मोटार ठेवण्याची माझी ऐपत नव्हती, व त्या गावाला आगगाडीचा रस्ताही नव्हता जाणारा मी एकटाच असल्यामुळे बैलगाडीचें प्रयोजन नव्हते. म्हणून मी एक भाड्याचे घोडे ठरविलें, व त्यावर स्वार झालों. मी घोड्यावर बसण्यात अगदींच लेंचापेंचा होतों असें नाही. घोडा साळसूद असला, तो नाकासमोर व मद गतीनें चालला आणि रस्ता उच्चसखल नसला, तर मी घोड्यावरून खालीं येईनच असें कोणालाही छातीस हात लावून सागता आले नसते! पण त्या दिवशी मला जे जनावर मिळाले होतें तें सगळ्या मुलखाचें खट होतें काही वेळ त्यानें इतक्या सभावितपणाची चाल ठेविली, कीं मी पेंगत गेलों तरी मुक्काम गाठीन अशी मला खात्री वाटू लागली. त्यासरसें अगात जरा अवसानही आलें, आणि पाठीवरील स्वार अगदीच कच्च्या गुरूचा चेला नाहीं असें घोड्याला दाखविण्याकरता मी हातातील छडी त्याच्या अगाला लागेल न लागेल अशा बेतानें हलकेच त्याला लगाविली त्याबरोबर त्या कागावखोरानें जें उड्डाण मारिलें त्यासरशी मींहि उडी मारिली असती, पण त्याचें आयाळ हाताला लागल्यामुळें व तें मी गच्च आवळून धरल्यामुळे कसातरी

वरच्यावर राहिलो त्या तट्टाची पत मात्र आता माझ्यापाशी बिल्कुल राहिली नव्हती हें चतुष्पाद मजवरच केव्हा स्वार होईल याचा मला नेम सागता येईना. माझी त्रेधा पाहण्याला जवळपास कोणी आहे कीं काय हे बघण्यास मी एकवार दोन्ही बाजूस घाईघाईने दृष्टि फेंकली, व कोणी नाहीं अशी मनाची पक्की खात्री झाल्यावर घोड्याशीं कसे काय पाचपेंच लढवावयाचे याचा विचार करू लागलों. पुनः छडीचा प्रयोग करून त्याच्या शात स्वभावाची कसोटी पाहण्यात अर्थ नाहीं असें मीं लागलीच ठरविलें. छडीच्या पहिल्या फटकाऱ्याने त्याला मजबद्दल दहशत उत्पन्न झाली असावी कारण माझ्या अश्वारोहण कौशल्याशीं सामना देण्याऐवजीं तो एकेक पाऊल मागें घेऊ लागला. ही पिछेहाट पाहून माझे धैर्य दुणावले पण नुसतें धैर्य दुणावून काय उपयोग होता? त्याने त्याची वक्र गति थोडीच बद पडणार होती! शेवटीं त्यावर जरब बसविण्याऐवजीं जरा पडतेच घेण्याचा मी निश्चय केला. कारण मी मनाने पडतें घेतलें नसते तर शरीरानें पडते घेण्याचा मजवर प्रसंग आला असता. असो याप्रमाणें निश्चय झाल्यावर मी त्याला उच्चैःश्रवा, श्यामकर्ण इत्यादि सस्कृत, खड्या, मोत्या, झेंड्या इत्यादि प्राकृत नावानीं आळविण्यास सुरुतात केली परंतु तीं नावे त्याच्या श्यामकर्णरध्रांत शिरण्याचें चिन्ह दिसेना! आता करावें तरी काय अशी मोठी पंचाईत येऊन पडली अशा उलट गतीनें परत घरीं जाण्यात काहींच हशील नव्हतें बरें, हे नाठाळ जनावर घरापाशीच थाबेल याचा तरी काय नेम होता? त्याच्या मर्जीस आले तर तें माझ्या गावीं न थाबता पुढील गावीच मुक्काम करील, किंवा लहर लागल्यास माझी उलट धिंडका काढीत पृथ्वीप्रदक्षिणेचे पुण्य माझ्या पदरी बाधील अशी मला भीति वाटूं लागली शिवाय अशा वक्र प्रवासात आमच्या गावातील चव्हाट्यावरील विहीर मध्यें आल्यास तीं दिसण्याइतकी दिव्यदृष्टि त्याच्या शेंपटाच्या ठायीं व ती टाळून रस्ता काढण्याइतकें शात डोकें त्याच्या मानेवर असेल असा मला विश्वास येईना ती विहीर आपल्या वाटेंतच आहे की नाही हें मी स्वतः मागें वळून पाहाण्याचीही सोय नव्हती. कारण मान फिरविल्यास माझा एका बाजूस तोल जाण्याचा सभव— नव्हे—खात्री होती. शेवटीं वक्र गतीनें घरीं जाण्यापेक्षां, वक्र गतीनेंच का होईना, इच्छित मुक्कामास जाणें बरें, असें ठरवून मीं त्या तट्टाचें डोकें

लगामाचा इशारा देऊन परत गावाकडे वळविलें. पण तें कसलें मुर्दाड ! त्याला माझी खुबी थोडीच कळणार होती ! त्याला वाटलें, कीं माझ्या मनातून परत घरींच जावयाचें आहे ! आणि म्हणून त्यानें चालण्याची दिशा बदलल्यावरही आपली पूर्वीची उरफाटी गतीच चालू ठेविली, आणि या रीतीनें मीं अखेरीस त्या गतीनेंच मुक्कामाचें ठिकाण गाठलें तेव्हापासून जिवंत प्राण्याच्या हवालीं आपले प्राण देण्यापेक्षां सडक दाबणाऱ्या रुळाच्या इंजिनात प्रवास करणें बरें, मग त्या इंजिनाबरोबर मधून मधून मागें यावे लागलें तरी हरकत नाहीं, अशी मीं मनाशी गाठ बाधून ठेविली

केवळ पच महाभूताच्या मदतीनें होणारीं कार्येंच यत्राकडून करविता येतात असें नाहीं. काहीं यत्रें बुद्धीचेंही काम करितात. गुणाकाराचें यत्र पुष्कळानी पाहिलें असेलच एखादे वेळीं मनुष्य गुणाकार चुकले, पण हे यत्र चुकणार नाहीं याप्रमाणेंच व्यवहारी व दशाश अपूर्णांक, व्याज, ठेव, श्रेढी याची उदाहरणे बिनचूक करणारीं यंत्रेंही लवकरच निघतील अशी माझी खात्री आहे पुढेंमागें आवर्तदशाशाचें किंवा अनत श्रेढीचे एखादें यत्र निघून अखड' गती [ Perpetual motion ] च्या प्रश्नाचाही अनायासेच उलगडा होईल असा अजमास वाटतो काहीं दिवसानीं जर कवितेचेंही यत्र निघालें तर त्यात मोठेंसें नवल वाटावयास नको ! आता एका पेटींत कोशातील सारे शब्द घालून ते एखादा दाडा फिरवल्यानें निरनिराळ्या वृत्ताच्या साच्यात पडावे अशी योजना त्या यत्रात करावी लागेल. कमल, चंद्र, फुलें, मुलें, लता, प्रणय, कोकिला, वेडा, स्वर्गीय, अमृत अशा काहीं विशिष्ट शब्दाचा भरणा त्या पेटींत जरा मोठा ठेवावा लागेल, व अमक्या शब्दाचा अमुक स्थली नेहमींच्या परिपाठातला अर्थ नसून निराळा अर्थ आहे अशा जागोजाग टीपा द्याव्या लागतील, या साऱ्या गोष्टी खऱ्या. पण एकदा तेवढी योजना केली म्हणजे कवितेकडे मात्र मुळीच पहावयास नको ! या योजनेने यत्रातून निघणाऱ्या वाटेल त्या कवितेंतून टीकाकाराच्या मगदुराप्रमाणें वाटेल तितका मनोहर अर्थ निघूं शकेल अशा कवितेंत दाडा फिरविणाराच्या तोंडांतील तंबाखूच्या रसापेक्षा निराळा रस सापडण्याचा संभव जरा कमी आहे हें मला कबूल आहे, पण या यत्राबरोबरच रसिकाच्या डोळ्यातून पाणी काढणारी व त्याच्या बरगड्या

हलविणारीं यत्रें काढून तीं अनुक्रमें त्याच्या डोळ्यास व काखेंत अडकविल्यास ही उणीव दूर होईल अशी खात्री आहे.

अशा यत्रातून कशा मासल्याचे कवन निघेल हें थोडक्यात दाखवितों. 'विद्युन्माला' हे वृत्त वाचकास माहीत असेलच याचे 'वृत्तदर्पणा'त जे त्याच वृत्तात वर्णन दिलें आहे तें असे आहे —

**विद्युन्माला ऐसे बोला । जेथे मामा गागा आला ॥**

आता या वृत्ताच्या साच्यात कवितायत्रातून काव्य काढिल्यास ते याप्रमाणें होईल:—

**पाला नाला जोडा फोडा । बाबा काका मामा आत्या ॥**

यत्रातून निघालेल्या श्लोकार्धात मूळ श्लोकार्धापेक्षा एक असा विशेष आहे, की मुळात नुसता मामाच आला आहे, परतु यत्रनिर्मित वृत्तार्धात मामाच्या पक्तीस बाबा, काका व आत्या हीं सुद्धा बसलीं आहेत. बाकी आत्याबाईच्यापेक्षा मामींचाच सहवास मामाना कदाचित् अधिक पसत पडता. असो आता यावरील टीपा देतो, म्हणजे अर्थ स्पष्ट होईल.

टीपा:—'पाला'—बागेत पाल्याचा बागेशीं असलेला सबध प्रसिद्धच आहे. 'नाला'—पुष्करिणीजवळ येथील सबधही स्पष्टच आहे 'जोडा'—नायिका. नायिका रमणीवल्लभाच्या जोड्यापैकीं असल्यामुळें तिला हा शब्द लाविला आहे. 'जोडा' या शब्दाचा पादत्राणा असा अर्थ आहे अशी शका येऊन नायक नायिकेचें चुबन घेण्याला कदाचित् काकू करील, तसे होऊ नये म्हणून खरा अर्थ येथे मुद्दाम विस्तारानें दिला आहे. 'फोडा'—आनंदित [ झाली ] असा अर्थ घेतल्यावाचून निभाव लागत नाहीं, शब्दाचा व अर्थाचा सबध काय, तें एक यंत्रच जाणे ! 'बाबा'—नायकाच्या येथेंही तो सबध फारसा स्पष्ट नाहीं. कदाचित् नायिकनायिकाच्या भावी सततीच्या दृष्टीनें हा शब्द योजिला असावा पण ही योजना नायिकेस किती पसत पडेल हें सागता येत नाहीं. 'काका'—काळ्या कावळयाचा रग काळा असतो हें लहान मुलालाही माहीत असतें. 'मामा'—पाहून 'आत्या'—मिशा, 'आत्याबाईला मिशा असत्या तर तिला काका म्हटलें असतें.' या वाक्यात आत्याबाईच्या मिशा संकेतार्थात होत्या. त्या येथें कवीने स्वार्थात आणिल्या आहेत. कवि काल्पनिक वस्तुही समोर उभ्या करितो त्या अशा !

---

वृत्तार्थाचा अर्थ —' बागेंत पुष्करिणीजवळ [ बसली असता ] नायिका नायकाच्या काळया मिशा पाहून आनंदित झाली '

येथें पुष्करिणीत मुबलक पाणी असल्यामुळे रसासबंधानें दाडा फिरविणाराच्या मुखरसावरच भिस्त ठेवावयास नको.

डोक्यातील विचार व्यक्त करणारे शब्द तयार असल्यास त्यातील एक एक अक्षर अगर त्याचीं सबंध पृष्ठे एका अगर अनेक कागदावर उमटविणारीं यंत्रे निघालीं आहेत पण यत्राचा पट्टा मनुष्याच्या डोक्याभोंवतीं किंवा छातीभोवतीं गुडाळून यत्राचा दाडा फिरविला असता मनुष्याच्या विचारास व मनोविकारास अनुरूप शब्द तयार होऊन कागदावर उतरतील असें एकही यत्र अजून निघू नये हे यंत्रकलेस लज्जास्पद आहे. त्याचप्रमाणे डोक्यात विचार व शब्द तयार असून ते शब्द हजारों लोकास स्पष्टपणें ऐकविण्याइतकी आवाजात ताकद नसेल तर फुफुसात वारा भरून आवाज दणकट करण्यासारखा भाता तयार होऊ नये हेंही त्या कलेस मोठेंसें भूषणावह नाहीं.

यंत्रानी आजपर्यंत मोठ्या गैरसोईपैकीं बऱ्याच दूर केल्या आहेत हें कबूल आहे. परतु लहानसहान गैरसोईकडे कल्पकाचे अजून जावें तसें लक्ष गेलें नाहीं. यंत्राचा मुख्य हेतु श्रम वाचविण्याचा असतो. आजपर्यंतच्या यंत्रानीं लाबचा प्रवास, मोठे वजन उचलणें इत्यादि कृतींचे श्रम वाचनात. पण शतपावली करणे, लहान मूल कडेवर घेणें अशा क्षुल्लक वाटणाऱ्या कृतींचे श्रम वाचविण्याकरिता आजवर एखादें तरी यंत्र निघालें आहे काय? लाबचा प्रवास वर्षांतून फार तर एकदोनदा होतो, परंतु शतपावली रोज दोनदा करावी लागते खंडोगणती ओझें उचलण्याचा प्रसंग सामान्य माणसास जन्मात एकदाही येत नाहीं, पण मूल उचलण्याचा प्रसग पदोपदी येतो. या गोष्टी दिसतात क्षुल्लक, पण त्या वारवार घडल्या म्हणजे त्याचा परिणाम मोठा होतो. दात घासण्याचे यत्र नसल्यामुळें कितीकाचे तरी दात कुजून पडले आहेत तेच ओंठ ताणून धरून मजन लाविलेला ब्रश दातावरून फिरविण्याचें यत्र निघालें तर बुरसलेला दात म्हणजे खरोखरीच दंतकथेप्रमाणें वाटू लागेल! जाभई आल्याबरोबर चुटकी वाजविणे, ढेंकर येतेशी वाटल्याबरोबर तोंड एकीकडे करणें, शिंक आल्या-

बरोबर नाकातील सगळा खजिना दुसऱ्यावर हजाऱ्याप्रमाणें न उडविता नाकास पदर लावणे इत्यादि अल्पस्वल्प गोष्टी नीट रीतीनें पार न पडल्या· मुळें अनेकदा व्यवहारशून्यत्वाचा किंवा आचरटपणाचा दोष पदरीं येतो. पण यापैकी प्रत्येकास अनुरूप असें यंत्र निर्माण झाल्यास आपला व इतराचा किती तरी त्रास चुकणार आहे ! चित्राहुति घालणें, जानवें कानावर चढविणें व सव्यापसव्य करणे, वैश्वदेव करणें इत्यादि यांत्रिक विधि तर यंत्रानींच झालेले बरे मंत्र म्हणण्याचे ढोंग खरे वाटावें म्हणून तोंडानें काही तरी पुटपुट करावी लागते ती पुटपुट बगलेंत विजेची पेटी ठेवून तिच्या तारा ओठास अडकविल्याने बेमालूम करविता येईल. एखाद्या मोठ्या प्रयोजनाच्या प्रसंगी प्रत्येकाच्या पानासमोर उभे राहून व रडक्या सुरतेवरही लटकें हसूं आणून पाहुण्याची प्रार्थना करावयाची असते, तिला विजेच्या पेटीचा खासा उपयोग होईल. तुम्ही परगावी गेला असता एखादे वेळीं तुम्हाला रस्त्यात जुना ओळखीचा मनुष्य भेटतो, तेव्हा तो आनंद झाल्याची बतावणी करून 'कोठे उतरला आहात ?' अशी चौकशी करितो. तुमची उतरण्याची जागा कळल्यावर त्या बाजूचा रस्ता इतःपर टाळावयाचा एवढाच त्याचा ही पृच्छा करण्यात वास्तविक हेतु असतो. तसेंच 'घरीं केव्हा भेटाल ?' असा तुम्ही सवाल केल्यावर तो तुम्हाला नक्की वेळ कळवितो, तीही तो त्या वेळेस सहल करावयास जाण्याच्या इरादानेंच कळवितो. अशा प्रसंगीं त्याला संतोषाची व आतुरतेची मुद्रा धारण करण्याच्या कामीं वरील विजेच्या पेटीची खाशी मदत होईल, व 'मोलें घातलें रडाया, नाही असु आणि माया' अशा मोलकऱ्यास ऊर बडविण्याचें कामीही तिचें चांगले सहाय्य होईल रस्त्यानें पायीं चालण्याचेही एक असें यंत्र निघालें पाहिजे, कीं त्या यंत्राच्या रिकिबीत पाय ठेवून दिले कीं ते त्या रिकिबीसह आपोआप वर खाली व पुढें मागे होतील. मात्र तें यंत्र इच्छेप्रमाणें उजवीकडे किंवा डावीकडे फिरविण्याची कळ त्या यंत्रात जरूर ठेवावी लागेल, नाही तर तें स्वतःच्या प्राणाच्याबरोबर मालकाच्या प्राणाचीही पर्वा न करिता बेधडक वाटेंतील विहिरीवरच चाल करून जावयाचें ! तसेंच तें यंत्र सुरू कसें करावयाचे याच्याबरोबरच बंद करण्याचें ज्ञानही मालकाला अगोदर प्राप्त करून घ्यावें लागेल. नाहीं तर सबंध पृथ्वीप्रदक्षिणा झाली

तरी तें थांबावयाचे म्हणून नाहीं. घरच्या घरीं व्यायाम करण्याचीं काहीं यंत्रे निघालीं आहेत, पण त्यापैकीं एकही जागच्या जागीं चालण्याचा व्यायाम करण्याच्या उपयोगाचें नाहीं. जागच्या जागीं चालणें म्हणजे एका जागीं उभे राहून किंवा आडवें पडून फक्त पायाना अनुक्रमे वर खाली किंवा मागें पुढें गति मिळणें. अशा व्यायामास स्वच्छ हवेची फार जरूर असते. त्याकरिता आत उघडणारा पडदा लाविलेल्या दोन नळ्या खुल्या व स्वच्छ प्रदेशातून, व बाहेर उघडणारा पडदा लाविलेल्या दोन नळ्या कोंडलेल्या व गलिच्छ भागातून आणवून प्रत्येक प्रकारची एक नळी प्रत्येक नाकपुडीच्या वाट्यास यावी अशी योजना करावी लागेल, व प्रत्येक नाकपुडीसमोरील दोन नळ्या आळीपाळीने व नियमित वेळाने तिच्या समोर येतील अशीही तजवीज करावी लागेल. पण त्याबरोबरच व्यायामेच्छूसही आपला श्वास प्राणायामातल्याप्रमाणें नियमित अन्तरानें घेण्याची व सोडण्याची खबरदारी घ्यावी लागेल, नाहीं तर त्यास या लोकची स्वच्छ हवा मिळण्याऐवजीं परलोकची घाणेरडी हवा मिळण्याचाच योग यावयाचा. या यंत्रापेक्षा असें जर कोणीं यत्र काढिलें, कीं एकानें व्यायाम करून दुसऱ्याचें अन्न पचावें किंवा एकानें स्वच्छ हवा घेऊन दुसऱ्याची रक्तशुद्धि व्हावी, तर त्याचे साऱ्या मानवजातीवर मोठे उपकार होतील. पण असें यंत्र आपल्या हयातींत तरी निघण्याची आशा दिसत नाहीं.

या सगळ्यापेक्षा जरूरीचें यत्र स्वयपाकाचें होय हल्ली स्वयपाकी किती महाग झाले आहेत याचा प्रत्येकाला अनुभव आहेच दरमहा दहा दहा बारा बारा रुपये द्यावे लागून त्याची पायाधरणी व मनधरणी करावी लागते ती निराळीच त्याच्या नोकरीच्या अटीही जबर असावयाच्या. पाणी भरणार नाहीं, पाने माडणार नाही, वाढणार नाही, उष्टींखरकटीं काढणार नाहीं, भाडीं घासणार नाही, केरपोतेरें करणार नाही, चहा करणार नाही, मला मात्र दोन वेळचा चहा घ्यावा लागेल, बुधवारीं व शनिवारीं रात्रीं नाटकाला जावयाचें असल्यामुळे यजमानानी लवकर जेवणे उरकलीं पाहिजेत. गुरुवारीं व रविवारी दुपारी आधल्या रात्रीच्या जाग्रणामुळे स्वयंपाक होणार नाही, न्हावी, धोबी वगैरेंचा खर्च यजमानानी सोसला पाहिजे ! इतक्या शर्तींवर मालकाची सुटका झाली तर नशीब ! प्रतिवर्षी या यादींत भर

पडतच आहे बारा रुपये पगार घेऊन गाद्यावर लोळणाऱ्या या शिरजोरानीं लवकरच यजमानाकडून पाय चेपून घेण्याची अट घातली नाहीं म्हणजे मिळविली! बरें, इतका खर्च व अशा अटी संभाळून थोडेच सुटतें आहे! येथें यजमानाच्या हालांना नुसता आरंभ होतो. यानंतर आचाऱ्याच्या लहरी स्वभावाचा अनुभव यावयास लागतो एखादे दिवशी भात पेजेसारखा पातळ होतो तर दुसऱ्या दिवशीं गारगोटीसारखा टणक होतो. एकदा तो कच्चा राहतो तर दुसऱ्यादा बुडीं लागतो. सकाळी भाजी खारट होते तर संध्याकाळीं अळणी होते. एखाद्या खेपेस पोळी हिरवी राहून पोटशूळ उत्पन्न करिते, [ याच पोळीला 'सुळावरची पोळी' म्हणतात कीं काय कोण जाणे! ] दुसऱ्या खेपेस ती जळून कोळसा होते, आणि त्या कोळशाचा, दातांत अडकलेल्या कणाच्या द्वारें, अचवताना दात स्वच्छ करण्यांत जो काय उपयोग होत असेल तितकाच काय तो. कधी चहा खारट होतो तर कधी वरण गोड होतें कधीं भाजीत केशर पडते तर कधीं बासुदींत हिंग पडतो. याप्रमाणें पाकसाहित्याच्या वैचित्र्यांत बल्लवाच्या कल्पकतेची भर पडून जो मासलेवाईक पदार्थ निर्माण होतो त्यास, वर झाकण नसल्यामुळें कोळिष्टके, झुरळें, पाली व आचाऱ्याच्या तोंडांतील तंबाखू पडून जो मजेदार स्वाद येतो तो अनुभवावाचून कळावयाचा नाहीं! ही झाली पक्वान्नाची गोष्ट. खुद्द आचाऱ्याचा मुकटा या पक्वान्नास पूर्णपणें शोभण्यासारखा असतो. त्याने किती तरी उन्हाळ्यातील घाम व पावसाळ्यातील चिखल खाल्लेला असतो शिवाय हातरुमालाच्या अभावीं तुपातेलाचा व मीठमसाल्याचा हात आणि पडसें झालें असता नाकही त्यासच पुसण्याचा त्याच्या मालकाचा परिपाठ असल्या-मुळें त्यामध्यें वाण्याच्या व तेल्याच्या दुकानातील आणि शरीरातील सगळे वास व सगळ्या घाणी एकवटलेल्या असतात. स्वतःस नरकप्राप्ति होऊ नये म्हणून श्रद्धेनें नेसलेला हा मुकटा इतरास जिवंतपणींच नरकवासाचा अनुभव आणून देतो हा मुकटा विरलेला असून आखूडही असतो हें एका दृष्टीनें जेवणारास हितकरच असते. तो जर अंगात आणि लांबीरुंदीनें भरपूर असता तर त्यास जेवताजेवताच पटकीचा उपद्रव होण्याची भीति राहती असा मुकटा ढुंगणास लावून व तसा पदार्थ हातीं घेऊन बल्लवाचार्यांची स्वारी

जेव्हा गाजाच्या तारेंत त्या पदार्थांची पंक्तींत खैरात वांटूं लागते तेव्हां यजमानास इतका पगार कबूल केल्याचें सार्थक वाटत असेल यात संशय नाहीं पहिलें वाढप करितांना भाताच्या ठिकाणीं पोळी व पोळीच्या ठिकाणी भात, चटण्याच्या जागीं भाजी व भाजीच्या जागीं चटण्या, याप्रमाणे आचार्यांकडून वर्गावर्गी करण्यांत येते, व त्यानंतरच्या वाढपात त्यांजकडून जेथें साखर पाहिजे असते तेथें मिठाचा आग्रह होतो व बासुदी हवी असते तेथे कारल्याची भाजी वाढण्यात येते. कधीं कधीं तर आचाऱ्या-कडून [ आचार्य या शब्दातील रेफ खालीं आणिल्याबद्दल वर्गावर्गी करणारे बल्लवमहाराज मजवर रागावणार नाहींत अशी खात्री आहे. ] एखादे वेळीं मुख्य पकान्नच अखेरपर्यंत वाढावयाचें राहातें. क्वचित् प्रसंगीं एखादा पातळ पदार्थ वाढता वाढता अचानक त्याचें भाडे त्याच्या हातून गळून जमिनीवर पडतें व आतील जिनसेचा स्वाद पाहुण्याच्या जिभेशिवाय इतर अवयवांस व पितांबरासही चाखावयास मिळतो एखादे वेळीं तर वाढण्याच्या जलदी-मुळे पाय घसरून पाकदेवतेची मूर्तिच हातातील भाड्यानिशीं जमिनीवर लोटांगण घालते किंवा एखाद्या भाग्यवान् पाहुण्याच्या गळ्यात जाऊन पडते ! हा सगळा त्रास चुकवावयाचा असेल तर स्वयंपाकाच्या यंत्रावांचून दुसरा उपाय नाहीं. कल्पक पुरुषास त्या यंत्राची किंचित् कल्पना यावी म्हणून मी त्याचें येथें थोडेसे वर्णन देतों :—

प्रथम भुसारी, वाणी, तेली, भाजीवाला इत्यादि व्यापाऱ्याच्या दुकानातून निरनिराळ्या सामानाच्या व आत उघडणाऱ्या पडद्याच्या नळ्या यन्त्रात नेऊन पोहोंचवाव्या. उधार माल देण्यास व्यापाऱ्यांची तयारी नसावयाचीच, म्हणून एक बाहेर उघडणाऱ्या पडद्याची नळी आपल्या अंगरख्याच्या खिशातून व्यापाऱ्याच्या खिशापर्यंत नेऊन पोहोंचवावी नंतर कळ फिरविली कीं एकीकडून दुकानातील माल भराभर आपल्या यंत्रात येऊन पडावा व दुसरीकडून आपल्या खिशांतला पैसा त्या मालाची किंमत म्हणून दुकानदाराच्या खिशात जाऊन पडावा, अशी योजना करावी. नळ्यांची रचना अशी करावी, की त्यातून सामान येतायेतांच स्वयंपाकास ते ज्या अवस्थेत पाहिजे असेल ती अवस्था, बोगद्यांतील लाबलचक प्रवासाच्या अखेरपर्यंत त्यास प्राप्त व्हावी उदाहरणार्थ, तादळांचें

काडण व गहूजवारीचें दळण नळ्यांतच व्हावें; धान्यातील डोळे व खडे नळयातच निघावे, भाजीही नळ्यातच चिरली जावी, आणि मसाल्याचें सामान कुटलें जाऊन त्याचें योग्य मिश्रणही नळ्यातच व्हावे. हें सर्व साहित्य यंत्रात पोहोंचल्याबरोबर पपाच्या साहाय्यानें त्यातील निरनिराळ्या भाड्यात येऊन पडेल अशी युक्ति करावी. या भाड्यात पक्वान्न-भेदाप्रमाणें घुसळण्याच्या, तिंबण्याच्या, परतण्याच्या, तळण्याच्या, भाजण्याच्या वगैरे सोई ठेवाव्या लागतील. परंतु हीं सर्व कृत्ये मनुष्याच्या मदतीवाचून व्हावीं अशी तजवीज करणें जरूर आहे. फक्त कळ दाबली कीं पैशाची पिशवी रिकामी होऊन सर्व स्वयपाक सिद्ध झाला पाहिजे. या यंत्रापासून खाणाऱ्याच्या तोंडापर्यंत निरनिराळ्या पक्वान्नाच्या नळ्या आणून पोंहोंचविल्या तर फारच बहार होईल कारण मग पाटपानाची व वाढण्याची मुळींच यातायात न पडता बिछान्यावरच्या बिछान्यावरच सगळे पदार्थ आयते तोंडात येऊन पडू लागतील, आणि धोतर सैल करण्यापलीकडे हातांस मुळींच काम पडणार नाहीं पण ही शेवटची सोय झाली नाहीं तरी तिजवाचून फारसें अडणार नाहीं.

या अत्यत उपयुक्त व घोंटाळ्याच्या यत्रातील पोटयत्राची सविस्तर माहिती मी वाचकास करून दिली असती पण तसें करण्यास मला पुरेशी फुरसत नाहीं. शिवाय याच घटकेस मीं एका स्नेह्यास भेटण्याचे ठरविलें आहे. सबब या निबंधाचा उरलेला भाग घाईघाईनें पुरा करून मला त्याचा निरोप घेतला पाहिजे.

येथपर्यंत यत्राचा व्यक्तीस किती उपयोग होण्यासारखा आहे याबद्दल विवेचन झालें परंतु त्याचा एकट्यादुकट्या व्यक्तीस होतो त्यापेक्षा अनेक-पटीनें मोठ्या समूहास उपयोग करून देता येईल. धर्ममंदिरात डोळे मिटून परमेश्वराची प्रार्थना करावयाची असते अशा वेळीं डोळे मिटण्याकरिता व ते मिटल्यावर मध्यंतरीं झोंप लागल्यास ते उघडण्याकरिता एक विजेचें यत्र व्यासपीठावर ठेवून त्याच्या तारा सर्व भाविकाच्या बगलातून अडकावून टाकाव्या. अशाने डोळे मिटण्याची व उघडण्याची कवाईत व्यवस्थेशीर होऊन झोंपाळू भक्तांच्या घोरण्यामुळें श्रद्धाळू भक्ताच्या एकाग्रतेचा भंग होणार नाहीं. तिबेटात जशीं प्रार्थनेचीं चक्रें असतात, तशीं आपणही इकडे रामनामाचीं

किंवा मत्राची चक्रें करून तीं देवळात रोज नियमित वेळीं भक्तिभावानें फिरविण्याचा क्रम ठेविला पाहिजे. एक अठरा आऱ्याचें चक्र करून प्रत्येक आऱ्यास भगवद्गीतेचा एक एक अध्याय लटकावून दिला, म्हणजे चक्राच्या एका फेऱ्यात सबध गीतेचें पारायण होत जाईल. पुराणिकाच्या तोंडातून देवाचें नाव किंवा नमस्कृतिवाचक शब्द निघाला, कीं सर्व स्त्रीश्रोत्याची एकदम हात जोडून ते मस्तकास लावण्याची वहिवाट आहे हें वदन व त्याबरोबर होणारा बागड्याचा नाद विजेच्या यंत्राकडूनच घडविला तर किती मौज होणार आहे ! श्रावणीच्या दिवशीं मार्जन, पळयाचा खडखडाट, न्यासाची गडबड इत्यादि कवाइतीस तर, अशा यत्रापासून मोठा बहारीचा उपयोग होणार आहे ! नाटकगृहात नाटकमडळीचे स्नेही नटास प्रोत्साहन देण्याच्या बुद्धीने वेळींअवेळीं टाळयाचा गजर करण्यास हात एकावर एक धरून टपलेले असतात, परंतु अगीं रसिकता बेताचीच असते म्हणून म्हणा, किंवा प्रयोगाकडे लक्ष नसतें म्हणून म्हणा, त्याच्या टाळ्या अवेळीं पडून नाटकास रग चढण्याऐवजीं त्याचा बेरंग होतो. म्हणून सर्व प्रेक्षकाच्या बोटातून विजेच्या तारा अडकवून त्याची पेटी एखाद्या रसिकाच्या हातीं द्यावी, म्हणजे पडद्यामागील सूत्रधाराच्या तत्रानें नटाची कामें जशीं सुयत्र चालवितात, तशीं पडद्यापुढील या सूत्रधाराच्या तत्रानें प्रेक्षकाची कामेंही बिनबोभाट चालू लागतील. तारा प्रेक्षकाच्या बोटाप्रमाणें ओंठासही अडकविल्या [ ओठास तारा अडकविणें हें माजराच्या गळयात घाट बाधण्याइतकेंच अवघड आहे हें मात्र लक्षात ठेविलें पाहिजे. ] तर ‘ वन्स मोअर ’ [ पुन्हा एकदां ! ] व ‘ नो मोअर ’ [ नको नको ! ] या उद्गाराचीही किल्ली रसिकाच्या हातात येईल. कधी कधीं एखादे पद चागलें झाल्यावर प्रेक्षकानीं ओरडून तें पुन्हा म्हणावयास सुचविले तरी बेमुर्वतखोर नट तिकडे दुर्लक्ष करून गप्प राहातात, तर कधी कधीं प्रेक्षकाकडून सूचना न होऊनही उदार नट तें आपण होऊनच दोनदोनदा तीनतीनदा घोकून म्हणतात. अशा दोन्ही प्रसगीं नटाचे ओंठ उघडण्याकरिता किंवा बद करण्याकरिता त्या ओंठाचीं सूत्रें रसिकाच्या हातीं असलेलीं बरीं मोठमोठ्या सभात अनुकूल किंवा प्रतिकूल मतें दर्शविण्याकरिता हात वर करावे लागतात, व हात केव्हा वर करावयाचे हेंही सभेला येण्यापूर्वींच बहुतेक सभासदाचें ठरलेलें असतें. पण ज्या विषयावर मत

द्यावयाचें तो कशाशीं खातात याचें ज्ञान नसल्यामुळें जेव्हा हात वर करावयाचा तेव्हा तो अर्धांगवायूनें लुला पडल्याप्रमाणे खालीं राहातो, आणि जेव्हां तो खाली ठेवावयाचा तेव्हां तो बाहुल्याप्रमाणें वर जातो, व सर्व मते मोजावयाचीं झालीं तरी तो खाली येत नाहीं, जणु काय बैराग्याच्या वाळलेल्या हाताप्रमाणें तो निर्जीवच झाला आहे अशा सर्व सभासदाचे हात योग्य वेळीं वर जावे व खालीं यावे अशी योजना यंत्राच्या सहाय्यानें झाल्यास किती तरी सोय होणार आहे !

साराश, आपणास अनेकदां ज्या गोष्टी जरूरीच्या म्हणून श्रमाने किंवा जुलमानें कराव्या लागतात, त्या करण्याचीं यंत्रें निघालीं म्हणजे मनुष्याच्या दुःखाचा क्षय व सुखाची वृद्धि होईल, समाजातील अव्यवस्थितपणास फाटा मिळेल, व्यक्तीचीं कर्तव्यें वेळेवर होत जातील, आणि हें विश्वाचे घड्याळ सुयंत्र चालविण्यास आपण त्या जगन्नियंत्या परमेश्वरास यथाशक्ति मदत केल्याचें श्रेय मिळेल.

---

मुष्टि २२ वी *

## भाषा व इतिहास

जों जों एखादा देश आपल्या देशापासून दूर, तों तों त्याजबद्दलची आपली कल्पना अधुक असते. आपणाला त्याचें ज्ञान पृथ्वीच्या नकाशावरून झालेलें असल्यामुळें, त्याचें इतर देशापासून खरें अंतर किती आहे याची नीटशी कल्पना नसते. अमेरिका व इंग्लंड हे देश नकाशावर फार तर दोन वितींच्या अतरावर दिसतात, त्यामुळें इग्लडमध्यें जाणाऱ्या प्रवाशाला पुष्कळदा अमेरिकेतील इसमाला समक्ष निरोप सागण्याची विनति करण्यात येते. चीन व जपान हे देश तर नकाशावर इतके जवळ दिसतात, कीं त्यापैकी एका देशाच्या किनाऱ्यावर एक पाय ठेवितांना दुसरा देश दुसऱ्या पायाखालीं चिरडून जाईल कीं काय अशी भीति वाटते. परदेशाबद्दलच्या आपल्या कल्पना सख्येनेंही मर्यादित असल्यामुळें त्या कल्पनाना वास्तविक पाहिजे

* मनोरजन, पु १८, पू भाग ६ [ डिसेंबर सन १९१२ ]

त्यापेक्षा पुष्कळ अधिक महत्त्व आपण देतों. काश्मिरात शाली चांगल्या होतात एवढीच आपली त्या प्रांतासंबंधानें कल्पना असल्यामुळे त्या देशातील झाडून सारे लोक चारही काळ अष्टौ प्रहर शालींत गुरफटलेले असेच आपल्या अंत सृष्टींत वावरत असतात. त्या शालींचा रंगही काश्मीर देशाचा नकाशात जो रंग असतो तोच असला पाहिजे असें आपणाला वाटतें. बोर्डो व ओपोर्टो ही शहरें दारूसाठीं प्रसिद्ध आहेत एवढेंच आपलें त्यासंबंधानें ज्ञान असतें, त्यामुळें त्या शहरातील सारे लोक–मग ते धर्माध्यक्ष, स्त्रिया किंवा इतर कोणत्याही वर्गाचे असोत–हातात दारूच्या बाटल्या घेऊन झिंगलेले व धिंगामस्ती करीत असलेले असेंच आपल्या कल्पनाभूमीवर प्रवेश करितात आपली कल्पना जॉर्जिया देशातून साऱ्या कुरूप स्त्रियाना हद्दपार करिते, व आफ्रिका देशात बारीक ओठाचा इसम औषधालाही उरूं देत नाही.

परदेशातील लोकाशीं आपला जेव्हा प्रथमतःच प्रसंग पडतो तेव्हा त्या सर्वांचे चेहेरे अगदीं एकसारखे आहेत अशी आपली समजूत होते. हे लोक एकमेकाना तरी कसे ओळखतात याचे आपणाला मोठें गूढ पडतें. या देशात वाटेल त्या इसमास वाटेल त्याच्या जिनगीवर किंवा आप्तावर खुशाल हक्क सागता येत असेल, आईला आपलें मूल किंवा नवऱ्याला आपली बायको मोठ्या मुष्किलीनें हुडकून काढिता येत असेल, ‘ अल्लीबाबा आणि चाळीस चोर ’ या गोष्टींत मर्जीनेने शेजारच्या साऱ्या घरावर एकच खूण केल्यावर ज्याप्रमाणें चोरास अल्लीबाबाचें घर ओळखता येईना त्याप्रमाणें सध्याकाळीं कुटुंबातील सगळी मडळी घरीं परत आल्यावर आपला पिता कोण, पुत्र कोण, पति कोण, हें शोधून काढण्याकरिता बायकाना बराच वेळ घालवावा लागत असेल असे आपणाला वाटतें. सारे साहेबलोक केवळ सारखे गोरे दिसतात इतकेंच नाहीं, तर स्वरूपानेंही तुल्य वाटतात. सारे चिनी लोक सारखे पिंवळे आणि सारे शिद्दी लोक सारखे काळे दिसतात इतकेच नाहीं, तर त्याचे डोळे, ओंठ वगैरे अवयवही एकाच घाटाचे वाटतात. कृष्णपरमात्मा एकाच वेळीं सोळा सहस्र स्त्रियाच्या महालात दिसला, ही कथा अशा परक्या देशातील मूळची असली पाहिजे असा तर्क आपण बांधूं लागतों, व अशा देशातील माणसाची अर्धाअधिक बुद्धि एकमेकाना

ओळखण्यातच खर्ची पडत असली पाहिजे असें वाटून आपणाला त्याची कीव यावयास लागते

परकीयाच्या रूपाबद्दल आपला जसा प्रथमतः घोटाळा उडतो तसाच परक्या भाषेसबधानेही उडतो प्रथमच ऐकणारास सस्कृत भाषा केवळ अनुनासिकघटित असावीशी वाटते आणि इग्रजी भाषा निव्वळ जोडाक्षरघटित भासते. मी प्रथमतः जेव्हा दोन कर्नाटकी गृहस्थाना बोलताना ऐकिलें, तेव्हा ते भाडत असावेत असा माझा तर्क झाला, पण मागाहून असे कळलें, की ते अत्यत जिवलग मित्र असून फार दिवसानी भेटले होते कानडी भाषेतील प्रेमालापाला याप्रमाणे भाडणाचें स्वरूप येतें, तर त्याच्या उलट सस्कृत भाषेतील भाडणाला प्रेमालापाचे स्वरूप येते कर्णविवरात कानडी भाषेतील शब्द ताडव करीत आदळतात, तर संस्कृत भाषेतील शब्द लास्य करीत प्रवेश करितात. गीर्वाण भाषेचा देवगण मानिला, तर कानडी भाषेचा राक्षसगण मानिला पाहिजे संस्कृत भाषेतील शब्द ऐकताना सतारीचा भास होतो, तर कानडी भाषेतील शब्द ऐकताना मडक्यात खडखडणाऱ्या खड्याचा भास होतो एकदा तर सबंध कर्नाटकाचा प्रवास मीं एका मडक्याच्या दुभाषेपणावर केला. त्यात मी काहीं खडे व गारगोट्या घालून ठेविल्या होत्या कोणाही कर्नाटकी माणसानें मला प्रश्न केला, म्हणजे मी तें मडकें त्याच्यापुढें धरून जोरानें हलवीत असें ! त्याबरोबर कडकडकडकड असा दर खेपेस एकच तारायंत्री ध्वनि निघत असे, पण त्यानें प्रत्येक पृच्छकाचें समाधान झालेलें दिसे काही लोकाचें समाधान तर हास्याच्या रूपानें बाहेर पडे शेवटीं आपली भाषा इतक्या हुबेहुब रीतीने बोलणाऱ्या यंत्रात काय काय चमत्कार भरले आहेत हें पाहाण्याकरिताच कीं काय, एका गृहस्थाने सोट्यानें माझ्या दुभाष्याचीं दोन शकलें करून टाकिलीं, आणि मीं जर मडक्याची आशा सोडून धूम ठोकली नसती तर माझी पाठ कितीशी टणक आहे हे पाहाण्याकरिता तिच्यावरही सोट्याचा प्रयोग करण्यास त्यानें कमी केलें नसतें व मडक्याप्रमाणे सोटाही [ माझ्या पाठीवर ] फोडिला असता. एकंदरींत तिकडचीं माणसेंही भाषेप्रमाणें अमळ राक्षसीच खरी ! शिवाय पाहुणचाराची त्याची कल्पनाही काहींशी विलक्षणच ! असो. वरील प्रसंगापासून मी त्या कृतघ्न लोकाच्या वाऱ्यालाही उभा राहात नाहीं, आणि

मडक्यातले खडे कसे वाजतात हें पाहाण्याची उत्सुकता झालीच, तर भोंवतालीं दोन कोसाच्या टापूंत कोणी चिटपाखरूंही नाही अशी प्रथम खात्री करून घेऊन नंतर पाहात असतों.

परकीयाची तोंडओळख जों जो अधिकाधिक होत जाते, तो तो त्याच्या चेहऱ्यातील बारीक भेद कळू लागतात, व जों जो त्याची भाषा कानावरून अधिकाधिक जाते तों तों तिचे शब्द सारखे नसून एकमेकापासून ओळखण्याइतके भिन्न आहेत हें समजूं लागतें. यापुढची पायरी म्हणजे एका अर्थाच्या दोन शब्दापैकीं कोणता कुठें योजावा व एका शब्दापासून अनेक अर्थ कसे निघाले याचे मार्मिक ज्ञान शब्दाच्या इतिहासाबरोबर देशाचा, त्यातील लोकाचा व त्याच्या चालीरीतीचा इतिहासही कळू लागतो. अखेरीस प्रत्येक शब्द म्हणजे एखाद्या ऐतिहासिक सत्याचें थडगे आहे अशी भावना होऊन त्याची चिकित्सापूर्वक छाननी व्हावयास लागते.

लहानपणीं मी भाषेत इतिहास शोधण्याऐवजीं इतिहासात भाषा शोधीत असें. मी इतर विषयातल्याप्रमाणें इतिहासातही जरासा कच्चा होतों. त्यातील पुरुषाच्या व स्थलाच्या नावांचा, वशावळीचा व हकीगतींच्या सनाचा मीं कितीही पिट्ठया पाडिला, तरी शिव्यागाळी देण्यास सवकलेल्या माझ्या तोंडात ते बेटे नीटपणें बसेनातच 'निजामअली' बद्दल 'हजामअली' 'बाजीरावा' बद्दल 'पाजीराव, 'मादण्णा' बद्दल 'ढढणा' अशा चुका मजकडून पदोपदीं होऊं लागल्या ! शहाजीस मी एकदा अकबरशहाचा बाप बनविलें व त्याजकडून खर्ड्याची लढाई लढवून त्याच्या विजयी समशेरीच्या साहाय्यानें त्या लढाईत शिकदर बादशहाचा फडशा उडविला ! टिपू सुलतानाला, तो नको नको म्हणत असता चादबिबीच्या माडीवर दत्तक देऊन तिजकडून त्याचा शनिवारच्या वाड्यात खून करविला, व ब्राह्मणी राज्य एका ब्राह्मणास बहाल करून त्या ब्राह्मणापासून पेशव्यांची उत्पत्ति झालेली तपशीलवार दाखविली !

सनासबधानें तर माझा घोंटाळा उडत असे आजपर्यंतच्या सर्व लढाया आणि तह दशकादशकाच्या अंतरानीं झाले असते तर विद्यार्थ्यांचें नऊदशाश श्रम वाचले असते. इतिहासप्रसिद्ध पुरुषांनीं जर शतकाच्या अखेरीस जन्मण्याचा व मरण्याचा परिपाठ ठेवला असता तर ते स्वतः शतायु होऊन शिवाय किती तरी विद्यार्थ्यांचें अकालीं मरण चुकलें असतें. या वक्तशीर

इच्छामरणास प्रसिद्ध पुरुषाची तयारी नसल्यास निदान राष्ट्रांनीं तरी विद्यार्थ्यांच्या मागचा त्रास चुकविण्याकरिता दहा दहा वर्षांनीं वयातीत झालेले प्रसिद्ध पुरुष फाशीं देण्याचा नियम केला पाहिजे या बाबतींत दशांशपद्धतीचे पुरस्कर्ते फ्रेंच लोक यानींच पुढाकार घेतला पाहिजे. नाना फडणीस बरोबर शतकाच्या अखेरीस मरण पावला यावरून त्याचें आटोकाट धोरण व शहाणपण जसें दिसून येतें, तसें त्याच्या कारस्थानावरूनही दिसून येत नाहीं.

ऐतिहासिक नावाबद्दल माझ्या ज्या चुका होत त्या बहुधा त्या नावांचा सदृश मराठी शब्दाशीं घोटाळा झाल्यामुळें होत. अखेरीस भाषेचा उपयोग याप्रमाणें घोंटाळा उडविण्याच्या कामीं करण्याऐवजीं तीं नावें लक्ष्यात ठेवण्याच्या कामीं करण्याचा मी निश्चय केला. पानिपत येथें अनेक मोठाले संग्राम होऊन पाण्यासारखें रक्त पडलें त्याअर्थी त्याचे ' पानिपत ' हें नाव सार्थ आहे, अशी मीं आपली समजूत करून घेतली. तात्या टोपी याने टोपीवाल्याशीं युद्ध केलें त्या अर्थी त्याचेंही नाव योग्यच म्हटले पाहिजे, असें मी मनाशीं ठरविलें. याप्रमाणें प्रत्येक नावाचा तत्संबंधी कथेशीं स्वाभाविक अथवा ओढून ताणून संबंध जुळवून मीं तें आपल्या स्मरणात कायमचें राहील अशी खटपट चालविली, व ती बऱ्याच अंशानीं सिद्धीलाही गेली.

मी जसजसा मोठा होत चाललों, तसतशी मला स्मरणशक्तीची जरूर कमी कमी वाटावयास लागून विचारशक्तीची अधिकाधिक वाटावयास लागली. मी प्रत्येक गोष्टीचें कारण शोधावयास लागलों. आपल्या सणावारात किती गूढ अर्थ भरलेला आहे, वैदिक मंत्र उच्चारल्यापासून कोणते फायदे होतात, पौराणिक कथाचें मूळ काय, आपल्या चालीरीती इतकीं वर्षे अविकृत स्थितींत टिकण्याइतके महत्त्वाचे लाभ त्यापासून कोणते होतात, या गोष्टींचा मी खल करूं लागलों. या चिंतनापासून निष्पन्न झालेले सिद्धांत मी वाचकासमोर वेळोवेळीं मांडीत आलोंच आहे. शेवटीं ही चिकित्सा येथवर गेली, कीं शेंडी डोक्यावरच का ठेवतात, कपाळावर का ठेवीत नाहींत, डोळे गुडघ्यांवरच न ठेवता भिवयाच्या खालीं ठेवण्यात ईश्वराचा काय हेतु असावा, घर खालून वर बांधीत नेण्यापेक्षा वरून खालीं बांधीत का आणीत नाहींत, या विषयाचीही चर्चा मी, भिंतीला तुंबड्या

लावणाऱ्या रिकाम्या न्हाव्याप्रमाणें फावल्या वेळीं करूं लागलों. या वादग्रस्त विषयाची समाधानकारक विल्हेवाट लाविल्यावर मीं आपलें सुकाणूं भाषेच्या इतिहासाकडे वळविलें, व एक कोश विकत घेऊन त्यातील प्रत्येक शब्दाची पूर्व पीठिका धुडाळूं लागलों. जर माझ्या एकाग्रतेचा सौभाग्यवतीनें ' पाने वाढून तयार आहेत.' अशा शब्दानीं भंग केला, तर रागावण्याऐवजीं मी त्या वाक्यातील प्रत्येक शब्दाच्या पूर्वेतिहासाचा तलास लावीत बसें एकदा माझ्या एका मुलाला स्थल पहावयाचें होतें. पण त्यास सागून आलेल्या मुलीच्या कुळाचा शोध करण्याऐवजीं मी त्याच्या नावाच्या कुळाचाच शोध लावू लागलों आणि त्याच्या आडनावाचे [ तीं आडनावें बहुधा लाडगे, उट, कोल्हे, वाघ अशापैकींच होतीसें आठवतें ! ] उगम कोणते असावेत याची शहानिशा करूं लागलों शेवटीं ज्या मुलीचें नाव सर्वात अधिक अपभ्रंश पावले होते तिचीच मीं निवड केली आता तिचे कुळ भ्रष्ट आहे की काय हें पाहाण्याऐवजीं तिचें नाव अपभ्रष्ट आहे की नाहीं हे पाहाणें कित्येकास तऱ्हेवाईकपणाचें वाटेल, पण पत्रिकावरून स्थलनिश्चय करण्यापेक्षा वरील निवडणुकीचे तत्त्व फारसें अहितपरिणामीं नाहीं हें मी खात्रीनें सागू शकतों.

भाषाशास्त्रात मीं जे शोध लावले आहेत, ते इतर भाषाकोविदाना कितपत रुचतील हे मला सागवत नाहीं कारण विद्वान् लोकाइतके मत्सरी लोक पृथ्वीच्या पाठीवर दुसरे कोणीही सापडणार नाहींत. वाचकांना मजबद्दल हेवा वाटण्याचें काहीं कारण नाही, म्हणून त्याच्या फायद्यासाठीं त्यापैकी प्रमुख शोध येथें सादर करितों:—

१. प्राण्यांची उत्पत्ति वनस्पतींपासून झाली हे आपल्या पूर्वजाना माहीत असावें, असें 'अश्वत्थ' या शब्दावरून उघड होतें. हा शब्द वृक्षवाचक असून यातील अंत्याक्षर काढिलें असता त्यातून 'अश्व' हा प्राणिविशेष-वाचक शब्द रहातो प्रथम घोडा व कुत्रा हे दोनच प्राणी निर्माण झाले, असें 'अश्व' या शब्दावरून दिसतें. कारण 'श्व' [ म्हणजे कुत्रा ] नाही तो घोडा. अर्थात् हे दोनच प्राणी त्या काळीं विद्यमान् होते असा गर्भितार्थ निघतो. हा काळ म्हणजे मृगयाकाळ व अशा काळीं हे दोन आवश्यक प्राणी निर्माण व्हावे ही ईश्वराची मोठी कृपाच समजली पाहिजे.

२. मनुष्याची उत्पत्ति माकडापासून झाली हेंही तत्त्व प्राचीन काळीं माहीत ासावे, हे 'वानर' या शब्दावरून स्पष्ट आहे कारण या शब्दातील ाद्याक्षर काढिलें, की 'नर' हा शब्द अवशिष्ट रहातो. पहिलें मनुष्य ाकडाप्रमाणें बांध्यानें लहान असलें पाहिजे, यास 'जानवें' व 'कुतल' ा शब्दद्वयावरून पुष्टि मिळते 'जानवें म्हणजे जानूपर्यंत पोहोंचणारें' ार्थात् तो जानु खुज्या माणसाचाच असला पाहिजे 'कुतल' [ कु=पृथ्वी ] ़णजे केस, हे त्या काळी पृथ्वीतलापर्यंत लोंबत असावेत पहिलीं हिली माणसे माकडाप्रमाणे नग्नही असावीत असा तर्क 'कंबल' धोतर' व 'मुकटा' या शब्दावरून निघतो प्रथमोक्त शब्द निघाला व्हा तद्व्यक्त वस्त्र फक्त 'कबरे' भोवतीच गुडाळीत असावेत, धोतर धूतोत्तरीय ] हे वस्त्रही खाद्यावरच घेण्याचा परिपाठ असावा, आणि मुकटा' [ मुख=तोंड ] तर तोंडासच गुडाळीत असत.

३ गीर्वाण भाषा बोलणारे लोक विलायतेतल्यासारख्या चचल हवेत हाणारे असावेत, असें 'सुख' व 'दुःख' [ ख=आकाश ] या शब्दद्वयावरून यक्त होते. आकाश निरभ्र असले म्हणजे त्याना आनद होई, आणि तें भ्राच्छादित असले म्हणजे त्याना दुःख होई

४. अवयववाचक शब्दावरून त्या काळच्या लोकस्थितीची काहींशी ल्पना करिता येते. डोळ्याचा उपयोग डाळीतीले डोळे निवडण्यासाठींच हुवा होत असावा. 'अधर' [ अ+धर ] या शब्दावरून रमणीचे अधरपान ाळविण्याला वल्लभाला हल्लीइतकेच श्रम पडत असावेत 'ओष्ठ' ओं+स्थ ] या अवयवाचा उपयोग ॐकाराचा उच्चार करितानाच होत ासे, इतके ईश्वरनिष्ठ त्या वेळचे लोक होते ॐ या अक्षरातील अनुनासिक स्कृत शब्दात जरी मावळलें आहे तरी ओंठ या मराठी शब्दात त्याचा नः उदय झाला आहे 'मस्तक' [ मस्त ] या शब्दावरून प्राक्कालीन रुषाचें डोकें सोमरसादि मादक पदार्थांनीं नेहमीं मस्त होत असावेंसें ़सतें 'हृदय' [ हृ=हरण करणें + दया=करुणा ] या शब्दाच्या टकावयवावरून त्यास दयामायाहि कमी असावी अशी शका येते. 'दड' ा शब्द 'बाहू' व 'शिक्षा' अशा दोन अर्थी असल्यामुळें, पूर्वी हात ोडण्याची शिक्षा देत असत असा अंदाज निघतो 'मान' [ मन=विचार

करणे ] हें विचाराचें स्थान आहे असें तत्कालीन मत असावें एखाद्या बुद्धिमान् पुरुषाच्या मानेवर आवाळू झालेले पाहूनच हें मत निघालें असावे ! 'खाक' या शब्दाचे 'अवयवविशेष' व 'रक्षा' असे दोन अर्थ आहेत. ज्या काळीं लोक काखेंत राख घालून वैराग्यवृत्तीने रहात असत, त्या काळीं या शब्दाचा उगम झाला असावा 'कूर्चक' [ म्हणजे 'दाढी' व 'कुचला' ] या शब्दावरून तत्कालीन लोकाचे केस फार राठ असून कुंचल्याऐवजीं उपयोगात येत असत हें सिद्ध होतें. 'केश' [ के=पाण्यात, शी=शयन करणे ] हा शब्द ज्या काळीं निघाला, त्या काळीं स्मश्रूची युक्ति नसल्यामुळे केस नेहमी ओले असत केसाचें पीक खुरपून काढणारा कारागिर [ नापिक ] अर्थात्च त्या काळीं जन्मला नव्हता. 'अक' [ म्हणजे 'माडी' किंवा 'आकडा' ] या द्व्यर्थी शब्दावरून, लिहिण्यासाठीं माडी घालून बसण्याचा प्रघात आकडेमोडीकरिताच सुरू झाला असावा, व अकलिपीचा शोध अक्षरलिपीपूर्वीच लागला असावा हें उघड होतें.

५. अवयववाचक शब्दावरून निघालेल्या नामापासूनही तत्कालीन स्थितीबद्दल अनुमान होतें. 'बटु' शब्दावरून त्या काळींही मुलाच्या डोक्यावर शेंडीची बट असे असें सिद्ध होतें. त्या वेळची 'पगडी' [ पग= पाय ] प्रथम बाधवून नतर तिला विशिष्ट रूप देण्याकरिता पायाखालीं तुडवीत असावेत, किंवा पायास ज्याप्रमाणें बोटें, त्याप्रमाणे पागोट्यास पीळ देण्याची त्या काळींही वहिवाट असावी. 'अगठी' अनामिकेत न घालता अगठ्यात घालीत असत, असें त्या स्वरूपाच्या शब्दावरूनच शाबीत होते, पुरातन पुरुषाच्या टागा इतक्या लाब व शीघ्रगति असत, की त्यावरून वाहनवाचक 'टागा' हा शब्द निघाला आहे. हा शब्द 'जानु' व 'कुंतल' या शब्दापेक्षा अर्वाचीन असला पाहिजे

६. नाते किंवा सबंध दाखविणारे शब्द.—'नवरा' व 'नवरी' [ न+वरी ] यानीं लग्न करण्याबद्दल नकार दर्शविला असताही त्याचें त्याच्या इच्छेविरुद्ध विवाह पूर्वीही होत असत पूर्वी 'मेहुण' बोलवावयाचें असल्यास मेहुणामेहुणीसच आमन्त्रण करीत असत 'श्वश्रू' [ श्वस् म्हणजे उद्या+श्रू ] म्हणजे सुनेने आज एखादी विनंति केली कीं जिला उद्या ऐकूं जावयाची अशी व्यक्ति, किंवा 'श्वश्रू' [ श्वन् म्हणजे कुत्रा+श्रू ] याचा

अर्थ 'जिचें बोलणें ऐकूं आल्यास कुत्र्याच्या ओरडण्याप्रमाणे भासतें' असाही असेल. 'श्वशूर' [ श्वन्+क्षुर म्हणजे कुत्र्याप्रमाणें तगड्या झाडणारा ] या जोडीदार शब्दावरून उत्तरोक्त अर्थच बरोबर असावा असें दिसतें. कोणताही अर्थ घेतला, तरी त्या काळच्या सुना बऱ्याच मार्मिक असून त्यानीच हे शब्द निर्मिले असें दिसतें 'नातू' या शब्दावरून पूर्वी नातवा पर्यंतच नातें मानीत असत, म्हणजे त्या काळीं मनुष्याच्या हयातींत पणतू होत नसत, अर्थात् त्या काळचीं माणसें अल्पवयी मरत, असा निष्कर्ष निघतो. जेव्हा पणतू पाहाण्याचा प्रथमच योग आला, तेव्हा तो उत्सव साजरा करण्याकरिता पणत्या लावण्यात आल्या, व त्यावरूनच नवीन नातेवाईकाचें नाव पडले. या व्युत्पत्तीबद्दल कोणाला पुढें शका वाटेल, ती वाटू नये म्हणून त्या पणत्याच्या खापराचा अश पणतू या शब्दाशीं जुळवून 'खापरपणतू' हा शब्द प्रचारात आणिला. परंतु पणतवडाचें अपत्यही पाहाण्याचा जेव्हा प्रसग आला, तेव्हा खापरपणतू हा शब्द पणतवडापासून हिरावून घेऊन त्याच्या मुलास अर्पण केला खापराहून अधिक किंमतीच्या वस्तूचें हरण होत नसल्यामुळें त्याला पणतवडानेंही फारशी हरकत घेतली नसावी. पूर्वीचे 'छात्र' [ छत्र=छत्री ] गुरुवर छत्री धरीत असत.

७. प्राचीन लोकाचे व्यवसाय.—'पय' या शब्दाचे दूध व पाणी हे दोन अर्थ प्रसिद्ध आहेत. यावरून असें दिसतें, कीं हा शब्द प्रचारात आला तेव्हा गोपाचें प्राबल्य होतें, व दुधाच्या ऐवजीं पाणी घातल्याबद्दल शिक्षा होऊं नये म्हणूनच या शब्दाची प्रवृत्ति पडली असावी. 'मृच्छकटिका'त एका गवळ्याच्या पोरानें पालकाचें राज्य काबीज केल्याबद्दल वृत्तान्त आहे; त्या पोराच्या—आर्यकाच्या—कारकीर्दीतच हा शब्द निघाला असावा 'मृच्छकटिका'त 'आर्द्रमहिषोदरतुल्य' अशी मेघाची महिषाच्या उदराशीं तुलना केली आहे. मेघाला एका अर्थानें 'पयोद' हें नाव आहे, व महिषीलाही दुसऱ्या अर्थानें 'पयोद' म्हणावयास हरकत नाहीं. याप्रमाणें ढग व म्हशी यांचा एकत्र सबध आणून गोपराजाचे आश्रित कविही गवळ्यांच्या लबाड्याना उत्तर देत असत. राज्ञीवाचक 'महिषी' शब्दही याच राज्यांत सुरू झाला असावा. 'अंबर' हा शब्द 'आकाश' व 'वस्त्र' या दोन अर्थांचा वाचक आहे, या शब्दाचा प्रचार सुरू झाला

तेव्हां ' रजक ' राजाची सत्ता असावी, कारण त्या काळचीं वस्त्रें निळीमुळें जरी आकाशाप्रमाणे झालीं तरी लोकास कुरकुर करिता येत नसे याच सत्ताधाऱ्याच्या कारकीर्दींत धुवट वस्त्राप्रमाणें एक पाढऱ्या शुभ्र ' रजता 'चा म्हणजे रुप्याचा शोध लागला असें दिसतें. त्यापूर्वी सोनार, लोहार, ताबट हे अनुक्रमें सोन्याचे, लोखडाचे व ताब्याचे कारागीर असत; परंतु रुपेंच माहीत नसल्यामुळें रुप्याच्या कारागिराला निराळे नांव देण्याची जरूर वाटली नव्हती ' प्रयोजन' या शब्दाचा ' निमित्त ' व ' पगत ' असे अर्थ आहेत. वरील विचारसरणीने या शब्दाच्या उत्पत्तिकालीं ब्राह्मणांचें वर्चस्व असलें पाहिजे असें निष्पन्न होतें. त्या काळीं ब्राह्मणाना भोजनावाचून काहीं उद्योग नसला तरी चालत जसे अगदीं पुरातन काळीं केंस काढण्याचा संप्रदाय नव्हता असे जें वर अनुमान केलें आहे, त्याला ' न्हावी ' [न्हाणें=आघोळ करणें ] या शब्दाने बळकटी येते त्या काळीं न्हाव्याचा धदा नुस्ता आघोळ घालण्याचा असे. पूर्वी त्याच्या ताब्यात घगाळें, हडे, गुड इत्यादि मोठमोठीं पात्रे असत. पण ती सत्ता कालगतीनें मर्यादित होत होत हल्लीं त्याचा अधिकार एका लहान वाटींतील पाण्यावर मात्र चालतो. वस्तऱ्यातील पाणी लाक्षणिक अर्थाचें असतें, त्या अर्थी तें हिशेबात घेण्याची जरूर नाहीं. ' आचार्य ' या शब्दापासूनच ' आचारी ' हा शब्द निघाला आहे. पूर्वी वेदविद्या व पाकविद्या एकाच्याच अधिकारात असत, आणि होमकुंड व चुलखड या दोघावर त्याचें एकट्याचेंच स्वामित्व असे, यामुळें भात तयार झाल्याबरोबर होमकुंडातील अग्नीस [ किंवा त्यापेक्षा जठराग्निच अधिक प्रदीप्त झाला असल्यास त्याला ] ताबडतोब आहुति देता येत असे आणि चूल व वैल दोन्ही गुतली असल्यास स्वैपाकाची भाडी 'होमकुडात ठेविता येत, अशी दुहेरी सोय असे हल्लींहि अनेक आचारी पाकसिद्धि करताना मंत्र पुटपुटत तोंडातील तमाखुरसानें पात्राचे प्रोक्षण करीत असतात, यावरून वरील तर्कास दुजोरा येतो. हिंदुस्थानातील काहीं भागात आचाऱ्यास ' महाराज' या नावानें सबोधण्याचा प्रघात आहे, तोही पूर्वीच्या काळचाच अवशेष असावा.

८. वर्णवाचक शब्दः—'वर्ण ' याचे दोन अर्थ, एक रंग व दुसरा जात.

रगः—' रक्त ' याचे ' रुधिर ' व ' ताबडा ' असे दोन अर्थ आहेत. ' रुधिर ' हाच ताबडा पदार्थ मनुष्याच्या प्रथम दृष्टीस पडला. ' धवल '

यात ‘ धव ’ हा मूळ शब्द आहे हल्लींप्रमाणें त्या काळींही बायकांस नवरा गोरा असावासा वाटे, असें यावरून म्हणावयास हरकत नाहीं. ‘ पीत ’ म्हणजे ‘ पिवळें ’ व ‘ प्यालेलें ’. यावरून त्या काळीं एक पिंवळे पेय पिण्याचा फार प्रचार असे असे निघते. सोमरस कदाचित् त्या रंगाचा असावा.

जातः—प्राचीन व्यापारी लोकाच्या दुकानास लागूनच वेश्यागृहे असत असें ‘ वैश्य ’ या शब्दावरून दिसतें शूद्र [ शू+द्रु ] ‘ शू ’ म्हटल्याबरोबर पळण्याची कुत्र्याप्रमाणे तत्कालीन शूद्राचीही वहिवाट असावी

९ किरकोळ शब्दः—दिवाळीच्या सुमारास खात्याची तोंडमिळवणी करण्याची वहिवाट असल्यामुळें त्याच वेळीं दिवाळीं निघत असत असें दिसतें. ‘ सणग ’ हा शब्द कापडाचा वाचक असून सणावाराशिवाय कापड जात नसे असें दाखवितो ‘ पाटलोण ’ घालून लोणपाट खेळावयास लागलें असता तो खेळ अस्ताव्यस्त होतो, व म्हणून त्या खेळास तें वस्त्र अगदी निरुपयोगी आहे, असें त्या शब्दावरून सूचित होतें ‘ अलकार ’ [ अल=पुरे ] या शब्दावरून प्राचीन नवऱ्याचीही बायकाच्या दागिन्याच्या पायीं पुरेवाट होत असे असें ध्वनित होतें. अरण्यकें ज्यानीं लिहिलीं ते अरण्यपंडित म्हणून मानिले जात, किंवा त्याचा उपदेश अरण्यरुदिताप्रमाणें फुकट जाई, असा त्या शब्दावरून ध्वनि निघतो. ‘ कागद ’ [ काक=कावळा ] यावरून पूर्वी कावळ्याच्या पिसावर खडूनें लिहीत असत असें दिसतें हा तर्क ‘ काकपद ’ या शब्दावरून दृढ होतो. पाढऱ्यावर काळें करण्याची विद्या अलीकडची आहे ‘ सारस्वत ’ [ सारस=सरोवरातील मासा ] यावरून मत्स्याहाराची प्रवृत्ति दिसून येते

१०. लिंगवचनेंः—‘ दाराः ’ या पुल्लिंगी अनेकवचनी शब्दावरून असा कयास निघतो, कीं एके काळीं प्रत्येक नवऱ्याला अनेक बायका असून त्या पुरुषासारख्या धीट असत ‘ मित्र ’ हा शब्द नपुसकलिंगी असण्याचीं कारणे दोन. एक तर मित्रपत्नींशीं त्याची वर्तणूक अत पुरातील कंचुकीप्रमाणें प्रामाणिकपणाची पाहिजे, व दुसरें असे, कीं मित्र इमानी असला पाहिजे. परतु ‘ इमानि ’ हें विशेषण ‘ इद ’ या नपुसकलिंगी सर्वनामाच्याच प्रथमेच्या अनेकवचनीं शक्य असतें ‘ स्वप्न ’ हा शब्द सस्कृतात मराठींतल्याप्रमाणें नपुसकलिंगी नसून पुल्लिंगी आहे यावरून पूर्वीचीं स्वप्ने हल्लींप्रमाणें स्त्रैणपणाचीं नसून वीररसपरिप्लुत असावीत असा निर्णय करण्यास हरकत नाहीं.

मुष्टि २३ वी *

# साहित्यपरिषदेची तयारी

आमच्या गावीं भरलेल्या चोराच्या संमेलनाची हकीगत यापूर्वी वाचकाना सादर केलीच आहे. त्यानतर बडोदें व अकोलें येथे भरलेल्या साहित्य-संमेलनाच्या हृदयगम हकीगती वर्तमानपत्रातून वाचण्यांत आल्या. तेव्हा आपणही आपल्या गावीं साहित्यपरिषदेच्या एखाद्या बैठकीचा प्रसंग साजरा करावा असे माझ्या मनानें घेतलें. कोणतीही नवी गोष्ट करावयाची झाल्यास तिच्यासबधानें प्रथम बंडूनाना व पाडूतात्या याचा सल्ला घेण्याची माझी वहिवाट असे. तिला अनुसरून मीं त्या उभयताना घरीं बोलाविलें व त्याच्यापुढें माझ्या मनात घोळत असलेला प्रश्न माडिला माझी कल्पना उभयतानाही पसत पडली.

परतु संन्याश्याच्या लग्नाला ज्याप्रमाणें शेंडीपासून तयारी करावी लागते त्याप्रमाणें आम्हालाही परिषदेच्या तयारीचा आरभ स्वत. ग्रथकार बनण्यापासून करणें भाग होतें. एक तर परिषदेच्या निमंत्रणपत्रिकेखालीं सह्या करणारे इसम ग्रथकारच असले पाहिजेत, दुसरें असें, कीं ग्रंथकार पाहुण्याना सामोरे जाणारे यजमानही ग्रथकारच असणें इष्ट होतें, तिसरें असें, की परिषदेसमोर येणाऱ्या सूचनापैकीं काहीं सूचना तरी ग्रामस्था-कडून येणे श्रेयस्कर होतें, व तसें होण्याला काही ग्रामस्थ तरी ग्रथकार या नावाला पात्र पाहिजे होते. स्वत. ग्रथ लिहिण्याचा प्रश्न निघाला तेव्हा पाडूतात्याची हौस जरा मावळल्यासारखी दिसली. परतु आम्ही दोघानीं त्याना सहाय्य करण्याचें जेव्हा कबूल केलें तेव्हा तेही ग्रंथ लिहिण्यास तयार झाले, मात्र या कामी आमची मदत घेण्याचे त्यांनीं साफ नाकारिलें. प्रत्येकानें आपला ग्रथ एक महिन्यात छापून तयार ठेवण्याचे कबूल केलें

दुसऱ्या दिवशीं मीं एक लहान व सोपीशी इग्रजी कादबरी विकत घेऊन एका स्नेह्याच्या मदतीनें तिचे भाषातर करण्यास सुरुवात केली. भाषातराचें काम आठ दिवसात पुरें झालें यापुढे माझ्या स्नेह्याच्या

* मनोरजन, पु. १९, अंक ४ [ सन १९१४ ]

मदतीची जरूर न राहिल्यामुळें मीं त्याला रजा दिली. त्यापुढील आठवडा मीं त्या भाषातरांत मूळच्या नावाबद्दल मराठी नांवें घालण्यात खर्च केला. मूळ कादंबरींत नाच, प्रीतिविवाह वगैरे सुधारकी थाटाच्या प्रकारांची रेलचेल असल्यामुळें मीं भाषांतरातील सर्व पात्राना सुधारक बनविलें. त्यामुळें मला नावें बदलण्यापलीकडे यातायात न पडता सुधारकाची टवाळी करण्याचें श्रेयही घेतां आलें. मधून मधून दुराचारी पात्रांकडून दुष्कृत्यें घडल्याचें वर्णन येई, तेथें मी लागलीच, 'हा पहा पुरुषांनीं डोक्यावर केंस ठेविल्याचा व बायकांनीं अंबाडा बाधिल्याचा परिणाम!' अशी मल्लिनाथी करावयाला चुकत नसें अखेरीला सुधारक घराण्यातील नायकनायिका सुखात पडल्याचें वर्णन आलें, तेव्हां मात्र तें जसेंच्या तसें मराठींत उतरणें माझ्या जिवावर आलें. सुधारकी ढंग करणाऱ्या स्त्रीपुरुषांना अतीं सुख मिळाले असें दाखविल्यास सारा समाज रसातळाला जाईल ही माझी खात्री होती. म्हणून मुळातल्याप्रमाणें नायकनायिकाचा धर्ममंदिरात विवाह लावून त्याची प्रवासाला रवानगी केल्यानंतर मीं कादंबरीचा शेवट याप्रमाणें केला:—

'हें सुधारकी जोडपें आगगाडींतून एका पुलावरून प्रवास करीत असता एकाएकीं पूल मोडून त्याचा डबा पुढील एजिनासह पुलावरून खालील नदींत पडला, आणि तो व मागील डबे जोडणारी साखळी धक्क्यानें त्या डब्यापासून अलग झाली. इतक्यात कर्मधर्मसयोगानें एक भयकर धरणीकंप होऊन मागील डब्यापुढे एकाएकी एक टेकडी उभी राहिली व यामुळे त्या डब्याचा बचाव झाला. त्या डब्यात एकूण एक उतारू सनातन धर्माभिमानी होते ही गोष्ट लक्ष्यात ठेवण्यासारखी आहे'

माझी कादंबरी प्रसिद्ध झाल्यावर मजवर चौर्याचा आरोप येऊं नये म्हणून मीं प्रस्थावनेंत दूरदर्शीपणानें असे एक वाक्य ठोकून दिलें:–' ही कादबरी कोणत्याही पुस्तकाचा आधार न घेता लिहिली आहे तथापि हिचे. . [ येथें मीं मूळ इग्रजी कादबरीचें नाव दिलें होतें. ] या कादबरीशी साम्य दिसून आल्यास ग्रंथकाराला त्यांत कमीपणा न वाटतां आपले विचार व भाषा एका प्रसिद्ध इंग्रज ग्रथकाराच्या विचाराशीं व भाषेशीं तंतोतत जुळल्याबद्दल अभिमानच वाटेल.' प्रस्तावनेच्या शेवटीं मला भाषातराच्या कामीं मदत केल्याबद्दल माझ्या स्नेह्याचे आभार मानावयास मीं विसरलों नाहीं

हे पुस्तक तयार झाल्यावर मी तें मुबईला छापण्याकरिता पाठवून दिले. प्रकाशकाच्या सल्ल्यानें त्यात मधूनमधून काही चित्रें घालण्यात आली व आरंभीं माझा स्वत चा फोटोही देण्यात आला परतु चित्राखाली द्यावयाच्या वाक्याशिवाय इतर मजकूर चित्रकारानें वाचिला नसल्यामुळें व काही स्थळी त्याचा ग्रंथकाराशीं मतभेद झाल्यामुळें त्यात काही किरकोळ चुका राहून गेल्या. एके ठिकाणीं नायिकेनें नायकाला मिठी मारल्याचे वर्णन होतें, परंतु चित्रकाराच्या लक्ष्यात नायकाचें नाव न राहिल्यामुळे त्याने नायिकेला प्रतिनायकाच्याच गळ्यात मिठी मारावयास लाविले. प्रतिनायक काळोख्या रात्री एका मृत्युपत्राची चोरी करीत आहे या प्रसगाचें चित्र काढिताना चित्रातील सारे भाग ठळक दिसावे म्हणून चित्रकारानें आकाशात सूर्य तळपत ठेविला. मृत्युपत्रातील एकूण एक अक्षर वाचकाना वाचिता यावे म्हणून त्याने त्याचा आकार शाळेतील फळ्याएवढा करून त्यातील अक्षरे कित्त्यातील अक्षराप्रमाणे मोठीं बनविलीं शेवटी प्रतिनायक फाशी जातो व नायकनायिका विवाहग्रंथीने बद्ध होऊन चतुर्भुज होतात असा कथाभाग होता परंतु चित्रकार अत्यन्त कोमल मनाचा असल्यामुळे त्याने प्रतिनायकाला पळावयाला लावून त्याच्याऐवजी एका फासावर फाशी देणाऱ्या मागाला व दुसऱ्या फासावर खुद्द ग्रथकर्त्याला लटकावून दिले, व नायकनायिकेच्या हातापायात बिड्या ठोकून त्याना खरोखरीच चतुर्भुज बनविले चित्रकाराचे हे सारे दोष शुद्धिपत्रात दुरुस्त करण्याची मात्र मीं पूर्ण खबरदारी घेतली.

बड्डूनानाना कादबऱ्याचा मोठा तिटकारा असे. हिंदुस्थानाची अवनति होण्याला ते जी कारणे पुढे करीत, त्यात कादबऱ्याची रेलचेल हें एक प्रमुख कारण असे मुलाच्या हाती लहानलहान गोष्टींचीं पुस्तके देण्यापेक्षा गणिताची किंवा व्याकरणाची पुस्तकें देणे शतपट बरे, असे ते जोराने प्रतिपादन करीत. रागणाऱ्या मुलाच्या हातीसुद्धा कादबऱ्या देण्यापेक्षा गभीर विषयावरील पुस्तके किंवा विविध माहितीने भरलेली वर्तमानपत्रे देणे बरे, असें त्याचें प्रामाणिकपणाचें मत असे ते एका दैनिक पत्राचे वर्गणीदार असत. रोज सकाळीं त्यानी त्याचा अक वाचिला. कीं त्याचें कुटुब त्याचा

मुलांकडे उपयोग करण्याकरिता म्हणून तो घेऊन जाई आपल्या अर्धांगीला गृहशिक्षणाचें इतकें महत्त्व वाटतें याचा बंडूनानाना अभिमान वाटे. एके दिवशीं ती वर्तमानपत्राच्या अंकाचा कसा काय उपयोग करिते हे पहाण्याकरिता ते लपून तिच्या मागोमाग गेले असता मुलेंही अंकाकरिता खोळंबून बसलीं आहेत असें त्याना दिसून आलें. परंतु या गोष्टीनें त्याना झालेला आनंद पुढील प्रकार पाहून ताबडतोब मावळला ज्या अंकाचा उपयोग चित्तशुद्धीकडे व्हावयाचा त्याचाच उपयोग शरीरशुद्धीकडे होताना पाहून कोणाला उद्वेग वाटणार नाही? जो अंक मस्तकी धारण करावयाचा त्याची अगदीं उलट दिशेला स्थापना झालेली पाहून नानाच्या डोळ्यात दुःखाश्रु उभे राहिले त्या अंकांतील अग्रलेख 'आमची शेती' हा होता पण त्या शेतीला इतक्या लवकर खत मिळेल अशी नानाची किंवा संपादकाची कल्पनाही नव्हती. त्यातील एक लेख अत्यंत घाणेरडा होता, त्याची योग्य संभावना झाल्यामुळें मात्र त्याना दुःखात काहींसें समाधान वाटलें यापुढें अंकाचा कोणत्याही गृहकृत्याकडे उपयोग न करण्याची त्यानी आपल्या बायकोला निक्षून ताकीद दिली. तिने त्याचीं जेव्हा फार आर्जवे केली तेव्हा त्यानीं त्या वर्तमानपत्रातील खमंग व चुरचुरीत लेख मात्र पळीनें फोडणी देताना हातीं घेण्याची तिला परवानगी ठेविली

याप्रमाणें बंडूनानाना गंभीर व शास्त्रीय वाङ्मयाबद्दल पहिल्यापासून आवड असल्यामुळें त्याचा ग्रंथ एखाद्या शास्त्रीय विषयावर असावयाचा अशी मीं अटकळ बांधिली होती ती अखेरीला खरी ठरली कारण नानानीं एका महिन्याच्या मुदतींत एक अंकलिपि लिहून प्रसिद्ध केली होती. अंकलिपींत कर्त्याच्या कल्पकतेला तो कितीसा अवसर असावयाचा? पण आमचे नाना अत्यंत कल्पक असल्यामुळें त्याच्या कल्पनेची छटा अंकलिपीतही जागोजाग दिसत होती. त्यानी मुळीं विषयाचा क्रमच बदलून टाकिला होता जेथें अंक असावयाचे तेथें एकोत्री, जेथें औटकी असावयाची तेथें पावकी, जेथें तिसाचा पाढा असावयाचा तेथे एकाचा, एकंच्या स्थानीं असावयाचा अंक दहंच्या स्थानीं व दहच्या स्थानीं असावयाचा आकडा एकच्या स्थानीं, साराश खिळे जुळविणारानीं धरणीकंपाच्या गडबडींत काम केलें असता अंकलिपीला जें स्वरूप यावें तेंच नानाच्या अंकलिपीला आलें होतें. या अंकलिपीच्या पुस्तका-

बरोबर शुद्धिपत्राचें पुस्तक काढावयाचा नानाचा विचार असल्यामुळें त्यानीं पाठ्यात पदोपदी मुद्दाम चुका केल्या होत्या 'चुकामुळें शुद्धिपत्र' या नेहमीच्या कार्यकारणभावाचा त्यानी 'शुद्धिपत्राकरिता चुका' असा विपर्यास केला होता. चार चोंक तेरा, तीन त्रिक सात, याप्रमाणें कुट्टकगणितातील अंत्य भाज्यभाजकाच्या जोड्याप्रमाणें एकमेकाशीं फटकून राहणाऱ्या अकाच्या जोड्या त्यानी पावलोंपावली ठेवून दिल्या होत्या. यामुळें गणितासारख्या ठरीव नियमाच्या विषयातही वैचित्र्य व नाविन्य आलें होते. मुदतीच्या महिन्यांत नाना रोज भागेवर आणि गाजावर बराच ताव मारीत याचें कारण आता मला कळलें या साऱ्या चुका शुद्धिपत्रकाच्या पुस्तकात अर्थात्च दुरुस्त केल्या होत्या. अकलिपी व शुद्धिपत्रपुस्तक यापैकी कोणत्याही एक पुस्तकानें गिऱ्हाइकाचे न भागता त्याला दोन्ही पुस्तकें घेणें भाग पडावें अशी नानांनी शक्कल लढविली होती, आणि ती चागल्या प्रकारें सिद्धीलाई गेली होती खिळे जुळविणाराच्या प्रमादामुळें या शुद्धिपत्रातही मनस्वी चुका राहिल्या कारणानें त्याचे दुसरें शुद्धिपत्र व त्याचेंही त्याच कारणाकरिता तिसरे शुद्धिपत्र, याप्रमाणे पूर्वपूर्व शुद्धिपत्राचें नियमन करणारी चारपाच शुद्धिपत्रें या अकलिपीच्या पुरवणीरूप पुस्तकात सामील झालेली होतीं अर्थात्च अकलिपीच्या पुस्तकापेक्षा हें शुद्धिपत्राचे पुस्तक बरेंच मोठे झालें होतें

अकलिपीच्या पुस्तकात वर्णमाला व बाराखड्याही दिल्या होत्या पण त्यांच्यातही बडूनानानी आपल्या कल्पक डोक्याला शोभण्यासारखी एक नवी योजना अमलात आणिली होती. ती वाचकाच्या नीटपणें लक्षात यावी म्हणून तत्संबधीं प्रस्तावनेत दिलेलें स्पष्टीकरण खाली देत आहें:—

"हिंदु समाजात पुरातन कालापासून चालत आलेल्या वर्ण व्यवस्थे प्रमाणेंच व्याकरणातील वर्णव्यवस्थाही सयुक्तिक आहे. समाजातील भिन्न भिन्न वर्ण जसे विराटपुरुषाच्या निरनिराळ्या अवयवापासून उत्पन्न झाले, तसे व्याकरणातील कठ्यादि भेदही मुखाच्या निरनिराळ्या भागातून झाले आहेत. पूर्वोक्त व्यवस्थेंत वर्गाची संख्या चार असून उत्तरोक्त व्यवस्थेतील वर्गांची संख्या पाच आहे, एवढेंच काय तें त्यामध्यें अंतर आहे प्रत्येक वर्गामधील व्यजनें पुरुषवर्गाच्या जोडीची असून स्वर स्त्रीवर्गाचा प्रतिनिधि आहे; प्रत्येक वर्गातील व्यंजनाना अनुरूप असा एक एक स्वर त्यास नेमून दिला

आहे. पाच पुरुषवर्गीय वर्णांना एकच स्त्रीवर्गीय वर्ण ज्या काळी नेमून देण्यात आला तो काळ पांडवांचा असावा असा तर्क केल्यास तो अगदीच निराधार म्हणण्याचे कारण नाही. स्वर स्त्रीप्रमाणे मृदु स्वभावाचा असून व्यंजन पुरुषाप्रमाणे कठोर स्वभावाचे असते. ज्याप्रमाणे स्त्रीशिवाय पुरुषाचा संसार पूर्ण होत नाहीं, त्याप्रमाणे स्वराशिवाय व्यंजनाचा उच्चारही पूर्ण होत नाही. कंठ्य वर्ण ब्राह्मणाच्या ठिकाणी होते टाळू, मूर्धा, दांत व ओंठ यांची योग्यता कंठापेक्षा कमीकमी असल्यामुळें तालव्य, मूर्धन्य, दंत्य व ओष्ठ्य या वर्णांची योग्यताही उत्तरोत्तर कमी कमी असली पाहिजे सुग्रास अन्न गिळण्याचा अधिकार एकट्या कंठाला असून ते अन्न गिळण्याला योग्य करणे हें इतर स्थानांचे कर्तव्य आहे. कंठाच्या वाड्याच्या बाह्य द्वाराचे रक्षण करण्याचे काम दाताकडे असून त्या दरवाज्याच्या बाहेर मिशाच्या केसांचे भाले घेऊन पहारा करण्याचे काम ओंठाकडे असते दांत व ओंठ हे शूद्र-अतिशूद्रांच्या स्थानी आहेत परंतु कधी कधी इतर दंतौष्ठांशी विनिमय करण्याचे कामही त्यांच्याकडेच असल्यामुळे वाणिज्यही त्यांनीच आटोपलेले आहे. ओष्ठ्य हा वर्ग तर इतका नीच आहे, कीं कविवर्य मोरोपंतांनी एका रामायणात त्याला पूर्ण बहिष्कार घातलेला आहे. ‘ श ’ या तालव्य व ‘ ष ’ या मूर्धन्य व्यंजनाच्या ‘ शेंडीफोड्या ’ व ‘ पोटफोड्या ’ या नावावरून तालव्य व मूर्धन्य हे वर्ग दंत्य व ओष्ठ्य या वर्गांपेक्षा ब्राह्मणवजा कंठ्य वर्गालाच जवळ आहेत हे उघड होतें कारण संध्या देताना शेंडी उपटण्याची व जेवताना पोट फुटेपर्यंत खाण्याची चाल आम्हा ब्राह्मणांतच आहे कंठ, दांत, ओंठ व त्यामधील स्थाने यांनी आजपर्यंत विशेष आपत्तीशिवाय कधीही आपापल्या स्थानाची अदलाबदल केली नाही घशामध्यें दांत गेलेले दंगा-मस्तींत प्रत्यक्ष दिसतात, व वादविवादांत लाक्षणिक अर्थानें दिसतात. परंतु हे अपवाद होत मूलस्थानांनीं जर याप्रमाणें आपणांत कडक जातिभेद पाळिला आहे, तर त्यांच्या वर्णरूप वंशजांनीं तो पाळू नये हे किती उद्वेगजनक आहे ! कंठ्यादि वर्गांना अनुरूप अशा स्वराचा त्याच वर्गांतील व्यंजनाशीं विवाह होणे युक्त असता इतर वर्गांतील व्यंजनाशी लावण्यात येतो ही किती शोचनीय गोष्ट आहे ! हा धडधडीत वर्णसंकर आहे ! जोडाक्षररूप स्नेहही सवर्गीयांमध्येच होणे इष्ट असता भिन्नवर्गीयांमध्ये घडवून आणणें

हेंही वर्णव्यवस्थेला सोडून आहे शूद्रांची सावलीसुद्धा पडू देणें पाप असतें असें असता त्यानी गळ्यात गळा घालून स्नेहालाप करीत बसणे हें सर्वथा गैर आहे. या दृष्टीने का, ची, टु, तूळ व पू इत्यादि एकवर्गीय स्वरव्यजनानीं घटित अक्षरें वर्णव्यवस्थेला अनुसरून असून इतर अक्षरें तिला सोडून आहेत तसेच क्क्, च्छ्, ड्ड्, त्थ्, प्फ इत्यादि एकवर्गीय व्यंजनानी घटित जोडाक्षरे वर्णव्यवस्थेला धरून व इतर सर्व तिच्या विरुद्ध आहेत, वर्णव्यवस्थेला धाब्यावर न बसविता शब्द तयार केल्यास ते ' जीक्कड्ट ' ' गान्छिल्ळ ' या स्वरूपाचे होतील. आपल्या भ्रष्ट कर्णांना ते हेंगाडे लागण्याचा सभव आहे, परतु सवईने तेच गोड वाटू लागतील. या योजनेने कोशातील शब्द कदाचित् सपुष्टात येतील, परंतु सामाजिक वर्णव्यवस्था शाबूत राखण्याकरिता राजकीय व सामाजिक अडचणी निमूटपणे सोसणाऱ्या आम्हा आर्यांना ही अडचण मनावर घेण्यासारखी नाही शब्द छापताना त्यातील शूद्र किंवा अतिशूद्र म्हणजे दंत्य किंवा ओष्ठ्य वर्गातील वर्ण श्रेष्ठवर्गीय वर्णापासून अलग छापविण्याचीही योजना वरील योजनेबरोबर अमलात आणिल्यास वर्णसकराला चागला आळा बसण्याचा सभव आहे वर ' गान्छिल्ळ ' हा शब्द दिला आहे तो याप्रमाणें, वर्णव्यवस्थेला धरून लिहावयाचा झाल्यास ' गान्छि ल्ळ ' असाच लिहावा लागेल जाज्वल्य सनातनधर्मीयात खतावणीतील ब्राह्मणाच्या व अतिशूद्राच्या खात्यामध्यें जर कोऱ्या पानाचे कुपण ठेवण्याचा प्रघात आहे तर एका शब्दातील उच्च व नीच वर्णामध्ये कोरी जागा ठेवणेही त्याना जड जाणार नाहीं ”

या उताऱ्यावरून बहूनानांच्या वर्णमालेची, त्यानी दिलेल्या साध्या अक्षराची, जोडाक्षराची व शब्दांची थोडीशी कल्पना वाचकाना करता येईल अशी आशा आहे. या बाबतींत सुधारणा करण्यासंबंधानें एक ठराव परिषदे-पुढें आणण्याचा नानाचा विचार असल्यामुळें हा उतारा जरा लाब असताही येथे दिला आहे

नानाच्या ग्रथलेखनसामर्थ्याबद्दल मला केव्हांही शंका नव्हती. पांडूतात्या-सबधानें मात्र माझे मन बरेंच साशक असून आपण त्याच्यामागें विनाकारण हें नसतें लचाड लावून दिलें आहे असें मला वाटू लागलें होतें. मुदतीपैकीं पहिला आठवडा तर त्यानी डोकें खाजविण्यातच घालविला त्या खाजविण्यानें

त्याच्या डोक्याच्या वरच्या बाजूला एक भला मोठा नायटा उत्पन्न झाला. पण त्याने डोक्याच्या आंतील शकाचे विशेषसे निराकरण झाल्यासारखें दिसलें नाहीं त्यानीं रोज मजकडे येऊन ग्रथ म्हणजे काय, तो किती पृष्ठाचा असला पाहिजे, प्रत्येक पृष्ठावर किती शब्द असले पाहिजेत, ग्रथाचा पुठ्ठा विवक्षित जाडीचा पाहिजेच की काय वगैरे गोष्टींसंबंधाने चौकश्या कराव्या. अशा रीतीने मुदतीचा चौथा हिस्सा बाह्यागाबद्दलच काथ्याकूट करण्यात घालविल्यावर पुढे पाडूतात्या काय दिग्विजय लावणार, याचा मी आपल्या मनाशीं अदाज करून चुकलो. परतु माझा अदाज खोटा ठरणार अशी हळूहळू स्पष्ट चिन्हे दिसू लागली. आतांशा पाडूतात्या घराबाहेर फारसे दिसेनासे झाले रात्रीं बारा बारा वाजेपर्यंत त्याच्या खोलीत दिवा दिसू लागला. त्याचे घोरणें रस्त्यावर ऐकू यावयाचे, तें ऐकू येईनासें झाले एकदा त्यानीं मजजवळचें क्यालेंडर मागून नेले त्यावरून तर उरलेल्या अवधीतील प्रत्येक दिवस सार्थकी लावण्याचा त्याचा कृतसकल्प दिसला तिसऱ्या आठवड्याच्या अखेरीला त्याचे पुस्तक छापावयाला गेल्याची बातमीही कानावर आली त्यासरसा आम्ही तात्याबद्दल आजपर्यंत करून ठेविलेला ग्रह पार बदलून गेला अनुकूल सधि आल्यास नराचा नारायण कसा बनतो, याचे पाडूतात्या एक चालतें बोलते उदाहरणच वाटू लागलें. त्याच्या ग्रथाची पृष्ठसख्या चारशेंच्या जवळजवळ गेली आहे असें एक दिवस कानावर आले, त्याने तर आमची छातीच दडपून गेली. तात्याची पाणीदार चर्या एकवार तरी दृष्टीस पडावी म्हणून आम्ही टपून बसू लागलो व मोठ्या कष्टानें त्याची भेट झालीच तर त्याच्याशी मोठ्या अदबीनें बोलू लागलों. पुढील महिन्याचा पहिला दिवस उजडतो केव्हा याकडे आमचे डोळे लागून राहिले महिन्याच्या शेवटी शेवटी तर आमची स्वत ची पुस्तकेही आम्ही पार विसरून गेलों होतों

अखेरीला एकदाचा तो सोन्याचा दिवस उजाडला ! मी व बडूनाना आपापल्याला पुस्तकाची एकेक प्रत घेऊन तात्याच्या घरी गेलो. त्यावेळीं त्याच्यापुढें त्याचा प्रचड ग्रथ पडला असून त्याकडे ते अभिमानपूर्वक पहात होते आम्हांला पहातांच तात्या म्हणाले, ‘ एकदरींत ग्रंथकर्तृत्व ही कांहीं मोठीशी गोष्ट नाही. आपण लक्ष पुरवीत नाहीं तोंवरच त्याचा बाऊ वाटतो. पण तें काम हाती घेतलें, की हातच्या मळासारखें वाटूं लागते.’

नतर आपल्या प्रचड ग्रथलेखनामुळें आमचा अगदीं हिरमोड होऊ नये, म्हणून उत्तेजनपर दृष्टीने आम्हाकडे पहात तात्या म्हणाले, ' असो, तुम्ही तर आपापलीं पुस्तकें अगोदर काढा मागाहून मी आपला ग्रथ दाखवितों. असे लाजू नका तुमचा हा पहिलाच प्रयत्न आहे हे मला ठाऊक आहे मी तुमच्यापासून फारशी अपेक्षा करीत नाही '

आम्ही लाजत लाजत मोठ्या मुष्किलीने आपलीं पुस्तकें तात्याच्या पुढें केलीं त्यांनीं एक पुस्तक एका हातात व दुसरे दुसऱ्या हातात घेऊन त्याच्या वजनाचा अदाज करीत म्हटलें, ' एका महिन्यात प्रत्येकानें इतक्या वजनाचे पुस्तक बाहेर आणावें, हे तुम्हास भूषण आहे मीही आपल्या अल्प सामर्थ्याप्रमाणे हा चारशे पानाचा ग्रथ काढीला आहे ' असे म्हणून त्यानीं वर सोनेरी अक्षरें झळकत असलेला कापडी बाधणीचा आपला जाडा ग्रथ बंडूनानाच्या हाती ठेविला नानानी वरील अक्षरावरून आपली दृष्टि एकदा फिरविली मात्र, आणि त्याना असें काही अनिवार हसूं लोटले, की न भूतो न भविष्यति ! हसण्याचा जोर काहीसा मंदावताच ते ओरडले, ' अरे तात्या, ही तर नुसती डायरी आहे ! आणि हिच्यावर तू आम्हाला इतके दिवस झुकविलेंस ना? शाबास आहे तुझी ! ही कोरी पाने तुझ्या कोऱ्या ठणठणीत डोक्याला शोभण्यासारखी आहेत खरीं! बरे, डायरीच का होईना ! ती पुढील सालची नाही तर नाही, चालू सालची तरी असावयाची होती ! पण तुझा आपला तृतीय पथच ! ही मागील सालची डायरी घेणार कोण ? '

हा वर्षाव चालला असताना तात्या ओशाळगतीनें थिजल्यासारखे होऊन बसले होते परतु इतक्यात त्याना कसलासा विचार येऊन ते प्रसन्न मुद्रेनें म्हणाले, ' या डायरीच्या दोन हजार प्रतीपैकीं एकही खपली नाही तर त्यातही मला समाधान मानायला थोडीशी जागा आहे.'

' ती कोणती ? '

' या डायरीत काही चमत्कारिक चुका राहिल्या आहेत, व त्याची दुरुस्ती ज्या शुद्धिपत्रात केली होती तें शुद्धिपत्रक डायरीला जोडावयाचें चुकीनें राहून गेलें डायरी ज्या सालची आहे त्या सालात फेब्रुवारीचे एकोणतीस दिवस असता डायरींत चुकीनें तीस पडले आहेत, यामुळे पुढील साऱ्या तारखाचे वार चुकले आहेत. त्यातून या बेट्या घोड्या महिन्यानेंहि

याच साली येऊन सारी घाण केली! बाळाचें नांवहि कसें योग्य ठेविलें आहे पण! अगदीच दगड! पुढल्या सालीं आला असता तर काय बिघडलें असतें! पण तो नेमका डायरीच्याच साली आल्यामुळे डायरीतील दिवाळी एक महिन्यानें अगोदर आली आहे याचा अर्थ असा कीं, जो दिवस सारें जग सर्वपित्री अमावस्या म्हणून गभीर विचारांत घालविणार त्या दिवशी माझ्या डायरीचीं गिऱ्हाइके अभ्यगस्नान करून व फराळावर यथेच्छ ताव मारून फटाके उडवीत बसणार! बरें, माझ्या हातून चूक झाली तर झाली, खिळे जुळविणाराना तर काही अक्कल असावी! पण सारे बेटे शतमूर्ख!'

'पाडुतात्या, ज्याअर्थी ही डायरी गेल्या सालची आहे त्याअर्थी तिच्यामुळें गिऱ्हाइकाची फसगत होईल ही काळजी बाळगण्याचें तुम्हाला मुळीच कारण नाहीं. हिच्यात कितीहि चुका असल्या तरी तुम्हाला ग्रंथकार बनविण्याचा कार्यभाग हिजकडून झालाच आहे. आता पुढील कर्तव्याकडेच आपणाला लक्ष्य दिलें पाहिजे'

पुढील रविवारीच सार्वजनिक पुस्तकालयाच्या इमारतीत जाहीरसभा भरण्याचें ठरले. त्याकरिता वाटावयाच्या हस्तपत्रकाचा मसुदा बंडूनानांनीं तयार केला. परतु ज्याना व्याकरणाची व शुद्धलेखनाची फारशी ओळख नव्हती अशा लोकामध्यें वाटावयाच्या हस्तपत्रकाचा मसुदा मात्र पाडुतात्याकडे सोपविण्यात आला, व तो त्यानी समाधानकारक रीतीने तयार केला दोन्ही प्रकारच्या हस्तपत्रकाच्या खालीं 'नवीन प्रसिद्ध कादबरीकार,' 'स्वतत्र अकलिपीचे कर्ते' व 'समेलन डायरीचे कर्ते' अशा मोहक वर्णनानिशी आम्हा त्रिवर्गाच्या सह्या होत्या.

सभेची वेळ येऊन ठेपली सभेचें काम बरोबर चार वाजता सुरू व्हावयाचें होतें. पाच मिनिटें अगोदर गेल्यास आपला बोज राहणार नाही या भीतीनें आम्ही अगदी वेळेवर सभेला जाण्याकरिता निघालों सभेला अतोनात गर्दी होणार असल्यामुळें बदोबस्ताकरिता सरकारच्या परवानगीने दोन पोलीस अमलदार बरोबर घेतले होते. आम्ही सभास्थानीं जाऊन पहातों, तों तेथें एकही सभासद दिसेना. उतार वयामुळें दृष्टि चकली असेल अशी शंका येऊन आम्हीं आपापल्या आरश्या साफ करून दोनदोनदा तीनतीनदां नाकावर चढविल्या. पण व्यर्थ! कांचेंत समोर असेल ती वस्तु हुबेहुब दाखविण्याची

शक्ति आहे, परतु नवीन वस्तु निर्माण करून दाखविण्याचें सामर्थ्य मुळीच नाहीं आम्ही गर्दीचा बदोबस्त करण्याकरिता बरोबर पोलिस आणिले होते, पण जेथें मुळी गर्दीच नव्हती तेथे ते बिचारे बदोबस्त काय करणार ! ते खुशाल डोळे मिटून इकडून तिकडे आंणि तिकडून इकडे येरझारा करू लागले. पण त्याना एकाहि सभासदाची ठेंच लागेना ! जाहिरातीत तारीख आणि वार चुकींचे तर नाहीत ना पडले, अशी शंका येऊन आम्ही हस्तपत्रकें नुस्त्या डोळ्यानिशी, आरश्या चढवून, जवळून अंतरावरून वाचून पाहिली, पण एकही चूक दिसेना, कदाचित् घड्याळ पहाण्यात आमची चूक झाली असेल असें वाटून आम्ही आपलीं घड्याळें एकमेकाशीं पडताळून पाहिलीं पण त्याचेंहि सगनमत झालेलेंच दिसलें तिघाचेहि काटे समातर होते शेवटीं आमच्या लोकाच्या अगी खिळलेला अनियमितपणाच या साऱ्या फजितीला कारण आहे असे ठरवून आम्ही मुकाट्याने इतर सभासदाची मार्गप्रतीक्षा करीत बसलो.

एक तास झाला, दोन तास झाले, इतक्या उशिरानें येणाऱ्या इसमानीं आमची घड्याळें पाहून शरमिंदे होऊं नये म्हणून आम्हीं घड्याळाचे काटे सहावरून चारावर आणिले, तरी एकही इसम सभेकडे फिरकेना रोज सायकाळीं जे दोन चार वर्गणीदार वाचनालयात नेमानें येत, तेही आज आले नाहींत मागाहून आम्हाला असे कळलें, की साडेचाराच्या सुमाराला बरेच इसम सभेला यावयाला निघाले होते. परतु त्यानीं दुरून तेथें दोन काळे डगलेवाले फिरताना पाहून परभारे पोबारा केला ! आमच्यासंबंधाने गावात नानातऱ्हेच्या कड्या उठल्या होत्या, त्या सर्वांचे सार इतकेंच, कीं आम्हाला पोलिसानी चतुर्भुज करून वाचनालयात अटकेंत ठेविलें आहे, व इतराना पकडण्याच्या ते तयारींत आहेत ! काहीं गावगुंडानी तर आम्हाला पोलिसानीं यथास्थित चोप दिल्याबद्दलीहि एक गप्प उठविली होती. ती बहुधा सभेंतील टाळ्याच्या कडकडाटाचाच परिणाम असावी असो ज्याप्रमाणें गुन्हा घडून त्याला शिक्षा होण्यापेक्षा तो न घडणेंच श्रेयस्कर, त्याप्रमाणें गर्दी होऊन ती मोडण्यापेक्षा ती न होणेंच इष्ट, या तत्त्वाची अंमलबजावणी पोलिसांकडून याप्रकारें त्याना न कळत आपोआपच झाली !

या कंड्या आम्हाला घरी गेल्यावर कळल्या सभास्थानीं आम्हांला बाहेरची कांहींच हालहवाल न कळल्यामुळें आम्हीं कंटाळून त्रिवर्गांनींच

सभेचा समारभ साजरा करण्याचा निश्चय केला. प्रथम बंडूनानानी अध्यक्ष-स्थान स्वीकारावें अशी मी सूचना आणिली, व तिला पाडूतात्याचें अनुमोदन मिळाले. नानाच्या योग्यतेमुळे अर्थातच हा ठराव सर्वानुमतें मजूर झाला. नाना अध्यक्षाच्या खुर्चीवर जाऊन बसले "या सभेंत मजपेक्षा अनेक योग्य गृहस्थ या मानाला पात्र आहेत, असे असता आपण हा मान मलाच दिला, याबद्दल मी आपले अतःकरणपूर्वक आभार मानितों" असें त्यानी विनयपूर्वक प्रास्ताविक भाषण केलें ते ऐकून सूचना आणणाऱ्या व अनुमोदन देणाऱ्या इसमानी टाळ्यानी आपली पसति दर्शविली इतराची पसंती, विशेषेकरून त्याच्या मौनावरूनच दिसून आली. यानतर आपल्या गावी साहित्यपरिषद भरविणें अत्यत इष्ट आहे अशा अर्थाची सूचना पाडूतात्यानीं पुढें आणिली, व तिला मी दुजोरा दिला. दुजोरा देताना मीं इतक्या आवेशाचे भाषण केले, की दोन पोलिसाचें घोरणें वर्ज्य केल्यास सारी सभा चित्राप्रमाणे स्तब्ध राहिली होती! तिसरा ठराव खुद्द अध्यक्षानीं पुढे आणिला, व मी त्याला पाठिंबा दिला तो ठराव पाहुण्याच्या उतरण्याची, जेवणाची व परिषदेच्या बैठकीची व्यवस्था पहाणाऱ्या कार्यकारी मडळा-सबधाने होता प्रत्येक मडळात आमची त्रिवर्गाचींच नावें होतीं. पण त्यातील नावाना वैचित्र्य येण्याकरिता भिन्नभिन्न मडळातील नावाचा क्रम भिन्नभिन्न असावा अशी योजना केली होती हा ठरावही सर्वानुमते पास झाला मात्र हा ठराव खुद्द अध्यक्षानीच पुढे आणिल्यामुळें त्याला पूर्वीच्या दोन्ही ठरावापेक्षा एक मत अधिक मिळालें.

याप्रमाणे पहिली सभा आमच्या अटकळीपेक्षाही बिनबोभाट पार पडली. सभेची व्यवस्था उत्तम ठेविल्याबद्दल पोलीसचे अमलदार आमच्याकडून चिरीमिरी घेऊन परत गेले, व आम्हीही हात हलवीत घरोघर परत गेलों पोलिसाना दिलेल्या चिरीमिरींतून घोरून शातता मोडल्याबद्दल दडादाखल दोन आणे कापून घेण्याला मात्र मी विसरलो नाहीं

दुसऱ्या दिवसापासून आम्ही त्रिवर्ग वर्गणी वसूल करण्याकरिता घरोघर फिरूं लागलों या कार्यांत आम्हाला इतका विचित्र अनुभव आला, की पुढें पुढें आम्हांला चोराच्या संमेलनाच्या स्वागतमंडळाचा हेवा वाटावयास लागला. त्या मडळानें वर्गणीबद्दल कधींही ओरड केली नाही किंवा एकाही

घराचा उबरठा झिजविला नाही ग्रामस्थाच्या खिशातील आणि पेट्यातील पैसे तें मडळ आपल्याच तिजोरींत असल्याप्रमाणे सुरक्षित समजत असे व त्या पैशाची जरूर पडली म्हणजे मुकाट्यानें त्याचे स्थलातर घडवीत असे. ही जुलमाची देणगी दुसऱ्या दिवशीं मालकाच्या नजरेला आल्यावर तो ती रक्कम समेलनाप्रीत्यर्थ खुषीची देणगी म्हणून गुपचूप खर्ची घालीत असे. पोलिसात वर्दी देऊन या गोष्टीचा बोभाटा केल्यास स्वागतमडळ आपल्या पदरी रोजचे रोज दातृत्वाचे नवें नवे पुण्य बाधिल्यावाचून रहाणार नाही अशी त्याची खात्री असल्यामुळें या गुप्त दानाची तो विशेष वाच्यता करीत नसे यांप्रमाणें जुलमाच्या देणग्याचा प्रकार असे परतु आम्ही मालकाकडून खुशीच्या देणग्या मागण्याकरिता घरोघर खेटे घालू लागलों तेव्हा आम्हाला याच्या अगदी उलट अनुभव येऊ लागला आम्हाला घरात शिरताना पाहून काहीजण नोकराकडून ‘ यजमान घरीं नाहीत ’ असा निरोप पाठवीत, व त्या निरोपाच्या खरेपणाबद्दल आम्ही सशय दर्शविताच ते आतून ‘ मी स्वतः सागतों मी घरी नाही म्हणून, तेंही तुम्ही खरें मानीत नसल्यास तुमच्या भलेपणाला नमस्कार असो ! ’ असे ओरडून सागत. काहीं निरुद्योगी माणसे आम्हाला पहाताच एखादें पुस्तक घाईनें हाती घेऊन ते वाचण्यात इतके गर्क होत, की साहित्यपरिषदेचा हेतु ती भरण्यापूर्वीच पूर्णपणें सिद्धीला आण्याची आम्हाला खात्री वाटू लागे. कित्येक इसम आम्ही दृष्टीला पडताच आपल्या कुटुबावर व नोकरावर रागावून इतके बेफाम होत, की ‘ लेकी बोले सुने लागे ’ याप्रमाणें आम्ही त्याचा रागरग ओळखून रस्त्याची वाट धरीत असू. एकदा आम्ही एका गृहस्थाकडे भिक्षादेही करण्यास गेलों असता त्याने आपल्या मोठ्या कुत्र्याला छूः केले, त्याबरोबर आम्हास ‘भीक नको कुत्रा आवर’ असे शब्दशः होऊन पळता भुई थोडी झाली कित्येकानी वर्गणीचे आकडे ताबडतोब घालून ते लवकरच चुकविण्याचें वचनहि दिले, परंतु पुढे त्याच्या तोंड चुकविण्यावरून ते वर्गणी कोणत्या अर्थाने चुकविणार हे आम्हाला पूर्णपणें कळून आले. आम्ही वर्गणी गोळा करण्याकरिता बहुधा सकाळींच निघतो ही बातमी गावात पसरल्यामुळे सकाळी व्यायाम घेण्याकरिता निघालेले ताडेचे ताडे आमच्या दृष्टीला पडू लागले. शारीरिक व्यायामाचें महत्त्व बिंबविण्याचे जे काम आमच्या व्याख्यानानीं झाले नाहीं, ते केवळ वर्गणीप्रीत्यर्थ

होणाऱ्या आमच्या अगमेहनतीने झाले. शब्दापेक्षा कृतीचा परिणाम त्वरित होतो तो असा! शेवटीं शेवटी आम्हाला असा अनुभव येऊ लागला, कीं आम्ही ज्या ज्या रस्त्यानीं जावे, ते ते रस्ते ओसाड होऊन गावाचे इतर भाग माणसानी गजबजून जावें! हा आधळ्या कोशिबिरीचा खेळ खेळण्याचा आम्हाला साहजिकच कटाळा येऊ लागला दोन महिने खपून त्या महिन्यातील दिवसाइतकेही वर्गणीचे रुपये वसूल झाले नाहींत, व जे रुपये वसूल झाले त्याच्या दसपट मित्राना आम्ही मुकलों, हे जेव्हा आम्हीं पाहिलें तेव्हा जमलेल्या वर्गणीवरच समेलनाचा सारा खर्च भागविण्याचा आम्ही निश्चय केला

इतक्या थोड्या रकमेंत सारा खर्च निभावण्याकरिता खर्चाच्या प्रत्येक बाबतींत काटकसर करणे जरूर होते परिषदेच्या बैठकीकरिता निराळा मडप न उभारता वाचनालयातच त्या उरकण्याचे आम्हीं ठरविले. त्यानतर पाहुण्याची उतरण्याची सोय कोठे करावी याचा विचार सुरू झाला पाडूतात्या ज्या वाड्यात रहात होते तो वाडा चागला प्रशस्त व सोईचा होता परतु मध्यतरी पाडूतात्यावर त्याच्या छापखानेवाल्यानें डायरीच्या छपाईबद्दल व बाधणीबद्दल आलेल्या खर्चाचा हुकूमनामा मिळाला होता, व त्याच्या वाड्यात पाहुण्याची सोय केल्यास त्या हुकूमनाम्याच्या अमलवारीत पाहुण्याचें सामान जप्त होण्याचा फार सभव होता, त्यामुळे तो बेत रहित करावा लागला बडूनानाचें घर ऐसपैस होतें, पण त्यात पाहुण्याना उपयोगी पडण्यासारखा एकच दिवाणखाना होता, आणि त्यात निर्यमक व सयमक कविताच्या अभिमान्याचा किवा जुन्या व नव्या कवींच्या भक्ताचा एकदम समावेश होणें शक्य नव्हते अशा भिन्न भिन्न निशाणाखालीं लढणाऱ्या वीराना पृथक् तळ देण्याची माझ्या स्वतःच्या घरात चागली सोय होती. परंतु तेथें ढेकणाचा व पिसवाचा इतका सुळसुळाट होता व ग्रंथकाराच्या नवरसयुक्त रुधिराची लज्जत त्याना आजपर्यंत इतक्या कमी वेळा चाखायला मिळाली होती, कीं उभयताची गाठ पडली असती तर ग्रथकाराना आपल्या मर्मज्ञ व रसिक भक्ताची जन्मभर आठवण राहिली असती. याप्रमाणें भवति न भवति होता होता शेवटी पाहुण्यांच्या वस्तीकारिता धर्मशाळा मुक्रर करण्यात आली ही धर्मशाळा काहींशी आकुंचित होती, व पाहुण्याची संख्या मर्यादेबाहेर गेल्यास त्याना तिच्यात वाजवीपेक्षां

अधिक सलगीने एकत्र रहावें लागेल अशी भीति होती. परतु ही अडचण दूर करण्याकरिता आम्हीं एक शक्कल काढिली ग्रथकाराना पाठवावयाच्या निमत्रणपत्रिकात आमच्या गावी प्लेगच्या प्रादुर्भावाची स्पष्ट चिन्हे दिसत असल्याचे व जानोशाच्या जागी एक मेलेला उदीरही आढळल्याचे लिहून, अशा संकटाना खरा वाङ्मयभक्त भीक घालणार नाही अशी आशा प्रदर्शित करावी असे आम्ही ठरविले

पण आमचा डाव ओळखून या जरबेलाही भीक न घालणारे काही खमग ग्रंथकार निघणारच शिवाय काही निस्सीम सरस्वतभिक्त समेलनाला येण्यापूर्वी प्लेगची लस टोंचून घेण्यासही चुकणार नाहींत ' ज्या गावी त्या सुमाराला प्लेग जारीने सुरू होता त्या गावच्या ग्रथकाराना, तर आमचे बुजगावणें हास्यास्पद वाटून ते स्वतः प्लेगची साथ बरोबर घेऊनच आमच्या गावा यावयाचे व या रीतीने आमच्या तगड्या आमच्याच गळ्यात घालावयाचे ' शेवटी मेलेल्या उदराची अनुदार कल्पना आमच्या शीलाला न शोभणारी म्हणून, आम्हाला अजीबात सोडून द्यावी लागली

पण आमच्या सन्मान्य पाहुण्याच्या सख्येला जर कोणताच आळा राहिला नाही तर आमच्या तुटपुज्या रकमेवर त्याचा पाहुणचार कसा करावयाचा, हा प्रश्न आम्हाला काही वेळ बराच भानगडीचा वाटला. अखेर धूर्त बडूनानानी तोही समाधानकारक रीतीने सोडविला. त्या वर्षी रामनवमीच्या पुढील दशमीचा ज्योतिषाच्या व शास्त्रार्थाच्या ओढाताणीने क्षय दाखवून एकादशी नवमीला लागूनच आणिता येण्यासारखी होती नानानी रामनवमी व एकादशी हे दोन दिवस परिषदेच्या बैठकाकरिता मुकर केले व यदाचे समेलन धर्माज्ञा कडकडीत रीतीने पाळून साजरें करण्यात येणार आहे अशी सूचना निमत्रण-पत्रिकेत सामील करण्याचे ठरविले धर्मावर उज्ज्वल निष्ठा असल्यावाचून प्रासादिक कविता साध्य होत नाहीं असे एक मत सुदैवाने या सुमाराला चोंहोकडे फैलावू लागले होते त्यामुळें बहुतेक ग्रथकार–निदान जाज्वल्य धर्माभिमानी ग्रथकार तरी–दोन्ही दिवस अन्नपाण्याचें सेवन न करिता आनदानें पाळतील अशी आमची खात्री होती एखादा मवाळ धर्माभिमानी पाणी पिण्याचा हट्ट घेऊन बसलाच, तर आमच्या पाण्याच्या नळामध्ये त्याची तहान न भागविण्याइतकी अनुदारता खास नव्हती मवाळाच्याही खालच्या

पायरीच्या एखाद्या गचाळ धर्माभिमान्याचे दुधावांचून अडलेच तर त्यास रुपयाला सोळा शेर या भावाने सफेती दिलेलें पाणी पुरविण्याचा मक्ता गंगाप्रसाद गवळ्याकडे देण्याचा आमचा विचार होता.

उरता उरले सुधारक ग्रंथकार हे बेटे मोठे विघ्नसंतोषी व घरबुडवे! यानी विधवांचे केशवपन बंद करून व स्वतः डोक्यावर छपरे ठेवून देशी न्हाव्याचा धंदा बंद केला! पुराणे बंद करून देशी वातीचा कारखाना सपशेल बुडविला! हव्यकव्याचा व व्रतवैकल्याचा नायनाट करून उनाड भिक्षुकांची फुकट खाण्याची सोय नाहींशी केली! श्राद्धपक्षाच्या प्रसंगी वाटेल त्या भटाला घटकाभर मृत यजमानाचें स्थान पटकावून नवीन यजमानाकडून पाया पडून घेण्याची जी सवड होती, तीही यानी ठेविली नाहीं, आणि तांदुळाचा खप कमी करून कावळ्यावर उपाशी मरण्याचा प्रसंग आणिला! कोवळ्या मुलींशी लग्न करून तिला जिनगीची वारस करूं पहाणाऱ्या पिकलेल्या बिजवराच्या उदार प्रयत्नांत यानीं खो घातला, व बालविधवांचीं लग्ने सुरू करून त्यांच्या आप्तांच्या हक्काच्या मोलकरणीला यानी त्यांजपासून दूर केलें! गावच्या बाहेरची मोकळी हवा खाणाऱ्या व अज्ञानाच्या सुखांत लोळणाऱ्या महारमांगांना यानीं गावांतल्या घाणेरड्या हवेत लोटून देऊन त्यांच्या डोक्यावर निरर्थक ज्ञानाचा बोजा ठेवून दिला! यानी बायकांना विद्या शिकवून पुरुषांना त्यांज-पेक्षांही विद्वान होण्याची आवश्यकता उत्पन्न केली! यानी सती जाण्याची चाल बंद करून सर्पणवाल्यांचें तर नुकसान केलेंच, पण वारसांना अनायासे मिळणारी मिळकत यानीं त्यांजपासून हिरावून घेतली! असे एक कीं दोन! हजारों अनाचार यानी प्रचारांत आणिले. यानी काय काय भ्रष्टाकार केले हें विचारण्यापेक्षा काय काय केले नाहीत हें विचारणेंच सयुक्तिक होईल.

वर सुधारकांवर केलेले आरोप खरे असोत किंवा नसोत, एवढे मात्र खरें, कीं आमच्या त्या वेळच्या अडचणीच्या स्थितींत सुधारक ग्रंथकार आम्हाला अत्यंत देशद्रोही वाटूं लागले. ज्याअर्थी प्रत्येक इसम बहुधा स्वतःच्या गावाला जग व स्वतःला देश समजत असतो त्याअर्थी आम्हा त्रिवर्गांना संकटांत पाडणारे सुधारक ग्रंथकार आम्हाला देशद्रोही वाटावे यांत नवल नाहीं. हा कांटा आमच्या वाटेंतून काढण्याकरितां सुधारक ग्रंथकारांच्या नास्तिकपणामुळें त्यांना ग्रंथकार ही पदवीच योग्य नाहीं असें सिद्ध करण्याला

आम्ही प्रथम तयार झालो पाडूतात्याच्या डायरीला वाङ्मयात कोंबण्याचा अत्याचार करणारानीं सारस्वतसेवा अनन्यभावें करणाऱ्या सुधारकानाही सरस्वतीमदिरात शिरताना मज्जाव करावा हें वाचकाना कदाचित् चमत्कारिक वाटेल परंतु आमच्या त्या वेळच्या कोडमाऱ्याकडे लक्ष्य पुरविल्यास आमचें वर्तन अगदी स्वाभाविक होते हें त्याना कबूल करावें लागेल असो आमचा हा डाव साधण्याचा रंग दिसेना तेव्हां सुधारकाची परिषदेंतून हकालपट्टी करण्याकरिता आम्हीं खालील नियम केले :—

१ प्रत्येक ग्रथकारानें गाडींतून उतरल्याबरोबर स्वागतमंडळाला आपलें जानवें व शेंडी ही दाखविलीं पाहिजेत.

२ प्रत्येक ग्रथकाराने स्नान केल्यावर सोंवळें नेसून सध्या केली पाहिजे सध्येंतील टाळ्या व चुटक्या वाजविण्यात चूक झाल्यास ईश्वराचा तर क्षोभ होईलच पण स्वागतमंडळही गरम होईल

३ प्रत्येक ग्रथकारानें रामनवमी व एकादशी हे दोन्ही उपास कडक रीतीनें पाळिले पाहिजेत. अन्नाचा एक कण किंवा पाण्याचा एक थेंबही न घेतल्यास उत्तमच, पण तें शक्य नसल्यास नुस्त्या पाण्यावर, किंवा फार झाले तर पाणी मिसळलेल्या दुधावर गुजारा केला पाहिजे.

४ वरील नियम पाळावयाचे नसल्यास दोन दिवसाच्या खर्चाबद्दल दहा रुपये दिले पाहिजेत.

याप्रमाणें ग्रंथकाराच्या अन्नखर्चाचा आयताच बदोबस्त झाला. स्वागत-मडळाला पाहुणचाराची दगदग पडणार असल्यामुळे त्याच्याकरिता दोन्ही दिवस चमचमीत जेवणाची तयारी ठेवावी असा ठराव पांडूतात्यानीं पुढें आणिला व तो सर्वानुमतें पास झाला या जेवणाचा बहुतेक खर्च अर्थात्च सुधारक ग्रंथकाराकडून वसूल होणाऱ्या रकमेंतूनच करावयाचा होता स्वयपाकगृहाची व्यवस्था ठेवण्याचे बिकट काम अगावर घेण्याची आपणाला परवानगी मिळावी अशी नम्र विनति पाडूतात्यानीं केली होती. परतु त्यांज-कडून जेवणाराचा समाचार घेतला जाण्याऐवजी पक्वान्नाचा समाचार घेतला जाण्याचाच संभव विशेष दिसल्यामुळे ती विनंति आम्हीं मान्य केली नाहीं.

परिषदेंतील काहीं ठराव ग्रामस्थानीं पुढे आणावयाचे ठरलें होतें; त्यापैकीं काहीं खालीं देतों:—

**बंडूनानांचे ठराव —**

१ सामाजिक वर्णव्यवस्थेप्रमाणे लिपींतील वर्णव्यवस्था होण्याची आवश्यकता

[ या ठरावाचे पूर्ण समर्थन यापूर्वी दिलेच आहे. ]

२ ग्रंथप्रकाशनाला लागणाऱ्या खर्चाऱ्या निम्म्या खर्चातच प्रकाशकानी ग्रंथ छापून द्यावे.

३ ग्रंथकारांनी पुष्कळ प्रतींची एकच आवृत्ति काढण्यापेक्षा थोड्याथोड्या प्रतींच्या अनेक आवृत्ती एकाच खेपेला काढून घ्याव्यात. एक आवृत्ति निघाल्यावर त्याच खिळ्यावर पुढची आवृत्ति काढिताना तिचा क्रमाक बदलावा म्हणजे झाले. अशाने आवृत्तींचा खप सपाट्यानें झालेला दिसून ग्रंथकाराना उत्तेजन येईल

४ सरकारने चलनी नाण्याची सख्या एकदम दुप्पट करावी म्हणजे ग्रंथाच्या किंमती दुप्पट ठेविता येऊन ग्रंथकाराची प्राप्तिही दुणावेल

५ कादबऱ्याचा प्रसार समाजाला अनिष्ट असल्यामुळे त्याच्या किंमती प्रत्येक पृष्ठाला अर्धा आणा याप्रमाणे भारी ठेवण्यात याव्यात, व प्रती विकल्याबरोबर जाळण्यास सुलभ जावे म्हणून प्रत्येक प्रतीबरोबर एक एक आगपेटी फुकट देण्यात यावी

**पांडूतात्यांचे ठराव :—**

१ टिंबासबधाने व ऱ्हस्वदीर्घासबधाने जे कडक निर्बंध जारी आहेत त्याना फाटा देण्यात यावा.

२ शास्त्रीय विषयावरील ग्रंथातही तीनपेक्षा अधिक अक्षराचा शब्द व दोन ओळींऱ्यापेक्षा मोठे वाक्य येऊ नये असा कडक नियम करण्यात यावा

३ डायऱ्याची किंमत फार कमी असते, ती अधिक ठरविण्यात यावी.

४ इंग्रजी कादबऱ्याचे मराठींत भाषातर किंवा रूपातर करिताना चालीरीतीच्या भेदामुळे ग्रंथकाराना फार त्रास पडतो तो पडू नये म्हणून इग्लड देशातील विवाहपद्धति, कायदे, नृत्यादि मनोरजनाचे प्रकार वगैरे यच्चावत् गोष्टी आपल्या देशात सुरू करण्याबद्दल सामजिक परिषदेकडे शिफारस करण्यात यावी

**खुद माझे ठरावः—**

१ ऐतिहासिक ग्रंथांतून स्वदेशस्तुतिपर विधानेंच येत जावींत, निंदापर विधानें येऊ नयेत. सत्यकथन हा जरी इतिहासाचा उद्देश असला तरी मनाला प्रिय वाटणारी गोष्टच बहुधा सत्य भासत असल्यामुळें असे ग्रंथ असत्य गणिले जाण्याची भीति नको

२ रूढ चालीरीतींवर प्रतिकूलटीकात्मक स्वरूपाचीं जीं पुस्तकें असतील ती कोऱ्या पानाचीं समजून डायऱ्यादाखल विकण्यात यावींत.

याप्रमाणें ठरावाचें स्वरूप ठरविल्यावर निमत्रणपत्रिका पाठविण्याच्या कामाला सुरवात झाली. हस्तपत्रकांच्या खालीं जशा त्रिवर्गाच्या सह्या होत्या तशा निमत्रणपत्रिकाच्या खालींही देण्यात आल्या. या पत्रिकाचे मायने लिहिताना आम्ही अत्यत नम्रता धारण केली होती लक्ष्मीशी हाडवैर बाळगणाऱ्या सरस्वतीभक्ताना आम्हीं क्षणात श्रीमत बनविलें. आम्हाला ज्या ग्रथकारांचीं नावें माहीत नसून केवळ आडनावेंच माहीत होती त्याजवर तर आम्ही रावसाहेब व रावबहादूर या पदव्याचा वर्षाव केला. केवळ शब्दात उदारपणा दाखवावयाचा झाल्यास त्याला एका दिडकीचाही खर्च येत नाही, असें असता काही कंजूष लोक त्यातही काटकसर करू पहातात! अशा कवडीचुंबकापैकीं आम्ही नव्हतो हें वाचकाना निराळें सागावयास नकोच.

निमत्रणपत्रिकातील नावें लिहून तयार होताच त्या बहुनानांच्या स्वाधीन करण्यात आल्या. त्या लिफाफ्यात घालून रवाना करण्याची कामगिरी त्याजकडे होती

निमत्रणपत्रिका रवाना होऊन बरेच दिवस झाले, तरी एकाही पत्रिकेचें उत्तर येईना हे ग्रंथकार मोठे विक्षिप्त! याना सामान्य व्यवहारज्ञान देखील नसते. आम्ही एवढा स्वार्थत्याग करून परिषदेची तयारी केली व त्याना अत्यंत लीनतेनें विनंतिपत्रें पाठविलीं. पण तें याच्या गावीं तरी आहे का? सारा दिवस निःसत्त्व व बेचव लेख खरडण्यांत घालविल्यावर आम्हांला एक ओळ लिहिण्यासही यांना फावूं नये ना! पण कदाचित् आगाऊ सूचना न देता एकदम येऊन आम्हांला चकित करण्याचाही यांचा विचार असेल. या

ग्रंथकाराना अद्‌भुतरसाची मोठी गोडी ! साधी गोष्ट करावयाची झाली तरी हे ती काहीं तरी विलक्षण प्रकारानें करितील द्राविडी प्राणायामाची याना अतोनात हौस ! अतिशयोक्तीला इतर लोक फाजीलपणा म्हणतात, पण तिला यानीं अलकारात नेऊन बसविलें आहे ! परदेशीय ग्रथकारांचें अनुकरण करून यानीं बाष्कळपणाला व अचरटपणाला विनोद हें नाव दिले आहे ! कदाचित् पत्रानें उत्तर न देणें हेंही याच्या दृष्टीनें अलकारात किंवा विनोदात येत असल्यास न कळे !

आगगाडीचे स्टेशन आमच्या गांवापासून काहीं अतरावर होते. तेथें आम्हीं चैत्र शुद्ध अष्टमीच्या प्रातःकालपासून पाळीपाळीनें खेपा घालण्यास सुरवात केली उताराच्या व मालाच्या प्रत्येक गाडीचा एकूण एक डबा आम्हीं पालथा घातला. तरी एकही ग्रंथकार, प्रकाशक, मुद्रक, पुस्तकाची विक्री करणारा, खिळे जुळविणारा, बाधणी करणारा किंवा वाचक आढळण्यात आला नाहीं साऱ्या ग्रंथकारांनीं शेवटच्या गाडीने येऊन आम्हाला थक्क करण्याचा घाट घातला असावा असा तर्क करून आम्ही त्रिवर्गही रात्रीं चार वाजता गाडीच्या धक्क्यावर हजर झालों गाडी बरोबर वेळेवर येऊन दाखल झाली. गाडींतील प्रत्येक इसम ग्रंथकारच असला पाहिजे असा आमचा समज असल्यामुळें व आमचे डोळे प्रेमाश्रूंनीं भरलेले असल्यामुळें आमच्या हातून काहीं विलक्षण चुका झाल्या बंडूनानानीं प्रेमानें गार्डालाच गाढालिंगन दिलें, व पाडूतात्यानीं गाडीवरच्या कोळसेवाल्याशीच जोराने हस्तांदोलन केलें काहीं उतारूनीं आम्हास त्यांचें सामान उचलतांना पाहून 'चोर ! उचले !' म्हणून ओरड केली. काहीं खप्पी उतारूनी मात्र आम्हाला त्यांचें सामान स्टेशनाबाहेर मुकाट्यानें नेऊं दिलें व नंतर ते परत आपल्या ताब्यांत घेतलें, तेव्हां कोठें ते ग्रंथकार किंवा प्रकाशक नसून वाचकही नाहींत असा आमच्या डोक्यात प्रकाश पडला कित्येकांनीं आम्हाला हमाल समजून एक एक दिडकी दिली, ती आम्हीं रागानें दूर भिरकावून दिली !

या घोटाळ्यांचें मूळ काय असावें, यासंबंधानें आम्हाला फार वेळ संशयात रहावें लागलें नाहीं कारण आम्ही नवमीच्या पहाटेला गावात येऊन दाखल होतों, तोंच मुंबईच्या डेड लेटर ऑफिसमधून आलेला एक पाकिटांचा गठ्ठा आमच्या हातीं पडला. त्या पाकिटावर पत्ते लिहिलेले नसल्यामुळें तीं मालकांकडे परत पाठविण्यांत आलीं होतीं !

---

## मुष्टि २४ वी *

# चित्रकार

कवीप्रमाणें चित्रकारही जन्मावा लागतो, हें तत्त्व चित्रकलेच्या प्रत्येक मर्मज्ञाला मान्य करावे लागेल रसिकाचे चित्त हलवून सोडणाऱ्या मधुर गीताचें बीज ज्याप्रमाणें अर्भकाच्या कर्णकठोर किंचाळीत असतें, त्याप्रमाणें आश्चर्यानें स्तिमित करणाऱ्या चित्राचाही उगम त्याच्या वळलेल्या मुठींतच असतो. त्या कर्कश किचाळींतूनच ज्याप्रमाणें सव्वालाख किंमतीचा श्लोक उगम पावतो, त्याप्रमाणें त्या झाकलेल्या मुठींतूनच सव्वालाख किंमतीचें चित्र उत्पन्न होतें ती किंचाळी व ती मूठ इतराना जरी सामान्यच वाटली तरी तिजवर प्रतिभेचें शिक्कामोर्तब आधींच झालेलें असतें !

ह्या नियम आमच्या पाडूतात्याच्या सबधानें जसा प्रत्ययाला आला तसा तो कधीही आला नसेल सूक्ष्म अवलोकन करणाराला त्याच्या बाळपणींच्या लीलापासूनच पुढील भविष्य वर्तविता आलें असतें पाळण्यावर टागलेल्या खेळण्याकडे तात्या घटकाघटका टक लावून पहात असत असें सांगतात एखादें चित्र पाहिलें, कीं ते हस्तगत करून चघळीत चघळीत आपलेसें करण्याची त्याची जन्मतःच प्रवृत्ति असे त्याच्या वडिलानीं एकदा एक उदरावर बसलेला व हातीं मोदक घेतलेला मातीचा गणपति आणिला होता. तो तात्यानी त्याची नजर चुकवून मोदकासुद्धा व उदरासकट गट्ट करून टाकिला ! लहानपणी जेवताना तात्या अगावर उष्टें खरकटें अन्न उडवून तें चित्रित करून सोडीत असत. कोळशाने पाटी घासताना ते तो सर्वांगाला ज्या शिताफीने फांशीत व आपल्या सवगड्याच्या अगांस ओचकारे घेताना ते जें नखकौशल्य दाखवीत, त्यावरून कोळशानें व नखानें चित्रें काढण्याची विद्या त्याजमध्यें बीजरूपानें आहे असें कबूल करणें भाग पडे. खेळगड्याच्या गालांवर ते आपलीं बोटें इतक्या सफाईने उठवीत, कीं रंगकर्मांतही त्याचा हात धरणारा कोणीही समवयस्क सापडला नसता ! त्याना जेव्हा काजळ लावून व कुंची घालून गौरीपुढें 'बाळ' म्हणून बसवीत तेव्हा जवळच्या फराळाच्या ताटांतील लाडूकरंज्या लाबवून पोटात रिचविण्याची हातचलाखी

---

* मनोरंजन, पुस्तक २०, अंक ४, वसंत अंक [एप्रिल सन १९१५]

वर्ज्य केल्यास ते अगदी चित्रासारखे बसत असत ! अशा प्रसगीं मातीच्या चित्रांबद्दल तात्याना इतकी सहानुभूति वाटत असे, कीं ते त्याच्या मुळीच वाटेला जात नसत, व त्याना लागूनच साखरेची चित्रें असल्यास ते त्याना स्पर्शही करीत नसत. तात्याची भाबडी आई पक्वान्नाचें व साखरेच्या चित्राचे भक्ताचा डोळा चुकवून गौरीनेंच नैवद्य म्हणून ग्रहण केले असे समजत असे ! त्यात सत्याचा भाग मुळीच नसे असें मात्र नाहीं. कारण तात्या ते पदार्थ आईचा डोळा चुकवून पसार करीत असत. याप्रमाणें आईच्या श्रद्धाळूपणाचें अर्धें श्रेय तात्याच्या खादाडपणालाच असे

परंतु चित्रकलेचे महत्त्व तात्याच्या मनावर विशेष रीतीनें ठसण्याला तशीच काहीं कारणें झालीं एकदा त्याच्या पहाण्यात एक सचित्र पुस्तक आलें. त्याच्या मलपृष्ठावरील गणपतीचे चित्र सोडिल्यास त्यात एकही चित्र नव्हते, परतु सचित्र पुस्तक या मोहक नावावरच त्याला त्याच्या योग्यतेच्या चौपट किंमत येत असे केवळ चित्रकलेची जोड असल्यामुळेच वाङ्मयाला आलेलें महत्त्व पाहून साहजिकच त्या कलेविषयी तात्याच्या मनात आदर उत्पन्न झाला त्याच सुमाराला आमच्या गावीं एक गावठी नाटक मडळी निघाली होती तिचे पडदेही एका गावठी चित्रकारानेच तयार केले होते पण त्यावरील चित्रें आम्हाला इतकी हुबेहुब वाटत असत, कीं उन्हाळ्यात शाकुतलातील उपवनाचे पडदे दोन बाजूना सोडून त्यामध्यें बसल्यास आम्हाला उन्हाची मुळीच बाधा होत नसे, व हिवाळ्यात हरिश्चद्र नाटकातील वणव्याच्या पडद्यासमोर आम्ही प्रहरानुप्रहर हात शेकीत बसत होतो कधी-कधी तर बागेच्या पडद्याजवळ बराच वेळ बसल्यामुळे आम्हाला सर्दी होत असे, पण वणव्याचा पडदा सोडल्याबरोबर ती नाहीशी होऊन अगातून घामाच्या धारा चालत महालाच्या पडद्याकडे पाहून आम्हाला आमच्या चद्रमौळी घराचें काहीं वाटेनासे झाले. तुरुगाच्या पडद्याकडे दृष्टि जाताच आमची सदसद्विवेकबुद्धि खाडकन् जागी होत असे नदीचा पडदा पाहूनच आमची तहान निवत असे, व एकदा तर मीं शिवरात्रीचा कडकडीत उपास पडद्यावरील झाडाच्या फळावरच उरकला ! ससारातील गरजा भागविण्याच्या कामींही चित्राचा असा विलक्षण प्रभाव प्रत्ययाला आल्यापासून चित्रकला साध्य करण्याकडे तात्यांचे विशेष लक्ष्य वेधलें

चित्रकलेंत काही कठिण आहे असेंही तात्याना वाटण्याचें कारण नव्हतें. आमच्या लहानपणी जीं चित्रें सामान्यतः आमच्या पहाण्यांत येत, तितपत चित्रे काढण्याला विशेष ज्ञान सपादन करण्याची जरूरी भासत नसे. इतकेंच नाही, तर आम्हाला होतें तें ज्ञानही प्रसगीं विसरावें लागत असे. चित्रातील सर्व तोंडें एका घाटाचीं व बाजूला फिरलेली असत पहाणाराच्या डोळ्याशीं डोळा भिडविण्याचे धाडस एकाही चित्रगत व्यक्तीला होत नसे. प्रत्येक व्यक्तीच्या हाती, मग ती कोणत्याही पेशाची असो, एक फूल असे, व तिच्या तोंडावर कोणताही विकार दिसत नसे अर्थातूच चित्र पाहून प्रेक्षकाच्या मनातही कोणताच भाव उत्पन्न होत नसे, याप्रमाणें त्या काळातील चित्रकला इतर गोष्टीप्रमाणेंच अगदीं साधी, सरळ व सोपी असे

तात्यानीं चित्राना सुरुवात केली, ती यापेक्षाही साध्या प्रमाणावर केली. चेहऱ्याबद्दल एक गरगरीत वर्तुळ, जेवणीबद्दल एक लहान लंबवर्तुळ, डोळ्या-बद्दल दोन लहान वर्तुळें, नाक, हात, पाय व धड याबद्दल लहानमोठ्या सरळ रेघा, एवढ्या साहित्यावर ते वाटेल त्या माणसाची आकृति काढीत असत भीमाला एक आकृति व सुदामदेवाला दुसरीच, हा पक्षपात त्याजपाशीं नसे उत्पादनाच्या कामीं ते ईश्वरापेक्षाही निःपक्षपाती असत. जग व्यक्त होण्यापूर्वी तें जसे अव्यक्त स्वरूपात असतें त्याप्रमाणें तात्याची चित्रकला आरभीं अव्यक्तावस्थेंत होती पहिल्यापहिल्यानें तर महानुभावपंथातील स्त्रीपुरुषाप्रमाणे त्याचें स्त्रीपुरुष एकमेकांपासून ओळखूं येत नसत. पण लवकरच त्यानी पुरुषाना शेंडीची व बायकाना वेणीची तैनात करून दिली प्रथम त्यानी स्त्रीपुरुषाना ख्रिस्ती धर्मशास्त्रातील आद्य स्त्रीपुरुषाप्रमाणें फारच कमी वस्त्रप्रावरणांवर ठेविलें होतें; परतु कांहीं काळाने त्याची त्यानाच लाज वाटून त्यानीं उभयताना कपड्याचे मुबलक अहेर केले. कृष्णानें वस्त्रें पुरविल्यामुळें द्रौपदीला जो आनद झाला होता तोच चित्रगत स्त्रियांनाही त्या प्रसगीं झाला असेल ! हळूहळू तात्यानीं स्त्रियाच्या गळ्यांत मगळसूत्रें बाधून व हातांत बागड्या भरून त्याना सौभाग्यदान व चुडेदान दिले आणि पुरुषाच्या डोक्यावरही पागोटीं ठेवून दिलीं व त्यांना टोप्या घातल्या. त्याच्या सृष्टींतील माणसाच्या अगावर हळूहळू मास येऊं लागलें. पण त्याच्या शरीरात किंवा चेहऱ्यात विशिष्टत्व येण्याचें चिन्ह दिसेना. त्यांची

सर्वे अपत्यें जुळी भावडे दिसत, व सर्वांची तोंडे एकसारखी असत. एकदा यांनीं अशोकवनातील सीतेचें व त्रिजटेचे चित्र काढलें होतें, पण त्यातील सीता कोणती व त्रिजटा कोणती हे ओळखण्याला फार प्रयास पडत. दुसऱ्या एका वेळी त्यानी अर्जुनाच्या रथाचे चित्र काढिले, पण ध्वजावरील मारुतीपेक्षा सारथ्य करणारा कृष्ण अधिक कुरूप निघाल्यामुळे उभयतानीं आपापल्या स्थानाची अदलाबदल केल्याचा भास उत्पन्न होऊं लागला. त्याच्या चित्रातील रावण तोंडाच्या सख्येवरून तेव्हाच उमगत असे. एकदा मात्र कागदाची रुंदी दहा तोंडाना पुरण्यासारखी नसल्यामुळें तात्याना सहा तोंडावरच काम भागवावे लागले, व त्यामुळे सीतेला खांद्यावर घेऊन पळून जाण्याचा आरोप ब्रह्मद्वेष्ट्या कार्तिकस्वामीनाच सहन करावा लागला ! एकदा तात्यानी अत्यंत मेहनत घेऊन रतीचे चित्र तयार केले, पण त्याच्या कुटुंबियाच्या अगी तितकी मार्मिकता नसल्यामुळे त्यानी तें शूर्पणखेचेच समजून शौचकूपाच्या बाहेर टागून दिलें. तेव्हापासून त्याच्या आप्ताची प्रकृति साफ राहू लागली. त्याच्या रतीला मिळालेला मान पहिल्या बाजीरावसाहेबाना निजामाकडून मिळाला होता हे इतिहासज्ञाना अवगत आहेच

चित्रातील चेहऱ्यासंबधानें हा जो प्रेक्षकाचा गैरसमज होत असे, तो टाळण्याकरिताच की काय, तात्या बहुधा अशाच व्यक्तीची चित्रे काढीत, की त्यासबधानें गैरसमजाला फारशी जागाच राहूं नये ते रामदासस्वामींचें चित्र वारंवार काढीत, व त्याच्या कपाळावरचें टेंगूळ 'नाकापेक्षा मोती जड' या न्यायाने तोंडापेक्षाही मोठे ठेवीत हेतु हा, कीं तें तावडतोब दिसून सादृश्य ध्यानात यावें बरे, टेंगूळ द्रोणागिरीपर्वत वाटून मारुतीचा भास झाला तरी रामदासस्वामी मारुतीचेच अवतार असल्यामुळें त्यात फारसी चूक झाली असें म्हणावयाला जागा नसे. गणपतीला सोंड असल्यामुळें त्याचे चित्रही तात्यांचें आवडतें असे गणपतीचे चित्र काढता काढता मारुतीचे जरी निघाले, तरी तोही देवच असल्यामुळे त्याचे श्रम अगदींच फुकट जात नसत.

तात्याना आपल्या चित्राच्या द्वारें हास्य, शोक व भीति हे भाव फारच चागल्या प्रकारें वठविता येत असत त्याचीं काहीं चित्रें पाहून प्रेक्षकाची हंसून मुरकुंडी वळे, तर काहीं चित्रें पाहून त्याच्या तोंडचें पाणी पळून चेहर

रडवा होई पण तात्याची विशेष खुबी अशी होती, की हे भाव विरुद्धभाव-दर्शक चित्रापासून उत्पन्न होत ! चित्रातील प्रकार आनंददायी असले म्हणजे प्रेक्षक रणकुंडीला येत, व ते प्रकार दुखदायी असले, की प्रेक्षकाना हंसण्याची लहर येई त्याच्या चित्रामुळें आशावाद्याचे निराशावादी व निराशावाद्यांचे आशावादी झाल्याचे दाखले आहेत

चित्राचा एवढा परिणाम होतो हे कळल्यापासून तात्यानीं चित्राची टाकसाळ इतक्या त्वरेने चालविली, कीं ‘ न भूतो न भविष्यति ’ ! त्याचीं चित्रे पैसे देऊन घेणारे गिऱ्हाईक मिळविण्याचा सभव नसल्यामुळें त्यानी त्याची मुलामध्यें फुकट खैरात चालविली गावातील प्रत्येक घरात तात्याचीं चित्रें दिसावयाला लागून रहिवाश्याचे हाल होऊ लागले. त्याचीं देवादिकाची चित्रे पाहून लोक नास्तिक होण्याच्या बेताला आले त्याची सुदर स्त्रियाची चित्रें पाहून भावी कवीच्या प्रतिभा बाल्यावस्थेंतच करपून खाक होऊ लागल्या ! त्याचें रतीचें चित्र पाहताच प्रेक्षकाची बोबडी वळून ‘ रति ’ ऐवजीं ‘ हेडबा ’ हा शब्द त्याच्या तोंडातून चुकीने निघूं लागला, व तें चित्र सुलभप्रसूतीवर रामबाण औषध म्हणून फुकट वाटण्यात येऊ लागलें त्याच्या चित्राची साथ चुक-विण्याकरिता लोक स्थलातर करण्याचा विचार करू लागले काहींकाची मजल तर चित्रें काढणें हा खुनाच्या तोडीचा गुन्हा आहे अशी कायद्यात सुधारणा करण्याबद्दल अर्ज करण्यापर्यंत गेली. त्याचीं चित्रें सकाळीं दृष्टीला पडल्यास दुकानदाराचा माल खपेनासा झाला तीं दिसताच प्रेमळ पतिपत्नीमध्यें, भावाभावामध्यें कलह होऊ लागले. नाहीं म्हणावयाला होतकरू चित्रकाराना मात्र त्याच्या चित्रापासून विलक्षण उमेद वाटावयाला लागली. आपण डोळे मिटून कुचल्याऐवजी केरसुणीने जरी चित्रें काढिली तरी ती इतःपर कोणाला टाकाऊ वाटण्याचा संभव नाहीं, या विचारानें त्याच्या चित्तवृत्ति प्रफुल्लित झाल्या !

आपल्या चित्राचा आपल्या अदाजाच्या उलट परिणाम होतो असें कळल्यापासून पाडूतात्या प्रेक्षकावर जो परिणाम करावयाचा त्याच्या उलट परिणाम होईल अशींच चित्रें बुद्धिपुरस्सर काढूं लागले. वरातीचे चित्र काढावयाचे असल्यास ते स्मशानयात्रेचें काढण्याचा प्रयत्न करूं लागले, बागेचें

काढावयाचें झाल्यास सहारा वाळवटाचें वठविण्या[illegible] ञा लागू लागले समुद्र इष्ट असल्यास डोंगर, आणि डोंगर इष्ट असल्यास समुद्र रेखा लागले. फोटो काढिताना ज्याप्रमाणें प्रथम उलट व नतर सुलट काच तया करावी लागते तसा प्रकार तात्याच्या चित्रासंबधानें सुद्धा होऊ लागला !

पुढें पुढें तात्याना ऐतिहासिक प्रसगांची चित्रे काढण्याचा नाद लागला. तीं काढिताना वरील उलट प्रयोग त्यांच्या उपयोगी पडेनासा झाला. मनात औरंगजेब कल्पून शिवाजीचें चित्र निघणें शक्य नव्हतें, व सवाईमाधवरावांच्या वेळचा रगपचमीचा उत्सव चिंतून पानिपतची लढाई चितारण्याचे श्रेय मिळण्यासारखे नव्हतें. म्हणून तात्या हुबेहुब चेहेरे काढण्याची कला हस्तगत करण्याच्या मार्गाला लागले. त्याकरिता त्यानीं प्रथम आपलेच तोड आरश्यात बघून काढण्याचा सकल्प केला पण हा संकल्प जितका सोपा, तितकी त्याची अंमलबजावणी सोपी नाही असें लवकरच त्याच्या अनुभवाला आलें. आरसा समोर धरिल्याबरोबर त्याना स्वत ला वाकोल्या दाखविण्याची बुद्धि अनावर झाली. आपल्या लीला बघण्यास आपणाशिवाय दुसरा कोणीच प्रेक्षक नाहीं ही जाणीव असल्यावर मनुष्य कोणकोणत्या माकडचेष्टा करील याचा नेम नाहीं. तात्या कधीच सुरेखात मोडण्यासारखे नव्हते, आणि तशात त्याना एकान्त मिळून वाकोल्याची तलफ आलेली ! मग काय विचारिता ! '**आधींच मर्कट तशांतहि मद्य प्याला**' या श्लोकात वर्णिल्याप्रमाणें त्याच्या अगाध चेष्टा सुरू झाल्या त्यानी दात विचकले, जीभ बाहेर काढली, नाक मुरडलें, मान जोराजोरानें हालविली भिवयाचें थैमान सुरू केलें, मुठी वळून आपल्या प्रतिबिंबावर उगारल्या, व त्याजकडे पाहून ते खदखदा हसले ! परंतु चेष्टानाही अत हा असतोच काहीं वेळानें स्वतःची कुचेष्टा करून दमल्यानतर त्याना आपल्या संकल्पाची आठवण झाली, आणि ते हातांत कागद व कलम घेऊन व चेहरा गभीर करून त्याचें निरीक्षण करूं लागले. इतक्यांत त्याना एक भली मोठी शिंक आली. त्यामागोमाग लागलीच दुसरी, तिसरी, याप्रमाणें पांचसात शिंका आल्या. करुणरसपर्यवसायी नाटकात नायक तऱ्हेतऱ्हेचे आलाप घेऊन शोकरसाचें पद आळवीत असतां त्याला शिंक आली तर त्याचा जसा विरस होतो, तसा तात्यांचाही

हा ' प्रथमग्रासे मक्षिकापात ' पाहून हिरमोड झाला पुनः ते आपला चेहरा साफसूफ करून त्याकडे टक लावून पाहू लागले, तों एक गाधीलमाशी त्याच्या प्रतिबिंबाच्या गालावर बसण्याच्या बेतात आहे असें त्याच्या नजरेला पडले. त्यासरशीं त्यानीं एक चापट जोरानें त्या आरश्यावर मारिली. त्यामुळें त्याचा हात तर चागला झणझणलाच, पण त्याच्या गालालाही गाधील-माशीने सपाटून दश केला. तथापि ह्या आगंतुक विघ्नाला भीक न घालण्याचा तात्यानी पुरा निश्चय केला होता. म्हणून पुन स्थिरस्थावर झाल्यावर आपण कलमाने चित्र काढिताना जसे दिसू तशा थाटात स्वतःचें चित्र काढावयाचें अशा निग्रहाने ते बसले. लवकरच स्वत ची बैठक, कागदावरील चित्र, हातातलें कलम व चेहऱ्याशिवाय बाकीचे सर्व अवयव रेखाटण्यात आले.

तात्याचा चेहरा काढावयाला फारसा कठिण नव्हताच कारण त्यावर मिशाचें एवढे मोठें जाळे पसरलेलें होतें, कीं त्यामधून गाल, ओंठ, हनुवटी इत्यादि किरकोळ अवयवाना दिसून पडण्याला फारसा अवकाशच नव्हता. त्याच्या मिशाची वाढ इतक्या सपाट्यानें होत असे, कीं त्याचा क्षौर करून त्याना शाकुतल नाटकाच्या पहिल्या अकात नटीचें काम दिलें असतें, तर दाढीमिशा लावण्याची यातायात न करिता त्याजकडून दुसऱ्या अंकात दुष्यताचें, चौथ्या अकात कण्वाचें आणि सातव्या अंकात सिंहाचें व मारीचाचे काम खुशाल करवून घेता आलें असतें ! त्याचें मिशाचें जंगल इतकें अवाढव्य असे, कीं आम्ही त्यांना नेहमी थट्टेनें म्हणावे, ' तात्या, तुम्ही कोठेही गेलात तरी तुमच्या कपाळची जगलची वस्ती कधीं चुकावयाची नाहीं, व तुमचा जगली स्वभावही सुधारावयाचा नाहीं !' त्याच्या तोडावरील मिशाचा झुबका दाखविण्यासाठीं त्यावर नुसता कुंचला फिरवून नंतर सवड असल्यास त्यावरील अवयव दाखविले असते तरी चालण्यासारखें होतें. अर्थातच तात्यानी स्वतःची मुखश्री लवकरच चागली रंगविली मात्र त्याना स्वतःचे डोळे काहीं केल्या साधेनात ! ते चित्राकडे लागलेल्या स्थितींत दाखविणें भाग असल्यामुळें त्याची नजर खालीं चित्रावर खिळविणें जरूर होतें, पण त्याकारिता तात्यांनीं स्वत.ची नजर खालीं केली, कीं त्याना आरश्या-तील प्रतिबिंबच दिसेनासें होई. बरें आरश्यातील चित्रार्पित दृष्टि चांगली

दिसण्याकरिता त्यानीं वर त्याकडे पाहिलें, की प्रतिबिंबातील नजरही बेटी वरच येई! तात्यानीं तास दोन तास जगजग पछाडले, पण प्रतिबिंबातील नजर खाली व तात्याची नजर वर एकदम असण्याचा योग एकदाही आला नाहीं! शेवटीं त्रासून त्यानी कल्पनेनेंच कसेबसे डोळे सपविले, व नतर आपल्या चित्राकडे अभिमानपूर्वक दृष्टि फिरविली, तों ज्या कर्माला ते भीत होते, तेच दत्त म्हणून पुढे उभे राहिलेले त्याना दिसलें! इष्ट प्रकाराच्या उलट प्रकार घडून येऊं नये म्हणून त्यानी हा सारा खटाटोप केला होता, पण चित्रात तर उजव्या हातातील अगठी डाव्या हातात, उजव्या कानातील भिकबाळी डाव्या कानात, पागोट्याच्या उजव्या बाजूकडील झिरमिळ्या डाव्या बाजूला, फार काय, पण कलमही डाव्याच हातात! तात्यानी कपाळावर हात मारून घेतला! त्याबरोबर तिकडे प्रतिबिंबानेही, त्याची थट्टा करण्याकरिताच कीं काय आपला डावा हात कपाळावर जोरानें आपटला!

कुशल चित्रकार दहापाच फरकाट्यातच माणसाचा तोंडवळा हुबेहुब बठवितात असे तात्यानी ऐकिलें होते, पण त्याचा त्याना नीट उमज पडलेला नव्हता. काहीं महिने प्रसिद्ध चित्रकाराच्या चित्राचा शातपणे विचार केल्यावर त्यानी त्यातील मर्म हुडकून काढिलें. वसंतसेना, उर्वशी, तिलोत्तमा, मेनका इत्यादि प्रसिद्ध चित्रापैकी प्रत्येकात असा जो विशिष्ट भाग होता, कीं त्याच्या योगानें ते इतर चित्रापासून निराळें निवडून काढिता यावे, तो त्यानी आपल्या चित्रातही आणावयाचा प्रघात सुरू ठेविला तेव्हापासून त्याची चित्रें पाहिल्याबरोबर ओळखता येऊ लागली. एखाद्याला त्याचें चित्र ओळखण्याला जरा उशीर लागला कीं त्यानीं ताबडतोब त्याला अधळा किंवा निरक्षर म्हणून ठरवून टाकावें! व खरोखर निरक्षराना त्याचीं चित्रें पूर्वीप्रमाणेंच अजूनही सारखीसारखीं वाटत! मोजक्या रेघोट्यात पूर्ण सादृश्य उतरविण्याचें कसब आहे तरी काय असें वाचकास कोडें पडलें असेल त्याच्या संतोषाखातर मी तात्याच्या एका चित्रातील फरकाटे देतों, म्हणजे त्यांची आपोआप समजूत पडेल रतीच्या चित्राखाली असलेले फरकाटे याप्रमाणें होतेः— रति या दहा फरकाट्यातच तात्याच्या हातची शूर्पणखा मूर्तिमत रति भासत असे काय कौशल्य!

सादृश्य वठविण्याची विद्या साध्य झाल्यावर तात्यानीं ऐतिहासिक चित्राकडे आपली मोहीम वळविली. परतु अनेक कारणामुळें तात्यानीं चितारलेले ऐतिहासिक प्रसग हुबेहुब वठत नसत. एक तर तात्याची स्मृति काहींशी शातताप्रिय असे. तिच्यात अनेक जिनसानीं गोंधळ उडवून दिलेला तिला मुळीच खपत नसे. यामुळे तिच्यातील रहिवाश्याची सख्या ठरीव मर्यादेपलीकडे गेली, की त्यातील काहीकाना अर्धचद्र मिळत असे. शिवाय तिचा स्वभाव खुनशी नसल्यामुळे तिची पकड जरा सैल असे. तिच्या स्वाधीन आज एखादी जिन्नस केली तर ती उद्या तिच्याजवळ सापडेलच असा नेम नसे. त्याच्या स्मृतीचा तिसरा गुण म्हटला म्हणजे समदृष्टि हा होय. आपल्या ताब्यात असलेल्या जिनसामध्यें पक्तिप्रपच करून, काही एका खोलींत, तर काहीं दुसरींत ठेवणे तिला मुळींच प्रशस्त वाटत नसे. यामुळें तात्याच्या स्मृतींत साठलेल्या जिनसाची पुष्कळ वेळा गल्लत होत असे, व एका शतकातील व्यक्तींचा दुसऱ्या शतकातील व्यक्तीशी प्रसग पडून तिसऱ्याच शतकातील घडामोडी घडून येत. पहिल्या बाजीरावाला पळपुटेपणा कशाशीं खातात हें स्वप्नातही माहीत नव्हते, पण दुसऱ्या बाजीरावाशीं नामसादृश्याचा योग घडून आल्यामुळें त्याला तात्याच्या रगपटावर पळता भुई थोडी झाली! ब्राह्मणी राज्याचा सबंध पेशव्याशींच असला पाहिजे अशी तात्याच्या स्मृतीची लहर लागल्यामुळें पेशव्याच्या घराण्याला अठराव्या शतकापासून एकदम सोळाव्या शतकापर्यंत माघार घ्यावी लागून ब्राह्मणी राज्याबरोबरच पंचत्वाला पावावें लागले! तशाच कारणामुळे बाबराला आफ्रिकेंतील बर्बर देशात जन्मावे लागून जजिऱ्याच्या शिद्द्याशीं सोयरीक करून घ्यावी लागली!

कधीकधीं तात्याच्या कनवाळूपणामुळें किंवा स्वदेशभक्तीमुळे त्याच्या ऐतिहासिक चित्रात विसगतपणा उत्पन्न होत असे. ते पानिपतच्या लढाईचें चित्र काढावयाला बसले, तेव्हा वस्तुस्थिति दर्शविण्याचाच त्याचा इरादा होता, पण जेव्हा का विश्वासरावाना गोळी लागून ते गतप्राण झाले व भाऊसाहेब घोड्यावर स्वार होऊन गर्दीत शिरले, तेव्हा तात्याच्या मनानें एकदम उलट खाल्ली आणि त्यानीं कल्पनावारूवर स्वार होऊन अखेर सत्पक्षाचा जय व मराठ्याकडून अफगाणाचा पाठलाग करविला!

तात्या ज्या एकाग्रतेनें चित्रलेखनात मग्न होत असत, तिजमुळेंही कधींकधी ऐतिहासिक सत्याचा अपलाप होत असे आनदीबाई राघोबा-दादाच्या हुकुमात ‘ध’ चा ‘मा’ करून तो हुकूम सुमेरसिंगाला दाखविते, तो चटकदार प्रसंग तात्यानीं एकदा चित्ररूपानें दर्शविला ‘ध’ चें ‘मा’-मध्यें झालेलें परिवर्तन अधळ्यालाही दिसण्यासारखे होतें पण या जगात न्यून नसलेली एकही वस्तु नसावयाची या नियमाला बिचाऱ्या तात्याचें चित्र तरी कसें अपवाद असणार ? तात्या चित्र काढताना त्याच्याशीं इतके तन्मय झाले, की त्या तन्मयतेच्या भरात त्यानी सुमेरसिंगाची दाढी आनदीबाईच्याच हनुवटीला लटकावून दिली ! हा क्षुल्लक दोष जर घडला नसता, तर त्या चित्रांत खोड काढण्याला एकही जागा नव्हती.

चित्रात प्रकाश आणि छाया हीं कोठें व कशी दाखवावयाचीं व रग कोणत्या प्रमाणात मिसळून कसे द्यावयाचे, याचेही अध्ययन तात्याकडून चालू होते. पण प्रत्येक गोष्टीत त्याची कल्पकता दिसल्यावाचून रहात नसे. एकदा त्यानीं सूर्याच्या सातही किरणाचे रग एकत्र करून एक मिश्र रग तयार केला व तो सूर्याला फासून दिला. त्यानीं छायेपासून सूर्यालाही मोकळे सोडलें नव्हते ते सूर्याच्या सबध अर्ध्या भागावर छाया दाखवीत असत. पात्राचे स्वभाव नावानीं दर्शविण्याचा जो काहीं ग्रथकर्त्याचा प्रघात असतो, त्याचें अनुकरण करून तात्या मनुष्याचे स्वभाव त्याच्या चित्रातलि रंगावरून दिसून यावेत अशी कधींकधीं योजना करीत. उदाहरणार्थ, नेहमीं कृष्ण-कृत्यांत निमग्न असलेल्या इसमाच्या चेहऱ्याला ते काजळ फासावयाला मागेंपुढें पहात नसत, हिरवट माणसाच्या तोंडाला ते हिरवा रग देत व रागीट माणसाचा चेहरा तांबडालाल करून सोडीत [ अशा रागीट माणसाच्या नजरेला त्याचें चित्र पडण्याचा योग कधीं आला नाही म्हणून बरें, नाहीं तर त्यानें हें उपकाराचें ओझें न ठेविता तात्याचें मुस्कट ताबडतोब रागीट माणसाजोगें करून सोडिलें असतें ! ] ज्या माणसाचें चित्त पाण्याप्रमाणें निर्मळ, त्याच्या चित्राला तात्या पाण्याचीं इतकीं पुटें देत, की तो माणूस त्या चित्रात होता कीं नव्हता असा ते करून टाकीत ! हें सरळ स्वभावाच्या माणसाबद्दल झालें. मनात एक व बाहेर एक अशा दुटप्पी वर्तनाच्या

माणसाशीं तात्या चित्रलेखनात जशास तसें या न्यायानेंच वागत असत; म्हणजे प्रथम त्याला त्याच्या अंतरगाप्रमाणे रगवून नंतर ते त्यावर त्याच्या बाह्य कृत्याला साजेसा रग फाशीत. उद्देश इतकाच, कीं थोडेसें खरवडल्या-बरोबर त्याचें अतरग उघडे पडावें चित्तात एक, वाचेंत दुसरें व कृतींत पुनः निराळेंच, असे त्रिविध माणूस रगवावयाचें असल्यास पेपरमिटाच्या रंग बदलणाऱ्या गोळ्याच्याप्रमाणें तात्याना त्यावर निरनिराळ्या रगाची तीन पुटें चढवावीं लागत, व त्या माणसाचें अंतरंग फारच खोल असलें म्हणजे चित्राची मागची बाजूही रगवावी लागे ! पण त्यानी या कामीं कधींही आळस केला नाही ! कोणतीही कला उद्योगाशिवाय साध्य होत नाहीं हें खरें आहे.

अखेरीला तात्याना चित्रकलेचा इतका नाद लागला, कीं त्याना तिजवाचून दुसरे काही सुचेनासें झालें ते रोजच्या जेवणाला रागोळ्या काढू लागले व जेवताना पानावर बोटानें चित्रें काढू लागले. त्यानी आपल्या घराच्या भिंतींवर पौराणिक व ऐतिहासिक प्रसंगाच्या चित्राची गर्दी उसळून दिली आपल्या जमाखर्चाच्या वह्यात जागा सांपडली, कीं ती ते चित्रानीं भरून काढू लागले विशेषत सावकाराच्या खात्यातील जमेकडील बाजू ते इतकी चितारून सोडीत, कीं तिकडील रकमा वाचणें अशक्य होऊन बसे ! त्याच्या घरी बिनचित्राचा असा पत्र लिहिण्याचा कागद मिळेनासा झाला आपल्या अर्धांगीच्या अंगावर पत्रवल्लि काढण्याचा जुना प्रघात त्यानी सुरू केला, व त्यानी स्वतःचेही बहुतेक अंग चित्रानीं गोंदून टाकिले. मिसर, चीन या देशातल्याप्रमाणें चित्ररूप वर्णमाला काढण्याचें त्याच्या मनात घोळूं लागले. कापड, छत्र्या वगैरे माल खरेदी करणें झाल्यास ते त्याजवरील चित्रें पाहून तो पसत करूं लागले. ते साऱ्या सचित्र वर्तमान पत्रांचे व मासिकाचे वर्गणीदार झाले. त्यानीं सचित्र नाटके व कादबऱ्या खरेदी करण्याचा धडाका लाविला, व चित्रानीं पूर्ण अशीं जाहिरातींचीं चोपडींही ते जवळ बाळगूं लागले. विलायती विड्याच्या कागदीं पेट्याबरोबर चित्रें मिळतात, म्हणून त्यानीं विड्याचें व्यसनही जडवून घेतले !

हा छंद सुटण्याला एक क्षुल्लक कारण झाले. तात्यांनीं यथारूपदर्शन [ Perspective ] चित्रकलेच्या नियमाना अनुसरून व विविध रंगानीं युक्त

असें एक ' चातुवर्ण्या 'चें चित्र काढावयाला हाती घेतलें. त्यात ब्राह्मणाला अगदीं समोरचें व मध्यवर्ति पद मिळावयाचें असून त्याच्या उजव्या व डाव्या बाजूना व काहींशा मागें क्षत्रिय आणि वैश्य याना जागा देण्यांत यावयाच्या होत्या. शूद्राकरिता ब्राह्मणाच्या अगदीं मागें व फार दूरचे स्थान राखून ठेवण्यात येणार होतें. चित्र तयार होण्याला बरेच दिवस लागले, पण अखेरीला तें त्याच्या मनाजोगें तयार झालें त्यावर तात्यानी आपलें कौशल्यसर्वस्व खर्च केलें होते. ब्राह्मण सत्त्वगुणविशिष्ट, म्हणून त्याच्या तोंडाला सफेती दिली होती, क्षत्रिय व वैश्य रजोगुणपूर्ण, म्हणून त्याची तोंडें लाल दर्शविलीं होतीं, व तमोगुणमय शूद्राचे तोंड काळेकुट्ट दाखविलें होतें. ब्राह्मण आसनमाडी घालून बसलेला, क्षत्रिय व वैश्य हात जोडून उभे असलेले आणि शूद्र हातांची अजलि करून गुडघे टेकलेला, असा काढलेला होता. ब्राह्मणाच्या बेढब व मिशाळ तोंडावरून तो तात्यानीं स्वत.च्याच रूपावरून उतरला असावा हें उघड दिसत होतें. ही सारी योजना ठीक होती. पण बेट्या यथारूपदर्शन चित्रकलेने सारी घाण केली ! शूद्र जरी ब्राह्मणाच्याच पातळींत बसविलेला होता, तरी तो त्याच्यापासून फार अंतरावर मागें असल्यामुळें त्या कलेंतील नियमाप्रमाणें त्याची बैठक ब्राह्मणाच्याहून फार उंच दिसू लागली. ती इतकी, कीं त्याने ब्राह्मणाच्या मानगुटीला बसून आपले दोन्ही हात एकत्र करून ब्राह्मणाला मारावयाला उगारले आहेत की काय, असा भास होऊं लागला ! तात्या चित्रलेखनात गर्क असल्यामुळें ही गोष्ट चित्र संपेपर्यंत त्याच्या ध्यानात आली नाही ज्या चित्रावर त्याच्या उच्च आकांक्षेची सारी मदार, त्याची ही स्थिति ! तेव्हापासून तात्यानी कलमाला किंवा रगाला बोट लाविलें नाही. कोणी त्याच्यासमोर चित्र आणिलेंच, तर त्याचे हात कमल करण्याची किंवा थोबाड रंगविण्याची ते त्यास धमकी देत असतात !

---

मुष्टि २५ वी *

# छायाचित्रें उर्फ फोटो

ललित कलाच्या प्रातान वास्तविक व काल्पनिक यामधील झगडा फार पुरातन कालापासून चालत आला आहे. प्रत्येक कलेचा उगम निसर्गापासून आहे, व प्रत्येक कलाकृतीला व्यवस्थित आणि पूर्ण स्वरूप येण्याला कल्पनेचा उपयोग केला पाहिजे यांप्रमाणें वास्तविक पहाता प्रत्येक कलाकृतींत निसर्ग व कल्पना याचें थोड्या फार प्रमाणात मिश्रण दिसून येतेंच वर सांगितलेल्या दोघा मतवाद्यात फरक काय तो प्रमाणाचा असतो, व हा फरक त्याचा कलेच्या प्रयोजनासबधानें जो मतभेद असतो, त्यापासून उद्भवलेला असतो. वस्तुवाद्यांच्या मते सृष्ट पदार्थांचें यथार्थदर्शन हेंच कलेचें प्रयोजन असतें, कल्पनावाद्याच्या मतें तत्त्वबोध किंवा मनोरंजन हें असतें. यामुळें पहिल्याचें लक्ष्य विशेषेंकरून निसर्गस्वरूपाकडे व दुसऱ्याचें रसिकचित्ताकडे राहून जड किंवा चेतन सृष्टींतील चमत्कार पहिल्यांकडून बहुधा मिश्र स्वरूपात व दुसऱ्याकडून बहुधा केवल स्वरूपात दाखविण्यात येतात पहिल्याच्या कृतींत विरोध तर दुसऱ्याच्या कृतींत अविसवाद विशेष प्रमाणात दिसून येतो. वस्तुवादी चित्रकार हरिणाची वाघाकडून शिकार करवील, तर कल्पनावादी चित्रकार उभयताना एकाच भाड्यातून पाणी प्यावयास लावील. वस्तुवादी शेक्स्पिअर आपल्या काव्यातून रमणीय व बीभत्स वस्तु जवळजवळ माडील, तर कल्पनावादी कालिदास रसिकाना मेघावर बसवून त्याच्या दृष्टीला रमणीय वस्तुच पाडील

अलीकडे यत्रशास्त्राची प्रगति झाल्यापासून वस्तुवाद्याना एक मोठेंच सहाय्य मिळाल्यासारखें झालें आहे कलालाच्या भट्टीशेजारी चालणाऱ्या भाडणातील [ अप ] शब्द जसेचे तसेच घेण्याची इच्छा झाली म्हणजे ध्वन्यनुकारि यंत्र [ Phonograph ] त्याचा कर्ण्यासारखा विशाल कर्ण उघडून जवळ ठेवावें, की ते शब्द व त्याचे हेल कायमचे हस्तगत झाल्यासारखे होतात, आणि जवळचा अपशब्दांचा साठा विसरून जाण्याची भीति वाटतांच

*मनोरजन पु. २१ पू. भा. १ [ जुलई सन १९१५ ]

त्याची यंत्राच्या साहाय्याने उजळणी करिता येते. त्या भांडणाची मजल गटारांत पडण्यापर्यंत जाऊन त्या चमत्काराचा हुबेहुब देखावा घेण्याची इच्छा झाली म्हणजे कृत्यनुकारि यंत्र [Cinematograph] त्याच्या ग्राहक साहित्यासह समोर ठेवावे, म्हणजे तो देखावा वज्रलेप होऊन आपणाला वाटेल तेव्हा भांडणाऱ्या इसमाना गटारात लोळविता येतें या दोन यंत्राच्या द्वारें भांडणाच्या वेळीं घडणाऱ्या श्राव्य व दृश्य गोष्टींचा कानाना व डोळ्याना इतका हुबेहुब भास होतो, कीं त्या गोष्टींच्या अनुषगाने रहाणाऱ्या व इतर इंद्रियानाच गोचर अशाही गोष्टींचा आपणाला क्षणभर भास झाल्यावांचून रहात नाहीं त्या यंत्राच्या प्रयोगाचे प्रसंगी दारूच्या किंवा गटाराच्या घाणीच्या भीतीने अनेक प्रेक्षक व श्रोते नाकास पदर लाविताना, व दारूच्या चवेचा अनुभव घेऊनच कीं काय, तोंडे वेडीवाकडी करिताना दिसतात ! अविकृत निसर्गाचे चित्र खुद्द निसर्गानेंच उतरविल्यावर इतका साक्षात्कार झाल्यास नवल नाही

परंतु मनुष्याच्या कौशल्यानें व्हावयाच्या कृति याप्रमाणे पंचमहाभूताकडून बिनबोभाट घडत असताना त्याबरोबर त्यात कधी कधी असे काही वैगुण्य राहून जातें, कीं जे मानवी कृतींत दिसून येत नाही, व ज्यामुळे त्या कृतीपासून होणाऱ्या फायद्यावर बरेंच विरजण पडते. वर सांगितलेली यंत्रें फार तर आवाजाचे व कृतीचें हुबेहुब अनुकरण करितील, इतके कीं तसे कुशल स्वरनिपुणाला व नटालाही साधणार नाही पण त्या आवाजात किंवा कृतींतच जर वैगुण्य असलें, तर ते ओळखण्याची व सुधारण्याची अक्कल मनुष्याप्रमाणे त्या यंत्रात नसते. यामुळें पुष्कळदा गुणाप्रमाणें अवगुणही चिरस्थायी होऊन बसतो. ध्वन्यनुकारि यंत्रात गाणें घेताना जर गायकाचा बेसूर झाला, तर तें गाणें गाताना तें यंत्र दर खेपेला तोच बेसूर आळविताना दिसून येईल, व अशा बेसुराला जर कोणा अरसिकशिरोमणीनें 'खाशी' म्हणून शाबासकी दिली असेल, तर ती शाबासकीही त्या यंत्राकडून दर खेपेला बिनचूक उच्चारण्यात येईल गाताना गायक खाकरला किंवा शिंकला, तर तें खाकरणें किंवा शिंकणें यंत्ररूपी चित्रगुप्ताकडे लागलीच नमूद होतें, व यंत्राचें गाणें ऐन भरांत आलें असता त्याचा बेरंग करण्याकरितां तें त्याजकडून अगदी वेळेवर रसिकासमोर दाखल करण्यांत येतें.

कधीं कधीं यत्राच्या तबकडी [ Record ] वरील कंगोरा बिघडल्यामुळें काटा एकाच कंगोऱ्यावर फिरत राहून श्रोत्यांकडून ' वन्स मोअर ' [ पुनः एकदा ] झालें नसतांही यत्र तेच तेच शब्द व स्वर पुन. पुनः घोकूं लागतें. श्रोत्यास यत्राची स्मरणशक्ति पक्की असल्याचें माहीत असल्यामुळे तर हें संथा घेणे फारच अप्रासंगिक वाटतें अशा प्रसंगीं गाणाऱ्या यंत्राप्रमाणें ऐकणारें यत्रही त्याच्या उत्पादकानें निर्माण केलें असतें तर बरें झालें असतें असा विचार प्रत्येक श्रोत्याच्या मनात आल्यावांचून रहात नाहीं.

प्रकाशलेखक किंवा कृत्यनुकारि यत्राने मनुष्याच्या मनांतील भाव हुबेहुब प्रतिबिंबित करिता येतो हे खरें आहे, पण तसें होण्यास त्या मनुष्याच्या तोंडावर तो भाव आपोआप दिसला पाहिजे, किंवा त्यानें त्याची बतावणी तरी चागली केली पाहिजे मनातील भाव लपवून ठेवणारा किंवा तो नाट्यात उतरविण्याला असमर्थ असा मनुष्य जर समोर असेल, तर यत्रानें काय रडावें ! थोड्याशा कल्पनेच्या साहाय्यानें सामान्य चित्रकाराच्या हातून जें भावप्रकटीकरण वठेल, त्याच्या शतांशानेंही परावलंबि यंत्राच्याने वठणार नाहीं.

आमच्या गावांत एक कुशल चित्रकार रहात असे. त्यानें तीन चित्रें तयार केली होतीं प्रत्येक चित्रात एक मध्यम वयाचा पुरुष एका तरुणीच्या खांद्यावर हात ठेवून उभा राहिलेला दाखविलेला होता त्या उभयताचें परस्पराशीं असलेले नातें ओळखण्याला त्या पुरुषाच्या नजरेशिवाय काहीं साधन नव्हते पण केवळ त्या नजरेच्या बळावर तें नातें एका चित्रात पतिपत्नीचें, दुसऱ्या चित्रात पितापुत्रींचें व तिसऱ्यात बधुभगिनींचें आहे, हें रसिकाला ताबडतोब ओळखिता येत असे. आमच्या बहुनाजानीं या चित्रातील कल्पना घेऊन तिजवर भिन्नभिन्न नातीं दाखविणारे पाचपन्नास फोटो काढण्याचा विचार केला. पाचदहा फोटो तर पतिपत्नींच्या नात्याचेच निघावयाचे होते. एकात प्रथम वर व प्रथम वधू, दुसऱ्यात बिजवर व प्रथम वधू, तिसऱ्यात प्रथम वर व गतभर्तृका [ या फोटोचा बेत इतराच्या मतानें मागाहून रद्द करण्यांत आला ] याचीं नातीं दाखवावयाचीं असून बाकीच्यात कोठें पुत्रहीन पति व वंध्या भार्या, कोठें प्रथम जवळचे नातलग असून नंतर विवाहरज्जूनें बद्ध झालेले स्त्रीपुरुष वगैरे अनेक प्रकारचीं

जोडपीं यावयाची होतीं बहीणभावाचीं नाती तर यापेक्षाही बारकाईन
दाखवावयाची होती एका फोटोंत सख्खी तर दुसऱ्यात सावत्र व तिसऱ्या
मावसभावंडें, चवथ्यात मामेभाऊ आतेबहीण, तर पाचव्यांत आतेभा
मामेबहीण, सहाव्यात एका पिढीच्या, सातव्यांत दोन पिढ्याच्या
आठव्यात तीन पिढ्यांच्या अतरावरची बहीणभावडें आणि नवव्यात दत्त
भाऊ व औरस बहीण आणि दहाव्यात मानलेली बहीण भावडें येणार होत
असेच प्रकार पितापुत्रींच्या संबंधानेंही व्हावयाचे होते

हे फोटो घ्यावयाला दोन कुशल नटाची आवश्यकता होती बंडूनानान
साऱ्या नाटकमडळ्या पालथ्या घातल्या, परंतु प्रथम सांगितलेल्या ती
नात्याशिवाय इतर नाती वठविणारा एकही नट मिळेना. त्यानी पैशाच
लालूच दाखविली, कीर्तीचें आमिष पुढें माडिलें, वस्त्रेंप्रावरणे देऊ केल
पण त्यांचा कांही उपयोग झाला नाही शेवटी दोन सामान्य प्रतीच
पात्राना विड्यांचीं जुडगीं देऊन व नाटकातील हलक्यासलक्या कामाला
बहुमोल साज घालण्याची परवानगी नाटकमंडळीच्या चालकाकडू
मिळविण्याचें कबूल करून त्यानी त्याना अनुकूल करून घेतलें,
त्याना तालमी देण्याचें सुरू केले. परतु हे नट सामान्य असले त
आपणाला भारीच आहेत असें नानाना लवकरच कळून आलें,
नानाचें नाट्यविषयक अज्ञान जों जों त्या नटाच्या होऱ्यात येऊ लागल
तों तों त्याच्या स्वसामर्थ्याबद्दलच्या वल्गना वाढूं लागल्या पण त
खोट्या आहेत असे निक्षून सागण्यापुरता नानांचा आपल्या तारतम्यबुद्धीव
विश्वास नव्हता. पुरुषपार्टी नटानें तर चाळीस पिढ्याच्या अतरावरी
दत्तकसावत्रमावसमामेभावाची बतावणी करण्याचा एकदा आव घातल
नानाना या नात्याचा अर्थच कळेना, पण आपलें अज्ञान प्रकट न करित
त्यांनीं नटाला शाबासकी देऊन 'इतक्या बारकाईचे सूक्ष्मतादर्शक य
हिंदुस्थानात नसल्यामुळें नाइलाज आहे !' इतकेच काय ते उद्गार काढिले
त्यांनीं त्या नटावर जरा का अविश्वास दाखविला असता, तर त्याच
स्वत च्याच बेचाळीस पिढ्यांचा उद्धार व्हावयाला वेळ लागला नसता.
वेळेला त्यांची स्थिति 'भीक नको पण कुत्रा आवर' अशी झाली होत
आपणाला हा अव्यापारेषु व्यापार करण्याची कोठून बुद्धि झाली, असें त्या

चालू लागले होते. नाना, शिक्षक व नट, शिष्य हें नातें बदलून जाऊन उलट त्यानाच नटाकडून प्रत्येक तालमीला शिक्षा मिळत होती.

अखेरीस फोटो घेण्याचा दिवस येऊन ठेपला. नटाची जोडी ठरलेले वेष घेऊन सज्ज झाली. फोटो घेणारा इसम आपल्या आयुधासह येऊन दाखल झाला त्यानें आपलें तिकाटणें उभें केले औरसदत्तक, सख्खींसावत्र, मामेआतेमावस इत्यादि सर्व प्रकारचीं व प्रत्येक पिढींतील बहीणभावडाचीं नातीं फोटोत घेण्याला सुरवात झाली नानानीं नात्याचे वर्णन उच्चारावें व नटानीं त्या नात्याला अनुसरून आपले चेहेरे बदलावे, असा क्रम चालू झाला. पिढ्या जों जों एक एक पायरीनें मागें हटत चालल्या, तों तों नटाच्या चेहेऱ्यावर मनुष्यजातीच्या अव्वल पूर्वजाची थोडी थोडी छटा दिसू लागली हा चमत्कार नटाना हळूहळू जो थकवा येत होता त्याचाही परिणाम असावा. उत्तरोत्तर त्याना मोठमोठ्या प्रमाणावर जाभया येऊ लागल्या, यामुळें दूरदूरच्या नातलगाना परस्पराच्या सगतीविषयी जो कटाळा असतो तो त्याच्या चेहेऱ्यांवर स्पष्ट दिसू लागला एका फोटोच्या वेळीं तर पुरुषवेषधारी नटाला जबरदस्त शिंक आल्यामुळें फोटोंत त्याचा व शिंकेच्या आवाजानें हदरलेल्या स्त्रीवेषधारी नटाचा चेहरा पार बदलून गेलेला निघाला असता पण शिंकेच्या धक्क्यानें फोटोची काच फुटली म्हणून बरें झाले दूरदूरच्या अतरावरील नातलगाच्या परस्पराकडे लागलेल्या दृष्टींत मार्दव कमी असले पाहिजे असा नटाचा समज असल्यामुळें त्याची मुद्रा उत्तरोत्तर क्रुद्ध दिसू लागली. ती इतकी, की तिच्या व जाभयाच्या योगाने दहा पिढ्याच्या अंतरावरील बहीणभाऊ एकमेकाना खाऊन टाकितात की काय असा क्षणभर भास झाला नटाच्या मुद्राना हें जें नवीन वळण मिळालें, तें पुढेंही कायम राहिल्यामुळें पितापुत्री व पतिपत्नी याच्या नात्याचे फोटो अजमासाहून अगदी निराळे निघाले. जनावरातल्याप्रमाणे पिता आपल्या पोटीं आलेल्या कन्येला पुनः पोटातच जागा देतो कीं काय, व पति आपल्या स्त्रीचा अधरदश करण्याऐवजी तिचे नरडें फोडतो कीं काय असा भास ते फोटो पाहून होत असे. पुढें लवकरच फोटो घेण्याचें काम सपले म्हणून बरें झालें. नाही तर त्या नटानी आपली रक्ताची तहान बिचाऱ्या नानावर व फोटो काढणारावर भागविली असती.

नाट्यकलेचें शिक्षण मिळालेल्या इसमांचा हा थाट! मग ज्यांना नाट्यकाला

कशाशीं तोंडीं लावितात हे कळण्याची मारामार, अशा अजागळाचा फोटो घेण्याच्या प्रसंगीं होणारी फजीती काय विचारावी ? ' फोटो निघणे ' व ' फजीती होणें ' हे शब्द समानार्थी उपयोगात येण्याला कारण हेच बावळट लोक असावेत फोटो काढण्याचा खरा उद्देश छबी स्वाभाविक अवस्थेत व ताबडतोब ओळखण्यासारखी निघावी हा असताही हे लोक फोटो काढविण्या-पूर्वी आपलें शरीर वस्त्रालकारानीं इतकें झाकून टाकितात व त्याच्या दृश्य भागाला इतकें कृत्रिम स्वरूप आणितात, की त्यांची ओळख त्याच्या बायकानाहि पटणे मुष्कील होऊन बसते. या तयारीला स्मश्रूपासून आरभ होतो. ज्याचें डोकें सहारा वाळवटाप्रमाणें अगदीं रुक्ष असून मध्यें उगीच नावाला टिंबाएवढी शेंडी असते, असे लोक फोटोच्या दिवशीं मुद्दाम मोठा संजाब ठेवितात, व बाकीचें डोकें वस्तरा फिरवून फिरवून रक्तबंबाळ होईपर्यंत गुळगुळीत करितात नुक्तीच शाई लाविलेल्या तबल्याप्रमाणें दिसणारे तें संजाबाचें डोकें पाहून एखाद्या तबलजीला त्यावर थाप मारण्याची स्फूर्ति झाल्यास नवल नाहीं यानतर न्हाव्याकडून चप्पी करवून घेऊन पुढे अभ्यगस्नान करण्यात येते स्नानानतर गंध कोरून लावण्यात अर्धा घटा मोडतो. इतक्यात फोटो काढणाराकडून घाई करण्यात येते. त्यामुळें धादल उडून नेपथ्यरचनेंत कधीकधी हास्यास्पद चुका होतात एकदा एका म्हाताऱ्या धादलेकाकानें मिशाना कलप लावण्याऐवजी तो पगडीच्या झिरमिळ्यानाच फासून दिला, व एका तरुणाने अंगात जाकिटाऐवजी बायकोची चोळी व कानात बिक-बाळीऐवजी तिची नथ घालून पायात हातमोजे व हातात बूट अडकवून दिले फोटो काढून घेणाराची आपली स्वाभाविक व्यगे छपविण्याच्या कामीं तर विशेषच तत्परता दिसून येते. फोटो निघतांना चेहरा हसरा असला पाहिजे हें तत्त्व ठरलेले असल्यामुळें व हंसताना नुसती जीभच दिसणें इष्ट नसल्यामुळें म्हातारे लोक तोंडात मुद्दाम दाताची कवळी अडकवून त्याला पाढऱ्या पट्ट्या बसविलेल्या बाजाच्या पेटीचें स्वरूप आणितात. तिरळी व एकाक्ष माणसें रगाचे चष्मे वापरून इतराच्या डोळ्याना अंध करण्याचा प्रयत्न करितात. विड्या ओढून काळेकुट्ट झालेले ओंठ विडा खाऊन लालभडक करण्यात येतात. कान लाब किंवा बेढब असल्यास ते डोकीच्या रुमालाखाली दडविण्यात येतात उच मान झाकण्याकरिता तिच्याभोंवतीं एकदा किंवा अनेकदा उपरणें गुंडाळण्यात

येते ज्याप्रमाणे गौर सजविण्याकरिता असतील नसतील तेथून वस्तू मागून आणण्यात कमीपणा वाटत नाहीं, त्याप्रमाणें फोटोसाठीं पोषाख करितांना शेजाऱ्याकडून उची उची वस्त्रेप्रावरणें आणण्यातही वाटत नाहीं एखाद्या पाणक्याला जरी फोटो काढून घ्यावयाचा असला, तरी तो अंगावर घालण्यासाठी जरीकाठी उपरणें व रुमाल मागून आणिल्याशिवाय रहाणार नाही. नेहमी डोक्यावर साधा रुमालही वापरण्याची संवय नसल्यामुळें तो बाधून घ्यावयाला त्याला अर्थात्च रुमालाच्या मालकाला आणावें लागतें. उपरण्याचें काठ जपून व चापूनचोपून काढण्यात येतात. पण ते सहज बाहेर आले आहेत असे दिसण्यासाठी त्यावर एखादी दुसरी सुरकुतीही ठेवावी लागते. एका खिशात घडी केलेला व किंचित् बाहेर डोकावणारा हातरुमाल आणि दुसऱ्यात घड्याळ किंवा तें नसल्यास नुसती त्याची साखळी अडकविण्यात येते जमा केलेले कपडे जरूरीपेक्षा अधिक असले, तर त्यातील प्रत्येकाचा काही भाग दिसावा म्हणून ते सारे एकावर एक चढविण्यांत येतात, व वरील वरील कपडे फारच लाब अस्तन्याचे असल्यास आतील-आतील कपडे दिसण्याकरिता त्या अस्तन्या दुमडण्यात येतात. कित्येकजण तर इतके दीर्घशहाणे असतात, कीं आतील कपडे व अलंकार फोटोंत येणार नाहींत अशी खात्री असताही ते बाहेरील अगरख्याच्या आत भरजरीचीं जाकिटें व कठ्या घालतात, आणि अत्तराचे वास फोटोंत दरवळणार नाहींत हे माहीत असताही अगाला अत्तरे फासतात. स्वतःच्या किंमतीपेक्षा हजारपट भारी किंमतीचीं वस्त्रप्रावरणे अंगावर चढविणाऱ्या या नंदीबैलाचा जाड्या जाड्या पुस्तकाशी संबध फक्त अगाच्या जाडीबद्दलच्या तुलनेपुरताच यावयाचा; पण असें असताही ते हातात एक जाडा ग्रंथ घेऊन व टेबलावर दुसरा जाडा ग्रथ ठेवून त्याची सोनेरी अक्षरें आपल्या वस्त्रांच्या जरीकाठाप्रमाणेंच स्पष्टपणें फोटोंत येतील अशा बेताने यंत्राकडे फिरवून ठेवितात. त्या पुस्तकाची दुसरी बाजू जर यंत्राकडे रहाती, तर त्या ग्रथांचीं पांनें अजून फाडलेलीं नाहींत हें दिसून येऊन ते ग्रंथ व फोटो काढविणाराचें डोके हीं त्याच्या अंगावरील वस्त्राइतकीच कोरीं करकरीत आहेत हें तेव्हाच कळून चुकलें असतें.

फोटो काढणारा इसम तो काढून घेणाराना योग्य जागावर बसवितो, तेव्हां त्याचे जसें कौशल्य दिसून येतें तसें त्याचेहि दिसून येतें. त्यांच्या

स्थानाची रचना एकदरीने योग्य व चित्ताकर्षक होईल इकडे त्याचें पहाणें असतें, आणि इतराच्यापेक्षा आपलीच ऐट फोटोंत दिसावी इकडे त्याचें लक्ष असतें ठेंगण्या लोकाना बहुधा पुढच्या रांगेंत बसविण्यात येते अर्थातूच त्याचे जरीचे कांठ, घड्याळाची साखळी, भिकबाळी, मिशाचे आकडे, कपाळावरील गधाची टिकली [ व हाताची बोटे खुबीने ठेविल्यास अगठीही ] फोटोत यथास्थित रीतीनें निघते आपली शारीरिक किंवा इतर व्यगें झाकण्याकरिता त्याना थोडीशी तर्तूद करावी लागते इतकेंच काय ते म्हणजे- कपाळावर आवाळू असले तर विचार करण्याचा आव आणून कपाळ हातावर टेकावें लागते, मिशी अर्धीच असली तर तिच्या न फुटलेल्या अर्ध्या भागावर ताव देण्याची बतावणी करावी लागते, हनुवटी लाब असली तर तिला खालून हाताचा टेंकू देण्याचे निमित्त करून तिचा काही भाग लपवावा लागतो, अगरख्याचा छातीवरचा भाग फाटका असल्यास त्यावर नेमके हाताचे स्वस्तिक करावें लागते, व धोतर फाटलें असल्यास त्यावर नेमकीं येईल या बेतानें छत्री ठेवावी लागते

उंच लोकाना बहुधा मागील रागेतच उभे राहावे लागतें त्याना आपली व्यगें लपविणे फार सोपे जातें मान उटासारखी, छाती खचलेली, पोट सुटलेलें, पाय फेंगडे, याप्रमाणे तोंडाखालील कोणतेही वैगुण्य असलें तरी तें पुढील इसमाच्या मागें वाटेल तसे लपविता येतें एखाद्या उच फेटा बाधलेल्या इसमाचा आश्रय घेऊन त्याच्या जटावजा फेट्यावर नेमका आपला मुखचद्र आणिला म्हणजे फोटो निर्व्यग्य निघण्याची खात्री बाळगा- वयास हरकत नाहीं मात्र पुढील मडळीला व्यग्य झाकणे जितके कठिण जातें, तितकेंच मागील मडळीला आपलें अगसौष्ठव किंवा नेपथ्यरचना प्रकट करणें कठिण जातें एकदा एका ठेंगू माणसाला त्याच्या कुरूपपणावरून मागे उभें केलें होतें त्याला आपल्या लाब व झुबकेबाज मिशाची फार घमेंड असे. पण समोरच एक अगडबब स्वारी बसली होती तिच्या देहानें त्याच्या मुखचंद्राला व त्यावरील मिशारूप कलकाला खग्रास ग्रहण लाविलें होते. अखेरीला तोंड नाहीं तर नाही, मिशा तरी फोटोंत येवोत, अशा उद्देशानें मागील इसमानें फोटो निघण्याच्या ऐन वेळेवर पुढील इसमाच्या बगलेखालील लहानशा फटीमार्गें आपल्या मिशा आणिल्या, आणि फोटोंत त्या अगदीं

हुबेहुब निघाल्याही, इतक्या की, पुढील इसमाच्या अंगरख्याची बगल फाटली असावी असा प्रेक्षकाना फोटोवरून तात्पुरता तरी भास होत असे दुसऱ्या एकाने नुक्ताच विकत घेतलेला कोरा करकरीत बूट चढविला होता. त्यावर मागे उभें रहाण्याची पाळी आली तेव्हा तो काही वेळ खिन्नपणे उभा राहिला पण फोटोवाल्यानें यंत्राकडे पाहण्याची इशारत करिताच त्याला एक युक्ति सुचून त्यानें आपले पाय पुढील इसमाच्या पायाना भिडविले पुढील इसम फोटोत चतुष्पाद निघाला, हे निराळे सागावयाला नकोच. तिसऱ्या एका इसमाने नुक्ताच एक सुरेखसा कातडी कबरपट्टा मुद्दाम फोटोकरिता मुंबईहून आणविला होता त्याला मागे उभें करण्यात आले, तेव्हा त्यानें आपली कंबर खचू न देता व आपल्या नाही तर दुसऱ्याच्या अंगावर तरी आपला कबरपट्टा दिसो असा उदार विचार करून फोटोवाला एक दोन तीन म्हणत आहे व पुढील इसम आपल्या तोंडावर उसने हास्य आणीत आहे, तोंच तो कबरपट्टा पुढील इसमाच्या गळ्यात अडकवून दिला !

सर्कसवाल्याला आपल्या ताब्यातील जनावरें कह्यात ठेवण्याला जितकी यातायात पडते त्यापेक्षा कितीतरी पट फोटोवाल्याला आपल्या यजमानाना शिस्तीने बसविताना पडते छाती वर करून बसलेल्या माणसाला जर थोडेसे वाकण्यास सागितले तर त्याला उपमर्द झाल्यासारखा वाटतो अर्धवट मिटलेले डोळे पूर्वीप्रमाणे उघडावयाला सागितले असता ते लागलीच वटारल्यासारखे होतात. मानेचा काटकोनापेक्षा कमी अगर अधिक असलेला कोण हाताने काटकोनाइतका केल्यास लागलीच मानेला हिसका बसून ती पूर्वीइतकीच कललेली दिसून येते इतक्या लोकासमोर असा मानभग कसा सहन होईल ? एवढे मोठे रावसाहेब, रावबहादूर किंवा त्याहूनही मोठ्या पदव्या धारण करणारे, आणि या भिकार फोटोवाल्यानें त्याची शेंडी धरून त्यांना हवें तसें वाकवावे म्हणजे काय ! त्याची शेंडी दोघाच्याच काय ती हातीं जावयाची एक अर्धांग अर्पण केलेली स्त्री व दुसरा उत्तमाग अर्पण केलेला नापिक ! बरें, बाबापुता करून अर्ध्या मंडळीला कसेबसें व्यवस्थित रीतीनें बसवून फोटोवाला उरलेल्या मंडळीस शिस्त आणावयास लागतो न लागतो तोंच शिस्तीनें बसविलेली मंडळी आपली आखून दिलेली चित्रासारखी बैठक मोडून पूर्वीपेक्षाही अव्यवस्थित रीतीनें वागूं लागते फोटोवाल्याची हुकमत

त्यांना दुःसह होऊन त्याची पाठ फिरताच ती जाभया व आळोखे पिळोखे देणें, अंग खाजविणें वगैरे स्वतंत्रपुरुषोचित कर्मे आचरूं लागते. बिचाऱ्या फोटोवाल्याला अशा प्रसंगीं सर्कसवाल्याप्रमाणे चाबकाचाही उपयोग करिता येत नाहीं!

स्त्रीपुरुषाचा मिश्र फोटो काढावयाचा असल्यास बहुधा खुर्च्यांच्या रांगेंत बायका बसवून मागील रांगेंत पुरुषाना उभें करण्यात येते. अशा प्रसगी कोणत्या स्त्रीच्या मागें कोणता पाठीराखा उभा करावयाचा यासंबंधानें कधीकधी फार नाजूक प्रश्न उत्पन्न होतात, स्त्रीच्या मागील पुरुष तिचा पतिच असला पाहिजे, असा आग्रह होण्याचा संभव असतो म्हणून पतिविरहित फोटो काढून घेण्याचा प्रसंग सुवासिनींना आला असता त्या आपल्या खुर्च्यांमागील जागा रिकाम्याच ठेवण्याबद्दल हट्ट धरून बसतात फार काय, पण विधवाबद्दल असा ग्रह होण्याचा सभव नसता त्या सुद्धा तसा आग्रह धरून तो इतक्या विकोपाला नेतात, की विधवाचें दर्शन झालें म्हणजे कार्याला विघ्न येतें या विधानाची खात्री इतरांना तावडतोब पटते. कधीकधी एखादा दोन बायकांचा दादला आपल्या दोन्ही बायकांच्या खुर्च्यांच्या मागें हात पसरून त्या दोघींवरची आपली मालकी शाबीत करीत उभा रहातो. यामुळें पुष्कळदा फोटोंतील रचनेला विषमता येते, पण त्यानें मनातील वैषम्याला मात्र जागा रहात नाहीं हें खास

खुर्च्यांच्या पुढील जागा गौरीच्या पुढील जागेप्रमाणें लहान मुलाची हक्काची असते. त्याना त्यांच्या आईबापाप्रमाणें फोटोच्या उपयुक्ततेची कल्पना नसल्यामुळें त्यांना संभाळता सभाळता फोटोवाल्याची पुरेवाट होते त्याना खाऊ देऊन स्वस्थ बसविण्याची तर सोयच नसते. कारण आपल्या दांडगाईचें बक्षीस आपणाला खाऊच्या रूपानें मिळतें असा त्याचा समज झाल्यास त्याची गडबड थांबण्याचें दूर राहून ती उलट वाढते मात्र. बरें, त्याना माराचा धाक दाखवून गप्प बसवावें, तर त्यानीं भोंकाड पसरण्याचा संभव फार अशा अडचणीत फोटोवाला त्याचें चित्त कांहीं तरी लोणकढी थाप मारून यंत्राकडे वेधण्याचा प्रयत्न करितो, आणि तो बहुधा सिद्धीलाही जातो. एकदा एका फोटोवाल्यानें यत्रात कुत्रें बसलें आहे असें सांगून एका लहान मुलाचे डोळे यत्राकडे खिळवून टाकिले. फोटो निघेपर्यंत तें

मूल देवासारखे बसले होते. पण मंडळी उठून जातांच त्यानें कुत्रा पहाण्या-करिता यत्राचे टोपण काढून फोटोच्या काचेची खराबी करून टाकिली. असल्याच्या माथी अपजय असतो याचे याहून खासे प्रत्यंतर दुसरे कोणतें देतां येईल ?

ही सारी व्यवस्था लागण्याला कधीकधी इतका वेळ लागतो, की फोटोची वेळ सकाळची असल्यास ऊन्ह फार होऊन व ती संध्याकाळची असल्यास अधार फार पडून फोटो घेणे अशक्य होते, आणि ते पुढील खेपेवर टाकावे लागते पण त्या खेपेस सुद्धा बहुधा 'येरे माझ्या मागल्या' असाच प्रकार होतो फोटोला जितका प्रकाश पाहिजे तितका टिकेपर्यंत फोटो निघण्याची सुसधि येण्यास कधीकधी दोनदोन तीनतीन दिवस फुकट घालवावे लागतात.

बसणारे स्थिरस्थावर होऊन फोटो निघण्याची वेळ येईपर्यंत फोटो काढणारा व काढविणारे अगदी रडकुडीला येतात. मध्यतरी यत्राचा केंद्र साधावयाचा असतो. त्याकरिता फोटोवाल्याला भिगातून वारवार समोर बसलेल्या इसमाकडे पहावे लागते तो त्याना वारवार टक लावून पहाण्याची इशारत करीत असतो सारखी टक लावून पहाण्यामुळे त्याच्या डोळ्यातून पाणी वहावयाला लागते. पण त्याबरोबरच त्याना तोंडावर लटके हास्यही धारण करावयाचें असते यामुळें ते हसत आहेत कीं रडत आहेत याचा नीट उलगडा करिता येत नाही पापण्या सारख्या ताटकळत ठेविल्याचा परिणाम असा होतो, की त्या अगदी ऐन वेळी मिटाव्या लागतात, व एवढा खटाटोप फुकट गेल्यासारखा होतो फोटोवाला ठेंगणा तुदिलतनु असल्यास त्याच्या धावपळीने इतके हसू लोटतें, की तें ऐन वेळीं सुद्धा आवरत नाही. अर्थात् फोटोत तोंडावर नुसतें स्मित झळकण्या-ऐवजी जेवणीच्या एका कोपऱ्यापासून दुसऱ्या कोंपऱ्यापर्यंत सबंध बत्तिशी दिसू लागते. एखाद्या वेळी फोटो निघण्याच्या ऐन संधीला एखादी माशी तोंडावरून सथपणे सहल करीत जाऊ लागते, पण ती वेळ माशी मारीत बसण्याची नसल्यामुळें मुकाट्यानें तिच्यासह आपली छबी उतरून घेतल्या-शिवाय इलाज नसतो तिकडे यत्राकडून चेहेऱ्याची इतकी हुबेहुब नक्कल करण्यांत येतें, की अगदी 'माशीला माशी'! कधीकधी अगदी नेमक्या वेळेला अंग खाजविण्याची इतकी तलफ येते, किंवा खोकल्याची ढास,

उचकी शिंक, ढेकर अगर जाभई इतकी अनावर होते, की त्या वेळच्य विकृत अगविक्षेपाचा फोटो निघून तो इतराना एक नेहमीचा मौजेचा विषः होऊन बसतो, व एकट्या स्वत च्या तोंडावर स्मित दिसण्याची इच्छ याप्रमाणे इतराच्या तोंडावर हसा दिसून पूर्ण होते देवापाशी मागितल एक डोळा, तर देवानें दिले दोन!

शरीराच्या, पोषाखाच्या व मनाच्या इतक्या अस्वाभाविक स्थिती निघालेल्या फोटोवरून मूळ इसम [ खाली नाव घातलें नसल्यास ] कस ओळखता येणार ? पण तो न ओळखता आल्याबद्दल त्या इसमालाही वाई वाटत नाही कारण फोटोत निघालेले तोंड इतकें विद्रूप निघालेले असते की ते आपल्या तोंडाची अस्सल प्रतिमा आहे हें लोकानी न ओळखण्यातः त्याची शोभा रहाण्यासारखी असते असे इसम बहुधा स्वतःचा इतःप फोटो काढावयाचा नाही अशी शपथ घेतात व पूर्वी घेतलेले फोटो बलभी मारुतींची चित्रे म्हणून भाविक लोकाना दिडकीदिडकीला विकून झालेल्य खर्चाची शक्य ती भरपाई करून घेतात.

---

मुष्टि २६ वी *

## साधुसंत

हिंदुस्थानात हल्लीं जे धंदे प्रचलित आहेत त्यातील प्रत्येकाला द्रव्यरू ज्ञानरूप किंवा शक्तिरूप भांडवलाची जरूर लागते शेतीला जनावरा व आउताचा पुरवठा लागतो. सोनार, लोहार, तांबट, सुतार, शिंपी न्हावी, परीट इत्यादि धंदेवाल्याना त्याची त्याचीं हत्यारें असावीं लागतात सावकाराला व दुकानदाराला पैशाची पुंजी पाहिजे असते. वकिलाना डॉक्टराना त्याच्या धंद्याचीं पुस्तकें व शिवाय भपकेबाज पोषाख हें साहि आवश्यक असते चित्रकार, नट, गवई, गारुडी, यानाही विशिष्ट आयु बाळगावी लागतात फार काय, पण सर्वांत कनिष्ठ धंदा जो भीक मागण्या त्यालाही एखादी झोळी किंवा नरोटी लागतेच. या साऱ्या धंदेवाल्याना धं धंद्याप्रमाणें ज्ञान व शक्ति याचेंही साहाय्य लागतें आचाऱ्याला पाकसिद्धी ज्ञान व काटकपणा लागतो, आणि पाणक्याला शरीरबलाची अनुकूल

लागते. भिकाऱ्यालाही मनुष्यस्वभावाची उत्तम प्रकारची पारख असल्याशिवाय भरपूर भिक्षा मिळत नाही

वरील धंदेवाल्यांपैकी बहुतेकांना त्यांच्या जबाबदारीप्रमाणें द्रव्यलाभापेक्षां निराळे असे कमीअधिकप्रमाणानें विशिष्ट फायदेही असतात. वकिलाला व डॉक्टराला अनुक्रमें मानवी व ईश्वरी न्यायासनापुढें आरोपी म्हणून जाण्याचा संभव दिसल्यास त्या संकटातून मुक्त होण्याचा सल्ला मिळण्याकरिता फी देण्याची जरूर नसते, गवयाला दुसऱ्या गवयाचें गाणें ऐकण्याकरितां किंवा नटाला परक्या नाटकमंडळीचा प्रयोग पहाण्याकरिता खिशाकडे हात नेण्याचें कारण नसते, शिंप्याला व धोब्याला घालावयाला कपडे नाहीत किंवा भिकार कपडे आहेत अशी कुरकुर करण्याला सहसा जागा नसते, आचाऱ्याला धन्यापेक्षाही सुग्रास पक्वान्नें मिळू शकतात, न्हाव्याला डोकें करून घेण्यासाठीं दिडकीही द्यावी लागत नाही व स्वतःच्या डोक्याला लावण्याकरिता तेलाची कधी उणीव पडत नाही, आणि दुधाचें व पाण्याचें जर बेमालूम मिश्रण करिता आले नसतें तर गवळ्यालाही पुरेशी गुरे बाळगावीं लागून स्वतःला पिण्यासाठी दूध उरलें नसतें

भांडवल मिळविण्याची किंवा बाळगण्याची यातायात न करिता, विशिष्टच नव्हे तर सर्व प्रकारची सुखें अनुभविणारा असाही आपल्या देशात एक वर्ग आहे तो साधुसंतांचा होय. आपले लोक जात्याच कनवाळू व श्रद्धाळू दुष्काळात उपासाने पटापट मरणाऱ्या असंख्य मानवी प्राण्याकडे त्यांची कदाचित् डोळेझाक होईल, पण मुंगीला साखरेवाचून तळमळत ठेवावयाचें पातक त्याजकडून होणार नाही. हाडांची काडें करणाऱ्या मजुराला पोटास अर्धी भाकरी मिळाली नाही तर तें त्याचें नशीब म्हणून ते स्वतःचें समाधान मानून घेतील, पण जांभया देण्यापलीकडे मेहनत न करणाऱ्या साधूकडे पंचपक्वान्नाचें ताट पोंहोचविण्याला त्याजकडून एक क्षणही विलंब लागावयाचा नाही. ज्यांनी आपणाला धंद्याला वाहून घेतले आहे त्यांचे पोट भरण्याची जबाबदारी अर्थात् त्याजवरच असावयाची, परंतु ज्यांना कोणताच धंदा नाही त्या बिचाऱ्या मुंग्यांना व साधूंना पोसावयाची जबाबदारी मात्र सर्वस्वी आपणाकडे आहे, असा सर्व हिंदूंचा वाजवी समज असतो. यामुळें त्या जोडीला हिंदुस्थानात तरी कुरकुरण्याला मुळींच जागा नाही. ज्याप्रमाणें

बायकोचा जन्म मिळाल्यास विलायतेत किंवा अमेरिकेंत मिळावा व पुरुषाचा मिळाल्यास फ्रान्समध्यें मिळावा असें प्रत्येकाला वाटतें, त्याप्रमाणे मुगींचा किंवा साधूचा जन्म कपाळी असल्यास तो हिंदुस्थानात मिळावा असेंही वाटत असतें. या दुकलीची चैन चालण्याकरिता तिला दुसऱ्याचे उंबरठे झिजवावे लागत नाहींत किंवा त्याजपुढें दांतही विचकावे लागत नाहीत, तर 'असेल माझा हरी, तर देईल खाटल्यावरी' या न्यायानें वारुळात व देवळात बसून सुग्रास अन्न खावयाला मिळते साधूचें अग चेपावयाला तर घरबसल्या कोमल हातही चालत येतात. मुगींचें अग चेपताना तिला चिरडण्याची भीति नसती तर तिजकडेही ते गेले असते

साधूना कोणत्याही धंद्याचें ज्ञान नसते, इतकेंच नाही, तर धंदेवाइकाला न शोभणारे चाळे करण्याचीही त्याना मुभा असते. एखादा गवडी उद्या धोंडे फेंकून मारूं लागला, कापडवाला चिंध्या फाडू लागला किंवा हरदास श्रोत्याना शिव्या देऊ लागला तर त्याला लोक वेड्यात काढतील, पण एखाद्या साधूने त्याच गोष्टी देवळात किंवा मठांत बसून केल्या, तर त्यावद्दल त्याला कोणी नावें ठेवणार नाहींतच, उलट त्याची कीर्ति वाढण्याला तें एक कारण होईल. सामान्य व असामान्य माणसात हा फरक असावयाचाच ! पूर्वी आमच्यामध्यें पागलखाने नव्हते म्हणून आम्हांला अनेकदा हिणविण्यात येतें, पण ज्यानें साधुसंताच्या मठीत जाऊन त्याचें [व त्याच्या भक्ताचेंही] निरीक्षण केलें असेल, तो निराळे पागलखाने नसल्याबद्दल खास दूषण देणार नाही. सरकारी पागलखान्यांत फक्त जुनेच वेडे कोंडून ठेवितात, पण सताच्या मठांत रोज नवे नवे वेडे तयार होतात ही विशेष सोय असते. वेड्याशी वागतांना त्याच्या छदानेंच चाललें पाहिजे हा नियम आमच्या गांवठी पागलखान्यात इतक्या सक्तीनें अमलात येतो, कीं त्यानें थोडक्याच दिवसात वेडा पुरा छादिष्ट बनून जातो. तथापि त्यानें केलेली एकही लीला अशी नसते, की जी साधुकृत्याच्या सदरात पडत नाही कृत्याच्या स्वरूपभेदाप्रमाणें त्याच्या वर्गांत फरक पडतो इतकेंच काय तें. साधु दुसऱ्याच्या हातानें जेऊंखाऊ लागला व सारे विधि बसल्या जागीं करावयास लागला म्हणजे त्याच्या वृत्तीला 'बालवृत्ति' म्हणतात. तो प्रहरन् प्रहर स्वत शी पुटपुटत व हातवारे करीत बसूं

लागला किंवा आपल्या भक्ताना शिव्या देऊन त्यांच्या अंगावर धांवूं लागला व त्याना धोंडे मारूं लागला म्हणजे तो 'उन्मत्त' या नावाच्या वरच्या पायरीला जाऊन पोहोचला असें समजावें परंतु साधुसंताना हिच्याहीपेक्षा उन्न अशी एक पदवी मिळविण्यासारखी असते. त्याची चेष्टा अर्भकाच्या-प्रमाणें केवळ अगतिक किंवा वेड्याच्या प्रमाणें निव्वळ अकारण या सदराखालीं येत नसून अत्यत गलिच्छ किंवा हिडिस असल्यास ती 'पिशाचवृत्ति' या नावानें संबोधण्यांत येतें. अचरटपणात पिशाचाच्या पलीकडचें कृत्य मनुष्याच्या ठायी संभवत नसल्यामुळे साधुसताचे वर्गीकरण येथेंच थाबतें

आमच्या गावाला एका साधूच्या समागमाचा लाभ मिळाला होता. ते एकाच वृत्तीचे अभिमानी नसून प्रसगपरत्वे साऱ्या वृत्तीचे चमत्कार दाखवीत असत. ते बहुधा दिगबरवृत्तीनें रहात. आम्हा दांभिक ससारी मनुष्याप्रमाणे त्यांना लपविण्यासारखें काहीच नसे अर्थात् वस्त्राचें लचाडही बाळगण्याचे त्याना कारण नसे भक्ताना लगोटीचें तीर्थ मिळावें म्हणून त्याचा परिवार कधी कधी त्याना लगोटी नेसवून स्नानाला बसवी व लोकसंग्रहा-करिता म्हणून साधुबोवाही आपल्या स्वातंत्र्यावरील तेवढें दडपण मुकाट्यानें सहन करीत. कधीकधी मात्र त्याच्या स्वैरवृत्तीला तेंही खपलें नाही तर लोकसग्रहाला धाब्यावर बसवून ते लंगोटीचा चोळामोळा करून कोणाला तरी भिरकावून मारीत असत ज्याला ती लागे तो ती अत्यादारानें अनुग्रह म्हणून जपून ठेवी. बाकीच्याची मात्र सपशेल निराशा होई. त्याना आपली तीर्थाची तहान आघाळीच्या वेळी साधूंच्या अंगावरून वाहिलेल्या पाण्यावरच भागवावी लागे. या अवधूतस्थितीबद्दल त्या निःसंग साधूना लाजेचा स्पर्श झालेला कधीही दिसला नाही. आमच्या गावीं एकदा हजारों नंग्या बैराग्याचा तांडा आला होता, तेव्हा त्याजकडे पाहतांना आम्हां मूठभर तमासगिराना आपल्या वस्त्रांची तेवढ्यापुरती लाज वाटावयाला लागली होती. केवळ प्रेक्षकाच्या सख्येचा स्वतःच्या आचरणावर परिणाम होऊं देण्याचा हा नामर्दपणा आमच्या साधुबोवांत कधी दिसला नाही. दर्शन घ्यावयाला आलेल्या सवस्त्र लोकांची त्याच्याभोंवती नेहमी ही खेंच असावयाची; पण त्याना अग झाकून घेण्याची एकदाही इच्छा झाली नाहीं कितीही

इच्छा त्यानी अंगावर पाघरूण घेऊन कधी विफल केली नाही. स्वतःच्या निर्वस्त्रतेमुळे लाजण्याऐवजी ते उलट आमच्याकडे इतके टवकारून पहात, की वस्त्रासारखी ओंगळ वस्तु बाळगिल्याबद्दल आमची आम्हालाच लाज वाटूं लागे स्वच्छतेसबधानें सुद्धा ते अगदी बेपर्वा असत. त्यानी कापल्या केंसांना तेलाचा उपसर्ग कधींही पोचू दिला नाही. यामुळें त्याच्या भोंवतालच्या भक्ताप्रमाणें उवापिसाही त्याच्या डोक्यात गजबजाट करून सोडीत त्यांनी शिकेकाईचा स्वदेशी स्पर्शही आपल्या अंगाला कधी होऊं दिला नाही, मग साबूचा विलायती स्पर्श तर दूरच राहिला. ते स्नान करीत तें फक्त भक्ताना तीर्थाचा पुरवठा करण्याकरिता यामुळें त्याचें तीर्थ कोणत्याही सुगंधी द्रव्यापासून अलिप्त अशा निर्मळ स्थितीतच भक्ताना चाखावयाला सापडे साधुबोवा नेहमी स्वत शी कांही तरी पुटपुटत असत. त्या पुटपुटण्यातील एखादाच शब्द आमच्या तृषार्त कर्णाना ऐकूं येई. पण त्यात शेकडों भक्ताचे एकदम समाधान करण्याचें सामर्थ्य असे जे कोणी मनात प्रश्न योजून येत त्याना त्या शब्दात त्याच्या प्रश्नाचें उत्तर मिळे. जे सकटात बोवाचा सल्ला घेण्याला येत त्याना तो सल्ला त्यात स्पष्टपणे दिसून येई. जे संसारतापानें त्रस्त होऊन त्याच्या परिहारार्थ साधुबोवाचा आश्रय करीत त्याच्या मानसिक पीडेवर तो शब्द थडगार लेपाप्रमाणें परिणाम करी. त्या शब्दाची योजना आपणाकरिताच आहे असें मानिताना भक्ताना अर्थातूच अभिधा, लक्षणा, व्यजना या तिन्ही साधनाचा उपयोग करावा लागे, पण अखेरीला त्यातून त्याच्या मनाप्रमाणे अर्थ निघून त्याच्या श्रमाचे साफल्य होई. साधुबोवाच्या वर्तनावरही एकसमयावच्छेदेंकरून असेच परस्पर-विरोधी अर्थ बसविण्यात येत. बोवांनी जवळच्या इसमाला आपली चिलीम भरण्याला किंवा ओढण्याला सांगितले तर तो मोठा अनुग्रह मानण्यात येई यात नवल नाही, पण त्यांनी ती चिलीम आतील निखाऱ्यासुद्धा एखाद्याच्या तोंडावर फेकून मारिली तरीही त्याला गाल चोळताचोळता त्याबद्दल पोटातून गुदगुल्याच होत अनुग्रहाच्या पूर्वोक्त प्रकारापेक्षा उपरोक्त प्रकाराचाच आस्वाद बहुधा भक्तजनाना मिळत असे. ठीकच आहे, 'स्वातत्र्यापुढे वस्त्राचीही पर्वा न करणाराला भोंवतालीं अष्टौप्रहर आदाळभूताची गर्दी असलेली कशी खपणार!

मी लहाणपणी नेहमी साधुबोवांच्या दर्शनाला जात असे. पण बोवांचा

फारच प्रसाद झाल्यास प्रसगीं उपयोगी पडावा म्हणून. एक जाडसा सोटा बरोबर नेई व मठीच्या दाराजवळच बसें. साधुबोवाकडे रिक्त हस्तानें जाण्याची वहिवाट नसे. मी दर खेपेला भेटीदाखल नारळ किंवा पैसा घेऊन जाई पण त्याच्यासमोर नमस्कार करून तो ठेविताना माझी जी तारांबळ उडे ती माझी मलाच माहीत. एकीकडून निस्सीम भक्ति व दुसरीकडून माराची अमर्याद भीति यांच्या चिमट्यात सापडून साधुबोवाचे तोंड दुसरीकडे फिरलेलें असे तोपर्यंतच नमस्काराचा विधी घाईघाईनें उरकून त्याचा कृपाकटाक्ष मजवर पडण्याची वाट न पाहाता मी निसटत्या पायानें दाराशीं जाऊन दुसऱ्याच्या मागें आपले पापी तोंड लपवीत असे. बोवाचा निस्पृहपणाचा बाणा प्रसिद्ध होता त्याजपुढे ठेविलेला नारळ ते भक्ताच्या डोक्यातील गुरुभक्तीचा ठाव पहाण्यासाठी त्याजवर केव्हा फेंकून मारतील याचा नेम नसे. एकदां स्वारीच्या बावळ्या तोंडावरून ती बालवृत्तीत असावीं असा समज होऊन मी त्याच्या पायाना हात लावण्याचें धाडस केले, इतक्यात त्याच्या पिशाचवृत्तीनें उचल खाऊन त्यांनी माझ्या थोबाडीत इतक्या जोराने भडकावली, की त्याचा वरदहस्त माझ्या गालावर पाची बोटासह दिसू लागला, व दुसऱ्या गालाची काळजी नसती तर मी तिरमिरी येऊन तेथे पडलोंही असतों पण साधुबोवानीं पुन उगारलेला हात दुसऱ्या गालावर उमटण्यापूर्वीच मी बोवांना शतशः धन्यवाद देत तेथून पोबारा केला. त्यापूर्वी नुकताच मी एका परीक्षेला बसलों होतों साधुबोवाचे दर्शन घेण्याकरितां मी गेलों होतों तो तरी परीक्षेचा निकाल काय होतो हें साधल्यास त्याजकडून आगाऊ कळावें याच हेतूनें गेलों होतों. बोवा वर लिहिल्याप्रमाणें मला कडकडून भेटले त्यानतर लवकरच परीक्षेचा निकाल लागला, व तो मला अनुकूल असाच लागला झाले, लागलींच माझ्या मार खाण्याचा परीक्षेच्या निकालाशी सबध लावण्यात आला. तेव्हापासून अनेक आशावादी उमेदवार घरी परीक्षेचा अभ्यास करण्याऐवजी साधुबोवाच्या मठीत त्याच्या हाताकडे गाल करून प्रहरन्प्रहर तिष्ठत बसूं लागले. बोवानींही हाताला माराचे वावडें मानिलें नव्हते. त्याच्या हाताला रोज चार पाच गालाचा खुराक मिळूं लागला. ज्या विद्यार्थ्यांना हाताचा प्रसाद सहजासहजीं मिळत नसे ते बोवाना खिजविण्याकरिता त्याची कुचेष्टाही करीत. असा छळ सुरू झाल्यावर समजस माणूससुद्धा पिसाळून जायचा, मग बालोन्मत्तपिशाच-

वृत्तीचे बोवा काबूब गेल्यास नवल नाही. लवकरच बोवाच्या हाताचा प्रसाद न मिळालेला एकही विद्यार्थी दिसेनासा झाला होतां होता पुढील वर्षाची परीक्षा आली धडे मुखोद्गत करण्यापेक्षा मुखश्री रगवून घेण्यावरच ज्याची विशेष मदार होती ते सारे विद्यार्थी मोठ्या आशेनें परीक्षेला बसले, आणि आश्चर्याची गोष्ट ही, की ते एकूण एक नापास झाले तेव्हा कोठे बोवाच्या माराचे अर्थ अनेक शक्य असतात ही जाणीव त्याना उत्पन्न झाली, आणि यश व मार याजमधील कार्यकारणभाव नाहीसा झाला. तेव्हापासून विद्यार्थ्यांची माराच्या अर्थाबद्दल जिज्ञासा थाबली असें मात्र नाही त्याना ती किंचित् काळ म्हणजे परीक्षेचा निकाल होईपर्यंत थोपवून धरावी लागे इतकेंच काय ते. निकाल झाला म्हणजे तो अर्थ शुभ किंवा अशुभ हे त्याना समजून येई, व तें बोवाच्या त्रिकालज्ञानाचे आश्चर्य करीत घरी जात

हे साधुबोवा मठींतून एकाएकी गुप्त होऊन दुसऱ्या गावातील साधुसताना अचानक दर्शन देत असत मात्र हा चमत्कार ते कोणादेखतही करून दाखवीत नसत असें म्हणतात त्याच्या भोवती अष्टौप्रहर भक्ताचा गराडा पडलेला असे, व त्यापैकीं एकानेंही हा चमत्कार पाहिला नाही, या गोष्टी लक्ष्यात घेतल्यास तें खरेंही असावे असें कबूल करणें भाग आहे

हें मनुष्ययोनींतील साधूसंबंधानें झाले. पण आपले लोक केवळ माणसानाच पक्षपाती आहेत असें नाही साधुत्व कोठेंही दिसलें तरी त्याबद्दल त्याना योग्य आदर वाटल्यावाचून रहात नाही. याचा प्रत्यय त्यानी काही वर्षांपूर्वी एका वृषभसाधूचा [ त्याला साधुवृषभ म्हटलें तरी चालेल ] जो सत्कार केला त्यावरून पूर्णपणें आला. त्याचा मालक अत्यत दरिद्री होता त्याला एके दिवशीं रात्री तो बैल महान् साधु असल्याबद्दल दृष्टान्त झाला. या गोष्टीचा बोभाटा होण्याचाच अवकाश, लागलीच दर्शनेच्छु भक्ताची तिकडे झुड लोटली. साधूच्या पायावर पैशाचा पाऊस पडू लागला. पण धन्य त्या महात्म्याची, कीं तें सर्व द्रव्य त्याला तृणासमान–नव्हे तृणापेक्षाही कमी मोलाचें वाटत असे ! अनेक लक्ष्मीपुत्रानीं त्याजवर भरजरी झुली घातल्या, अनेकानीं त्याच्या शिंगाना सोन्याने मढविलें, कित्येकानी त्याला मोत्याच्या माळा घातल्या, पण त्याने आपल्या पाठीकडे, शिंगाकडे किंवा गळ्याकडे

एकदाही लोभाने पाहिलें असेल तर शपथ ! त्याची निस्पृहता खरोखर मानवी सताच्यापेक्षाही अधिक होती त्याचें दर्शन घेण्याला पुरुषाबरोबर स्त्रियाही येत, पण त्यानें त्याजकडे वाकडा डोळा करून एकदाही पाहिलें नाही. पहिल्यापहिल्यानें तो बसला असतानाच भक्तवृन्द त्याचें दर्शन घेत असे. पण पुढे पुढे त्याच्या अगाखालून जाण्याचा जेव्हा भक्ताचा आग्रह दिसला तेव्हा तो बिचारा चतुष्पाद साधु केवळ लोकोपकारार्थ प्रहरन् प्रहर उभा राहू लागला त्याच्या अगाखालून आपले देह नेऊन अनेक ससारी लोक हा भवसागर तरून गेले. कधीकधी अशा समयीं सत्पात्र पाहून साधुबोवा तीर्थाचाही प्रसाद देत मानवी साधूप्रमाणें ते कधीही पिसाळत नसत. त्यानीं एकदाच काय तो भक्ताला लत्ताप्रहार केला. तो ज्या भक्ताच्या कपाळी बसला, त्याला साधुसमागमाच्या बळावर वैकुठपदही मिळण्याच्या बेतात होते. पण या पातकी जगात त्याला अजून काहीं वर्षे काढावयाची होती, म्हणून इतरानीं त्याच्या डोक्यावर पाणी शिंपडताच तो शुद्धीवर आला तेव्हापासून त्याला साधुबोवाबद्दल इतका आदर वाटावयाला लागला, की आपण त्याच्या चरण धूलीला मुळीच पात्र नाही असें समजून तो अदबीनें त्याच्यापासून चार पावलें दूरच उभा राहू लागला वरील अपघातापासून साधुबोवाना जाड दोरखंडानें बाधण्यात येऊ लागलें पण त्यामुळे इतराना संसारपाशातून मुक्त करण्याचें त्याचें सामर्थ्य अणुमात्र कमी झालें नाही हे साधुबोवा समाधिस्थ झाले तेव्हापासून त्याच्या नावानें प्रतिवर्षी मोठी यात्रा भरत असते. त्याना सतति काय ती एकच–एक गोऱ्हा–होती त्याच्या अंगींही साधुत्व आहे असा दृष्टान्त झाल्याबद्दल मालकानें पुकारा केला. पण आमचे चाणाक्ष लोक अशा थापाना थोडेच बधतात ! त्यानीं गोऱ्ह्याला साधु ठरविण्याऐवजी मालकालाच भोंदू ठरविलें पण साधुसमागमाचा असा अगाध महिमा आहे, कीं तो मालक तेव्हापासून परद्रव्याबद्दल पूर्णपणें निरिच्छ राहूं लागला. गतसाधूबद्दल त्याला इतका आदर वाटे, कीं भक्तानी त्या हुतात्म्यापुढें ठेविलेल्या द्रव्यापैकीं एक कपर्दिकही खर्च करणें त्याच्या अगदीं जिवावर येई.

आमच्या बंडूनानाचा स्वभाव फार श्रद्धाळू असे त्यांना एकदा नुक्ताच समाधिस्थ झालेल्या एका प्रसिद्ध साधूनें स्वप्नात दर्शन देऊन सागितलें, कीं ‘ मी तुला उद्या एका ढेंकणाच्या रूपानें दर्शन देणार आहें, उद्या तुझ्या घरीं

जो सर्वांत मोठा ढेंकूण सापडेल तोच मी असें समज ' बंडूनानानीं उजाडताच घराचीं सारी दारें बंद करून कडेकोट नाकेबंदी केली आतला ढेंकूण बाहेर जाऊं नये व बाहेरचा आत येऊं नये म्हणून त्यानीं दाराना कुलपें ठोकण्यालाही कमी केलें नाहीं. नंतर त्यानीं पलंग, बाजा, पाट, खुर्च्या, मेजें, कपाटें, गाद्या, उश्या, लोड, तक्के वगैरे ढेंकणाचीं सारी आवडती वसतिस्थानें एकत्र केली व साधुबोवाच्या अवताराला शोधण्याचें काम भाविकपणें सुरू केलें. ते चालू असता बंडूनाना अनेकदा सद्गदित होऊन आपले अश्रू पुशीत आणि पुन्हा ते चालू करीत. रात्रीच्या जागरणानें घोरत पडलेले बिचारे ढेंकूण खडबडून जागे झाले व या अचानक पडलेल्या छाप्यापुढें जीव घेऊन पळत सुटले त्यापैकी लहान ढेंकणाचा मोठ्यांशीं घोटाळा होऊं नये म्हणून बंडूनाना त्यावर तडकाफडकी नखाग्राचा प्रयोग करीत. एखादा लठ्ठसा ढेंकूण सापडला, कीं बंडूनाना मस्तक लावून त्याच्या पायां पडण्यासाठी हात पुढें करीत; पण दुसरा एखादा त्याहूनही गलेलठ्ठ सापडला, की भक्तिभाव जागच्या जागी गुडाळून ठेवून त्याच हाताच्या नखानें पहिल्याला चिरडून टाकीत ' आरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टीं'तील शहारियर बादशहा ज्याप्रमाणें रोज सकाळी आदल्या दिवसाच्या शिळ्या बायकोला ठार करून दुसरीशी लग्न करीत असे, त्याप्रमाणें बंडूनाना पळापूर्वी वद्य मानिलेला ढेंकूण वध्य समजून त्याच्या जागी दुसऱ्याची स्थापना करीत एकदां नानानी एका ढेंकणाच्या पायावर मस्तक ठेंगणें केलें, तोंच त्या ढेंकणाचा पायांसुद्धा सारा देह त्या मस्तकाखाली चिरडून त्याच्या रक्ताचा त्या मस्तकावर लाल टिळा उमटला. नानाना अतोनात वाईट वाटलें. पण तें क्षणभरच ! त्याच्यापेक्षा धिप्पाड शरीराचा एक ढेकूण नजरेला पडून नाना त्या चिरडलेल्या ढेंकणाला योग्य प्रायश्चित्त मिळाले म्हणून हर्षानें नाचूं लागले. त्या ढेकणाचें तें रक्त मूळचे वास्तविक त्याच्या स्वतःच्याच शरीरांतील असून त्याचा टिळा लावण्याचा त्याना पूर्ण हक्क होता असो. याप्रमाणें त्या मृत साधूच्या शोधाकरिता नानानी हजारों ढेंकणाचे वध केले. त्याना खून चढल्यासारखा झाला ढेकणाना मारणें म्हणजे पर्यायाने आत्महत्याच आहे हें जाणत असतांही त्यानी त्याचा निःपात करून घर निर्मत्कुण करण्याचा विडाच उचलेला दिसत होता. शेवटी निवड होता होतां

सर्वात जाड असा एक ढेकूण उरला. त्याची नानानीं लागलीच एका कुपीत स्थापना केली. झालेल्या श्रमामुळें म्हणा, किंवा बिछान्यात झोपमोड करणारें कोणी न उरल्यामुळें म्हणा, अथवा हातून घडलेल्या सत्कृत्यामुळें म्हणा, नानाना गादीवर अग टाकताच झोंप लागली, ती दुसऱ्या दिवशी उन्हें वर येत तोंपर्यंत मोडली नाही. एका शेतकऱ्यानें मरते वेळी आपल्या मुलांना शेतात द्रव्य पुरल्याचे खोटेंच सागून त्याजकडून द्रव्याच्या आशेनें सबंध शेत नागरवून काढिले व त्याना खरोखरीच संपन्न केलें, या गोष्टीची येथें आठवण झाल्यावाचून राहात नाही बडूनानाची झोप बऱ्याच दिवसापासून उडाली होती, ती पुनः पूर्ववत् आणण्याची साधुबोवांनी त्या शेतकऱ्याप्रमाणेंच जी शक्कल लढविली, तिजबद्दल त्याना धन्यवाद दिल्यावांचून रहावत नाही. बडूनानाही त्याचे हे उपकार विसरले नाहीत. त्यानी त्या कुपीतल्या ढेंकणाची रोज षोडशोपचारी पूजा करण्याचा क्रम सुरू केला. त्यानी त्याची काकड-आरती, धूपारती व शेजारती एक दिवसही चुकू दिली नाही. त्याला ते जेवणाच्यापूर्वी भक्तिपूर्वक नैवेद्य दाखवीत. पण बडूनानाच्या शेजेवर लोळण्याची व त्याच्याच रक्ताचा घोंट घेण्याची चटक लागलेल्या ढेंकणाचें समाधान कोरड्या शेजारतीवर व दुरून दाखविलेल्या नैवेद्यावर कसें व्हावें? त्यानें अन्नपाणी वर्ज्य केलें, व कृश होत होत थोड्याच दिवसात तो महात्मा समाधिस्थ झाला!

येथपर्यंत नुसत्या निर्बुद्ध व अचरट अशा साधूविषयीच झालें याशिवाय महाबुद्धिमान् व सामर्थ्यवान् अशाही साधूचा एक वर्ग असतो यांना भूतभविष्य वर्तमान कळते, व हे योगबलाने अत्यत आश्चर्यकारक चमत्कार करू शकतात. बडूनानाना ज्या साधूचा स्वप्नांत दृष्टान्त झाल्याबद्दल वर लिहिलें आहे, ते अशाच विभूतींपैकी होते. नानाच्या घरी जर एखादा बैरागी मध्यान्हीं दत्त येऊन उभा राहिला, तर त्याना ते साधूच आपलें सत्त्व पहाण्याकरिता त्या रूपानें आल्यासारखे वाटत या त्यांच्या भाविकपणाचें बक्षीसही त्याना मिळत गेले कारण ते साधू रोजचे रोज मध्यान्हकाळीं कोणा तरी गोसाव्याच्या, बैराग्याच्या किंवा फकिराच्या वेषानें त्यांना दर्शन देऊ लागले. नानांकडून सुग्रास भोजन मिळून ते घराबाहेर पडत न पडत तोंच ते गुप्त होत. 'आपणासारिखे करिती तात्काळ' या न्यायानें त्याच्याबरोबर

अंगणातील वस्तुहि गुप्त होऊं लागल्या शेवटी ही गोष्ट पोलिसाच्या कानांवर जाऊन ते नानाच्या घराभोंवती घिरट्या घालूं लागले तेव्हापासून साधूंनी दर्शन देण्याचें बंद केले, व अंगणातील वस्तुही गुप्त होईनाश्या झाल्या विघ्नसंतोषी पोलिसानी जर मध्यें खो घातला नसता, तर साधूंनी नानाच्या डोईवरील संसाराचा भार बराच उतरला असता यात सशय नाही.

या साधूचे आणखीही काही विस्मयकारक चमत्कार येथे वर्णिल्यावाचून या विषयाली पूर्णता येणार नाही. हे साधू आमच्या गावापासून दोनचारशें कोसाच्या अंतरावर रहात असत पण कधीकधी ते आपल्या प्रेमळ भक्ताच्या घरी रात्री गुप्तपणें येत व कोणाला न कळत स्वैपाकघरातील दुधाचें किंवा लाडवाचें भक्तवात्सल्यपूर्वक सेवन करून पुनः परत जात या चतमकाराच्या वेळीं नानाचा एक गुरुबंधु त्याच्या घरी नसता तर त्याचा मागमूसही कोणाला लागला नसता. या गुरुबधूची निजण्याची सोय नानानी स्वैपाकघराजवळील माजघरात केली होती, व त्याला बिछान्यावर ' पडल्या पडल्या स्वैपाकघरातील सारे प्रकार दिसत असत वरील चमत्कार त्याने ज्या दिवशी रात्री प्रथम पाहिला, त्याच्या दुसऱ्या दिवशी सकाळी त्यानें घडलेला वृत्तान्त आम्हा सर्वांना इत्थभूत सागितला लागलीच आम्ही स्वैपाकघरात जाऊन त्याचा खरेपण पडताळून पाहण्याकरिता दुधाचा गज व लाडवाचा डबा उघडून पाहिला, तों खरोखरच दोन्ही रिकामे दिसले गुरूचें आपणावरील प्रेम पाहून नानाचा कठ सद्गदित झाला त्याच्या गुरुबधूला मात्र गुरूची लीला चोरून पाहण्याबद्दल चागलेंच प्रायश्चित्त मिळालें त्याला त्याच दिवशी अमाशाचा विकार होऊन अथरूण धरावें लागलें व पुन्हा खडखडीत बरा व्हावयाला चागले आठ दहा दिवस लागले. तो दुखण्यातून उठल्यावर लवकरच पुनः तो चमत्कार घडून आला, आणि तो चोरून पाहण्याबद्दल त्याला पुन पूर्वीचेंच शासन झालें मात्र एकदा इशारा मिळाला असता त्यानें हा दुसरा गुन्हा केल्यामुळें त्याला या खेपेला पधरा वीस दिवस अंथरुणाला खिळून पडावें लागलें इतकी अद्दल घडली खरी, पण जित्याची खोड मेल्याशिवाय थोडीच जाणार ! त्यानें यानतरही दोन चार वेळा तोच चमत्कार प्रत्यक्ष पाहिल्याचें नानाना सागितले. मात्र या खेपेला साधुबोवानीं सबध गजाचा व डब्याचा फन्ना उडविला नसून फक्त पेलाभर

दुवावर व दोन चार लाडवावरच पोटाचे समाधान करून घेतलेलें दिसलें मग त्याची त्या गुरुबधूप्रमाणेच शोचनीय अवस्था झाली असल्यास न कळे !

नानाचे गुरु वाटेल तेव्हा वाटेल त्या गावीं नुस्त्या लिंगदेहानें जाऊन तेथील चमत्कार पाहून परत येत, नुस्त्या स्पर्शानें असाध्य रोग बरे करीत, मृताना उठवीत, आगगाडीच्या रुळावर बसून ती भर वेगात असता थाबवीत, केळीच्या पानावर बसून जलप्रवास उरकीत, व आणखीही दुसरे असेच अलौकिक चमत्कार करीत एकदा एका चेष्टेखोर मुलानें त्याजपुढें स्त्रीविषानें जाऊन त्याना नमस्कार केला असता त्यानी त्याला ' अष्टपुत्रा सौभाग्यवती भव ' असा आशीर्वाद देऊन तो खराही करून दाखविला. पण असे चमत्कार लोकासमक्ष करून दाखविल्यास असख्य लोक आपल्या भजनी लागतील व त्याजपासून आपणाला उपसर्ग पोहोंचेल असा विचार करून ते चमत्कार ते कोणाच्याही दृष्टीला पाडीत नसत, व त्याच्या हकीकती आम्हाला त्याच्या किंवा त्याच्या पट्टशिष्याच्या तोंडून ऐकून आपली तहान भागवून घ्यावी लागे लोकाच्या उपसर्गाची त्याना इतकी भीति वाटे, कीं ते त्याना बुजविण्याकरिता त्याच्या समक्ष सुरापानासारखे अनाचारही करीत पण आमचे लोक कसले वस्ताद ! त्यानीं बोवाचें मनोगत ओळखून त्याच्याशी अधिकच लगट चालविली शेवटीं त्याच्या मनात आपणाविषयीं पूर्ण तिरस्कार उत्पन्न करून त्याना दूर ठेवण्याकरिता बोवानीं आपणापाशीं एक फाटकें अंगवस्त्रही बाळगिलें पण त्यानें त्याची दुष्कीर्ति होण्याऐवजीं उलट सुकीर्तिच झाली, आणि त्याच्या [ अंगवस्त्राच्या नव्हे हो ! ] दर्शनाकरिता दूरदूरच्या प्रातातून लोक त्याच्या गावी लोटू लागले कीर्ति ही स्वच्छदी स्त्रियेप्रमाणे आहे असें म्हणतात, तें अगदीं खरे आहे. जे तिची वाछा करितात त्याच्या वाऱ्यालाही ती उभी रहात नाही, उलट जे तिला झिडकारतात त्याना ती एकनिष्ठपणें अनुसरते असाच प्रकार साधुबोवाच्या बाबतीत झाला. जो जों ते आपण साधु नाही असें बिनतोड प्रमाणानी सिद्ध करावयाला जात तों तों साधुत्व त्याना अधिकाधिकच चिकटू लागे. दारूबाजी, अभक्ष्यभक्षण, बाहेरख्यालीपणा यांजबद्दलच्या खोट्या कंड्यानींही मोठमोठ्या पुरुषांचीं चरित्रें मातीमोल झालीं आहेत. पण त्याची घाणेरडीं चिन्हें प्रत्यक्ष लोकाच्या

डोळ्यासमोर असताही त्याच्या घाणीनें साधुबोवाचें चरित्र मलिन होण्याऐवजी साफसूफ होऊन अधिक उज्ज्वल स्वरूपात चमकू लागे. शिवाय चमत्कार न दाखविण्याबद्दल बोवा इतकी सावधगिरी बाळगीत असताही कधी कधी त्याच्या हातून नकळत चमत्कार घडत, त्यानीही त्याच्या कीर्तीत भर पडे. अनेक स्त्रिया पुत्र प्राप्तीसाठी बोवांची वर्ष वर्ष सेवा करीत त्यातील आपल्या प्रसादाला सत्पात्र व अत्यत एकनिष्ठ स्त्रिया निवडून बोवा त्याचे मनोरथ पूर्ण करीत व त्याच्या पतींची नरकातून मुक्तता करीत ज्याचे मनोरथ पूर्ण होत नसत, त्या अर्थात् सत्पात्र व एकनिष्ठ या सदरात येत नाहीत असे समजण्यात येई. बोवासमोर प्रत्येक दिवशीं ज्या ज्या गोष्टी घडत, त्या त्याना दाष्टन्तरूपानें पूर्वींच कळल्याचे ते स्वतःच सागत असत, अर्थात् त्याबद्दल शका घेण्याचे कारणच उरत नसे. ते एकदा एका भक्ताच्या घरी प्रसादाला गेले असता रात्री त्या घरात चोरी झाली, तेव्हा चोरीला गेलेला माल कोणत्या कोपऱ्यात पुरलेला आहे हें सागून त्यानी मालाचा पत्ता लावून दिला, इतकेच नाही, तर तो माल ज्या खळग्यात गाडलेला आढळला तो खळगा चोरानें कोणत्या कुदळीनें खणला होता हेंही त्यानी दाखवून दिले चोरी झाली तेव्हा भक्तवत्सल बोवाचा जागरूक लिंगदेह चोराच्या शरीरात वास्तव्य करीत असला पाहिजे हें उघड आहे पण याहीपेक्षा मोठा चमत्कार त्यानीं एकदा हजारों लोकासमक्ष करून दाखविला एक बाई दर्शनाला आली असता तिची अंगठी बोटातून गळून हरवली त्या गोष्टीचा बोभाट होताच बोवानी ती अंगठी आपल्या गोमुखीतून काढून दाखविली

बोवाना भूतभविष्यवर्तमान अचूकपणें सांगता येत असे हें पूर्वी सागितलेंच आहे मनुष्याच्या चालू जन्मातील गत व भावी गोष्टी ते बहुधा सागत नसत याचे कारण, त्या गोष्टी सामान्य ज्योतिषालाही सांगता येतील असे ते देत. नाहीं म्हणायला 'तुम्हाला लवकरच एका महात्म्याकडून मोक्षप्राप्तीचें साधन मिळणार आहे' अशा तऱ्हेचे महत्त्वाचें भाकीत एखाद्या वेळीं त्याच्या ओठातून निघून जाई मनुष्याच्या मागील व पुढील जन्माचा वृत्तान्त मात्र ते खडानूखडा सागत असत तो वृत्तान्त ऐकताना त्या मनुष्याला तो काळजीपूर्वक टिपून घ्यावा लागे टिपून न घेता त्यानें तो पुनः सागण्याला साधुबोवाना विनंति केली, तर त्याची स्मरणशक्ति

भविष्यकथनशक्तींपेक्षा जरा मंद असल्यामुळें ते ती विनंति साफ अमान्य करीत ते जगाची उत्तरोत्तर प्रगतिच होत आहे या मताचे होते कारण त्यांच्या भक्तांच्या मागील जन्मांच्या हकीकती नेहमीं उदासवाण्या व दु खपूर्ण आणि पुढील जन्मांच्या नेहमी उत्तेजनपर व सुखमय अशाच त्यांच्या मुखातून ऐकण्यात येत त्यांचा प्रत्येक भक्त मागील जन्मीं डुक्कर, गाढव किंवा बैल व पुढील जन्मीं महंत, लक्ष्मीपुत्र किंवा राजा असायचा, आणि मागील जन्मी जितक्या विपुल उकिरड्यात लोळला असेल तितक्याच विपुल ऐश्वर्यात पुढील जन्मीं लोळावयाचा पुढील जन्मातील सुखाच्या आशेवर तो मागील जन्मातील हालअपेष्टा मुकाट्यानें ऐकत बसे जों जों बोवाचा भक्तगण विस्तृत व्हावयास लागला, तो तो मागील जन्मातील पशूंची संख्या वाढायला लागून त्यांच्या आरडाओरडीनें कानठळ्या बसण्याची पाळी आली त्याबरोबरच पुढील जन्मातील ऐश्वर्यवान् पुरुषांची संख्याही इतकी वाढली, कीं त्यांनी परस्परांचें ऐश्वर्य संपुष्टात आणिले 'राज्य' या शब्दाचा अर्थ बोवा मुलांच्या खेळातील 'राज्या'शीं समानार्थक तर समजत नाहींत ना? अशीही पुसटपुसट शंका कांही कुत्सितांना येऊं लागली. साधूंची कुचेष्टा करणाराची मात्र बोवाकडून पुढील जन्मींही पशुयोनींतच योजना करण्यात येई हे नास्तिक कुत्सित सुधारक नसते तर पुढील जन्मी एकही पशु औषधाला मिळाला नसता, व बैलांच्या अभावी गाड्यांना महंत किंवा लक्ष्मीपुत्र जोडण्याचा प्रसंग येऊन ठेपला असता

बोवा स्वत.च्या जन्माची गतपरंपरा देत ती अत्यंत विस्मयकारक असून तिजवरून त्यांना या जन्मी इतका मोठा अधिकार कसा प्राप्त झाला याची नीट संगति लागते रामावतारात ते वशिष्ठ ऋषि असून त्यांनी ऋग्वेदातील अनेक सूक्तें रचिली होती फार वर्षे लोटल्यामुळें ती किंवा त्यांचा अर्थ त्यांना या जन्मीं आठवत नव्हता ही गोष्ट निराळी. पुढें कृष्णावतारात त्यांना गर्गमुनींचा जन्म प्राप्त झाला. पण 'संगीत सौभद्र' नाटकात वर्णिल्याप्रमाणें त्यांनी अर्जुनाच्या सुभद्राहरणाच्या बेताला अनुकूल होऊन असत्याचरण केल्यामुळें त्यांना कपिलाच्या रूपानें पुनः मनुष्यजन्म घ्यावा लागला, परंतु त्यांनी प्रकृतीकडे सर्व कर्तृत्व देऊन पुरुषाला केवळ लंगडा केल्यामुळें त्या दोषाचे प्रायश्चित्त त्यांना शंकराचार्यांचा

जन्म घेऊन भोगावें लागलें. या जन्मात त्यानी मायेचा वरपगडा कर्मा करून ब्रह्माचें वर्चस्व स्थापित केलें खरे, पण योगबलानें मन एकाग्र करून कोणत्याही विषयाचें मर्म जाणण्याचे सामर्थ्य अगीं असता त्यानी गीतेचा अर्थ करिताना त्याचा नीट उपयोग केला नाही, म्हणून त्याना पुढील जन्म ख्रिस्ताचा घेऊन सुळीं जावें लागले हल्लींचे विद्वान् लोक शंकराचार्याना ख्रिस्ताच्या अलिकडे ओढितात. पण ही त्यांची चूक आहे हें बोवाच्या प्रत्यक्ष अनुभवावरून उघड आहे. ख्रिस्तानंतर बोवानी एकनाथमहाराजाचा जन्म घेतला. पण या जन्मात त्याजकडून सुधारकी चाळे झाल्यामुळे त्याना कबीराचा जन्म घेऊन ती चूक निस्तरावी लागली, व त्या दोषाचें पूर्ण परिमार्जन झाल्यामुळें त्याना हल्लीचा ब्राह्मणजन्म पुनः प्राप्त झाला या जन्माच्या अंती त्याना मोक्ष प्राप्त व्हावयाचा होता

बोवा इतके विरक्त खरे, पण त्याचे अंतःकरण जात्याच कनवाळू असल्यामुळें ते पूर्वजन्मीच्या आपल्या पत्नीना विसरले नव्हते एखादी विशेष लावण्यवती तरुणी त्याच्या पाया पडावयाला आली, की लागलीच ती पूर्वजन्मीची पत्नी असल्याबद्दल त्याना अंतर्ज्ञानाने कळे, व ते तिजकडे त्याच भावानें पहावयाला लागत ती या जन्मी परस्त्री आहे या क्षुद्र विचाराने ते तिच्याशी तुसडेपणा करीत नसत. दोन नोंदलेल्या दस्तऐवजामध्ये पूर्वी नोंदलेल्या दस्तऐवजाला अग्रता प्राप्त होते, हे कायद्याचे तत्त्वही त्याना दिव्य दृष्टीनें माहीत असावेसें दिसे. पूर्व जन्मपरिचित व्यक्ति पुढील जन्मी कोणत्या ना कोणत्या तरी निमित्ताने परस्पराकडे आकर्षिल्या जातात हा ठरलेला सिद्धान्त आहे. त्याला अनुसरून कलियुगापासून तों थेट कृतयुगापर्यंतच्या, मनुष्ययोनींतीलच नव्हे तर मर्कटयोनीतीलही झाडून साऱ्या स्त्रिया बोवाच्या दर्शनाला येत असत अशा स्त्रियाना एक एक जन्म बोवासारखे पति लाधले असता त्यानीं मनोभावे हरतालका पुजून तें नातें जन्मोजन्मी कायम करून ठेविलें नाहीं, यावरून त्याना त्याची तितपतच पारख होती हें उघड आहे पण त्याचें हें व्यंग त्याच्या चालू जन्मातील पतीकडून भरून काढण्यात येई. कारण आपली पत्नी कोणत्या तरी जन्मात बोवाची अर्धांगी होती या विचारानें त्याना गुदगुल्या होत अशा साऱ्या स्त्रिया सुंदर व तरुण असत हे वर आलेंच आहे. एकही कुरूप किंवा वृद्ध स्त्री या मानाला पात्र असलेली

दिसली नाही. दिसणार कशी ? अशा महात्म्याच्या समागमात राहिल्यावर कुरूप किंवा वार्द्धक्य स्त्रीच्या सावलीला तरी कशाला उभे राहील ! बोवाना मागील जन्मींच्या पत्नीच आठवतात, पण आईबाप आठवत नाहीत, अशी टीका कधीकधी कुटाळ लोकाच्या तोंडून ऐकूं येई अशा विभूतीना जन्म देणाऱ्या भाग्यशाली व्यक्ति त्याच जन्माच्या शेवटी मोक्ष पावून जन्म-मरणाच्या फेऱ्यातून कायमच्या सुटल्या असल्या पाहिजेत, हा लहानसा विचार सुचण्याइतकीही अक्कल त्याना देवानें दिली नसे, पण बोवासारख्या महात्म्याशी पूर्वजन्मी प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष सबध नसलेल्या मदभाग्याना इतकी सुबुद्धि तरी उत्पन्न कशी व्हावी ! असा सबध असलेल्या भाग्यवंताचा त्याना बोवावर टीका करिताना हेवाही वाटत असला पाहिजे तें भाग्य त्याच्या ललाटीं असते तर त्यानी इतका गिल्ला खास करून सोडिला नसता पण तेंही खात्रीनें सागवत नाही कारण बोवाशीं पूर्वजन्मीचा अप्रत्यक्ष सबध असलेल्या अशा पतीमध्यें एक बहाद्दर असा आढळला, की त्यानें बोवाचें आणि आपल्या स्त्रीचें पूर्वजन्मीचे नाते त्याच्या तोंडून ऐकताच पायातला पायपोस काढून व ‘ हा पायपोस मागील जन्मी तुमचें पागोटें होता ’ असें म्हणून बोवाच्या मस्तकावर फेकून मारिला. पण या अविचाराचे त्याला ताबडतोब योग्य बक्षीस मिळाले ! त्याच्या स्त्रीला बोवानीं आपल्या चरणसेवेंतून ताबडतोब दूर केले, व ‘ तुला पुढील जन्म चाभाराचा येईल ’ असा त्याला शाप दिला ! आपला शिष्य प्रसगीं आपणावर उलटला तरी त्याला टारग्या सुधारकाप्रमाणे पशुयोनीत घालण्याचा निर्दयपणा बोवाच्या हातून होत नसे, याचें हें उत्तम प्रत्यतर आहे !

पूर्वजन्मीच्या पत्नीची एकदा ओळख पटली, कीं तिच्यासंबधानें ज्ञातिनिर्बंधही पाळावयाचे नाहीत असें बोवानीं ठरविलें होतें. त्याच्या जन्मातरपरिचित ज्या पत्नी त्याच्या दर्शनाला येत त्या बहुधा सुवासिनीच असत एकदा एक विधवा कुणबीण आठ दहा महिने त्याच्या सेवेला राहिली होती तिची सेवा घेता घेतां तीही गतजन्मीची बायको असल्याबद्दल बोवांना एक दिवस साक्षात्कार झाला. लागलीच त्यानीं तिच्याशीं आपणाला विवाहरज्जूनीं बद्ध करून घेतलें आणि या रीतीनें मिश्रविवाह व पुनर्विवाह या दोन्ही सुधारणा एकदम अंमलात आणून बोलघेवड्या सुधारकांना

खाली पहावयाला लाविलें यानतर एक महिन्याच्या आतच त्याना या नवपरिणीत वधूपासून दिव्य पुत्ररत्न झाले. ‘आधी येत फूल वृक्षाला। मग येतें फळ तें त्याला’ या नैसर्गिक नियमातील क्रम बोवासारख्या अवतारी पुरुषासबधाने बदलल्यास नवल काय?

---

मुष्टि २७ वी *

## पांडूतात्यांची निर्जळी एकादशी

तारुण्यातील जोरजोरानें सळसळणारें रक्त मद गतीने वाहू लागले म्हणजे देहाच्या इतर क्रियाबरोबर जठराग्नीची क्रियाही मदपणें चालू लागते, कांद्यासारखे वातुळ पदार्थ आपोआप टाकावेसे वाटू लागतात, चतुर्मासाचे व्रत पाळावयाची इच्छा होऊ लागते व एकभुक्त रहाणे सहज घडू लागते तारुण्यात दात शाबूत असताही घासामागून घास गिळणारा मनुष्य वयस्क झाला म्हणजे हलणाऱ्या दाताकरवी सुद्धा चर्वणाची सक्त मजुरी करून घेतो तारुण्यात आजाराशिवाय सुंठेची व साबुदाण्याची आठवण न करणाऱ्या इसमास म्हातारपणी केवळ शरीरस्वास्थ्याकरिता त्याचा आश्रय करावा लागतो.

भुक्त आयुष्य वाढत जाऊन भोग्य आयुष्य कमी कमी होत जाते, तसतशी धर्मावरील श्रद्धाही वाढत जाते तारुण्यात विषयोपभोगच नावीन्यामुळे प्रिय वाटतात, व धर्माचा विचार करण्यास अजून पुष्कळ सवड आहे अशी खात्री असते, म्हणून त्या वयात मनुष्य नास्तिक नसला तरी धर्माविषयी उदासीन असतो पण भोगामुळे विषयांवरील आसक्ति कमी होऊं लागली व उर्वरित आयुष्य सपुष्टात येऊ लागलें म्हणजे ईश्वराची आठवण व्हावयास लागते ‘आपण आजपर्यंत परलोकाची उपेक्षा केली खरी, पण तो लोक खरोखरच अस्तित्वात असल्यास तेथे आपल्या आजपर्यंतच्या धर्मबाह्य वर्तनाबद्दल नरकात लोळण्याचा किंवा तापलेल्या कढईत होरपळण्याचा प्रसंग आल्यावाचून रहाणार नाहीं देवास वाहिलेल्या एका फुलानें जर नरकाची दुर्गंधी व त्याजवर शिंपडलेल्या चंदनाच्या एका

---

* उद्यान, संक्रान्त-अंक [ जानेवारी सन १९१७ ]

शिडकावाने जर कढईची धग टळण्यासारखी आहे तर ती केवळ सुस्तीमुळे न टाळण्यात मतलब काय आहे?' असे विचार डोकावू लागतात. हे विचार मनात आले, की ते कायमचेच पाहुणे होऊन बसतात. तारुण्यातील वर्तन ज्या मानाने उच्छृंखल, त्या मानानें त्या विचाराची तीव्रता असते. भरज्वानीत शिवीशिवाय देवाचे नाव न घेणारा नास्तिक राम म्हणण्याची वेळ जवळ येऊन ठेपली म्हणजे उठल्यासुटल्या देवाच्या शपथा घेऊ लागतो, धर्माची टवाळी करणारा हुच त्याचा अभिमानी व पुरस्कर्ता होतो; फार काय, मूर्तिपूजेचा जोराने निषेध करणारा निंदकही स्वतःच सगुण उपासनेची मूर्ति बनून त्रिकाळ देवपूजेंत मग्न झालेला दिसू लागतो. देवाज्ञा होण्याचा समय येऊन पोहोचण्यापूर्वी देवाच्या कल्पनेची छाया मनुष्याच्या मनावर आपोआप पसरत जाते

उत्तरवयातील खाण्यापिण्यावरील अनासक्ति व देवधर्मावरील वाढती श्रद्धा याचाच सयोग होऊन चातुर्मास्य, एकादशी, शिवरात्र ही व्रते उत्पन्न झाली असावीत चातुर्मास्यात फक्त पचण्यास कठिण असे कांदे, वांगीं वगैरे पदार्थच निषिद्ध मानण्यात आले पण एकादशीशिवरात्रीसारख्या दिवशी अन्नसेवन करण्याचाच – व व्रत कडकडीत पाळावयाचे असल्यास जलसेवन करण्याचाही – निषेध करण्यात आला हळूहळू ही व्रतें म्हाताऱ्याकोताऱ्या-प्रमाणे तरण्याताठ्यांच्याही मार्गे लागून मूळच्या उद्देशाचा लोप झाला, आणि कदफलाच्या आहारास निराहार आणि हळदीनें पिंवळा झालेल्या भाताच्या व दूध घालून केलेल्या दशमीच्या सेवनास फलाहार या सज्ञा प्राप्त होऊन त्याच्या निऱ्हार व फराळ या अपभ्रंशामुळें तर त्या सज्ञांचा विसंगतपणाही भासेनासा झाला. म्हाताऱ्याची व्रते याप्रमाणें तरण्याच्या वाट्यास आल्यापासून त्यानी त्यात आपल्या वयोमानास अनुसरून अनेक फेरफार केले आहेत. पूर्वी जें बंधन होतें त्यास आता सवलतीचें स्वरूप आले आहे. पूर्वी व्रत पाळणाऱ्या माणसाला एखादें फळ खातानाही लाज वाटत असे, पण आता केळ्याचे सबंध घड राजरोसपणे फन्ना होऊं लागले आहेत. रताळीं, बटाटे, पेरू इत्यादि कदफळें शीघ्र गतीनें धार्मिक उंदराचा ठाव पाहूं लागलीं आहेत ती खाताना चावण्याचा व चघळण्याचा शिष्टाचार तरी करावा लागतो, पण दूध, साबूदाण्याची लापशी यांस त्याचेंही कारण.

नसल्यामुळें त्यांच्या वाट्याच्या वाट्या एका दमासरशा उडविण्यात येतात. वाट्याच्यापेक्षा घशाचा आकार चिंचोळा असतो म्हणून नाइलाज होतो; नाही तर त्यासही पोटात स्थान देण्यास आमच्या उदारहृदय तरुणानीं कमी केले नसतें. पूर्वी वृद्धानी उपवासाचे दिवशी ज्या खाद्य पदार्थास शत्रुवत लेखिलें, त्यास त्याचे तरुण वंशज तसें लेखूनच थाबत नाहीत, तर त्याचा क्षणार्धांत फडशाही पाडतात नवे नवे जिन्नस खाण्यास लालचावलेल्या जिभेचे डोहाळे पुरविण्याकरिता प्रत्येक उपवासास नवान नवीन पक्वान्नें तयार करण्यांत येतात वऱ्याचे तादूळ, भुइमुगाच्या दाण्याची आमटी, रताळ्याचा कीस व शिंगाड्याचे थालीपीठ ही जुन्या माणसाच्याही परिचयाची असत. पण साबूदाण्याची खिचडी, शिंगाड्याचा व साबूदाण्याचा शिरा, बटाट्याच्या व कच्च्या केळ्याच्या पुऱ्या, बटाट्याची व शिंगाड्याची भजी, साबूदाण्याच्या पापड्या, कुरड्या, चिकोड्या व चिवडा, रताळ्याच्या पाकविलेल्या चकत्या, श्रीखंडाच्या व नारळाच्या वड्या, भगरीचा साखरभात, दाण्याचे, शिंगाड्याच्या पिठाचे, भगरीचे व साबूदाण्याचे लाडू, तवकिलाच्या व शिंगाड्याच्या जिलब्या, रताळ्याच्या फेण्या हीं मात्र नव्या नव्या चोचल्याचींच अपत्यें होत. ज्याप्रमाणे पचमहाभूतातून सर्व सृष्टि उत्पन्न होते, त्याप्रमाणे भगर, साबूदाणा, शिंगाडे, रताळी, भुइमुगाचे दाणे व बटाटे यासारख्या मोजक्या पदार्थांतून फराळाचे वाटेल तें साहित्य तयार होऊ लागलें आहे अलीकडे तर उपवासाच्या दिवशी म्हाताऱ्या बायाचें सुद्धा चहाकाफीवाचून अडू लागलें आहे. तीं पेयें परदेशी आहेत हा त्यासबधानें मोठासा आक्षेप मानण्यात येत नाहीं. कारण बटाटेही परदेशी असता त्यास उपवासाच्या दिवशी मानाचें स्थान मिळाले आहे. शिवाय त्या पेयास पावित्र्य यावें म्हणून गोमातेच्या रक्ताने माखलेली व त्यास शुद्धता यावी म्हणून अस्थिचूर्णाने शुद्ध केलेली परदेशी साखर वापरली म्हणजे त्यात आक्षेपार्ह असें कांहींच रहात नाही पूर्वी मुखशुद्धि पाढऱ्या सुपारीवर भागत असे, पण आता लवगावेलदोड्याशिवाय चालत नाहीं. पूर्वी शिवरात्रीच्या दिवशीं शभूची फार आवडती वल्लि म्हणून शांभवीचें सेवन केवळ प्रसादापुरतें होत असावें, पण उपासतापास तरुणाच्या तावडीत सापडल्यापासून भंगटपणा हें त्याचें प्रमुख अग बनलें, व आतां तर

भाग घोटण्यात त्या तरुणाचा प्रहर प्रहर खर्ची पडत असतो. भागेनें तारवटलेले डोळे गरगर फिरवीत धर्माभिमानी तरुणाचा घोळका जुन्या वहिवाटीप्रमाणें जेव्हा शंकराच्या दर्शनाकरिता देवळोदेवळीं फिरू लागतो व भाविक तरुणीस पाहून पावलोपावलीं थबकू लागतो, तेव्हा त्या तरुणींचा थरकाप होऊन ' **जटा नेयं वेणी** ' असे उद्गार काढण्याचेंही त्यास भान रहात नाही शिवरात्रीस घ्यावयाची भाग एकादशीस सेवन करिताना कट्टा वैष्णवही शिवभक्त बनत असतो. रात्रीं ईशनामाचा सारखा गजर व्हावा म्हणून पूर्वी जागरण करण्याचा नियम असे, व एखादे वेळीं करमणुकीसाठीं खेळ खेळण्यात आलाच तर मोक्षपटाचा खेळ खेळण्यात येई. पण अलीकडे त्या जागरणाचा सोंगट्या खेळून ठोकाठोकी करण्यात किंवा पत्ते खेळून राजाराणीचीं लग्ने लावण्यात उपयोग करण्यात येतो सारांश, लहान मुले फाल्गुनाच्या महिन्याची ज्या आतुरतेनें वाट पहातात, त्याच आतुरतेनें तरुण धर्माभिमानी उपवासाची वाट पहात असतात असें म्हणण्यास हरकत नाही.

मी, बंडूनाना व पांडूतात्या यांची मोठेपणातल्याइतकीच लहानपणींही गट्टी असे आम्हा त्रिवर्गाचे वडील फार धर्मनिष्ठ असत. त्यांनी आम्हास मुंजीच्या पूर्वीपासूनच संध्या, पुरुषसूक्त, सौर, पवमान, रुद्र, पूजा, वैश्वदेव यांची संथा दिलेली होती माझें डोकें किंचित् जड असल्यामुळे शेंडी जोराने हलविल्याशिवाय त्यास तरळपणा येत नसे पांडूतात्याचें डोके माझ्यापेक्षा कमी तरळ असून शिवाय त्यास झोंपेची संवय होती. आम्हास संथा मिळे ती मोठ्या पहाटेसच मिळत असल्यामुळें आणि ती वेळ पांडूतात्याची साखरझोंपेची असल्यामुळे शेंडी न हलवितांच त्याचें डोकें खालीं वर झुकत असे. पण त्याबरोबर शब्द उमटत नाहींत हें पाहून त्याची शेंडी जोरानें ओढण्यात येत असे या संथेचा परिणाम डोक्याच्या आत मात्र फारसा होत नसे या जुलमानें जे थोडे शब्द आमच्या डोक्यात नाखुषीनें प्रवेश करीत, ते संथा बंद होताच आमच्या परवानगीची वाट न पाहता आपोआप डोक्याबाहेर निघून जात. पाठ केलेले मंत्र अजून मुखोद्गत आहेत हे दाखविण्याकरिता आम्ही आंघोळीनंतर बराच वेळ पुटपुट करीत बसत होतो व तें पुटपुटणे खरे वाटावे म्हणून आचमन, मार्जन, चुटक्या, टाळया यांची बतावणी करण्यासही चुकत नव्हतों या

कवाइतीचा आमच्या धार्मिक समजुतींस शिस्त लावण्याच्या कामी जरी कांहीं उपयोग झाला नाहीं, तरी ती आमच्या वडिलांच्या मनात आमच्या बाडगेपणाबद्दल डोकावूं लागणाऱ्या असंख्य संशयांची फौज पिटाळून लावी हें मात्र खरें. या जुलमाच्या रामरामाचा असा परिणाम झाला, की आमची प्रवृत्ति आमच्या वडिलास पसंत नसलेल्या धर्मबाह्य वर्तनाकडे होऊं लागली. वडिलाचा सोंवळ्याओंवळ्यावर फार कटाक्ष असे. आम्ही सोंवळ्यात असतांना त्यांच्यादेखत सुतावर पाय न पडेल अशा रीतीने टणाटण उड्या मारीत चालत असूं, पण त्याची पाठ फिरल्याबरोबर बैठकीवर धिंगाणा घालून व स्वैपाकात शिवाशिव करून साऱ्या घरात विटाळ कालवीत असूं. सध्या करिताना आमच्यावरं वडिलांचा डोळा असे तोंपर्यंत आम्ही आपले चेहरे जितके गंभीर ठेववतील तितके ठेवीत असू, पण त्यानी जपासाठीं डोळे मिटताच आमच्या भावडास वाकोल्या दाखवीत असू ताटे वाढून होत तोंपर्यंत त्याजकडे न पाहता शून्य दृष्टीनें आकाशाकडे तद्री लावून बसत असू, पण वडिलानीं नैवेद्य दाखविण्याकरिता डोळे मिटले, की दुसऱ्याच्या ताटांतले पदार्थ आपल्या ताटात किंवा आपल्या ताटातले पदार्थ तोंडात टाकीत असू आमच्या वडिलाना कांद्याची भारी चीड असे घरात कांद्याचा पदार्थ कधीही करावयाचा नाहीं अशी त्यानी सक्त ताकीद देऊन ठेविली होती पण आम्हापैकी प्रत्येकजण, दर दोन चार महिन्यानीं, वडील बाहेर गेल्याची संधि साधून आपल्या आईच्या मागें लागून तिजकडून मधल्या वेळीं कांद्याचे थालीपीठ, पिठलें किंवा भजीं करवीत असे आणि घरात कांद्याची घाण राहू नये म्हणून चोहोंकडे उदबत्त्या लावून, व तोंडास घाण येऊ नये म्हणून वेलदोडे खाऊन वडील परत येण्याच्या सुमाराला पोथीची पानें चाळीत बसे ते संध्याकाळी परत आले म्हणजे साऱ्या घरात सुवास कोंदलेला पाहून त्यास चिरजीव देवपूजेत मग्न होते असें वाटे, व त्या धर्मश्रद्धेचें ते कौतुक करीत त्याच्याजवळ तोंड नेल्यास तोंडाच्या भपकाऱ्यानें त्यास आपलें पाप उमगून येईल या भीतीनें चिरजीव त्याजपाशी न जाता अदबीनें दूरच उभे रहात या त्याच्या मर्यादेबद्दल वडिलास अर्थात्च संतोष वाटे.

एकादशीच्या किंवा शिवरात्रीच्या दिवशीं आमच्या घरी खाण्याचे तीन प्रकार होत. लहान मुलांकरिता रोजचे साधें जेवण, आजाऱ्याकरिता

ान्य-फराळ व इतरांकरिता निरशनाचा फराळ. आम्ही या तिन्ही पंक्ती ाधून तिन्ही प्रकारच्या खाद्यास यथाशक्ति हातभार लावीत असूं आमचे ाडील अन्नाचा कण किंवा पाण्याचा थेंब न घेता कडक उपोषण करीत मसत. त्याजकडे फिरकण्याची मात्र सोय नसे. कारण त्या दिवशी त्यांचें पेत्त भडकून जात असे, आणि ते रागावण्याकरिता निमित्ताचीच वाट पहात मसत. अशा वेळीं त्याजकडे जाणें आणि भुकेलेल्या सिंहाच्या गुहेंत जाणें ्कच होतें. एका एकादशीस मी बाबासमोर गेलों असता मला ढेंकर माली. आपल्या पोटांत कावळे काव काव करीत असता, हीं पोरें खुशाल ढेंकरा देत आहेत हें पाहून बाबाना इतका राग आला, कीं त्यानीं त्याच्या भरांत हातांतली पचपात्रीच मला फेंकून मारली. थोडक्यांत चुकलं, जर का ती पचपात्री माझ्या डोक्यात बसली असती, तर माझा कपाळमोक्ष होऊन एकादशीच्या दिवशी मरण आल्यामुळे मला इच्छेविरुद्ध वैकुंठवास घडला असता. असो, हा प्रकार घडला त्याच वेळी पाडूतात्याचे घरी त्याजवरही तशीच आपत्ति ओढवली होती. तात्यांचे वडील देवपूजेस बसले असताना त्यास उपोषणाच्या ग्लानीमुळें कापराच्या डबीचें झाकणच उघडेना त्यानीं आपली पराकाष्ठा करून पाहिली. दातओंठ चाविले, डबी सर्व बाजूनी जमिनीवर आपटून पाहिली, पण झाकण उघडेना ते पाहून तात्यास किंचित् हसू आलें. झालें, तात्याच्या वडिलांचा भडका उडाला! त्यानी ती डबी तात्याच्या डोक्यावर भिरकावून मारिली त्यासरसे त्या डबीचें झाकण निघून आतील कापूर चारी बाजूस उधळला, व त्या डबीस तात्याच्या टणक डोक्याच्या स्पर्शाने एक पोंचाही आला. अशा रीतीनें रागाच्या भिरिरीत घरातले जिन्नस फेंकीत गेल्यास ते सारे फुटतील किंवा खराब होतील असा तात्याच्या वडिलानीं पोक्त विचार केला, व तेव्हांपासून ते घरातील जिनसावर राग काढीनातसे झाले. रागाच्या सपाट्यात त्यानीं जर कोणास एखादी वस्तू फेंकून मारिलीच तर ती शेजाऱ्याच्या घरून आधीं मागून आणिलेली असे. सुविचारानें रागाला आळा बसतो तो असा.॥

त्या एकादशीची पुढील प्रत्येक एकादशीस मला आठवण होत आली आहे तिची आठवण झाली म्हणजे कंठ सद्गदित होतो, अंगावर रोमाच उभे रहातात व त्या दिवशीं आपण वैकुंठसुखाच्या किती जवळ गेलों होतों याचा विचार येऊन डोळ्यांत अश्रू उभे राहातात.

बंडूनानाचेही वडील मनस्वी रागीट होते. पण त्यांचा राग जरा निराळ्या प्रकारचा होता ते रागाच्या आवेशात स्वतःच्याच जिवास त्रास करून घेत. त्याचें कोणाशीं भांडण झालें म्हणजे ते अन्नपाणी वर्ज्य करीत व आपल्याच तोंडात फडाफड मारून घेत रागाच्या सपाट्यात त्याना सजीवनिर्जीव हा भेदही कळत नसे एका निरशनाचे दिवशीं जिना उतरत असता त्याचा ग्लानीमुळें झोंक जाऊन ते जिन्यावरून खालीं पडले. त्यामुळें त्याना त्या जिन्याचा इतका राग आला, कीं ते पाच दहा वेळा जिन्यावर चढून त्यावरून तितक्याच वेळा मुद्दाम खाली पडले. दर खेपेस पडताना ते जिन्यास उद्देशून 'तू मला पाडच किती वेळा पाडतोस तो!' असें पुटपुटत होते. या आततायीपणामुळे जिन्याची खोड किती मोडली असेल ती असो, नानाचे वडील मात्र हाडें मोडल्यामुळे एक महिनाभर अथरुणावर पडून होते.

आम्हा त्रिवर्गांचे वडील ज्या दिवशीं निर्जळी एकादशी करीत, त्या दिवशीं त्याच्या घरातील इतर सर्व मंडळीच्याही तोंडचे पाणी पळून जात असे. त्या तिघास त्या एकादशीमुळें काय पुण्य लागत असेल ते लागो; घरातील मंडळीस मात्र आपलें मागील जन्मींचें पाप उभे राहिले असें वाटे. ही धास्ती दुसरे दिवशीं त्याची द्वादशी सुटेपर्यंत टिकत असे. त्याच्या पोटात पोळी व खीर गेली म्हणजे त्याना आपल्या आधल्या दिवशीच्या शीघ्रकोपीपणाबद्दल पश्चात्ताप होई गोड शब्दापेक्षा गोड पक्वान्नानीच रागाचें खरें सांत्वन होतें, यास याहून निराळ्या पुराव्याची काय जरूर आहे? हा त्याचा पश्चात्ताप पुढील एकादशीपर्यंत [ मध्यंतरी कोणताही उपास न घडल्यास ] टिकतही असे.

याप्रमाणें लहानपणीं निर्जळी एकादशीचा आमच्या मनास वचक बसल्यामुळें आम्ही मोठेपणीं तिचे नाव टाकिले यात नवल नाही. एकादशीतलें त्याज्य अंग याप्रमाणे टाकिल्यावर बाकीचीं अंगें आम्ही भक्तिपूर्वक पाळीत असतों. मला गोड व बंडूनानास तिखटमिठाचे पदार्थ फार आवडत असतात. मीं लापशीचा व त्यानीं दाण्याच्या आमटीचा भुरका मारिला, कीं एकादशीचा वैकुंठसुखाशीं किती संबंध आहे याचा आम्हाला प्रत्यक्ष अनुभव येतो. खरोखर अशीं गोड व्रतें आमच्या धर्मांत

आहेत म्हणूनच भाविकांकडून त्याचें पालन योग्य प्रकारें होत असतें. साबूदाण्याच्या लापशीबद्दल कोयनेलच्या गोळ्या व दाण्यांच्या आमटीबद्दल काडेचिराइताचा काढा घेतला पाहिजे असा जर उद्या शंकराचार्यांनीं नियम केला, तर बहुतेक सारे भाविक लोक वैकुंठसुखावर लाथ माण्याला तयार होतील यांत संशय नाहीं एकादशीशिवरात्रीच्या व्रताच्या तोडीचें मधुर व्रत म्हटलें म्हणजे सत्यनारायणाचें. साधुवाणी कैदेंत पडल्याची व त्याचा जावई बुडाल्याची कथा मीं शेकडों वेळा ऐकिली असेल, पण ती ऐकण्याचा मला कधींच कंटाळा आला नाहीं. सध्येच्या पळीभर प्रसादाप्रीत्यर्थ मी आणखीही शेकडों वेळा साधुवाण्यास तुरुंगात ढकलण्यास व त्याच्या जावयास जलसमाधि देण्यास एका पायावर तयार असतों. गावात कोठेंही सत्यनारायण असो, मी तेथे भटजी येण्यापूर्वींच जाऊन बसत असतो, व सारी मडळी घरोघर परत जाईपर्यंत थाबत असतों सत्यनारायणावर माझी इतकी भक्ति जडली आहे, कीं त्याचा प्रसाद साजूक तूप व केळीं घालून धर्मोक्त विधीनें तयार केला असल्यास तो किती खाऊ व किती न खाऊ असें मला होऊन जातें. सत्यनारायणास आमत्रणाची जरूर नसते ही एक त्यात इतर व्रतांहून विशेष वाखाणण्यासारखी बाब आहे एकादशीप्रमाणे द्वादशीसही चमचमीत खावयास मिळतें, हा त्या व्रताचाही एक प्रशसनीय प्रकार आहे.

पाडूतात्याची आवड आमच्याप्रमाणे मर्यादित नाहीं. पदार्थ गोड असो अगर तिखटमिठाचा असो, कच्चा असो किंवा शिजलेला असो, खाद्य असो वा पेय असो, त्याला तात्याच्या उदार पोटात ठाव मिळाला नाहीं असे कधीही झाले नाहीं पहिल्यापहिल्याने ते आपल्या भक्तिभावाची तलफ सोललेले बटाटे, केळी व रताळीं, भुइमुगाचे भाजलेले दाणे अशा कच्च्या मालावरच भागवीत असत. याचा अर्थ त्याची बायको सुग्रण नव्हती असा मात्र घ्यावयाचा नाहीं पाकशास्त्रात तिचा हात धरणारी साऱ्या गावात दुसरी बाई नव्हती. पण पाडूतात्या उपासाच्या दिवशी सकाळपासून स्वैपाकघरात येरझारा घालून कच्च्या मालाचा पक्का माल करण्यास तेला सवडच देईनात, त्याला त्या बिचारीनें तरी काय करावे ? शेवटीं तिनें एक शक्कल काढिली सर्व प्रकारचा कच्चा माल एका मोठ्या टोपल्यात

घालून तो ती बैठकींत प्रात:काळींच नेऊन ठेवूं लागली. तात्यांसारखा धिमा पुरुष तोच. कारण, असें होऊं लागल्यापासून त्यांची स्वारी फराळाच्या वेळेपर्यंत स्वैपाकघराकडे फिरकेनाशी झाली. नेहमीं आठ वाजता उठणारे तात्या या वेळेपासून उपोषणाचे दिवशी प्रातःकाळीं पाच वाजता उठून तयार होऊं लागले, इतकी त्यांची त्या दिवशींच्या नैमित्तिक कर्माबद्दल दक्षता वाढली. त्यांचा स्वभाव किती अल्पसंतोषी आहे याची अटकळ ते कच्च्या मालाच्या टोपलींतील उसांचे कर्वे, भुईमुगाच्या शेंगा वगैरे साहित्य चोयट्या, सालपटे यांसकट खात नाहींत या एकाच गोष्टीवरून करिता येईल. आहारात इतका माफकपणा ठेविल्यावर त्याना फराळाच्या वेळीं सडकून भूक लागते यांत काही नवल नाहीं त्याची कुशल पत्नी बटाटे, शिंगाडे यासारख्या साध्या पदार्थांतून जीं परोपरीची पक्कान्नें करिते त्यापैकीं एकाचाहि अनादर तात्याकडून कधीं होत नाही प्रत्येक पक्कान्नाची निराळी लज्जत घेत सावकाश फराळ करण्यास त्यास मुळींच फुरसत नसते. भगर, आमटी, लापशी, भजीं, शिरा, लाडू, तिखट, चटणी, दही, दूध याचा एकच काला करून ते त्या सर्वांस एकदम गति देतात. पोटात गेल्यावर हे सारे पदार्थ एक होणार आहेतच, मग आधी होण्यांत बिघडलें कोठें, अशी त्याची यासंबधानें विचारसरणी असते. त्याच्या फराळाच्या वेळी मी जवळ बसलेला असल्यास त्यांचें तें खाणें पाहूनच माझी तृप्ति होते, व मला ढेंकर यावयास लागतात. बरें, फराळाच्या वेळीं पाडूतात्याचें लक्ष केवळ आपल्याच पानाकडे असतें असेंही नाहीं. त्याना आपलपोटेपणाचा गंधही नाहीं. त्याच्या जवळच त्याचीं मुलें भातपिठलें खात असतात, त्याच्या पानाकडेही या पुत्रवत्सल पित्याचें लक्ष असतें. या दिवशीं त्याना पुत्रप्रेमाचें इतकें भरतें येतें, कीं फराळ होताच शितानीं व पिठल्यानें बरबटलेल्या मुलाच्या तोडाचें ते मोठ्या प्रेमानें चुबन घेतात त्या शिताचा व पिठल्याचा स्वाद घेण्यासाठी हा सारा उमाळा असतो असें कुत्सित लोक खुशाल म्हणोत तात्यांच्या पोटात एका शितासही जागा नसते या एका गोष्टीनेंच त्यांचें खंडन होण्यासारखें आहे आमच्या वडिलाची उपासामुळें जशी प्राणान्तिक अवस्था होई, तशी पाडूतात्याची फराळामुळें होत असते. त्याच्या पोटास तिडका लागत असतात त्याचें मरण एकादशी-

शेवरात्रीसारख्या उपोषणाच्या दिवशींच घडून त्यास वैकुंठाची किंवा कैलासाची प्राप्ति होणार याबद्दल मला मुळींच संशय वाटत नाहीं. इतक्या एकनिष्ठतेने परलोकसाधन करणारा दुसरा सत्पुरुष विरळाच सापडावयाचा. तात्या फराळाचें इतकें खातात, परंतु [ रूढ अर्थाहून किंचित् निराळ्या अर्थानें ] निर्जळी उपवास करण्याचा त्याचा निर्धार असल्यामुळें ते पाण्याचा एक थेंबही सेवन करीत नाहीत. पाणी पिण्याचा मोह होऊ नये म्हणून ते आपले पोट इतके काटोकाठ भरतात, कीं त्यात पाण्याच्या बिंदूसही जागा रहात नाही. फार काय, पण ते फराळानंतर अन्नपचनासाठी जी सुंठसाखर घेत असतात तीही त्याच्या घशाखालीं मोठ्या मुष्किलीनें उतरते. या सुंठसाखरेनें मात्र पोट लवकरच रिकामे होतें त्याबरोबरच पाण्याचा घोट घेण्याचीही इच्छा होईल या भीतीने तात्या पोटात झालेला खळगा पुनः पूर्वीप्रमाणेंच खाद्यानी भरून काढितात. याप्रमाणें त्याचें दिवसभर चालतें. दुसऱ्या दिवशीं उपवासाचें पारणे फेडण्याची इतर घरीं पहाटे-पासूनच धांदल चालली असते. पण आमचे विरक्त तात्या सकाळी झालेले लाडू पचत तोंपर्यंत पारण्याच्या बासुदी पुरीस शिवत देखील नाहीत. वृद्ध त्याची पत्नी उपास सोडण्यास अधीर झालेली असते. कारण, आधल्या दिवशी तात्यानीं फराळापैकीं एक कणही तिच्या वाट्याला उरू न दिल्याकारणानें व अनशेपोटीं पाणी न पिण्याचा तिचा नियम असल्यामुळें तिला कडकडीत व निर्जल उपोषण घडलेले असतें. सबब तात्या जेवावयास केव्हां उठतात याकडे तिचे डोळे लागलेले असतात याप्रमाणें स्वतःस व अर्धांगीस निर्जळी एकादशी घडवून आणणाऱ्या पुण्यशाली तात्याचें पोट उपासाच्या दिवशीं फुटून जेव्हा त्याचा अंतकाळ येईल व त्याना सदेह वैकुंठी न्यावयास विमान खाली उतरेल त्या वेळीं, त्याना सदेह नेण्याचा विष्णुदूताचा विचार त्याच्या देहदर्शनानें न डळमळल्यास, तात्या आपल्या मित्रास विसरतील हे शक्य नाहीं त्याच्या विमानाच्या एका टोंकास मी व दुसऱ्या टोंकास बंड्नाना लोंबकळून त्याच्या बरोबर जाऊ लागल्यास ते आम्हास मज्जाव करणार नाहीत अशी खात्री आहे.

———

मुष्टि २८ वी *

# मरणोत्तर

' मानवी जीविताला रंगभूमीची उपमा देण्यात येते ती किती तरी सार्थ आहे! या लाक्षणिक रंगभूमीवर बरीं वाईट कामे करून मनुष्य मृत्युरूपी पडद्याच्या आत अंतर्धान पावतो, तो पुन्हा म्हणून दिसत नाही. वास्तविक रंगभूमीवरील नटांना सुद्धा पुढील पडदा किंचित् बाजूला सारून आतून प्रेक्षकाकडे पहाण्याची सक्त मनाई असते तथापि तिला न जुमानता एखादा नट प्रेक्षकांची संख्या अजमावण्याकरिता किंवा त्यांत आपल्या परिचयाचें कोणी आहे कीं काय हें पहाण्याकरिता पडद्याच्या फटीतून बाहेर पाहतोच नाटकमंडळीच्या परिचयातला एखादा प्रेक्षकही पडद्याच्या आत गेल्यास आपलें पडद्यामागील अस्तित्व इतर प्रेक्षकास जाहीर करण्याकरिता मुद्दाम पडदा किलकिला करून आपल्या तोंडाचे प्रदर्शन करितो पण मृत्युरूप पडद्यामागे गेलेला कोणताही इसम प्रेक्षकांची तोंडें पहाण्याकरिता किंवा स्वतःचें तोंड दाखविण्याकरिता त्याच्या फटींतून पाहताना दिसत नाही याप्रमाणे आत्म्याच्या मरणोत्तर स्थितीबद्दल ज्ञान करून घेण्याचें एकही साधन नसल्यामुळे तिच्यासंबंधानें तर्कावरच भिस्त ठेवणे भाग पडते. त्या स्थितीविषयीं भिन्नभिन्न धर्मांनी भिन्नभिन्न विधानें केलीं आहेत जीवितरूपी रंगभूमीवर केलेल्या कामाबद्दल प्रत्येक प्राण्यास त्या रंगभूमीच्या सूत्रधाराकडून योग्य पारितोषिक मिळून नंतर त्यास भिन्नभिन्न चौऱ्यायशीं लक्ष सोंगे घेऊन त्याच रंगभूमीवर पुनः पुनः यावे लागतें असे एका धर्माचें मत आहे, तर पडद्यामागे गेलेल्या नटाचा पुन्हा त्या रंगभूमीशी कधीच संबंध येत नसून त्यास त्याच्या योग्यतेप्रमाणे स्वर्गसुख किंवा नरकयातना भोगीत अनंत कालपर्यंत रहावें लागतें असें दुसऱ्याचें मत आहे. एक धर्म आत्म्यास] अखेर निवाड्याच्या दिवसापर्यंत मरणकालीन स्थितीतच तिष्ठत ठेवितो, तर दुसरा त्यास प्रथम अग्नीच्या आचीने शुद्ध करून नंतर त्याची परलोकात स्थापना करितो. एक धर्म त्यास तिळायेवढा सुद्धा देह देत नाही, तर दुसरा त्यास सतरा तत्त्वाचा

---

* उद्यान, संक्रांत अंक. [ जानेवारी सन १९१८ ]

अंगठ्यायेवढा किंवा त्याहूनही मोठा देह देऊन आपले औदार्य प्रकट करितो. एक धर्म त्याची स्मरणशक्ति तशीच राहू देतो तर दुसरा ती हिसकावून घेतो भिन्नभिन्न वैद्याची आपापल्या रोगपरीक्षेबद्दल व औषधाच्या अचूकपणाबद्दल जितकी खात्री असते तितकीच भिन्नभिन्न धर्मांची आपापल्या मार्गांबद्दल असते. आपल्या शरीरस्वास्थ्याची काळजी वाहणारा रोगी जसा भिन्नभिन्न भिषग्वर्यांचीं आश्वासने ऐकून भाबावून जातो तसा आपल्या पारलौकिक कल्याणास जपणारा मुमुक्षु भिन्नभिन्न आचार्यांची आश्वासनें ऐकून बुचकळ्यात पडतो. वैद्याची योग्यता त्याचें ग्रंथावलोकन, बुद्धिमत्त्व व यशस्विता यावरून ठरविता तरी येते, पण धर्मसंस्थापकाची योग्यता अजमावण्याचें कोणतेंच साधन नसतें ज्यास अधिक मोहक कल्पना सुचतात किंवा अधिक मोहक वक्तृत्व करिता येतें अशाच सिद्धावर साधकाच्या साहजिक उड्या पडतात. पण त्या कल्पना जितक्या फोल असतात तितकेंच तें वक्तृत्वही असतें, व वस्तुस्थितीच्या ज्ञानासबधानें सिद्धसाधकाची योग्यता सारखीच असते.’

वरच्यासारखा आक्रोश नास्तिकानी किती जरी केला तरी अस्सल धर्माभिमानी त्यास कधीही भीक घालणार नाही प्रत्येकास आपापल्या धर्माचा अभिमान असतो या न्यायास अनुसरून मलाहि हिंदु धर्माचा अभिमान असल्यास नवल नाहीं. आपल्या पूर्वजानी आपल्या अलौकिक सामर्थ्याने अनेक अतींद्रिय वस्तूविषयीं व त्याबरोबर परलोकाविषयींही सूक्ष्म ज्ञान सपादन केले होते असा माझा पूर्ण विश्वास आहे. भौतिक सृष्टीविषयी त्याच्या कल्पना बऱ्याच काव्यमय होत्या, पृथ्वीवरील इतर प्रदेशासंबंधानें त्याची माहिती कल्पित कादंबरीत शोभण्यासारखी केवळ चुकीची होती. रक्त, पीत, कृष्ण वगैरे नावानी हल्लीं ओळखिले जाणारे समुद्र त्यानी दुग्ध, दधि, मध इत्यादि पचामृतसाहित्यानें काठोकाठ भरून ठेविले होते, प्रकाश, चुबकत्व, विद्युत् इत्यादिकाच्या गुणधर्माबद्दल व वाफ, वीज इत्यादिकाच्या सामर्थ्याबद्दल त्यास फारशी माहिती नव्हती, या साऱ्या गोष्टी खऱ्या. पण त्याचें कारण ते ऐहिक व इंद्रियगोचर वस्तूंविषयीं पूर्णपणें उदासीन होते हेंच होय. त्यानी दुर्बिणीचा शोध लाविला नसला तरी त्याना योगबलाने परलोकाबद्दल खडानखडा माहिती असे. ते आगगाड्यांतन

ावास करीत नसले तरी ते सूक्ष्म देहानें सूर्यचंद्रादि लोकावर निमिषार्धात
ाऊन परत सुद्धा येत सूक्ष्म देहाच्या मध्यस्थीनें त्यानी कदाचित
ृथ्वीवरीलही सारे प्रदेश व समुद्र पालथे घातले असतील. पण त्याच्या
वरूपाबद्दल त्यास निमिषार्धात ज्ञान कसें व्हावें ? अर्थात् तें अस्पष्ट
व डळमळीत असल्याबद्दल त्यास दोष देता येत नाहीं. त्यांनी ऐहिक
गाविषयींच्या आपल्या अज्ञानाचा वचपा पारलौकिक जगाच्या ज्ञानाने
ूर्णपणें भरून काढिला होता. त्यास स्वतःच्या घराची क्षेत्रफळें व त्याची
नेह्याच्या घरापासूनचीं अतरे एक वेळ माहीत नसतील. पण यमपुरीची
ांबीरुंदी व त्याचे येथपासूनचे अतर त्यास मुखोद्गत असे काशीयात्रा
रिताना किती मुक्काम पडतात, प्रत्येक मुक्काम गाठण्यास किती दिवस
ागतात व त्या यात्रेस निघताना कोणते साहित्य बरोबर घेतले पाहिजे हे
कदाचित् त्यास अवगत नसेल पण मरणकालच्या घोंगडीपासून
ामपुरापर्यंत कोणकोणत्या मुदतींनीं किती व कोणकोणती नगरें लागतात,
ेथे कोणकोणते राजे राज्य करितात, तेथे पाषाण, अग्नि, बर्फ इत्यादिका-
कीं कोणकोणत्या पदार्थांची वृष्टि होते, मार्गात कोणकोणते टप्पे किती किती
अतरावर लागतात, वाटेने थंडी, ऊन्ह, विंचू, काटे, सिंह, ग्रामसिंह
इत्यादिकाची कसकशी पीडा होते, पर्वतावरून ठेचाळत, निखाऱ्यावरून व
खेळ्यावरून विव्हळत आणि चिखलातून घसरत कसे चालावे लागतें
इतकेंच नाही, तर मधूनमधून खोल विहिरीत कसे पडावें लागते, वरून
अग्नि, पाषाण, रक्त वगैरे पदार्थांची कशी वृष्टि होते, मार्गानें लाविलेल्य
झाडास पानाऐवजी तरवारीच लटकत असल्यामुळे त्याच्या खालीं छायेसाठ
उभें रहाण्याची कशी सोय नसते, मृतास व यमदूतास पाथेय म्हणून
उपयोगी पडण्याकरिता किती पिंड द्यावे लागतात इत्यादि तपशीलवा
माहिती त्यांस प्रत्यक्ष अनुभव घेतल्याप्रमाणें करतलामलकवत् असे

त्या काळीं काशीयात्रेपेक्षा यमपुरीची यात्राच विशेष सुखाची व सोयीच
असे यात शका नाही. काशीयात्रेची पात्रता अंगी आणण्यास प्रथम
ब्रह्महत्त्येसारखें किंवा मार्जारहत्त्येसारखें एखादें मोठें पातक करावें लागे
निघताना बरोबर द्रव्याची बरीच पुंजी व धान्यादिकाचीही मुबलक सामुग्र

सल्यामुळे तो मुंगीच्या पावलानें होई. इतकेंही करून वाटेंत दुसऱ्याचें
झें आपल्या माथीं घेऊन त्यास विश्रांति देणाऱ्या ठगरामोश्यासारख्या
ाशीं गाठ पडल्यास जवळच्या धनधान्यास व प्रसंगी प्राणासही मुकावें
गून काशीयात्रेबद्दल यमलोकींची यात्राच करण्याचा प्रसंग येई. त्या भाम-
ाच्या तावडींतून धडपणें सुटका झाल्यास तीर्थांच्या ठिकाणीं वास्तव्य करून
हणाऱ्या व राजरोसपणें लुटणाऱ्या पंडे, चोबे, गयावळ इत्यादिकांकडून
गवणूक होई वाटेनें खाण्यापिण्याचे हाल होत असल्यामुळें मास झडून
स्थिपंजर राही इतक्या संकटातून परत गावी आल्यावर मावंद्याकरिता
र्च करावा लागे तो निराळाच. यमनगरीच्या यात्रेकरूला या मानानें फारच
मी दगदग पडते. त्या यात्रेकऱ्याप्रमाणें यासही प्रथम पातक करून त्या
त्रेची पात्रता अंगीं आणावी लागते हें खरें. पण तें पातक ब्राह्मणाच्या
वा मांजराच्या हत्येसारखें घोरच असलें पाहिजे अशी आवश्यकता
नते सोवळ्यात असताना सुतावर पाय दिल्यानेंही त्याचें काम भागतें.
ाने स्वर्गास जाण्याची जरी त्यास खात्री नसली तरी नरकास जाण्याची
त्र बालंबाल असते यवनाची भाषा बोलणें, नटाचें तोंड पहाणें, वेदाचा
ठ शूद्रातिशूद्रादेखत करणें इत्यादि सुतासारखीं हलकीं वाटणारीं पापेंही
नपुरयात्रेची पात्रता अंगी आणण्यास पुरेशीं असतात बरें, या पात्रतेकरितां
पाप आवश्यक असतें तें स्वतःच केले पाहिजे असाही शास्त्राचा दुराग्रह
नतो बायको वाझ असली किंवा विधवेनें पतिनिधनाप्रीत्यर्थ केशवपन केलें
हीं तरी त्या पापाच्या जोरावर पतीस यमपुरीचा परवाना मिळविण्यास
कत नसते. यमपुरीच्या यात्रेकरूस वाटेंत सोबत मिळण्याकरिता दुसऱ्याची
र्जिवें करण्याचेंही कारण नसतें घटका भरली म्हणजे यमदूत आपण होऊनच
ाची उचलबांगडी करायला तयार असतात मनुष्याचें शरीर अवजड असलें
णजे त्याला प्रवासात बराच त्रास होतो पण या यात्रेकरूला साडेतीन हात
ाची अडगळ बरोबर बाळगावी लागत नाहीं. त्यानें फक्त *अंगुष्ठमात्र
ाणाचा लिंगदेह घेतला म्हणजे झाले. प्रथम या देहाला भिन्नभिन्न अवयव
ून एवढ्या दूरच्या पल्ल्याची यात्रा करण्याचें सामर्थ्यही नसतें. त्यास
णानंतर प्रतिदिनीं पिंड मिळत गेले म्हणजे नऊ दिवसात मस्तक, मान,
ंदे, हृदय, पाठ, नाभि, कटि, नाड्या, गुडघे व पाय, हे अवयव क्रमाक्रमानें

प्राप्त होतात, आणि दहाव्या दिवसाच्या पिंडानें क्षुधा व तृषा उत्पन्न होते. शेवटच्या या पिंडानें क्षुधेचें शमन न होता जनन होते हा याचा विशेष आहे. हा पिंड देण्याची युक्ति शास्त्रानें काढिली नसती तर श्राद्धाच्या किती तरी जेवणास आपण अंचवलो असतों. मृताची क्षुधा प्रदीप्त करणारा हा पिंड हजारों सजीव ब्राह्मणाची क्षुधा तृप्त होण्याला कारणीभूत होतो असो यांप्रमाणें देह तयार होऊन त्यास अकराव्या व बाराव्या दिवसाचे पिंड मिळाले म्हणजे त्याच्या अंगी पुढील प्रवास करण्याचें सामर्थ्य येते, आणि जीव लागलीच यममार्गानें जावयास निघतो निघण्यापूर्वी दोन तीन क्षणात यमदूत त्यास विद्युद्वेगानें यमपुरीपर्यंतचा प्रवास घडवून च तेथील चमत्कार दाखवून परतही आणितात, यामुळे त्याची आजपर्यंतची जाचक जिसाज्ञा तृप्त होऊन त्यास प्रवास आक्रमण्यास उमेद येते त्यास बरोबर शिदोरी मुळीच घ्यावी लागत नाहीं कारण त्याच्या निकटाच्या आप्तानी त्यास पक्ष, महिना, दीड-महिना इत्यादि ठराविक मुदतींनीं पृथ्वीवर कोठेंही पिंड दिले तरी ते पिंड त्यास तो असेल तेथे सुखरूप येऊन पोहोंचतात, मग त्या पिंडावर मृत जीवाचा पत्ता लिहिलेला असो अगर नसो ही सुधारणा ऐहिक गोष्टीतही अमलात आल्यास कितीतरी बहार होणार आहे! ही सुधारणा म्हणजे बिनतारेच्या यंत्रावरची कडी होय. त्या यत्राने नुसते पोकळ सदेशच त्वरेनें पाठविता येतात, पण पिंडदानानें तितक्याच त्वरेनें भरीव अन्न पाठविता येतें. साप्रतच्या महायुद्धात सैन्यास अन्नाचा पुरवठा करण्यासाठीं सरकारास एक स्वतत्र खातें बाळगावें लागतें, व त्या खात्याकडून जय्यत व्यवस्था होत असताही तें अन्न मधल्यामध्यें शत्रूकडून पळविण्यात येतें पण पिंडदानाची सुधारणा अंमलात आल्यास हिंदुस्थानात शेंपन्नास ब्राह्मणाकडून रोजच्यारोज विधिपूर्वक पिंडदान व अर्घ्यदान करविलें, की युरोप, आफ्रिका, आशिया या तिन्ही खंडातील हिंदु सैनिकाच्या अन्नपाण्याची काळजी करावयास नको असें होऊन जाईल.

मृतास द्यावयाचा पिंड लहान असतो खरा, पण त्याचा देह त्याहूनही लहान असल्यामुळें व भरीव नसल्यामुळें त्यास तो भरीव पिंड पुष्कळ दिवस पुरतो, यांत आश्चर्य वाटण्याचें कारण नाही.

अकराव्या दिवशी अंगरखा, धोतरजोडा, पागोटें, छत्री, जोडा, पांघरूण,

कमडलु, अंगठी व आसन याचेही दान होत असल्यामुळें जिवाला प्रवासात हे सारें लटाबर बाळगावें लागतें. मार्गात बाराही आदित्य सपूर्ण तेजानें तळपत असल्यामुळें व शीतपर्जन्यादिकाचीही पीडा होत असल्यामुळें हा सरजाम त्यास केवळ अडगळ म्हणूनच वाटत असेल असें नाही. मात्र त्याचा त्याच्या अगुष्ठमात्रप्रमाण देहाला योग्य उपयोग होण्यास त्यास संक्षिप्त रूप मिळत असावें कारण, नाही तर मिय्या मूठभर आणि दाढी हातभर असा प्रकार होऊन, त्याच्या भाराखालीच तो अर्धमेला होऊन जावयाचा! वरील यादीतील कमडलूचा मात्र सूक्ष्म रूपातही त्या यादीतील अंगठीप्रमाणें अलकारापेक्षा अधिक उपयोग होत नसावा. कारण वाटेनें पाण्याचा टिपूसही मिळत नाही, व वाटेंतील विहिरी तृषाशमनाचे ऐवजी आत पडण्याच्याच काय त्या उपयोगी असतात.

यमलोकच्या वाटेने जाताना यमदूत जिवाच्या अंगुष्ठप्रमाण देहावर सारखे कोरडे ओढीत असतात, यामुळें वाट चालण्यात मुळीच दिरंगाई होत नाही. त्या बिचाऱ्या अंगठ्याएवढ्या प्राण्याला आपलें सारें बाडबिस्तर घेऊन त्या धिप्पाड यमदूताच्या बरोबरीनें चालणें भाग पडावें हें अन्यायाचें आहे. पण त्याबरोबरच हेहि लक्षात ठेविलें पाहिजे, कीं त्याचें शरीर हलकें असल्यामुळें त्याला आपली चाल द्रुतगतींत ठेवणें विशेष जडही जात नसावें किंबहुना एखादे वेळी सोसाट्याचा वारा सुटून, त्याने तो सपाट्यानें उडून जाऊं लागल्यास, यमदूताचीच त्याच्याबरोबर पळता पळता पुरेवाट होत असावी. वाटेनें चोराचिलटाचें मुळीच भय नसतें चोराला याची चोरी करून लाभ तरी काय व्हावयाचा? याच्या साऱ्या सरजामास अष्टमाश काढ्याचें रूप मिळालेलें असावयाचें. याचा धोतरजोडा 'त्यास लगोटी म्हणूनही शोभावयाचा नाहीं! पागोट्याचा त्याच्या अगठ्यास अगुस्तान म्हणून उपयोग होईल तेवढाच काय तो! याच्या अगरख्यावर त्याच्या मुलीची बाहुलीच काय ती सतुष्ट व्हावयाची? बरें, पिंडाची चोरी करावी तर, त्याकरितां पधरा पंधरा दिवस महिना महिना वाट पहावी तेव्हा कोठें दोन घास मिळावयाचे!

वाटेंत जिवास विंचू, सर्प, कुत्रे, वाघ, सिंह इत्यादि भयंकर प्राण्यांची पीडा होते. पण त्यास त्यांचें भय वाटणें मुळीच शक्य नसतें. एक तर

त्याच्या अंगाला कितीही सर्पांनीं विळखा घातला किंवा त्याचे कितीही वाघानीं व सिंहानी लचके तोडलें तरी आपला पुन्हा प्राण जात नाही ही त्याची खात्री असते, आणि म्हणून तो एखाद्या गारोड्याप्रमाणें सर्पांना हातावर खेळवीत व एखाद्या सर्कसवाल्याप्रमाणे व्याघ्रसिंहास कस्पटाप्रमाणे लेखीत मार्गक्रमण करीत असतो त्याला वाटेतील कोणत्याही संकटाचें भय न वाटण्याचे दुसरे कारण असे, की त्याजपुढे प्रवासाच्या शेवटी जे ताट वाढून ठेवलेलें असतें त्याची थोडीशी लज्जत त्यास प्रवासाच्या आरंभीच, दोनतीन क्षणाच्या अवकाशात यमदूताकडून दाखविण्यात आलेली असल्यामुळे तिच्या मानानें त्यास ती संकटे पोरखेळासारखी वाटत असतात.

मार्गात वैतरणी नावाची नदी लागते, ती अष्ट घाणींनी भरलेली असून तिचें पात्रही फार रुंद असते. अशा नदीतून पोहून जाण्यास सामान्य प्रवाश्याला किती तरी त्रास पडला असता पण तेथील कोळी फार परोपकारी असल्यामुळें जिवाला इकडची काडी तिकडे करण्याचेही कारण रहात नाही. ते त्याच्या तोंडात गळ कोंबून त्यास ओढीत परतीराला घेऊन जातात

अशा त्रासदायक मार्गानें ज्यास नेहमी प्रवास घडतो ते यमदूत फारच पापी असले पाहिजेत, असा एखाद्या अडाण्याचा समज होईल, पण तो चुकीचा आहे. ते फार पुण्यवान म्हणूनच त्याची या कामी योजना झालेली असते. दुसऱ्याच्या यातना नुसत्या पहाताना किती आनंद होतो याचा प्रत्येकाला अनुभव आहेच. मग यमदूताना त्या केवळ पहाण्याचाच नव्हे, तर घडवून आणण्याचाही ब्रह्मानंद लाभतो हें त्याच्या पूर्व पुण्याईचेंच फळ नाहीं असें कोण म्हणेल?

हा प्रवास जिवास किती मानवतो याचे एक प्रत्यंतर असे आहे, की तो एक वर्षानें यमपुरास पोहोंचतो त्यापूर्वी त्याचा अंगुष्ठमात्र देह हाताइतका उंच झालेला असतो. यमपुरी पृथ्वीपासून हल्ली आहे त्याच्या औटपटीच्या अंतरावर असती तर, प्रवासाच्या अंतीं जिवास यमदूताच्या डोळ्यास डोळा भिडविता आला असता यात शंका नाहीं. यमपुरीत प्रवेश करण्यापूर्वी मात्र जिवास हें मध्यंतरी संपादन केलेलें हातभर लांबीचें ऐश्वर्य टाकून पुन्हा अंगठ्याएवढ्या देहाचा आश्रय करावा लागतो. त्याचा प्रवेश

अर्थात्च दक्षिणद्वारानें होतो. इतर द्वारें पुण्यवन्ताकरिता खास राखून ठेविलेली असतात.

पापपुण्याचा निवाडा चित्रगुप्ताच्या घरी होत असतो. या घराच्या शास्त्रोक्त चतुःसीमा येणेप्रमाणे आहेत—पूर्वेस तापाचे घर, दक्षिणेस शूल व खरूज याची घरे, पश्चिमेस अजीर्ण व अरुचि यांची घरें; उत्तरेस क्षय व पाडुरोग याची घरें, ईशान्येस कपाळदुखीचें, आग्नेयीस मूर्च्छेचें, नैऋत्येस अतिसाराचें आणि वायव्येस शीताचे व दाहाचें घर. येथे 'घर' या शब्दाचा उपयोग 'रोगी' या लाक्षणिक अर्थी केला नसून 'ठिकाण' या अर्थीच केला आहे. चित्रगुप्ताच्या घराचा दगड बसविला तेव्हा पृथ्वीवर रोगाची सख्या किती अल्प व त्याचें स्वरूप किती साधें असे याचें या यादीवरून चांगलें अनुमान करिता येतें त्या काळी मधुमेह, जलोदर इत्यादि प्राणघातक रोगाचा जन्म झाला नव्हता, पटकी व बद्या ताप याच्या साथीही तेव्हा माहीत नव्हत्या. चित्रगुप्ताच्या शेजारीं जर या दुकलीची घरे असती तर त्यास चबूगवाळे आटपून बिऱ्हाडच बदलावे लागलें असतें अलीकडे रोगाच्या ज्ञानात फार भर पडली आहे ही मोठ्या अभिमानाची गोष्ट आहे .यात सशय नाहीं असो; क्षय व पाडुरोग याचे फिक्कट चेहरे प्रत्यहीं दृष्टीसमोर असता, अजीर्णाच्या व कर्पट ढेकराच्या घाणीत चित्रगुप्तास अन्न कसें जात असेल आणि शूलाच्या किंकाळ्यात त्यास स्वस्थ झोंप कशी येत असेल ! हें देवच जाणे. त्याच्या मागें रात्रदिवस पापपुण्याच्या निकालाचा लडका फार, तेव्हा त्या कामांत जेवण्यानें किंवा झोंपेनें व्यत्यय येऊ नये हाच अशा रोगट हवेंत राहण्यांत त्याचा हेतु असावा. हेतु कोणताही असो, पण 'निंदकाचें घर असावें शेजारी' या अभंगार्धाबद्दल 'आजाराचे घर असावें शेजारीं' हें यमकबद्ध अर्धच चित्रगुप्तानें आपल्या नजरेसमोर ठेविलें आहे येवढी गोष्ट खरी

यमराजाच्या दंडनीतींतील कलमें फार कडक असतात. त्या कलमात चोर, जार, निंदक, सुधारक, खुनी, ब्रह्मद्वेष्टे वगैरे निरनिराळ्या पातक्याची त्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें तामिस्र, रौरव, कुंभीपाक इत्यादि नरकात संभावना करण्यासंबधानें योजना सागितल्या आहेत क्षेत्रांच्या ठिकाणीं भटानें यात्रेकरूंस प्रहर प्रहर थंडींत कुडकुडत उभें करून व इतर मार्गांनीं नडवून

त्याजकडून दक्षिणा उकळणे, न्हाव्यानें त्याच्या डोक्याचा एकच पट्टा ओढून दुसऱ्या यात्रेकरूच्या क्षौरविधीकरिता त्यास तिष्ठत ठेवणें इत्यादि जे शिक्षाचे प्रकार आहेत त्याहून नरकातील शिक्षा अर्थात्‌च सौम्य असतात शिवाय पूर्वोक्त शिक्षात यात्रेकरूवर कधी कधी थडीने काकडून मरणाची पाळी येते तशी उत्तरोक्त शिक्षांत येत नाही, हाही त्याचा एक विशेष आहे

नरकातील ज्वालानी पातकाचें भस्म झाल्यानतर व पुन्हा मनुष्यजन्म प्राप्त होण्यापूर्वी जीवात्म्यास वनस्पति, कृमि, कीटक, पक्षी, पशु, स्त्रिया, शूद्र अशा भिन्नभिन्न, थोड्याथोडक्या नाही तर चौऱ्यायशीं लक्ष योनीतून जावे लागतें. सबब त्यास यमपुरीच्या यात्रेचे मावदें करण्याची सामान्य यात्रेकरू-इतकी घाई नसते हें उघड आहे

येथपर्यंत पातक्यास प्राप्त होणाऱ्या गतीबद्दल सागितले पुण्यवंतास अर्थात्‌च त्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें अगदी भिन्न गती प्राप्त होत असतात. यापैकी ब्रह्माशी एकरूप होणाऱ्या जीवनन्मुक्ताचा वर्ग वजा केल्यास देवलोकास व पितृलोकास जाणारे दोन वर्ग शिल्लक रहातात. पहिल्या वर्गात यज्ञयागादि पुण्यकर्मे सकाम बुद्धीने करणारे पुण्यात्मेच येतात असें नाही, तर कित्येकाच्या मतें निष्काम कर्मयोग्यास सुद्धा देवलोकात अथवा स्वर्गात अमृत पिऊन अप्सराच्या नाचरगात दग होऊन रहावे लागतें. उरलेल्या पुण्यात्म्यास पुण्याचा क्षय होऊन जन्ममरणाच्या फेऱ्यात पडेपर्यंत, पितृलोकात आप्तानीं दिलेले पिंड व अर्घ्य सेवीत आणि ब्राह्मणरूपी प्रतिनिधीमार्फत श्राद्धपक्षातील पक्वान्नावर ताव मारीत काळ कंठावा लागतो पहिल्या वर्गास सुखाचा अनुभव रोजचे रोज व प्रत्यक्ष घडतो, तसा दुसऱ्या वर्गास न मिळता त्याचा मधूनमधून व दुरूनच आस्वाद घ्यावा लागतो तथापि यामुळें त्या सुखाच्या तीव्रतेंत विशेष अंतर पडतें असें नाही. त्या वर्गातील पुण्यात्म्याच्या मुखत्यारास इहलोकीं वर्षश्राद्धाचे किंवा पक्षाचे दिवशीं तादुळाची खीर व उडदाचे वडे चारिले, की ते परलोकीं ढेंकरा द्यावयास लागतात यांच्या घशात घांस अडकल्यास त्यांना ठसका लागतो, व याच्या पोटांत कमी पाणी गेल्यास त्याना उचकी लागते. उडदाबद्दल पूर्वीच्या काळी त्याना मांस खावयास मिळत असे.

पण ही बेटी अहिंसेची उकळी देशभर उसळल्यापासून ‘मासान्ना’बद्दल ‘माषान्न’ हा अपपाठ येऊन त्याची तृप्ति होईनाशी झाली आहे. त्याचा मुखत्यार ब्राह्मण शुचिर्भूत व सत्पात्र असल्यास उत्तमच, पण कलियुगात दिवसेंदिवस अशा ब्राह्मणाचा दुष्काळ भासू लागला आहे. अलीकडचा सामान्य ब्राह्मण स्वतः सत्पात्र असण्याऐवजी एक फक्कडसें पात्र ठेवण्यातच भूषण मानीत असतो तथापि, ब्राह्मण कसाही असला तरी तो पवित्रच असल्यामुळें, परलोकी अन्नपाणी पोहोंचविण्याचें काम त्याजकडून निर्वेधपणें पार पडतें. मात्र यामुळें पितराच्या गळ्यात कधी कधी अनपेक्षित सुखें अचानक येऊन पडतात श्राद्धाचे दिवशी पितृस्थानी बसलेल्या ब्राह्मणानें एखादें अकर्म जरी केले तरी त्याची बाधा पितरास झाल्यावाचून रहात नाही उदाहरणार्थ, परस्त्री मातेसमान मानणाऱ्या पितरास, आपल्या मुखत्याराची लाज राखण्याकरिता, परलोकात जिने चढण्याचा निर्लज्जपणा करावा लागतो, व दारूस गटारातलें पाणी समजणाऱ्या पितरास मुखत्यारानें झोंकलेल्या दारूनें झिंगून पितृलोकातील गटारात लोळावें लागतें दारूबरोबर कधीं कधीं मासान्नही सेवावयास मिळते, येवढीच काय ती त्याला दुःखात समाधान मानण्याला जागा असते श्राद्धाच्या ब्राह्मणाला मोहाच्या पानाची पत्रावळ विशेष श्रेयस्कर समजली जाते, यावरून पूर्वी मासाबरोबर दारूही झोंकण्याचा प्रघात असलेला दिसतो, असा प्रोक्त विचार केल्यास पितराना सुरापानाची इतकी खंत वाटण्याचें कारण राहणार नाही

कुपात्र ब्राह्मणाकडून श्राद्धपक्ष उरकण्यापेक्षा चटावर, म्हणजे ब्राह्मणाच्या स्थानी दर्भाची स्थापना करून उरकणे किती तरी इष्ट आहे पण ते गौण समजण्यात येतें अशा प्रसगी दर्भावर ब्राह्मणाचा व अक्षतावर अर्पणीय द्रव्याचा जसा आरोप करण्यात येतो, तसा व्यवहारातही करीत गेल्यास किती सोय होणार आहे! उद्या जर एखादा दर्भरूपी अमलदार अक्षतारूपी कर वसूल करू लागला तर तो ताबडतोब देण्यात एकाचीही कसूर होणार नाही. पण इतकी सोय पहातो कोण?

आमच्या गावातील भिकंभटाना यजमानाच्या घरच्या श्राद्धांच्या आधल्या दिवशीं त्याच्या मातापितराच्या वासनाबद्दल दृष्टान्त होत असत; व श्रद्धाळ यजमानाकडून श्राद्धाच्या दिवशी त्या पुऱ्याही होत असत. एका

श्राद्धास पितराने अगरख्याचा, तर दुसऱ्यास धोतराचा आणि तिसऱ्य डोकीच्या रुमालाचा हट्ट धरून बसावें जों जो हे हट्ट पुरविण्यात ये लागलें, तों तो पितरामध्यें उपयुक्ततेच्या बरोबरीनें, किंबहुना तिच्याहून अधिक शोभेची आवड उत्पन्न होऊ लागली. त्याना आता साधी धोत व रुमाल चालेनासें होऊन त्याबद्दल रेशीमकाठी धोतराचा व जरीका रुमालांचा ते हेका धरून बसू लागले. पण आमच्या गावास भिकभटासारख निस्पृह ब्राह्मण लाभल्यामुळें त्यांचा हेका ताबडतोब पुरविण्यात ये लागला उत्तरोत्तर परलोकातील फासन् बदलावयास लागून पितरा चोंचले अधिकाधिक श्रीमती होऊ लागले. त्याचें पीताबरावाचू शालजोड्यावाचून व गादीच्या चर्मी जोड्यावाचून पदोपदीं अडू लागले पण आमच्या गावातील भाविक यजमान हटण्याचे चिन्ह दिसेना. त्या पितराची चोजें पुरविण्याचा सपाटा लाविला भिकभटाची गालफ पाताळात गेली होतीं, त्याचे खळगे भरून ती उच व गुलाबी दिर लागली. त्याचे सुकट शरीर मासल व तेजःपुज दिसू लागलें. त्याच सुळक्यासारखी उच मान व खबदाडात गेलेली छाती भरदार दिर लागली. वाढत्या सामर्थ्याबरोबर त्याच्या डोळ्यात चंचलपणा खेळ लागला त्याना विलासाचे दृष्टान्त 'होऊ लागले पितराना रविवर्म्याचं शेलकी शेलकी चित्रें डोळ्यासमोर असावीशीं वाटू लागली, उची उचं अत्तरें व अरगजे लागू लागले व वारागनाच्या मधुर कठातील सुस्वर आलाप ऐकण्याची इच्छा होऊं लागली एके दिवशी भिकभट आपल्या एका भोळ्या यजमानास म्हणाले, ' काल आपले वडील स्वप्नात फारच दुःखीकष्टी दिसले ' यजमानानीं प्रश्न केला, ' ते का बुवा ? त्याना आम्ही आपल्या- मार्फत उत्तम अन्नवस्त्राचा, सुदर चित्राचा, सुगधी हाराचा व बहारदार गाण्याचा वक्तशीर पुरवठा करीत असतोच, मग त्याची तक्रार कुठें राहिली ! ' भिकंभट म्हणाले, ' आपल्या प्रौढ मुलीच्या पाठीवरून हात फिरविण्याची त्याची अंतकाळची इच्छा अजून जशीच्या तशीच अतृप्त राहिली आहे.' हे शब्द त्याच्या तोंडातून निघण्याचा अवकाश, लागलीच यजमानानीं त्यांच्या पाठीवरून काठीसकट आपला हात फिरवून आपली स्वतःचीच हौस पूर्ण करून घेतली ! केवढा हा पितृद्रोह !

वर मृताच्या पारलौकिक कल्याणासबंधानें जें विवेचन केलें आहे तें आपल्या धर्मांतील सिद्धान्तांवर ज्यांची पूर्ण श्रद्धा आहे त्यांकरिताच केलें आहे ज्याची त्यावरील श्रद्धा उडून गेली आहे, किंबहुना ज्याना परलोकाच्या अस्तित्वाविषयीच शंका आहे, त्याच्या दृष्टीनेंही उत्तरक्रियादि कर्में श्रेयस्कर आहेत हें पुढील विवेचनावरून दिसून येईल या कर्मांच्या उत्पादकाचा धार्मिक हेतु होता, त्याप्रमाणें व्यावहारिक हेतुही होता या हेतूचीं दोन परस्परविरोधी अंगे असून त्या दोन्ही अगाचा मृताच्या आप्ताच्या कल्याणाशीं प्रत्यक्ष सबंध आहे. त्या आप्तास आरभी जो शोकाचा कढ येतो त्यात त्यानीं मग्न होऊ नये, व कालान्तरानें त्यास मृताची जी पूर्ण विस्मृति पडण्याचा सभव असतो ती न पडता त्यास त्याचें जन्मभर स्मरण रहावें, हा तो दुहेरी हेतु होय. मृताच्या मरणानतर त्याच्या बायकोस व मुलास दुःखाची इतक्या जोराची उसळी येते, की तिच्या भरात त्याजकडून एखादें अविचाराचें कृत्यही होण्याचा संभव असतो. पण आमच्या शास्त्रकारांनीं त्याच्यामागें असें काही विधीचें लटांबर लावून दिलें आहे, की त्यात त्या दुःखाचा विचार करण्यास फुरसत मिळत नाही. मुमूर्षूच्या आसन्नमरण स्थितींत सुवर्णदान, भूमिदान, गोदान इत्यादि दानें द्यावयाची असल्यामुळें, किंवा त्यास आतुरसंन्यास द्यावयाचा असल्यामुळें, त्या धादलींतच त्याचें चित्त गढून जातें त्याचा प्राण जाण्याच्या सधीस त्यास घोंगडीवर उतरून व माडी देऊन त्याच्या तोंडात सोनें, गगोदक, शालिग्रामाचें तीर्थ किंवा तुळशीपत्र घालावयाचें असतें, आणि तो गतप्राण होताच त्याचे डोळे उघडे असल्यास मिटावयाचे असतात, त्या गडवडीत त्यास स्वत च्या डोळ्यास पाणी आणण्याचें भान रहात नाही पूर्वी स्त्रीने सती जाण्याचा प्रघात होता, तेव्हा तिला साहाजिकच नवऱ्याबद्दल शोक करण्याचे कारण नसे हल्ली तिला केशवपन करावे लगतें, त्याच्या दुःखात तिला क्षणभर पतिनिधनाच्याहि दु खाचा विसर पडत असल्यास नवल नाही. मुलास मिशा क्षुरार्पण करावयाच्या असल्यामुळें त्याचें दुःख बाजूला राहून उलट त्याजवर लाजेची छाया येते, व कधीं कधीं तर त्याना हसण्याचीही लहर येते नतर मृतास स्नान घालून पिंड द्यावयाचा असतो; त्यानतर त्याचे अगावर लगोटीशिवाय एक चिंधीही न ठेविता त्याला तिरडीस करकचून बाधावें लागतें याप्रमाणें त्यास अवधूत केल्यानें स्वार्थ साधून वैराग्यशील

आर्यांचे सत्यस्वरूपही स्पष्टपणें दाखविता येतें. प्राणी ज्या स्थितींत जन्मास येतो त्याच स्थितींत स्मशानास जातो असा आम्हा हिंदूमध्येच ! मुसल्मान, ख्रिस्ती वगैरे लोक प्रेतावर स्वच्छ कापड घालून त्यावर सुगंधी माळा घालतात, व त्यापैकीं काहीं तर त्याबरोबर सुस्वर गाणी गात चालतात पण आम्ही हिंदु लोक पूर्ण निस्पृह व विरक्त आम्ही फार तर प्रेताच्या अंगावरील दागिने व किल्ल्या हस्तगत करून घेऊं, पण आम्ही स्वतः मरून पडल्यावर आमच्या अंगावरची सारी वस्त्रें जरी कोणी काढून घेतली तरी आम्ही हूं कीं चूं करणार नाही. असो तिरडीवर प्रेत घट्ट आंवळून बांधल्यावर तिला खांदा द्यावा लागतो किंवा अग्नीचें मडकें घेऊन पुढें चालावे लागते. मध्यें खांदा बदलताना पुन्हा मृतास पिंडदान करावयाचे असते, व स्मशानातही आणखी एकवार त्यास पिंड द्यावा लागतो. प्रेत सरणावर ठेविल्यानंतर त्यास स्वत हातानें मडक्यातील अग्नि द्यावा लागतो मडके पाण्याने भरून त्यास अश्म्याने छिद्रे पाडीत प्रेतास तीन प्रदक्षिणा घालाव्या लागतात, व त्या संपल्याबरोबर शंखध्वनि करावा लागतो शिमग्यातील शंखध्वनीची इतराकडून साथ होत असल्यामुळें विशेष लाज वाटत नाहीं पण स्मशानयात्रेबरोबर आलेल्या आणि वेळ घालविण्यासाठीं थट्टाविनोद करीत व चकाट्या पिटीत बसलेल्या समस्त प्रेक्षकासमोर एकट्यानेच शंखध्वनि करून त्याच्या मौजेंत भर घालण्यास बरेंच नीतिधैर्य लागते. मृत इसम लोकप्रिय किंवा वजनदार असल्यास हा प्रेक्षकाचा जमाव बराच मोठा असतो यात नवल नाही पण तो इसम दुष्ट, खट्याळ व अप्रिय असला तरीही क्षमाशील गांवकरी तितक्याच, किंबहुना त्यापेक्षाही मोठ्या जमावाने त्याच्या स्मशानयात्रेस जातात. प्रेताची जळून रक्षा झाली कीं नाही याची त्यास स्वतःच्या डोळ्यानीं खात्री करून घ्यावयाची असते.

या सगळ्या भानगडीत दुःखाच्या विचारास वाव मिळणें शक्य नसते. प्रेत सरणावर जळत असता, मृताच्या विरहाबद्दल व मानवी जीविताच्या क्षणभंगुरत्वाबद्दल विचार येणें अपरिहार्य असतें. पण त्यास अवसर मिळतो न मिळतो तोंच चितेंतील गोवऱ्या व लांकडें ओलीं असून नीट जळत नाहींत किंवा अपुरीं पडतात, ही गोष्ट नजरेस येऊन सर्पणाची व राकेल तेलाची

व्यवस्था करावी लागते. कवटी फुटून घरीं परत जाण्याची वेळ होईपर्यंत हीच विवंचना सारखी बाळगावी लागते.

पहिल्या दिवशींच विधींची पूर्तता केल्यास आह्मांस विश्रांति मिळून मृताबद्दल दुःख करीत बसावयाला अवकाश मिळेल, तो मिळूं नये म्हणून पुढील दिवसाचींही पृथक् पृथक् कर्मे धर्मानें त्याच्या मागें लावून दिलीं आहेत. भर हिंवाळ्याची थंडी असो, कडकडीत उन्हाळ्याची उष्णता असो, किंवा ऐन पावसाळ्याची झड असो, आह्मांस रोज नदीवर जाऊन भटाच्या साह्यानें पिंडदानादि विधी करावेच लागतात घरीं परत आल्यावर तरी विसावा मिळेल म्हणावें, तर इष्टमित्र तोहि मिळू देत नाहींत. कारण त्याची दुखवट्याकरिता म्हणून सारखी रहदारी सुरू होते. बरें, ते त्या प्रसंगास शोभण्यासारखें मौन स्वीकारतील म्हणावें, तर तेंही नाहीं. ते मुकाट्यानें बसल्यास आह्मास विचाराला फुरसद मिळावयाची, व त्याचा शोक अनावर होऊन हृदयाचा बाधही फोडून टाकावयाचा, आणि तसें होणें तर मुळींच इष्ट नसतें, म्हणून मृत इसम केव्हा मेला, कोणत्या आजारानें मेला, किती दिवस आजारी होता, कोणत्या वैद्याचें औषध सुरू होतें, मरते वेळीं त्याचें वय काय होतें, त्यास बायका किती आहेत, तरुण आहेत कीं प्रौढ आहेत, मुलें किती आहेत, काय शिकत आहेत इत्यादि प्रश्नाचा भडिमार करून ते आह्मास सळो कीं पळो करून सोडितात मधूनमधून ' अरे अरे ! फार वाईट गोष्ट झाली ! दहाजणाचा पोशिंदा गेला ! त्याचें हें मरण्याचें वय नव्हतें !' इत्यादि चर्वितचर्वणरूप किंवा ' म्हातारा गेला त्याचें सोनें झालें !' ' बिचारी सवाष्णपणात. गेली, बरें झालें !' इत्यादि समाधानपर उद्गार काढून त्या हृदयाच्या बांधास ते मजबुतीही आणीत असतात आह्माच्या मिशावरून वस्तरा फिरलेला किंवा दाढी प्रमाणाबाहेर वाढलेली पाहून इष्टमित्रास हे प्रश्न विचारताना व हे उद्गार काढिताना मनातल्या मनात हसण्याची उकळी येत असते, आणि आह्मास लाज वाटत असते पण उभयतास आपापले विकार दाबावे लागतात. आह्मास कधीं कधीं आपला स्मश्रुहीन चेहरा दाखविण्याची इतकी लाज वाटते, कीं त्यास अश्रू आल्याचा बहाणा करून पदरानें तोंड झांकावें लागतें. इष्टमित्राच्या चेहऱ्यावरील हंसण्याची लहर पाहून कधीं कधीं आह्मानाही हंसण्याची एवढी

मोठी उकळी येते, कीं तोंडावर पदर घेऊन ती उकळी रडण्याचीच आहे असें त्यास ढोंग करावें लागतें. दुखवट्याची भेट संपली म्हणजे दोघांसहि हायसें वाटतें. इष्टमित्र आनंदानें घरीं परत जातात. आप्तांस मात्र इतर इष्टमित्रांच्या माऱ्यास तोंड देण्याकरिता तयार होऊन बसावें लागतें.

तिसऱ्या दिवशीं अस्थि गोळा करून आणाव्या लागतात व त्या तीर्थाच्या ठिकाणी नेऊन विसर्जन कराव्या लागतात. हा प्रवास करणाऱ्या आप्तास अनायासें थारेपालट घडून अंगीं हुषारी येते, व मृताच्या मरणानें झालेल्या हानीचा बराच विसर पडतो. इतर आप्ताचें दुःखही या सुमारास भटाच्या व इष्टमित्रांच्या त्रासानें ओसरून संपुष्टात आलेलें असतें, इतकेंच नाहीं, तर ते मृतास पूर्णपणें विसरून जातात कीं काय अशी भीतिही वाटावयास लागते. क्षौर केलेले आप्त केस वाढण्याची उत्कंठेनें वाट पहावयास लागतात सुतकात स्मश्रूची पूर्ण मनाई असल्यामुळें, बोकडाच्या दाढीप्रमाणें वाढलेल्या व सुयाप्रमाणें टोंचणाऱ्या केंसावरून हात फिरवीत, प्रौढ आप्त अकराव्या दिवसाची मार्गप्रतीक्षा करू लागतात, आणि प्रत्येक दिवस केंसात बेसुमार भर टाकीत असला तरी तो आनंदाचा दिवस जवळही करीत आहे या विचारानें दु खात समाधान मानू लागतात. त्यांस केशवर्धक तेलाबद्दल फाजील द्वेष आणि वस्तऱ्याबद्दल फाजील आदर वाटावयास लागतो. तरुण आप्त शोकानें जड झालेल्या डोळ्यानीं आपल्या अर्धांगींकडे कटाक्ष फेंकावयास लागतात, आणि व्यवहारज्ञ आप्त मृताच्या जिनगीचा व देण्याघेण्याचा अदाज काढण्यासाठीं वह्या चाळू लागतात. सुतकाच्या आरभीं आरभीं विलासाचा त्याग व दुःख यामध्यें जो कार्यकारणभाव असतो त्याचा पुढे पुढें व्यत्यास होऊ लागतो. म्हणजे, आरभीं दुःखामुळें गोड खावेंसें वाटत नाहीं व शय्यादि सुखसाधनाचा त्याग करावासा वाटतो, पण पुढें पुढें गोड खाता येत नाही व शय्यादि सुखसाधनाचा त्याग करावा लागतो म्हणून दुःख वाटू लागतें वेळ कंटाळवाणा वाटूं नये म्हणून पत्त्याचे डाव खेळण्यात येऊन राजाराणीचीं लग्नें लावण्यात येऊ लागतात, व मृत मनुष्य सुवासिनी स्त्री असल्यास तिच्या पतीकडून भावी बधूचीं टिपणें चाळण्यात येऊ लागतात हा प्रकार चालू राहिल्यास आप्तांस मृताचें पूर्ण विस्मरण होऊन तो आपला कोणीतरी लागत

होता की काय याचीही भ्रांत पडावयाची. तसें होऊं नये म्हणून शास्त्राकडून त्याच्यामागें अनेक काच लावण्यांत येतात. सुतक दहा दिवस पाळलें पाहिजे व त्यात सर्व विलासांचा त्याग केला पाहिजे, या नियमाच्या बुडाशीं हाच हेतु असावा. त्यांच्या मागें गरुडपुराणश्रवणाचा जो ससेमिरा लावण्यांत येतो त्याचेंही रहस्य हेंच असावें. मृत यमपुरीच्या वाटेस लागल्यानतर यमदूत त्याचे कसें हाल करणार, त्याच्या पाठीवर कोरडे ओढओढून त्यास उन्हांतून, काट्यांतून, खिळ्यावरून, निखाऱ्यावरून कसें जावयास लावणार, त्याच्या मस्तकावर मधून मधून पाषाणाचा व अग्नीचा कसा वर्षाव होणार; वाघ, सिंह त्याच्या शरीराचे कसे लचके तोडणार, वैतरणीचा पैलतीर गाठण्याकरिता त्यास आपल्या मानेस गळ कसा लावून घ्यावा लागणार; यमपुरीस पोंचल्यावर रौरवादि नरकात कसें तळमळत पडावें लागणार याचें भटाच्या तोंडून रसभरित वर्णन ऐकून विसराळू आप्ताची आठवण खडबडून जागी होत असल्यास नवल नाही. मृताच्या हालाचीं भटानीं रंगविलेली चित्रें त्याच्या समोर जागेपणीच उभी राहतात असें नाहीं, तर स्वप्नातही ती त्यास सतावून सोडतात. ज्या कल्पक पुरुषानें हे पुराण रचिलें त्याचे कृतघ्न आप्तावर फार उपकार झाले आहेत यांत संशय नाही

दहाव्या दिवशी मृताच्या पिंडास कावळा शिवण्याची जी यातायात करावी लागते तिच्या मुळाशीं सुद्धा आप्ताच्या स्मरणशक्तीस अंकुश टोंचण्याचाच हेतु असला पाहिजे. मृताला आज दहावा दिवस आहे याची कावळ्यास आगाऊ सूचना नसल्यामुळें वेळेवर फारसे कावळेच जमत नाहीत. एखादा हजर झाल्यास त्यास पिंडाचे भयानक स्वरूप पाहून व काही अतरावर काही माणसें थबकत असलेली पाहून साहजिकच त्याच्या सद्धेतूबद्दल शका येते. आपल्या चोंचीकडून मृताच्या आत्म्यास सद्गति मिळावयाची ती धड बुद्धीची माणसे अपेक्षा करीत आहेत हें त्या निर्बुद्ध पाखरास काय माहीत ? मृताच्या मनातील इच्छा आपणास माहीत आहेत अशी त्या सुजाण माणसाची कल्पना असल्याचा त्या अजाण प्राण्यास सशय कसा यावा ? इतर प्रसगी आपणापासून फटकून वागणारी मनुष्ये आजच आपणाशी इतकी सलगी का करीत आहेत, आपला त्याच्यावर विश्वास बसावा म्हणून आपल्याप्रमाणें 'काव काव' शब्द का काढीत आहेत याचा त्या बिचाऱ्यास कांहीं उमज पडत नाहीं जों जों ती

त्यांस चुचकारून त्याचा पाठलाग करूं लागतात तों तों तो दूरदूरच पळूं लागतो. पाठलागात पुष्कळदा मध्यान्हीची वेळ टळून जाते, व मृतास सद्गति मिळण्याबद्दल ते प्रेमळ आप्त अधीर होऊ लागतात. त्याच्या पोटात कावळे ओरडूं लागतात, पण पोटाबाहेरचा कावळा दाद देण्याचें त्यास चिन्ह दिसत नाही. ते पिंडाकडे आशाळभूतपणानें व कावळ्याकडे मत्सरानें पाहूं लागतात. त्याच्यामागे इतकेजण पिंड देण्याकरिता हात धुऊन लागले असता तो त्याजकडे कानाडोळाच करीत आहे हें पाहून तो मृताच्या आत्म्यापेक्षा, किंबहुना आपणापेक्षाही निरिच्छ आहे याबद्दल त्यांची खात्री होते. इतके प्रयत्न होऊनही मृतात्मा आपली अंतकाळची इच्छा सोडून देत नाही, व इकडे आपली भोजनेच्छा क्षणोक्षणीं वाढतच आहे हें पाहून, शेवटीं आप्त भटास दर्भांचा कावळा करण्यास संमति देतात, आणि याप्रमाणें मृताची इच्छा समजण्यापूर्वीच व त्याच्या इच्छेविरुद्ध त्यास सद्गति देण्यात येते एकदां तर आमच्या बचभटजीनीं कावळा पिंडास शिवत नाहीसें पाहून पिंडाचा त्यास स्पर्श करविण्याच्या इच्छेनें पिंडच त्यास फेंकून मारिला आणि मृताला व कावळ्याला एकदम सद्गति दिली ! या ब्राह्मणाची गणना खरोखर 'शापादपि शरादपि' अशा कोटीतच आहे.

दहाव्या दिवसानें मृतास मुक्ति मिळत असेल, पण आप्तांची मुक्तता इतक्या सहज रीतीनें होत नाहीं. त्यास अकराव्या व बाराव्या दिवशींही पुन्हा पिंडदानादि विधि करावे लागतात, जेठा मारून बसलेल्या भटाच्या हुकुमाप्रमाणें सव्यापसव्याची कवाईत करावी लागते, स्वत स नागवून भटास वस्त्रे अर्पण करावी लागतात, स्वतःस असिधाराव्रत करावें लागत असता भटास शय्यादान करावें लागतें, व स्वत चें दिवाळें वाजवूनही भटाचें घर भरावें लागतें. याप्रमाणें एका मनुष्याच्या मरणावर किती तरी भिक्षुकाचें व त्यांच्या कुटुंबाचें जीवन चालतें. यापुढें पाक्षिक, मासिक, त्रिपाक्षिक, न्यूनषण्मासिक, न्यूनाब्दिक, वार्षिक ही श्राद्धें असतातच. तीं करिता करितां आप्तांचा जीव रडकुडीस येतो. पुढें आयुष्यात त्यांस केव्हाही मृताच्या मरणाची आठवण होवो, त्याच्या डोळ्यातून टिपें गळल्यावाचून व त्याच्या तोंडून 'अरे अरे ! बिचारा आम्हाला दुःख–सागरात लोटून गेला ना !' असे अंतःकरणपूर्वक उद्गारही निघाल्यावाचून रहात नाहींत.

**ताजा कलम**—संपादक महाराज, आपणास खास अंकाकरिता तिळसंक्रातीशी संबद्ध असलेला लेख पाहिजे होता. म्हणून श्राद्धामधील तिलोदकातील तिळाच्या आधारानें हा लेख पाठवीत आहें. हा संबध आपण बादरायण संबंधात काढणार नाही अशी आशा आहे.

---

## मुष्टि २९ वी *

# झोंप

कोणत्याही वस्तूंतील विशेष गुण तिच्या लहान अवस्थेंत ज्या प्रमाणात दिसून येतात त्यापेक्षां तिच्या मोठ्या अवस्थेंत अधिक प्रमाणात दिसून येतात. दिवाळी, एकादशी, शिवरात्र, यात्रा, पर्वणी इत्यादिकाचे लहान व मोठे असे प्रकार असून त्यासबधानें हा नियम लागू पडतो. पण निद्रेस तो मुळीच लागू पडत नाहीं साधी निद्रा व महा निद्रा याची स्वरूपेंच भिन्न असतात. दोन्ही अवस्थात प्राणी निश्चल स्थितीत पडून राहतो एवढेंच काय तें त्याजमध्यें साम्य आहे. पण साध्या निद्रेंत त्याचें शरीर अविकृत व सेंद्रिय स्थितीत कायम रहाते, व महानिद्रेंत तें कुजून पृथक्‌भवनाच्या मार्गास लागतें. साध्या निद्रेंत त्याच्या साऱ्या शक्तींस विश्रांति मिळाल्यामुळें तो ताजातवाना होऊन दुप्पट जोमानें आपल्या कामाला लागण्यास तयार होतो, व महानिद्रेंत त्याच्या साऱ्या शक्ति विलय पावून त्यास अचेतनता येते. साध्या निद्रेनंतर प्राण्यास जागृतीचा अनुभव येतो; उलट महानिद्रेस अंत आहे कीं काय, असल्यास पुन्हा जागृतावस्थेचा अनुभव येतो कीं काय हे वादग्रस्त प्रश्न आहेत. साध्या निद्रेस बहुधा जांभयांपासून, तर महानिद्रेस दुर्धर रोगापासून सुरुवात होते. साधी निद्रा येत असता आनंदाचा, तर महानिद्रा येत असतां यातनांचा अनुभव येतो. या सर्व कारणांमुळें निद्रेच्या या लघु व बृहत् स्वरूपाच्या कल्पनांनी मनुष्याच्या मनावर अत्यंत भिन्न स्वरूपाचे परिणाम होतात. महानिद्रेची कल्पना येतांच त्याच्या मनास चरका बसतो, तर साध्या निद्रेच्या बाहुपाशात पडण्यास तो आनदानें तयार

---

* चित्रमयजगत् [ जानेवारी सन १९२० ]

होतो. झोंप त्याच्या आयुष्याचा तिसरा किंवा चौथा हिस्सा हिरावून नेते; पण या सुखद अपहाराकडे तो आनंदानें डोळेझांक करितो. एखादे दिवशी झोंपेनें त्यास भेट दिली नाहीं तर त्याचे डोळे तारवटून जातात, मन अस्वस्थ होतें व तो सवड सापडतांच डोळे मिटून तिची आराधना करण्यात गढून जातो

झोंप याप्रमाणें मनुष्यमात्रास आवश्यक व प्रिय असता तिची व त्याची भेट न होऊं देण्यातच कांहीं विघ्नसतोषी प्राण्यास आनंद वाटत असतो. ढेकूण हे या प्राण्यात अग्रगण्य असून चिलटें, डास, कैंबरें हे त्याचे साथीदार असतात ढेंकूण हे माणसाशीं जमिनीवर लढतात तर त्याचे साथीदार त्याच्यावर वैमानिकांप्रमाणें आकशातून हल्ला करितात रणवाद्यें वाजविण्याचें कामहि या साथीदाराकडेच असतें तुम्ही आपल्या कानाचीं रंध्रें कोणत्याही बाजूस फिरवा, त्यानी तिकडे आपला मोर्चा फिरविलाच म्हणून समजावें. त्याच्या वाजवण्याकडे तुमचा कान नव्हता अशी सबब पुढें करण्याला ते तुम्हाला जागाच ठेवींत नाहीत. कधीं कधीं तर नाकालाच कान समजून ते त्यात आपल्या तुतान्यांसह प्रवेश करितात, व मनुष्याला शिंक येऊन त्याची झालेल्या चुकीबद्दल खात्री होईपर्यंत ते त्यातून बाहेर पडत नाहीत. सामान्य गाण्याबजावण्यात: चिजेंतील मुख्य अवसान ज्या स्वरावर असते त्या स्वराचें ठिकाण दर्दी माणसांखेरीज इतराना सहसा उमगत नाहीं पण ढेंकूण आपलें वायुवाद्य मनुष्याच्या रक्तात खुपसून जोरानें फुंकीत बसला असता त्याचे साथीदार वादनातील बहारीच्या स्थलीं त्याच्या [ मनुष्याच्या, ढेंकणाच्या नव्हे ] गालाचा पापा घेऊन त्याला इतका प्रेमळ इशारा करितात, कीं तो नुस्ती मानच हलवून न राहता त्या गालावर जोराची थापही मारितो व या प्रकारें वादनास जरी नाही तरी गालास चांगलाच रंग चढवितो गायनाप्रमाणें वादनही मनुष्याला वेडें करून नाचावयाला लावतें याचें वरील त्रयीच्या वादनापेक्षा दुसरें समर्पक उदाहरण सांपडावयाचें नाहीं. तें वादन थोड्याच वेळांत आपल्या श्रोत्यांस वेडें करून तांडवनृत्य करावयास लावितें; इतकेंच नाहीं तर त्यास आनंदाच्या भरांत आपलें अनुकरण करावयास लावून भारतीय योद्ध्यांचा आवडता व सर्व वाद्यांचा शिरोमणि जो शंख तो वाजविण्याची त्याचे ठायीं प्रेरणा उत्पन्न

करितें. 'आपणासारिखे करिती तात्काळ। नाही काळवेळ तयालागीं' हे महासाधूचें वर्णन कुशल वाजंत्र्यासही पूर्णपणें लागू पडतें.

ढेकणाचे साथीदार माणसापासून थोडेसे तरी दूर दूर असतात; पण ढेंकणास इतका परकेपणा बाळगण्याचें कारण नसतें. कारण मनुष्य व तो एकाच हाडामांसाचे नसले तरी एकाच रक्ताचे. तो त्याच्या परवानगीची वाट न पहाता त्याच्या बिछान्यावर खुशाल ठाणें देऊन बसतो. निजणारानें ज्या मऊ मऊ उशा व गिर्द्या स्वतःच्या डोक्यास व कुशीस टेंकावयाकरिता घेतल्या असतात त्याचा उपयोग तो किल्ल्यासारखा करून त्यांच्या मागें छपून बसतो निजणाराचा डोळा लागतो न लागतो तोंच त्याची स्वारी आपल्या आयुधासह सज्ज होऊन उश्यागिर्द्यांखालून मैदानावर येते व आपल्या बेसावध शत्रूवर अचानक हल्ला करिते. गनिमी काव्याची लढाई करण्यात ढेकणाचा हात कोणाच्यानेंही धरवणार नाहीं. एका क्षणीं डोक्याच्या घाटमाथ्यावर, तर दुसऱ्या क्षणाला बगलेच्या खिंडींत आणि तिसऱ्या क्षणीं पोटाच्या मैदानात, अशा जलदीच्या त्याच्या हालचाली असतात. त्या पाहून ढेंकणाच्या सबंध सैन्यानेंच येथें छावणी दिली आहे काय असा एखाद्यास भास व्हावयाचा! ब्रह्मदेवानें त्यास शरीरही जवसाच्या दाण्याप्रमाणें इतकें चापट दिलें आहे, कीं त्याचें वास्तव्य हातास सहसा उमगून येऊं नये, व इतकें लहान दिलें आहे, कीं पलंगपोसाची कितीही बारीक सुरकुती असो, तिच्यात त्यास बेमालूम लपतां यावें. प्रतिपक्ष्याशीं पेंच लढविण्यातही त्याचा हातखंडा असतो. ज्या हिंदी भाषेंत त्यास खटमल असें सार्थ नाव दिलें आहे, ती भाषा केवळ याच कारणामुळें राष्ट्रीय भाषा होण्यास सर्वांशीं योग्य आहे. खाटेवर याची कृति खरोखर एखाद्या मल्लासारखीच असते. तो आपल्या शिताफीच्या हालचालीनी निजणारास सळो की पळो करून सोडून लवकरच चीत करितो. निजणारा हाती दिवा घेऊन बारकाईनें पांघरुणाची एक एक घडी उलगडून व पलंगपोसाची एक एक सुरकुती साफ करून जरी पाहूं लागला तरी ढेंकणाच्या सफाईपुढें त्यास हात टेकावे लागतात. ढेंकणाचा शोध हा सुखाच्या शोधाप्रमाणें अनंत असतो. जादूगाराच्या हातातील रुपयाप्रमाणें हा एक क्षणीं दिसून लागलीच दुसऱ्या क्षणी अंतर्धान पावतो. एक क्षण

बोटांच्या चिमटींत गवल्यासारखा वाटतो; पण नखाग्रानें चिरडण्याकरितां त्याची चिमटींतून भुईवर स्थापना होते न होते तोंच तो तेथून निसटून तळहाताच्या मार्गानें बाहीच्या लबच लाब बोगद्यात प्रवेश करितो व निजणारा पुन्हा घोरू लागेपर्यंत बाहेर पडत नाही याच्या अगी इतकी धूर्तता असते, कीं आपल्याच रंगाच्या पदार्थांत दडून बसल्यास आपला पत्ता सहसा लागावयाचा नाहीं हें सत्य त्यास चागलें अवगत असते, व यामुळें 'अत्यत योग्य प्राणीच शेवटीं अवशिष्ट रहातात' [ Survival of the fittest ] या प्राणिशास्त्रातील सिद्धाताप्रमाणें तो अवशिष्ट रहाण्यास खरोखरच अत्यत योग्य असतो तरुण गोऱ्या माणसाच्या अगावर लपावें लागल्यास तो केसांत दडून बसतो, पण त्याच वयाच्या काळ्या माणसाच्या अगावर लपावयाचें झाल्यास त्याम सारें रान मोकळें असतें. अशा प्रकारें एखाद्या काळ्या इसमाच्या अंगावर तो हालचाल न करिता बसला असता पुष्कळदा तो इसम त्यास आपल्या अगावरील तीळ समजून त्याच्या स्थानामुळें होणाऱ्या लाभाच्या मानानें त्याजकडे कमी अधिक स्निग्ध दृष्टीनें पाहूं लागतो. पळावयाच्या साऱ्या वाटा बंद झाल्यास ढेकूण मेल्यासारखा निपचित पडून रहातो, पण आपला मार्ग काढणाराचें थोडेसें दुर्लक्ष्य झाल्याबरोबर धूम ठोकून पहाता पहाता नापत्ता होतो.

खाटा, पलंग ही ढेंकणाचीं अत्यत प्रिय निवासस्थानें होत. तेथून त्याला फारसा वेळ खर्च न करिता रणक्षेत्रात दाखल होऊन रक्तशोषणरूप पवित्र कार्यास सुरवात करिता येते. ही सोय खुर्च्यांतही असल्यामुळें त्याही त्याच्या आवडत्या असतात बसणारें मनुष्य खुर्चीला टेंकलें न टेंकलें तोंच ढेंकणानें आपलें अस्तित्व जाहीर केलें म्हणून समजावें. आरामखुर्चीमुळें बसणाराला जितका आराम मिळतो त्यापेक्षाही ढेंकणास अधिक मिळतो. कारण तिजवर बसलेला मनुष्य बहुधा लवकरच झोंपेच्या आधीन होत असल्यामुळें ढेंकणाच्या जिवाची तारांबळ होण्याचें कारण नसतें. टेबलाशीं माणसाच्या एखाद्या दुसऱ्या अवयवाचाच संबंध येत असल्यामुळें त्याजवर त्याची फारशी बहाल मर्जी नसते. खांबांतून वाटेल तेव्हां बैठकीवर किंवा खुर्च्यांवर येता येत असल्यामुळें प्रत्येक खाबात अनेक ढेंकणांची वसाहत दिसून येते. हिरण्यकशिपूनें खांबास लाथ

मारिली तेव्हां नरसिंहाबरोबर पांच पन्नास ढेंकणांची तरी तुकडी बाहेर पडली असली पाहिजे. जेवणाराचें पाटावरील आसान बरेंच स्थिर असल्यामुळें व त्याचें लक्ष्य पक्वान्नांकडे लागलेलें असल्यामुळें त्याच्याप्रमाणें ढेंकणासही अव्यग्र चित्तानें चमचमीत मेजवानीवर हात मारावयास मिळतो, म्हणून पाटातही त्या प्राण्याचा सुळसुळाट असतो. पलगावरील सारे ढेंकूण काढून टाकून त्याचे चारी खूर पाण्याच्या भाड्यांत ठेवून नाकेबदी केली तरी ढेंकूण हताश होत नाहीं. त्यास पोहता येत नसलें तरी त्याजपाशीं युक्त्याना तोटा नसल्यामुळें तो भिंती किंवा खाब चढून वरील तुळ्या गाठतो व तेथून नेमकी पलगावर उडी मारून तेथें बिनघोरपणें ढाराढूर निजलेल्याचा छळ करण्यास सुरवात करितो. या खेपेस पलंगाच्या खुरावाटे खालीं येण्याचा मार्ग बंद झाल्यामुळें ढेंकूण केशरी केलेल्या रजपुताप्रमाणें (निजणाराच्या) जिवावर उदार होऊन रक्तशोषण चालवितो. त्याच्या अंगात हळूहळू खून चढू लागतो दुःशासनाचें रक्त घटाघट पिणाऱ्या भीमकर्म्या वृकोदराच्याप्रमाणें त्याचे रक्तबंबाळ तोंड जर सूक्ष्मदर्शक यंत्राच्या सहाय्यानें दृष्टीस पडलेंच तर क्षणभर तरी भीति वाटल्यावाचून रहाणार नाहीं हें खास.

ढेंकणावर वस्ताद अशीं बरींच औषधें निघाली आहेत, पण त्याचा उपयोग गरजूंच्या घरचे ढेंकूण नाहीसे करण्यापेक्षा तीं काढणाराच्या घरीं पैसे जमविण्याकडेच विशेष होतो असा अनुभव आहे. मला एक घरगुती औषध स्वानुभवानें अचुक गुणकारी वाटल्यावरून येथें देत आहें. गरजूस फुरसद असल्यास जरूर उपयोग करून पहावा. अफू, सोमल, बचनाग, गोरचूद, कुचल्याचें बी, धोत्र्याचें बीं, काच हीं औषधें समभाग घेऊन कुटून वस्त्रगाळ करावींत व नंतर तीं सर्पाच्या गरळातून आठ दिवस खलावींत नवव्या दिवसापासून त्या चूर्णातील पळी पळी चूर्ण ढेंकणाच्या तोंडात दिवसांतून तीन वेळां याप्रमाणें आठ दिवस घालावें. औषध सुरू केल्यापासून नवव्या दिवशीं ढेंकूण औषधाच्या गुणानें नाहीं तर भारानें तरी मुर्दा होऊन पडेल. न पडल्यास खर्च झालेले पैसे परत वावडें फक्त माणसाच्या रक्तानें. या औषधाचा गुण येण्यास जरा वेळ लागेल खरा; पण गुण मात्र खात्रीचा.

या चूर्णापेक्षाहि त्याचा धूर विशेष गुणकारी असतो. चूर्णाचा चुटा

ओढून त्याचा धूर सोडिला असता त्याच्या कक्षेंत येणारे सारे ढेंकूण तडकाफडकी मरतात. चुट्टा ओढणारा इसम धुरानें गुदमरून मरण्याचा पुष्कळदा संभव असतो हा एकच लहानसा अयब या उपायांत आहे.

एकदा आमच्या घरात ढेंकणाची इतकी गर्दी झाली, कीं मी त्याच्या त्रासानें पिसाळण्याच्या बेताला आलों. मी पाटावर, बैठकीवर, खुर्चीवर, टेबलावर, खाटेवर, पलंगावर कोठेंही बसलों असलों तरी खालून असंख्य सुया बोंचल्याप्रमाणें वेदना होत. त्यांच्या भीतीनें मी बसण्याऐवजीं प्रहरन् प्रहर उभाच राहूं लागलों व मऊ बिछान्यावर शरपंजरी पडल्यासारखें वाटूं नये म्हणून घटका घटका पाठीची कमान करून पडूं लागलों. ढेंकूण अगाचे लचके तोडतोडून फरारी झाले, कीं त्याचा सूड मी घरातील मुलाबाळावर उगवीत असें एकदा जवळपास कोणी नाहीसें पाहून मीं स्वतःच्याच तोंडात फडाफडा मारून घेतलें. अखेरीस काही दिवस घर सोडण्याचा विचार करून मी सकुटुंब काशीयात्रेस निघून गेलों. त्या यात्रेनें माझी ससारापासून झाली नाही तरी ढेंकणापासून सुटका होईल अशी फार आशा होती घरीं रक्तशोषणाचा मनमुराद अनुभव आलेला असल्यामुळें पड्याचें व गयावळाचें रक्तषोषण विशेष त्रासदायक वाटलें नाहीं, व चिलटापिसवाच्या वादनाच्या मानानें त्याची पिरपिरही कर्णकटु वाटली नाही एक महिन्यानें आम्ही सुखरूप परत आलों. घरात जागोजाग ढेंकणाचे निर्जीव अस्थिपंजर पहावयास सांपडतील अशी माझी कल्पना होती; आणि ते सापडले असते तर त्याजकरिता दोन आसवाची तिलाजलि देण्याची माझी उदारपणाची तयारीही होती रोजचे रोज रडकुंडीला येऊन टिपें गाळीत बसण्यापेक्षां एकदाच टिपें गाळून मोकळें होणें कोणीही पत्करील. पण माझी उदार इच्छा तृप्त होण्याचें एकही चिन्ह दिसेना. ते बिचारे अशक्त होऊन जागचे जागीं पटापट मेले असावेत, बाहेर येण्यापुरता तरी तकवा त्यांनी कोठून आणावा असा समाधानपूर्वक विचार करीत मी एका खुर्चीला टेंकतों, तों तिच्यांत दडून बसलेल्या माझ्या कांहीं जुन्या स्नेह्यांनीं माझ्या पाठीच्या खालच्या भागाचा कडकडून चावा घेऊन मला पहिली सलामी दिली वर्षांतील सारीं उपोषणें एका महिन्याच्याच अवधींत घडल्यामुळें त्यांच्या दाढा रोडावून त्यांस अशी काहीं तीक्ष्ण धार

लागलेली होती, कीं ती एक तर त्यास माहीत कीं माझ्या अगास माहीत ! मी कळवळून गेलों आणि उडी मारून दुसऱ्या खुर्चीवर जाऊन बसलों. तेथेंही तोच प्रकार दिसून आला तेथेंही बुभुक्षित ढेंकणांची भली मोठी पगत माझ्या अगाचीच वाट पहात बसली होती माझ्या महायात्रेचें मावंदें होण्यापूर्वीच त्यानीं आपल्या उपोषणांचें पारणें फेडण्यास सुरवात केली आणि एका घटकेच्या आत मला त्राहि भगवान् करून सोडिलें.

यानंतर मी दुसरीच एक युक्ति योजण्याचें ठरविलें. ढेंकूण नखाग्रानें चिरडून मारावेत तर सापडत नाहींत, उपासमारीनें मारावेत तर मरत नाहींत, त्यापेक्षा त्यांची गावात खैरात केली तर किती तरी चागलें होईल गावांत असे किती तरी झोंपाळू इसम असतील, कीं ज्याची अतिनिद्रेमुळें प्रकृति नीट रहात नाहीं कित्येक विद्यार्थ्यास व मजुरास पहाटे चार वाजतां उठणें जरूर असून झोंपाळूपणामुळें त्यांची ती वेळ टळत असेल. माझी जर जाग्रणें या साऱ्यामध्यें वाटून दिलीं तर माझा भार हलका होऊन अनायासें परोपकार केल्यासारखें होणार आहे ! विचार मनात येण्याचा अवकाश, त्याची अमलबजावणीही लागलीच सुरू झाली मी ढेंकणानीं बुजबुजलेले आपले कपडे अगावर चढविले, आणि गावकऱ्याच्या भेटी घेण्याकरितां बाहेर पडलों. ज्याच्या घराचे उंबरठेही मी ओलांडिले नव्हते अशाना मी त्या दिवशीं मोकळ्या मनानें धूळभेट दिली ज्यांच्याशीं नुसता हस्तिदंतीपुरताच संबध, त्याच्याशीं घटका घटका गप्पा मारून मीं त्यांच्या चच्या रिकाम्या केल्या ज्याची ओळख याहूनही अंधुक होती त्याच्याही घरीं मी घटका घटका बसून [ मला विडीचें व्यसन नसताही ] विड्याचे जुडगे पार केले हा क्रम मीं दुसऱ्या व तिसऱ्या दिवशींही चालू ठेविला. माझ्या अंगीं एकाएकी उत्पन्न झालेला हा मनमिळाऊपणा पाहून लोकाना प्रथम आश्चर्य वाटल्यासारखें दिसलें पण माझ्या भेटीबद्दल बिचाऱ्यांनीं कधींही कंटाळा दाखविला नाही. उलट माझ्या आगमनाची ते उत्कंठतेनें वाट पहात बसू लागले व माझ्याकारिता पानसुपारीचा, तंबाखूचा व प्रसंगी चहाचाही खर्च करण्याला एका पायावर तयार राहूं लागले. माझें वर्तन त्याना जितकें गूढ वाटलें होतें त्यापेक्षांही त्यांचें मला वाटूं लागलें. इतके लोकप्रिय होण्यासारखे गुण तरी आपणांत कोणते आहेत याचा

मी बारकाईने विचार करूं लागलो, पण काही तर्क चालेना अखेरीस कित्येकास स्पष्ट विचारता त्यांच्या सागण्यात असें आलें की, मी घरोघर भेटी देण्यास सुरवात करण्यापूर्वी लोकास चागल्याशा झोंपा येत नव्हत्या; पण आता स्वस्थ झोपा येत असून तो केवळ माझा पायगुण असा सर्वांचा समज झाला आहे. आणखी तपास करिता असें कळलें, कीं पूर्वी घरोघर ढेंकणाचा बुजबुजाट झाला होता, पण आता औषधालाही ढेकूण मिळण्याची मारामार पडते, हें ऐकताच माझें धाबे दणाणून गेलें. स्वत च्या कपड्याच्या द्वारें लोकाच्या घरी ढेंकूण विसर्जन करण्याची जी माझी युक्ति होती ती माझी मलाच फळली की काय ? घरीं धावत जाऊन पहातों तों माझी बडी, अंगरखा, पागोटें, जोडा इत्यादि साऱ्या वस्त्रप्रावरणाचे ढेंकणानीं मोठमोठे तबू व डेरे बनविलेले दिसले. बैठकीचें त्यानीं चागलें प्रशस्त 'आटपाट' नगर केलें होतें, आणि खुर्च्या, टेबलें वगैरे लाकडी सामानातून त्यानी जपानी शहरें वसविलीं होतीं त्या ढेंकणात आमच्या गावातील यच्चायावत् ढेंकूण गोळा झाले होते त्यामध्यें बहुनानाकडील रोड व पाहूतात्याकडील लठ्ठ ढेकूण होते. त्यामध्यें गोरे, काळे, चपळ, मद, गोड रक्ताचे, खारट रक्ताचे वगैरे साऱ्या वर्गांचे प्रतिनिधि होते. तें पाहून मला ससाराचा वीट आला. त्याच क्षणीं मी बायकामुलासह एकेका वस्त्रानिशी घरातून बाहेर पडलों, आणि मीं आपल्या हातानें घरावर निखारा ठेवला. घराची राख होईपर्यंत मी तेथून हललों नाही. तेव्हांपासून मी जरी भाड्याच्या घरात रहात आहे तरी मला नित्य सुखाची झोंप येत असते.

ढेंकूण, पिसवा ही झोंपेस येणारी बाह्य विघ्नें होत. त्याशिवाय काळजी-सारख्या मानसिक अवस्थाही तिला विघ्न करूं शकतात. प्रत्येक विघ्नात रक्तशोषण हा समानधर्म दिसून येतो; मग तें विघ्न बाह्य असो कीं आंतर असो. आमच्या बहुनानाच्या मागें नेहमीं काहीं ना काहीं तरी विवंचना असल्यामुळें त्याना झोंप यथातथाच मिळत असे. त्याचें डोकें फार तरल व कल्पक, नेहमीं नवीन कल्पना किंवा योजना काढण्यात गुंतलेलें असावयाचें. त्याच्या कल्पकपणाची काहीं कल्पना वाचकांस यापूर्वीच आली आहे. त्याचें डोकें विशेषेंकरून कच्च्या मालाबद्दल एकदम पक्का

ालच उत्पन्न व्हावा अशा युक्त्या काढण्याकडे चाललें असावयाचें
ाईम्हशींच्या आचळाना यत्र लावल्याबरोबर आतून दूध येण्याऐवजी एकदम
ोणी किंवा श्रीखंड यावें, जमिनींत सरकी पेरण्यापूर्वी तिच्यात अशा
ुणधर्मांचें खत घालावयाचें, की कापसाच्या बोंडातून कापूस न निघता
ुकदम मलमल किवा रेशीमकाठी अगर जरीकाठी धोतरजोड्याचें एखादें
ानच त्यावरील चित्राछापानिशीं निघावें, इकडे त्याचें लक्ष हमेशा वेधलेले
ासे त्याची युक्ति फलद्रूप होण्याचे डोहाळे दिसूं लागण्यापूर्वीच ते ती
ालमल किंवा धोतरजोडे कोणत्या पेठात विकावयाचे हें ठरवून त्याची
किंमत सार्वजनिक कामाकडे मनातल्या मनात खर्चेही करून टाकीत असत
ा गोष्टीच्या चिंतनात नानाच्या रात्रींच्या रात्रीं जाऊं लागल्या याचा
ारिणाम असा झाला, की त्याना लवकरच निद्रानाशाचा विकार जडला.
यानीं हवे ते प्रयत्न केले तरी त्याना झोंप म्हणून येऊ नये
यानीं दिवसा दारें खिडक्या बद करून कृत्रिम अंधार उत्पन्न करावा, डोळे
मेटून घटका घटका स्वस्थ पडून रहावें, अगावर पाघरूण घेऊन जिवाचा
कोंडमारा करून घ्यावा, झोपेंतल्याप्रमाणें तोंड वासून ठेवावें व मोठ्यानें
ोरण्यासही सुरवात करावी, पण निद्रादेवी अशा सोंगास मुळींच भीक
ालीना. निव्वळ थकव्यानें झोंप येईल या आशेनें नानानी जोर व
ाठबशा काढाव्या, दोन दोन तास सहल करावी, मागें कोणी लागल्याप्रमाणें
ूम ठोकून पळत सुटावे, घोड्यावर रपेटी कराव्या, तालीमबाजाशीं
ुस्त्या कराव्या, दाडपट्याचा व बोथाटीचा अभ्यास करावा, पण सारें व्यर्थ!
ा त्यांच्या मर्दुमकीवर निद्रादेवी भाळण्याचें चिन्ह दिसेना. अखेरीस
ादक पदार्थ खाण्यापर्यंत त्याची मजल आली. त्यानी भाग, गाजा,
कुसुबा, अफू, इत्यादि सारे पदार्थ आळीपाळीनें घशाखालीं ओतले,
ण पालथ्या घागरीवर पाणी! पुढें त्या पदार्थांच्या भिन्न भिन्न मिश्रणाचें
ेवन करण्यास त्यानीं सुरवात केली प्रथम त्यांनीं अफूत भाग मिसळून
खाल्ली. काहीं परिणाम होत नाही हें पाहून भागेंत अफू मिसळून खाल्ली.
ारीही तोच परिणाम नतर गाजात कुसुबा, कुसुब्यात गाजा अशा दुसऱ्याही
अनेक मिश्रणाचे त्यानीं प्रयोग करून पाहिले, पण फुकट! सामान्य विषाचा
आपणावर परिणाम होत नाहीं असा अनुभव आल्यावर त्यांनीं आपल्या

जिभेस नागीण डसवून पाहिली. पण तिच्या विषाचा नानावर अंमल चालण्याऐवजी नानाच्याच विषाचा तिजवर चालून ती तडकाफडकी गतप्राण होऊन पडली. तेव्हापासून मोठमोठे विषारी साप नानास वचकून त्याच्यापासून दोन पावलें दूरच राहूं लागले. विंचू तर नानास पाहिल्याबरोबर नांग्या टाकून तातडीनें निसटून जात.

येथपर्यंत मजल आली, तेव्हा नानानी आत्महत्येचा निश्चय केला. त्यांनीं एकदां मोठ्या कड्यावरून उडी मारिली. पण उडी मारिताना कड्याच्या पायथ्याशीं पोहोंचेपर्यंत डोक्यास ऊन्ह लागू नये [ ते दिवस उन्हाळ्याचे होते ] म्हणून त्यानी जी छत्री उघडून हातात घेतली होती तिच्यामुळें त्यांचा हेतु सिद्धीस गेला नाही. दुसऱ्या एका खेपेस तळ्यात बुडून जीव देण्याचा निर्धार करून ते तळ्यापर्यंत गेलेही. ते दिवस हिंवाळ्याचे असल्यामुळें पाणी बर्फासारखें थंडगार झालें होतें बडूनानांनी उडी मारण्यापूर्वी पाण्यास हात लावून बघितला, तों त्याच्या अगावर शहारे आले तें पाहून नानानी आपला बेत पुढील उन्हाळ्यापर्यंत तहकूब ठेविला. यानतर बगाल्यातील एका मुलीनें आपल्या वस्त्रावर चिमणीचें तेल ओतून जीव दिल्याचें वर्तमान नानांच्या वाचण्यात आलें, तेव्हा तिचें अनुकरण करण्याचा त्याचा संकल्प झाला पण त्यावेळीं तें तेल लढाईमुळे इतकें महाग झाले होतें, की आमच्या व्यवस्थित व बातबेती नानाना, जीव देण्याकरिता का होईना, महाग तेलाचा उपयोग करणें अप्रशस्त वाटलें, व तेल स्वस्त होईपर्यंत वाट पाहण्याचा विचार, केवळ निरुपाय म्हणून त्याना करावा लागला.

ज्या निद्रेनें नानाच्या बतावणीस दाद दिली नाही, शारीरिक श्रमास जुमानलें नाही किंवा त्याजवर अमली पदार्थाचा अमल बसू दिला नाहीं, जिच्या विरहाने त्यास महानिद्राही आपलीशी करावी असे वाटूं लागलें, ती निद्रा अखेरीस एका ग्रथानें वठणीला आणिली. त्याचा प्रकार असाः— मराठींत एक अत्युत्तम नवीन शास्त्रीय ग्रथ निर्माण झाला आहे अशी कीर्ति ऐकून घेऊन मी तो घेऊन नानास नजर करण्याचा बेत केला आणि तो लवकरच अंमलातही आणिला तो ग्रथ घेऊन मी रात्रीचे वेळी त्याजकडे गेलों, तेव्हा ते झोपेशिवाय निराश होऊन बिछान्यावर तळमळत पडले होते. त्यानीं डोळ्यांस आरशी लावन ग्रंथ हाती घेतला. व त्याच्या पहिल्या

ओळीवरून नजर फिरविली असेल नसेल, तोंच आजपर्यंत रुसून बसलेली निद्रादेवी एकदम प्रसन्न झाली, आणि निमिषार्धांत नाना घोरावयास लागले. डोळ्यावरील आरशी काढण्याचेंहि त्यांना भान राहिलें नाहीं. दुसऱ्या दिवशीं ताजेतवाने होऊन ते जेव्हा ग्रंथ नजर केल्याबद्दल माझे उपकार मानूं लागले तेव्हां त्यांनीं गेल्या रात्रीं एक नवीनच शोध लागल्याचें वर्तमान मला सांगितलें. डोळ्यांवर चष्मा असतांना झोंप लागली तर स्वप्नांतील गोष्टी साध्या डोळ्यांनीं दिसतात त्यापेक्षा स्पष्ट दिसूं लागतात, हा तो शोध होय. वादाच्या भरांत चष्मा नाकावरून काढून डोक्यावर चढविला तर एरव्हीं डोक्यास न पटणारी विचारसरणी पटू लागते असाही अनुभव प्रयोगाअंतीं आल्याचें नानानीं काहीं दिवसानीं सांगितलें.

ग्रंथाचा हा प्रभाव दिसल्यापासून नानांचा ग्रंथाबद्दलचा—विशेषेंकरून शास्त्रीय ग्रंथाबद्दलचा आदर किती तरी पटींनें वाढला. जो ग्रंथ त्याच्या झोंपेस कारणीभूत झाला होता त्याजबद्दल तर त्याना इतकी पूज्यबुद्धि वाटू लागली, कीं त्यानीं त्याचीं पानें कधींहि फाडली नाहींत. ते रोज रात्रीं निजावयाचे पूर्वी तो ग्रंथ नेमानें वाचावयास हाती घेत, पण त्याचे दोन शब्द वाचले नाहींत तोंच त्याना गुंगी येई; व या प्रकारें त्याचीं पानें फाडण्याचें कारणही त्याना कधीं पडलें नाहीं. ग्रंथाचा केवढा उपयोग आहे हें कळल्यापासून नानांनीं ग्रंथालयास देणगी देण्याची एकही संधि वाया जाऊं दिली नाहीं. ग्रंथानीं केवळ मनच सुधारतें असें नसून शरीरही सतेज होतें असें ते नेहमीं म्हणूं लागले.

पाङ्गतात्याचा प्रकार आम्हा दोघाहून अगदी निराळा आहे ढेंकणानीं त्याची झोप कधी मोडली नाहीं, चिलटानीं ती कधी उडाली नाहीं व काळजीने तिला कधीं मज्जावही केला नाही. आहार व निद्रा यामध्यें अमुक कालावधि गेला पाहिजे असा जो वैद्यकानें नियम घालून दिला आहे तो पाळण्याचें त्याना कधी कारण दिसलें नाही, जेवण झाल्याबरोबर झोंपण्याची व निजून उठल्याबरोबर जेवण्याची त्याची नेहमी तयारी असते. फार जेवल्यानें त्याची झोंप कधीं बिघडली नाही व अतिनिद्रेनें त्याना कधीं अग्निमांद्य झालें नाही. त्याच्या घोरण्यामुळें त्याच्या जवळपासच्या इसमाचा जरी डोळ्यास डोळा लागत नाही तरी त्यानें त्याची स्वतःची

कधींच झोंपमोड झाली नाहीं त्याच्या घोरण्याच्या आवाजात किलटाचें गुणगुणणें लोपून जातें, त्याचप्रमाणें घड्याळाचा गजरही लोपून जातो. तात्याचें घोरणें इतक्या उच्च स्वरात चालतें, कीं त्याच्या आळीतील घराना निराळी जागल करण्याचें कारणच पडत नाहीं. त्या स्वरात कुत्र्याचें भुंकणें व गस्तवाल्याचा साद दोन्ही गडप होतात. त्या स्वरामुळें शेजाऱ्यापाजाऱ्यास रात्रीचे वेळीं परस्परांशी ओरडूनच बोलावें लागतें आणि भर उन्हाळ्यातही घराचीं सारी दारें व खिडक्या लावून व कानात बोळे घालून निजावें लागतें. शेजाऱ्यापाजाऱ्याच्या मालमत्तेचें रक्षण होण्यास आपली किती मदत होते याची त्या उदारधीस मात्र दादहि नसते.

दोन प्रहरचें जेवण झाल्यावर अंथरुणावर पडून तब्बल दोन तीन तास यथास्थित झोंप काढावयाची असा तात्याचा फार वर्षांपासून नियम चालत आला होता त्याचे ऐशीं वर्षांचे वडील मरावयास टेकले तेव्हा त्याचें दुपारचें जेवण नुक्तेंच आटपलें असून ते लवंडण्याच्या बेतात होते इतक्यात वडिलास घरघर लागल्याचें त्यास वर्तमान कळलें. तात्याचें तोंड ताबडतोब गोरेमोरें झालें आणखी दोन तीन तास तरी वडिलाचें आयुष्य लांबविण्याबद्दल तो पितृवत्सल पुत्र मनातल्या मनात देवाची करुणा भाकू लागला. पण निष्ठुर देवानें त्याची विनंति ऐकली नाहीं. वडिलांचें लवकरच प्राणोत्क्रमण झालें, व तात्यास पुढच्या तयारीस लागावें लागलें. ती तयारी चालली असता त्याचे डोळे जड व लाल झाले, शरीरातही जडपणा दिसू लागला, डोकें फिरावयास लागून झोंके खाऊं लागले, व ते वरचेवर धरणीवर अंग टाकूं लागले. जवळच्यानीं त्याच्या डोक्यावर जोरानें पाणी शिंपडलें नसतें तर त्यांना मूर्च्छाही आली असती, अखेरीस वडिलाचें कलेवर उचलण्याच्या वेळेस त्याच्या तोंडून आपोआप ‘ बाबा, याच वेळीं कसे हो निघून गेलात ! ’ असे हृदयद्रावक उद्गार बाहेर पडले. वडिलाच्या अकालिक मृत्यूनें तात्यावर केवढें संकट आलें होतें याची जाणीव असलेल्या प्रत्येकाच्या काळजाचें ते उद्गार ऐकून पाणी पाणी झालें यांत नवल तें काय ?

दुपारच्या झोपेंच्या नियमानें कधीं कधीं किती गैरसोय होते याचा अनुभव आल्यापासून तात्यांनीं मनाचा निग्रह करून झोंपेकडे ठराविक

वेळ देण्यापेक्षा संधि मिळेल तेव्हा वाटेल तितका वेळ झोंप घ्यावी असें ठरविलें, व त्याची जारीनें अंमलबजावणी सुरू केली. आता त्यांची दिवसाची झोंप दोन तीन तासाऐवजी पाच पाच सात सात तास होऊं लागली. ते स्नेहीमंडळीच्या गप्पा चालू असता त्याच्या देखत बसल्या-बसल्या झोंप काढूं लागले मधून मधून ते ज्या डुलक्या घेत त्यामुळें त्याच्या सोबत्यास असें वाटत असे, कीं याना झोंप लागली नसून यानीं नुसते डोळे मिटून घेतले आहेत, व याचें गप्पागोष्टीकडे पूर्ण लक्ष असून ते मान हालवून मान्यताही दाखवीत आहेत एखाद्या वेळीं वाद भरांत आला असता तात्या दोन्ही पक्षाच्या विधानास सारख्याच जोरानें मान हलविताना पाहून त्याच्या नि:पक्षपातीपणाबद्दल सर्वांस कौतुक वाटे. अखेरीस ते जेव्हा घोरू लागत तेव्हा त्यानीं वाद मिटविण्याची ही एक युक्ति केली आहे असेच सर्वांना वाटे आता रात्रींचीं जाग्रणें करण्यासंबधानेंही तात्याची प्रतिकूलता राहिली नाही. ते इतराबरोबर गाण्याच्या बैठकीत जात आणि तेथे आपल्या घोरण्याने बाजाच्या पेटीची साथ करीत. मात्र ते आपला सूर पेटीच्या स्वरात मिळविण्याची यातायात न करिता पेटीवाल्यासच पेटीचा स्वर त्याच्या घोरण्याच्या सुराशी मिळविण्यास भाग पाडीत तात्या बैठकीस श्रोते म्हणून जात खरे, पण आपणाऐवजीं इतरानाच श्रोते करून परत येत. मोठमोठ्या पहाडी आवाजाचें त्याच्या घोरण्यापुढें तेज पडत नसे, आणि कधीं कधीं तर गवयाना आपली हत्यारें गुडाळून बैठकीतून पळच काढावा लागे. नाटकगृहात तात्याचे घोरणें एकदा सुरू झालें, की गाणाऱ्या नटाचे आलाप व बोलणाऱ्या नटाचीं आवेशयुक्त भाषणें तर ऐकू येत नसतच, पण श्रोत्यांच्या टाळ्याचा कडकडाटही फुसक्या फटाक्याच्या लडीच्या आवाजाप्रमाणे भासे. तात्याच्या घोरण्यामुळें बेसूर नटांचें गाणें श्रोत्यापर्यंत पोहोंचत नसे, व सुरेल नटास श्रोत्याकडून मिळालेला 'पुन्हा एकदा' हा हुकूम त्याजपर्यंत जाऊन धडकत नसे, अशा उभय पक्षाच्या सोई होत असल्यामुळेच त्या घोरण्यास कोणी हरकत घेत नसे.

तात्याच्या बेसुमार झोंपाळूपणामुळे त्याची स्वत:ची कमी गैरसोय होई असें नाही. जेवणाव्यतिरिक्त इतर प्रसगी ते वेळेवर हजर झाले आहेत असें बहुधा व्हावयाचें नाही श्रावणीच्या दिवशी ते पचगव्यप्राशनाच्या पुण्य

प्रसंगीं बहुधा गैरहजर राहून सातूच्या पिठाचे गोळे खाण्याचे वेळीं मात्र येऊन दत्त उभे रहावयाचे! स्नेह्याच्या घरची गौरीची आरास करण्याच्या कामीं मदत करण्याची त्याना मोठी हौस. पण बेटी झोंप त्याच्या उपकार-शीलत्वाच्या आड यावयाची. आरास सुरू होण्यापूर्वी ते जे निजावयाचे ते निमंत्रित मंडळीस हरभऱ्याची डाळ व पन्हें वाटण्याच्या संधीस जागे व्हावयाचे! कीर्तनप्रसंगी खिरापत व सत्यनारायणाच्या कथेस प्रसाद वाटण्यापूर्वी ते बहुधा जावयाचे नाहीत, आणि या प्रकारें सुरसकथाश्रवणास नेहमीं मुकावयाचे! बाकी त्या लाभास घोरण्यानें इतरास मुकविण्यापेक्षा स्वत: मुकणें हें एका दृष्टीनें निरपेक्षपणाचेंच होय यात सशय नाहीं.

झोंपेंत गेलेल्या वेळाचें तात्याना मुळींच भान रहात नसे उगीच कोठें डुलकी येतें न येतें तोंच आपले घड्याळ दोन दोन तीन तीन तासाची मजल मारितें, अर्थात् ते मनस्वी जलद म्हणजे पाच मिनिटास एक तास या वेगानें चालतें असा त्याचा बरेच दिवस समज होता. म्हणून त्यानीं तें दुरुस्त करण्याकरिता अनेक वेळा घड्याळजीस देऊन पाहिलें, तरी त्याची गति मद होण्याचें चिन्ह दिसेना. इकडे दुरुस्तीच्या खर्चाची गति सारखी वाढतच होती. अखेरीस दुरुस्तीचा खर्च घड्याळाच्या किंमतीच्या दसपटीवर गेला, तेव्हा त्यानी जुन्या घड्याळास रजा देण्याचें व नवें विकत घेण्याचें ठरविलें, आणि त्याकरिता एका घड्याळाच्या दुकानीं गेले तेथील सर्व घड्याळाचे काटे नाटकप्रयोगातील वारागनाच्या हाताप्रमाणें एकासारखे एक फिरताना पाहून आणि त्यातील व आपल्या घड्याळातील वेळ ततोतत जुळत असलेली पाहून त्यानीं आपला बेत फिरविला आणि जुनें घड्याळ परत घरीं नेलें. भपकेबाज दुकानातला कोरा व सुदर माल दृष्टीस पडल्यावर तो न घेता जुनाच माल वापरण्याची इच्छा होणें फार विरळा दिसून येते पण तो चमत्कार त्या दिवशीं तात्यांच्या बाबतीत घडून आला खरा. घरीं आल्यावर तात्या जरा लवंडले. त्याचा डोळा लागावयास व त्याचें घड्याळ बद पडण्यास एकच गाठ झाली. त्याचे काटे तीन तास त्याच्या मालकाच्या अवयवाप्रमाणें निश्चल राहिले. तात्या उठून पहातात तों काटे पूर्वीच्याच ठिकाणीं घड्याळाची गति आपोआप दुरुस्त झालेली पाहून त्याना अर्थातच आनद झाला. ‘ नवें घड्याळ घेण्याची धमकी देताच बेटें कसें वाटेवर आलें !’

असे उद्गार त्याच्या तोंडून बाहेर पडले. या वेळेपासून तें घड्याळ त्याच्या गळ्यातील ताईत होऊन बसलें; तें इतकें, की कालगतीनें त्याचे दोन्ही काटे मोडून गळून पडले तरी तात्या वेळ पहाण्याकरितां त्यावांचून दुसऱ्या कोणत्याही घड्याळाचा उपयोग करीत नाहीत, आणि त्यांना दुसरें घड्याळ आपल्या घड्याळाइतकें भरवशालायक वाटतही नाहीं

आगगाडी पकडावयाची असली म्हणजे तात्याच्या जिवाची धांदल विचारूं नये पण जेवणानतर लहानशी सुरसुरी आली, की तिनें सारी घाण व्हावयाची. ‘या गाड्याच्या वेळा नेहमी गैरसोईच्या असावयाच्या. जेवण झाल्यावर जरा स्वस्थपणें पडूं म्हटलें तर सोय नाहीं. झोंपेच्या वेळीं गाडीनें कोणत्याही स्टेशनावर येता कामा नये असा नियम करण्याबद्दल कपनीकडे एक अर्ज जरूर केला पाहिजे इग्रजाचें सारेंच गैरसोईचें. बगल्याचीच गोष्ट घ्या ना! ज्या घराला खुंट्या नाहीत, कोनाडे नाहींत, फडताळें नाहींत, माडी नाही, ज्या घराला सुरक्षितपणा नाही, जें घर बाहेरून लावायला गेलें कीं आतून बंद होऊन मालकालाच बाहेर तिष्ठत ठेवतें तें घर खुशाल बंगला म्हणून समजावें! नाही म्हणायला आरामखुर्ची, सोडा, लिंबू आइस्क्रीम अशा काहीं अपवादादाखल सोइस्कर वस्तू इंग्रजामध्येंही आहेत.’ यातील काहीं सोईस्कर वस्तूच्या कल्पनेनें तात्याच्या तोंडाला पाणी न सुटलसास त्याचें वक्तृत्व आणखीही कितीतरी वेळ चालतें

तात्याना मोठ्या शिकस्तीनें गाडी सापडली तरी ते वेळेवर मुक्कामाला पोंचतील याचा मुळीच नेम नसे. ते झोंपेच्या भरात नेहमी मुक्कामाच्या पुढें दोनतीन स्टेशनें जावयाचें, व तेथें उतरून झालेल्या चुकीची दुरुस्ती करण्याकरिता उलट दिशेनें येणाऱ्या गाडीने परत यावयास निघावयाचे, ते मुक्कामाच्या मागें दोनतीन स्टेशनें गेल्यावर जागे व्हावयाचें! हा प्रकार घड्याळाच्या लबकाप्रमाणें दोन तीन वेळा झाल्यावर मग कोठें त्याना मुक्कामाचें ठिकाण दिसावयाचें! एकदा आगगाडीच्या एका लहान फाट्याचा प्रवास त्याना एकाच तिकिटावर रात्रीतून दोनतीन वेळा घडला! एकदा ते मुंबईहून पुण्यास जाणाऱ्या गाडीची कल्याण स्टेशनावर वाट पहात बसले असता–नव्हे, निजले असता–त्याच्या लागोपाठ तीन गाड्या चुकल्या. दर खेपेस गाडीनें निघावयाची शिटी फुंकल्यावर तात्या जागे व्हावयाचे आणि तिच्यामागें धूम

ठोकूनही ती हाती लागत नाही हें कळून आल्यावर हात हालवीत परत यावयाचे! पुढील गाडीस अजून अवकाश आहे, तितक्यात आणखी एक झोंप काढण्यास हरकत नाही अशा भरंवशावर ते पुन्हा लवडायचे, आणि पुन्हा पूर्वीच्याच प्रकाराची पुनरावृत्ति व्हावयाची. तिसऱ्या खेपेस तर डोळ्यावरची झापड पुरती उडालेली नसल्यामुळें ते गाडीच्या मागे धावावयाचे सोडून उलट दिशेलाच धावत सुटले! चवथ्या खेपेस गाडी सापडण्याचें कारण एवढेंच, कीं त्यानीं गाडी येण्यापूर्वी आपणास उठविण्याबद्दल हमालास बजाविलें होतें. आपणास उठावयास उशीर लागल्यास 'जेवण तयार आहे' हा मंत्र कानात उच्चारावयास त्यानी त्यास मुद्दाम सागितलें होतें.

तात्यानीं अलीकडे शरीराच्या वाटेल त्या अवस्थेत झोंप यावी अशी संवय जडवून घेतली आहे. ते बसून झोप घेतात, उभ्याने झोंप घेतात, फार काय, पण चालतानाही झोंप घेतात त्याना पळत पळत झोंप घेताना मात्र अजून कोणी पाहिलें नाही. पण भविष्यकालाच्या पोटात काय काय चमत्कार दडून राहिले आहेत हे कुणी सागावे!

---

मुष्टि ३० वी *

## यशःसिद्धीचे सोपे व अचूक मार्ग

प्रत्येक मनुष्य समोर कोणतें ना कोणते तरी ध्येय ठेवून त्याच्या सिद्ध्यर्थ अहर्निश खटपट करीत असतो श्रीमत मनुष्य आपल्या खडोगणती धान्यास खाणारे कसे मिळतील या फिकिरींत असतो, तर दरिद्री मनुष्य आपल्या खडोगणती पोरास पोसावयाचे कसें याची काळजी बाळगतो. सज्जन परोपकाराची, तर दुर्जन परापकाराची चिंता वहातो. रोगी आरोग्याच्या, तर निरोगी शक्तीच्या विवचनेंत असतो. विद्यार्थी ज्ञानाच्या मागे हात धुऊन लागतो, तर ज्ञानी कीर्तीकरिता सर्वस्वास अचवून बसतो. एखादा प्रेमाकरिता संपत्तीची, तर दुसरा संपत्तीकरिता प्रेमाची होळी करितो एखादा पदवीसाठी माणुसकीवर, तर दुसरा माणुसकीसाठी पदवीवर लाथ मारण्याला तयार होतो

* मनोरजन, पु २५ भा ६ [फेब्रुवारी सन १९२०]

एक जण धर्मासाठी बायकामुलावर पाणी सोडण्याला, तर दुसरा बायको मिळविण्यासाठीं धर्मास तिलाजलि देण्याला सिद्ध होतो. श्रीमंत अधिक श्रीमती, समर्थ अधिक सामर्थ्य व कीर्तिमान् अधिक कीर्ति संपादण्याच्या नेहमी नादात असतात. आशेच्या कोशात ' अलंत, ' ' पुरेसें ' हे शब्दच नाहीत. मनुष्याच्या या उद्दिष्ट चिंतनातच काही काहींच्या मतें त्याच्या सुखाचें व इतरांच्या मतें त्याच्या दुःखाचें बीज असतें.

हीं उद्दिष्टें साधण्याचे आधुनिक मार्ग कितीतरी ठराविक पद्धतीचे होऊन बसले आहेत! आजारी मनुष्य आरोग्यसंपादनासाठी विषासारखीं कडूजहर औषधें घशाखाली ओतील, अगात हुडहुडी भरली असता थड पाण्यात घटका घटका बसून राहील, तापानें अग भाजत असता तास तास उन्हात पडून राहील, जिवाची कासाविशी होत असता वरून पाघरुणें व खालून वाफारा घेऊन कोंडमारा करून घेईल, रेचकें घेऊन महिना महिना उपास काढील, तिळायेवढी गोळी हौदभर पाण्यात विरघळवून त्यातील चमचा चमचा पाणी तासातासाच्या अंतरानें चाखील–फार काय, पण भिन्न भिन्न रगाच्या बाटल्यातील शुद्धोदकाची आचमनें घेऊन रोगाचा रागरंग पालटण्याचा प्रयत्नहि करील साराश त्रासदायक मार्गांनी रडकुडीला आणून किंवा हास्यास्पद रीतीनें पोट दुखेपर्यंत हंसवून रोगाची हाकालपट्टी करूं पाहील. पण प्राचीन काळापासून रामबाण ठरलेले मंत्रताईत, गंडेदोरे उपयोगात आणील तर शपथ! हिंवतापासारख्या रोगावर तर आमचे हे सनातन उपाय अचूक गुणकारी असत अंगात केवढीही हुडहुडी भरलेली असो, ती एका फुकरीसरशी देशोधडीला लागत असे. रोग्याच्या दंडाला यत्र काढलेला कागद किंवा मतरलेला ताईत बाधला म्हणजे रोग, बंधनाच्या भीतीनेंच की काय, पलाय करीत असे पानदान पुढें आलें म्हणजे ज्याप्रमाणें भेटावयास आलेला इसम तो एक उठण्याचा इशारा म्हणून समजतो त्याप्रमाणें हिंवतापाच्या रोग्यास मतरलेला विडा खावयास मिळाला की हिंवताप मुकाट्यानें पाय काढीत असे. आता येवढें मात्र खरें, कीं अशा इलाजावर रोग्याचा एकाएकी विश्वास बसत नसल्यामुळें केवळ त्याच्या समजुतीकरिता त्या विड्याबरोबर कोयनेलच्या एकदोन गोळ्याही चारणें इष्ट असे. पण येवढी लहानशी तर्तूद केली म्हणजे रोगाचा

पुरा बंदोबस्त होत असे मुलाला दृष्ट लागून तो कोमेजू लागल्यास त्याजवरून मीठमोहऱ्या उतरून दृष्ट काढली म्हणजे चुलीत मोहऱ्या फुटतात न फुटतात तोंच त्याची बाधेपासून मुक्तता होऊन तो प्रफुल्लित होत असे तान्ह्या मुलाला सटवीची बाधा झाल्यास त्याच्या कपाळाला अंगारा लावून किंवा गळ्यात दोरा अडकवून त्या बाधेस अर्धचंद्र देण्यात येई. लहान मुलास फोड झाल्यास नवीनच टाकवलेल्या जाळ्यातून पडलेल्या पिठाने रस्त्यात निरनिराळ्या आकृति काढून ते फोड त्या मुलाच्या अंगावरून त्या आकृति ओलांडणाऱ्याच्या अंगावर नेत असत. पायाळू माणसाच्या पायाचा उसण उतरण्याच्या कामीं विजेच्या यंत्रासारखा उपयोग होई अलीकडच्या भ्रष्ट काळात हा दैवी उपाय मागे पडल्यामुळें 'पायाळू' या शब्दाचा अर्थही कळेनासा झाला आहे, म्हणून त्याचें किंचित् स्पष्टीकरण करणे इष्ट आहे. 'पायाळू' म्हणजे जन्मकाळीं ज्याचें पाऊल इतरांपेक्षा पुढें असतें तो मनुष्यप्राणी. मरणाच्याही कामी याचें पाऊल इतरांपेक्षा पुढेंच दिसून येतें. याला विजेपासून फार भय असतें अर्थात्च याला पावसाळ्यात फार जपावें लागतें, व इमारतीचे विजेपासून रक्षण करण्याकरिता जशी लोखंडी कांबेची योजना करावी लागते तसें याच्या अंगठ्याला पंच किंवा सप्त धातूचें एक वेढें अडकवावें लागतें. विजेचा पायाळूवर इतका रोष होण्याचें कारण उसणेसारख्या वातविकारावर त्याचा विजेप्रमाणेंच उपयोग होतो हें असावें. या प्रागतिक प्राण्यास काजळी लाविलेल्या नखावर गुप्त धनाचें ठिकाण किंवा भविष्यत्कालीन गोष्टी अंधारात स्पष्टपणें पहाता येतात. मात्र अंगास बिब्बा न लावण्याचें पथ्य त्याने मोडल्यास त्याच्या दिव्यदृष्टीला खग्रास ग्रहण लागतें ज्या जगात 'बोले तैसा चाले, त्याची वंदावी पाऊलें' हा न्याय चालत आला आहे त्या जगात ओठ उघडण्यापूर्वीही चालण्यास तयार असलेल्या या दिव्यदृष्टि प्राण्याचें पाऊल उसणेच्या रोग्यानें आपल्या पाठीवर घ्यावें यात नवल वाटण्यासारखें कांहीं नाहीं

आमचे पाहुणतात्या पायाळू असावेत असें त्याच्या पायगुणावरून आम्हीं अनुमान बांधिलें आहे त्याच्या डोक्यापेक्षां पायांची वाढ बरीच अधिक आहे या गोष्टीनें त्या अनुमानास बळकटीच येते. तात्यांनीं बिब्ब्याचें

पथ्य मोडल्यामुळें त्याच्या दिव्यदृष्टीच्या खाचा झाल्या आहेत खऱ्या. पण पायानें उसण बरी करण्याचा गुण त्याच्या अंगी इतर पायाळूच्या पेक्षाही अधिक प्रमाणात दिसून येतो. सामान्य पायाळूचा पाय उसणेच्या स्थानावर लागावा तरी लागतो. पण बळीची याचना करणाऱ्या विष्णूच्या पायाशी स्पर्धा करणारा तात्याचा बाळसेदार उपाय रोग्याच्या पाठीशीं भिडण्याच्या पूर्वीच रोग्यानें उसण नाहीशी झाल्याची कबुली दिल्याचें माझ्या अनेकदा पहाण्यात आलें आहे कधी कधी तर तात्याचा पाय निरोगी व धट्याकट्या मनुष्याच्या पाठीस चुकून लागला असता त्यास उसण भरल्याचेंही माझ्या दृष्टोत्पत्तीस आलें आहे यामप्रमाणें उसणेशीं किंवा तिच्या लोपाशी तात्याच्या पायाचा कार्यकारणभाव असल्यामुळें त्याच्या पायाळूपणाबद्दल शका घेण्याचे कारण नाही त्यास विजेपासून मात्र भय नसावेसें दिसतें. विजेचा कडकडाट होऊन आकाश जरी कोसळून पडले तरी तात्याच्या झोंपेचा अणुमात्रही भग झालेला कधी कोणाच्या पहाण्यात नाही

आरोग्याच्या मार्गाप्रमाणें इतर सुखसाधनाच्या मार्गासंबंधानेंही हल्लींच्या पिढीचे गाढ अज्ञान दिसून येतें. पूर्वी पायाळूच्या मदतीनें गुप्त धनाचा शोध कसा लावण्यात येई याचा वर उल्लेख आलाच आहे किमयेच्या साहाय्यानें हीन धातूचें सोनें करिता येई. पिशाच्चाच्या साहाय्यानें हलवायाच्या दुकानातील मिष्टान्नाची ताटेंची ताटे इष्टस्थली आणविता येत असत चांगल्या मांत्रिकास तर भुताचा भला मोठा बाजारही भरविता येत असे अवर्षण पडल्यास देवावर अभिषेकाची संतत धार धरून त्याच्याप्रमाणें सारी सृष्टि जलबंब करिता येत असे. कुटुंबावर एखादें सकट येऊन पडल्यास देवालाही संकट घालून त्यातून मुक्तता करून घेता येई संकट लवकर नाहीसे होण्याचे चिन्ह दिसेनासें झाल्यास देवघरातील यच्चयावत् देवास विहिरीत उतरवून, व आपल्या संकटाचे त्यासही भागीदार करून, त्याची किंचित् लज्जत त्याजकडून चाखविली म्हणजे संकटाचा परिहार हटकून होत असे. त्या वेळचे देव नवसास खात्रीनें पावत असत. मी लहानपणांतील बहुतेक परीक्षा पैशापैशाची खडीसाखर वाटण्याचा नवस करूनच पास झालों. हा अनुभव आल्यापासून

परीक्षांचा अभ्यास करण्याचें तर दूरच राहिलें, पण पुस्तकेंही विकत घेईनासा झालों. माझें सारें गणित, सारें भाषाज्ञान, सारा इतिहास–भूगोल खडीसाखरेच्या खड्यात साठविलेला असे. पुढें पुढें तर मी नवसाप्रमाणें खडीसाखर वांटण्याऐवजीं स्वतःच मटकावूं लागलों. मात्र नवसाची फेड याप्रमाणें घरबसल्या होऊं लागल्यावर खडीसाखरेचें प्रमाण साहजिकच वाढलें, व काहीं दिवसांनीं खडीसाखरेचें पेढ्यात व बरफींत रूपांतर झालें. मी देवासमोर नवस करतेवेळीं 'परीक्षा पास झाल्यास तुझ्या नावानें पेढे बरफी वांटीन,' असा बाह्यात्कारी उच्चार मात्र करीत असें, पण तो करितांना मिठाई न वाटतां स्वतःच गिळकृत करण्याची माझी योजना मी मनाशी पुटपुटतही असें. यामुळें पदरीं खोटेपणा येण्याचेंही सहजासहजीं टळे. नवसाची फेड करितांना पेढे–बरफी मटकावून टाकण्यापूर्वी ती देवाचें नांव घेत पाठ्यावर 'वाटली' म्हणजे मला शब्दांत पकडण्यास मुळींच जागा रहात नसे ही माझी युक्ति खुद्द देवासही अजूनपर्यंत माहीत झालेली नाहीं. माझ्या मनातले गूढ विचार त्या बिचाऱ्यास कोठून कळणार! नवसास पावावयाचें येवढेंच काय तें त्यास माहीत! तें काम मात्र तो बिनबोभाट पार पाडीत असे. त्याच्याच कृपेनें मला प्रत्येक परीक्षेंत, समोर बसलेल्या उमेदवाराच्या कागदावरून हुबेहुब नक्कल करण्याची संधि मिळत असे. एकदा तर समोरील उमेदवार नापास होऊन मी पास झालों या त्याच्या अपेशाचें कारण त्यानें नवसाचे पैसे वाचविण्यात जे कृपणत्व दाखविलें होतें तेंच असलें पाहिजे. कारण आमचा परीक्षक नवसास पावणाऱ्या देवाप्रमाणें बेसावध खास नव्हता.

विद्यार्थीदशेंतील हा अनुभव मला संसारांत फार उपयोगी पडला. व्यापारास हात घालण्यापूर्वी ज्याप्रमाणें भांडवलाची तयारी करावी लागते त्याप्रमाणें प्रत्येक कार्याच्या आरंभीं मी नवसाची तयारी करूं लागलों सर्व नवसात सत्यनारायणाचा नवस माझ्या अत्यंत आवडीचा असे. मीं कसलेंही कारस्थान शिरावर घेतलेलें असो, त्यांत सत्यनारायणाच्या कृपेनें यशःसिद्धि ठेवलेलीच असावयाची मग त्यांत असत्याचाही अंश असला तरी हरकत नसे. नवस न फेडल्यास सत्यनारायण क्रोधाविष्ट होऊन आपल्या इच्छेच्या अगदीं उलट प्रकार घडवून आणतो, याही गोष्टीचा मी

यथावकाश फायदा करून घेत असें एकदा मी 'देवा, यंदा माझ्या शेतातील पीक बुडवून टाक, एक दाणाही येऊ देऊ नकोस. माझी इच्छा पूर्ण केलीस तर मी सत्यनारायणाचें व्रत करीन' असा नवस केला माझ्या मनातील इच्छा अर्थात् पीक रगड यावें अशीच होती. पण ती सत्यदेवाला कळली पाहिजे ना! देवानें आपल्या भक्ताचें ईप्सित पूर्ण करण्याकरिता त्याच्या एकट्याच्याच शेतावर अवर्षण पाडिलें अर्थात्च पिकावर त्यात एक दाणाही उत्पन्न झाला नाहीं, व पाखरांना भेवडावण्याकरिता बुजगावणें ठेवण्याचें कारणही पडलें नाही. मी इतका कफल्लक बनून गेलो, की माझ्या मनातून असतें तरी सत्यनारायणाचें व्रत माझ्या हातून पार पडलें नसतें मी नवस फेडिला नाही, हें पाहून, सत्यनारायणाच्या तळव्याची आग मस्तकास जाऊन पोहोंचली; व त्याने आपल्या क्रोधाग्नीची माझ्या शेतावर पर्जन्यरूपानें इतकी वृष्टि केली, की तें लवकरच कणसाच्या भाराखालीं वांकून गेलें, व मी जन्माचा सुखी झालों माणसाच्या कृपाकटाक्षापेक्षा देवाची वक्रदृष्टिच कधी-कधी अधिक उपकारक होते ती अशी.

प्रेमाच्या साम्राज्यातही यशस्वी होण्याचे तेव्हाचे मार्ग आताच्यापेक्षा अधिक सुलभ व फलप्रद असत. वशीकरणाचे अनेक प्रकार पूर्वकालीन प्रेमपिपासूंस पूर्णपणें परिचित होते. त्या काळीं बालविवाह रूढ असल्यामुळें व प्रीतिविवाह बोकळला नसल्यामुळें वधूवरामध्यें वर्ण, उंची, प्रकृति, सुदृढता, ज्ञान, विचारशीलत्व, विकारवशत्व यापैकीं बहुतेक किंवा सर्व बाबींसंबंधानें बहुधा उत्तरदक्षिण ध्रुवांइतकी भिन्नता असे, ही गोष्ट माझ्या प्रेमळ वाचकांपाशीं तरी प्राजलपणें कबूल करण्यास हरकत नाहीं [ मात्र माझ्या कबुलीचा कोणापाशीही परिस्फोट न करण्याची त्यास येथेंच विनंति करून ठेवितों. ] परंतु पुरुषाच्या हातीं अमर्याद सत्ता व स्त्रियाच्या ठायीं अमर्याद अज्ञान ठेवण्याची जी बिनतोड युक्ति आपल्या धूर्त स्मृतिकारानी योजिली तिजमुळे अशा गंगाजम्नी जोडप्यामध्येंही बहुधा सात्विक प्रेम दिसून येई. कोणत्या जोडप्यांत प्रेम राहील याची आगाऊच बिनचूक अटकळ करण्यांत ज्योतिषशास्त्राचीही बरीच मदत होत असे. तथापि एखाद्या जोडप्यात वैवाहिक प्रेम उद्भूत स्वरूपांत न आढळल्यास त्या प्रेमाचा पाझर फोडण्यात निर्दिष्ट वशीकरणप्रयोगाचा चागला उपयोग होई.

उलट्या गुणधर्मांच्या बाहुलाबाहुलीचे लग्न झाल्यानें जी चूक होई तिची पूर्ण दुरुस्ती त्याच्या नजरेस उलट्या बाहुल्याची चित्रें पाडवून होत असे, व झिडकारिलेले प्रेम गुप्तपणे विड्याच्या किंवा दुसऱ्या एखाद्या खाद्य पदार्थांच्या द्वारे प्रतिकूल इसमाच्या अंगात प्रविष्ट करवून भिनविलें जाई. हल्लींच्या काळीं या वशीकरणशास्त्राचा फारसा उपयोग नसल्यामुळें त्यांतील तत्त्वांचें यापेक्षा विस्तृत विवेचन करण्याचे प्रयोजन नाही.

साप्रत काळीं विपुल संततीची कोणासही किंमत वाटत नाहीं. वंध्याकडून त्या बाबतीत जे प्रयत्न होतात ते नेटाचे होत नसल्यामुळें स्वतःच वांझ होत असल्यास नवल नाहीं 'पुत्रावाचून सद्गति नाही.' हें तत्त्व पूर्वीच्या लोकावर पूर्णपणे बिबले असल्यामुळें पुत्रप्राप्तीचे त्याचे मार्गही अनेकविध व अचूक असत वाझेने दिवसा लेकुरवाल्या घरातील ाळणा पुजणें किंवा रात्रीं त्याच्या उबरठ्यापाशीं निरुपाविक देहाने स्नान ारून तशाच स्थितीत त्याची पूजा करणे, चव्हाट्याची पूजा करणें इत्यादि नेक तोडगे यासंबधाने वस्ताद गुणकारी आहेत. पाळणा, उंबरठा, व्हाटा या दैवतास दभाचा इतका तिटकारा असतो, कीं आपणामध्यें व ापल्या भक्तामध्यें वस्त्रासारखा झिरझिरीत पडदाही त्यांना खपत नाहीं. ारुतीस रात्रीच्या वेळीं नग्नावस्थेंत उलट्या प्रदक्षिणा घालणें हा तोडगा या र्व तोडग्याचा राजा आहे. बिचाऱ्या मारुतिरायासारख्या ब्रह्मचाऱ्यास ा प्रसंग अगदीं अपूर्व! तेव्हा तो गागरून जाऊन पुत्रोत्पत्तीप्रीत्यर्थ आपले सर्व पुण्य खर्च करण्यास साहजिकच तयार होतो. अमावास्येच्या रात्रीं लेकुरवाळ्या घरास आग लाविल्यानेंही आपल्या घरांत खात्रीनें कुलदीपक निर्माण करिता येतो. शिवाय आग भडकून सुदैवानें इतर घराचाही स्वाहाकार झाल्यास दूषित हवा शुद्ध करण्याचें आणि घराची गर्दी मोडून व जागा ऐसपैस करून सार्वजनिक आरोग्यास हातभार लावण्याचें श्रेय अनायासें पदरीं पडते तें निराळेंच. आतां अशा आगीत अनेक माणसाची आहुति पडण्याचा संभव असतो हें खरें आहे. पण लोकसंख्येस आळा घालण्याचें आधुनिक अर्थशास्त्रांतील तत्त्व या आगलावेपणाच्या चालींत गर्भित आहे, ही गोष्ट लक्षात घेतल्यास तिच्या निर्दयपणाबद्दल दोष देण्यापेक्षा तिच्या धोरणीपणाबद्दल प्रशंसाचा करणें कोणाही निःपक्षपाती

मनुष्यास भाग पडेल नेपोलियनसारख्या कुलदीपकाचें रक्षण करण्याकरिता जर लाखों इसम आपले प्राण देण्यास तयार असतात तर एखाद्या स्वदेशी कुलदीपकाचें जनन होण्याकरिता शेंकडो लोकानी जळून भस्म होण्यास बिनतक्रार सिद्ध व्हावें हेंच योग्य आहे पुत्रप्राप्तीकरिता जाळलेल्या घरात आजपर्यंत हजारों-लाखों लोक भाजून मेले असतील पण त्यापैकी एकानेंही त्याबद्दल कुरकुर केलेली नाही यावरूनही माझें म्हणणेंच खरें ठरतें.

याशिवाय पुत्र झाल्यास गळ टोंचून घेऊन देवाचा रथ ओढण्याचा किंवा त्यास देवाच्या घरचें कुत्रे करण्याचा आणि कन्या झाल्यास तिला मुरळी म्हणून देवास वहाण्याचा, असे अनेक नवस म्हसोबा, खंडोबा, मरीआई, जाखाई, जोखाई, वगैरे राक्षसपुठ्यातील देवतास करण्यात येत असत. वर सांगितलेल्या सर्व तोडग्यामुळें व नवसामुळें आपल्या पूर्वजाचीं शरीरें व मनें हल्लीप्रमाणे दुर्बळ न रहाता राकट होत असत हाही त्यापासून एक वेगळा फायदा असेच

याशिवाय साधूची आराधना, हेही पुत्रप्राप्तीचे एक रामबाण साधन असे. या साधनास सामान्य सामुग्रीची मुळीच जरूर नसे, हा एक त्याचा विशेष असे. आमच्या गावात एकदा साधूची एकनिष्ठपणें सेवा करणाऱ्या एका भक्तास लग्नापूर्वीच मुलगा झाला सत्समागमाचा महिमाच काही विलक्षण आहे!

सुखाची साधनें आटोक्यात आणण्याचे सुलभ मार्ग जसे पूर्वी अवगत होते तसे अपकार करण्याचे मार्गही होते आम्हीं इतर शास्त्रातल्याप्रमाणें शकुनशास्त्रातही फार मोठी आघाडी मारिली होती. त्या काळी जांभई, शिंक, उचकी, ढेंकर, अवयवस्फुरण इत्यादि लक्षणावरून, पालीसारख्या क्षुद्र प्राण्याच्या पतनावरून व चुकचुकण्यावरून, पक्ष्याच्या किंवा माजरासारख्या प्राण्याच्या हालचालींवरून, लाकडासारख्या निर्जीव वस्तूच्या तडतडण्यावरून भावी गोष्टीचे अचूक भविष्य वर्तविता येत असे हे प्रकार आपोआप होण्याऐवजी मुद्दाम घडवून आणिले तरी त्यांची भविष्यत्कालावरील सत्ता थोडीच कमी होणार आहे! माजर केवळ लहरीमुळे आडवें गेलें काय किंवा समोर उदीर धरून ठेविल्यामुळें आडवें गेलें काय, एकच! त्याच्या गतीनें मिळणारी भावी अपेशाची सूचना, त्या गतीच्या कृत्रिम-

पणामुळें, मिळावयाची मुळींच रहात नाहीं. पाल डोक्यावर पडली, कीं मृत्यु आपला ठेवलेला! मग ती पाल पाय घसरल्यामुळें पडो कीं काडीनें लोटल्यामुळें पडो. नवरा मुलगा वधूगृहीं जावयास मिरवत मिरवत निघाला आणि समोर कुणी शिंकलें, की त्याला मोठा अपशकुन होतो, मग तें पडशामुळें शिंको किंवा तपकीर ओढल्यामुळें शिंको. शकुनशास्त्रातील तत्त्वाशी परिचय करून घेतल्यास तें शत्रूशी झगडण्याचें एक मोठें शस्त्रच हातीं आल्यासारखें होणार आहे तो कोणत्याही कार्याला निघो, त्यासमोर शिंकून, माजर आडवें घालून,–व तसाच प्रसंग आला तर स्वतःचें नाक कापून घेऊनही त्यास अपशकुन करिता येईल अशा प्रसगीं विधवेचें दर्शन मोठा अपशकुन मानण्यात येत असे. पण या सुधारकानीं विधवाच्या लग्नाचा सपाटा लावून शत्रूस दुश्चिन्ह करण्याचें आम्हा सनातनधर्मीयाचे एक मोठें साधन हिरावून नेलें आहे ज्या लग्नातील एकही विधि विधवेच्या दर्शनाशिवाय होणें शक्य नाहीं अशा लग्नाचें भवितव्य कल्याणमय कसे होणार, एवढाही लहानसा विचार या सुधारकाच्या डोक्यात येऊं नये हें त्याच्या बुद्धिमांद्याशिवाय दुसऱ्या कशाचें लक्षण समजावयाचें? असो. जोंपर्यंत माजरामधील माजरपण व शिंकेंतील शिंकपण सुधारकांना नाहींसें करिता येत नाहीं तोंपर्यंत, विधवाना सधवा करण्याच्या त्यांच्या उठाठेवींना आम्ही भीक घालणार नाहीं हें त्यानीं पूर्णपणें समजून असावें.

अलीकडील लोकाचा शकुनावरील विश्वास पार उडाला आहे. तो परत जडविण्याकरिता येथें स्वानुभवाच्या दोनतीन गोष्टी सागणे भाग आहे. प्रथिक सन्निपाताचा रोगी बरा करण्यात डॉक्टराना गुण का येत नाही, हें मला बरेच दिवस गूढ होतें. अखेरीस पोक्त विचार केल्यानंतर त्याचें कारण माझ्या लक्षात आलें तें असें—या तापाचीं साथ सुरू होण्यापूर्वी उंदराचा बराच सुळसुळाट होत असतो हे नव्यानें सागावयास नको. उंदरांस पकडण्याकरिता मांजरेंही सैरावैरा धावूं लागतात हेंही ओघानेंच आलें. याच सुमारास प्लेगही बळावत असतो. त्यानें पछाडलेल्या रोग्यांस इलाज करण्याकरिता डॉक्टरांसही धांवपळ करावी लागते या धांवपळींत उंदराच्या मागें लागलेलीं माजरें रोग्याच्या मागें लागलेल्या डॉक्टरांच्या आड येणें अपरिहार्य होतें; व याप्रमाणें

लागोपाठ अपशकुन होत असल्यामुळें डॉक्टराच्या हातांना यश येत नाहीं. उंदराचा संहार करण्यापेक्षा मांजराचा करण्यात येईल तर रोगी सहसा दगावणार नाही हें निश्चित समजावें पल्लिकापतनाचा मला एकदा जो विचित्र अनुभव आला तोही येथे नमूद करण्यासारखा आहे. एका तुळईवर एक पाल चुकचुकत होती त्या तुळईखालून एक इसम जाण्यास आणि ती तुळई पालीसह त्याच्या डोक्यावर कोसळून पडण्यास एकच गाठ पडली. तत्क्षणीच बिचारा गतप्राण झाला! शकुनाचा ठोकताळा किती तडकाफडकीं आला पहा! तेव्हांपासून पाल दिसली, कीं मी विंचवाप्रमाणे नांगी टाकली म्हणून समजावें. शिंकेचा ठोकताळा तर मला स्वत:लाच आलेला असल्यामुळें त्याचा माझ्या मनावर झालेला सस्कार सहसा विसरण्यासारखा नाही. एकदा आमच्या गावकऱ्यानी हास्यरसप्रचुर हरिश्चंद्र नाटकाचा प्रयोग केला. त्यात मजकडे सूत्रधाराचें काम होतें. त्या दिवशीं मला सपाटून पडसें आलेले असल्यामुळें मीं सकाळपासून तपकिरीवर तडाखा लाविला, पण काही केल्या पडसें मोकळें होईना म्हणून मीं वरचेवर नाकात तपकीर कोंबण्याचा सपाटा चालूच ठेविला नाटकास सुरुवात होण्याच्या संधीस माझें नाक ठासून भरलेल्या बंदुकीप्रमाणें अगदी स्फोट होण्याच्या बेताला आलें सकाळपासून दाबूनदाबून भरलेली आणि ह्या वेळपर्यंत मुकाट्यानें राहिलेली तपकीर बडाळी करण्याच्या रगाला आली मी शिंक दाबण्याचा होता नव्हता तेवढा सर्व प्रयत्न करून पाहिला पण ज्याचें नाव तें! ज्याप्रमाणें हसे जों जों दाबावें तों तो उकळी फुटून बाहेर पडतें त्याप्रमाणें मी जो जों शिंक दाबण्याचा आटापिटा करी तो तों ती अप्रासंगिक जोमानें नाकाबाहेर उमटण्याचा अट्टाहास करी अखेरीस पुढील पडदा बंदुकीच्या बारासरसा वर गेला. पण तो बार प्रेक्षकांपैकीं एकासही ऐकू गेला नाहीं कारण तोच मुहूर्त साधून माझ्या शिंकेने जी उचल खाल्ली तिच्या दणदणाटात बंदुकीचा आवाज पूर्णपणें लोपून गेला सूत्रधाराच्या शिंकेच्या आवाजाबरोबर पडदा वर नेण्याची नवीनच टूम आमच्यामधील कल्पक मडळीने काढिली असावी, असा काही, नाविन्याभिलाषी प्रेक्षकांचा समज होऊन त्यांनीं प्रथम टाळ्या वाजवून त्या नवीन प्रकाराचें अभिनदन केले. पण त्या टाळ्यांच्या गजराची टिमकी माझ्या शिंकाच्या नगाऱ्यापुढें कोठपर्यंत

टिकाव धरून राहाणार! हळुहळू प्रेक्षकांच्या चेहऱ्यावरील आनंद मावळून त्याची जागा अंशतः तिरस्कारानें व अंशतः भयानें पटकाविली. पण त्या फरकामुळे माझ्या धूमधडाक्यात थोडाच फरक पडणार होता! श्वासाचा अवरोध न होता जितकी शीघ्रता शक्य असते तितक्या शीघ्रतेनें माझें शिंकणें सारखें चालू राहिलें. मात्र त्यांतही तालबद्धता सुटली नव्हती. गवयाच्या पोराच्या रडण्याप्रमाणे माझें शिंकणेंही तालावरच चाललें होते. तें नांदीच्या धुमाळी तालावर मोरे धुमाकूळ घालीत होतें. समेशिवाय इतर ठोक्यावर त्याचा जो नाद होई तो कर्णकटु खराच, पण कांहीसा सुसह्य असे, पण समेवर होणारा घोष धड कानाच्या प्रेक्षकाससुद्धा असह्य भासू लागला. माझ्या शिंकाचा आवाज मूर्त स्वरूप घेऊन असंख्य काठ्यांच्या रूपाने प्रेक्षकांच्या कानाच्या पडद्यावर जोराने आघात करून त्याच्या चिंधड्या उडवीत आहे की काय असा भास होऊन प्रेक्षकांनीं एका दिलानें दरवाज्याकडे धूम ठोकली, व नांदी संपण्यापूर्वीच नाटकगृह रिकामें झालें! त्यापूर्वीच पारिपार्श्वकांनींही आपापलीं ताटेंतबकें फेकून देऊन अंगावरील साज न उतरताच आपापल्या घरीं पोबारा केला होता! त्या बिचाऱ्यांकडे तरी काय दोष! त्यांच्या ताटांतबकांतील गुलाल माझ्या उच्छ्वासांनीं, वादळांत जोरानें उडणाऱ्या धुळीप्रमाणें त्यांच्या नाकातोंडांत जाऊन ते गुदमरण्याच्या बेताला आले होते! असो. तर याप्रमाणें नाटकाच्या नांदीस भरतवाक्याचें स्वरूप येण्याचें कारण केवळ माझी अपशकुनी शिंक होय हे या गोष्टीवरून उघड होईल. शिंक कृत्रिम उपायानें आलेली असली तरी तिच्या अशुभत्वांत अंतर पडत नाहीं हेंही तात्पर्य या गोष्टीवरून घेण्यासारखें आहे.

अपशकुनाच्या द्वारें शत्रूवर संकट येण्याची अप्रत्यक्ष योजना करणें हें त्यास प्रत्यक्ष अपकार करण्यापेक्षा अर्थातच कमी श्रेयस्कर असतें. शिवाय मांजरें काय किंवा पाली काय, निर्बुद्धच असल्यामुळे आपणाकडून कोणास केवढ्या महत्त्वाच्या गोष्टीची सूचना मिळणार याची त्यांना जाणीवही नसते, व यामुळें त्यांजकडून आपणास प्रतिकूल असा प्रकारही होण्याचा संभव असतो. मांजरास आपल्या दुष्मानाच्या वाटेंत आडवें नेण्याकरितां पुष्कळदा त्याजवर हुसकावण्याचा व भेवडावण्याचा प्रयोग करावा लागतो.

त्यास भेदरून तें त्यास आडवें जाण्याऐवजीं आपणासच आडवें जाऊन आपल्या कामात खो घालितें. पालीबद्दल तर मला स्वतःलाच एकदा अशा प्रकारचा अनुभव आला. त्या दिवशी मी आणि बंडूनाना जेवणानंतर शिळोप्याच्या गप्पा मारीत बसलों असून जवळच माझा एक सुधारक स्नेही अर्धवट झोपेंत लवंडला होता. त्याच्या मतें पल्लिकापतना-सारख्या शास्त्रीय ग्रथातील विधानें म्हणजे निव्वळ थोताड. उलट अशा विधानाचा ठोकताळा पहाण्याची मला प्रथमपासूनच शास्त्रीय जिज्ञासा. तेव्हा त्याच्या डोक्यावर पल्लिकापतनाचा प्रयोग करण्यानें त्याचें नुकसान होण्यासारखें नसून माझा मात्र फायदा होण्यासारखा आहे असा विचार करून, मी त्याच्या डोक्यावरील तुळईला चिकटून असलेल्या एका पालीस एका लाब काठीनें डंवचून ती नेमकी त्याच्या डोक्यावर पाडण्याचा प्रयत्न करू लागलों, तों ती पाल गागरून जाऊन सैरावैरा धावूं लागली. त्या धादलींत तिनें जी एक उडी मारली ती नेमकी माझ्याच मस्तकावर आली. वीज पडून सुद्धा बसला नसता इतका धक्का माझ्या मनास बसला, व मी गपकन् डोळेच मिटून घेतले. आपण जिवत आहोंत कीं मरून मुर्दा होऊन पडलों आहोंत हें पाहण्याकारिता मी काहीं वेळानें हळूच डोळे किलकिले करून पाहूं लागलों, तों बंडूनाना आपल्या माडीवरील माजरास गोंजारताना बसलेले दिसून आले. ते म्हणाले, ‘ सुदामदेव ’ आज तुमचा प्राण केवळ या माजरानें वाचविला तुमच्या डोक्यावर पाल पडणार तोंच, मला कशी सद्बुद्धि झाली कुणास ठाऊक, मी हें माजर तुमच्या डोक्याच्या व पालीच्या मधून पलीकडे भिरकावून दिलें. याप्रमाणें माजर आडवें गेल्यामुळे तुमचा मृत्यु घडवून आणण्याचा पालीचा हेतु साफ फसला.’ असो, तर मजवर आलेला प्रसग याप्रमाणें अकल्पित रीतीनें टळल्यामुळें मला पाल आणि माजर या दोघाच्या शकुनाचा विस्मयकारक ठोकताळा पहावयास मिळाला

या दोन प्राण्याप्रमाणें चडोल, तास वगैरे पक्षाच्या गति व घुबड वगैरेंचे स्वर यांवरूनहि भविष्यांचे अनुमान काढतां येतें. माशीसारख्य क्षुद्र प्राण्याच्या हालचाली लक्षपूर्वक पाहून कोणी जर त्याचें एक शास्त्र बनविलें तर, निरुद्योगी माणसाच्या मागें माशा मारीत बसण्योपेक्षांही कम

श्रमाचा असा माशा पहात बसण्याचा उद्योग लावून दिल्याचें व उद्योगी पुरुषास उद्योगाशिवाय कार्यसिद्धि करून घेण्याचें एक नवें व सुलभ साधन प्राप्त करून दिल्याचें श्रेय त्याच्या पदरात पडण्यासारखें आहे

शत्रूस अपकार करण्याचेही पूर्वीचे मार्ग राजमान्य होते जादूच्या योगानें त्याच्या पोटात कळ उत्पन्न करून त्यास त्राहि भगवान् करून सोडणें, त्याच्या अगाचा भडका उडविणें, त्याच्या अन्नात अमंगळ पदार्थ कालवून त्याचें स्वास्थ्य नाहींसे करणें वगैरे लीला तर त्या काळी हातचा मळ असत. तादुळाच्या किंवा उडदाच्या सहाय्यानें मूठ मारून त्याचा प्राण घेणें हें काम मात्र सामान्य मात्रिकास साध्य नसे. त्यास किंवा ती मूठ वाटेंतून परतविण्यास चागलाच नामांकित मांत्रिक लागे मूठ शत्रूपर्यंत पोहोचल्याबरोबर त्याच्या अगास सुया टोंचल्याप्रमाणें वेदना व्हावयास लागून तो तडकाफडकी रक्ताची गुळणी ओकून प्राण सोडी. त्या काळच्या धान्यात पोषकशक्ति असे, त्याप्रमाणें घातक सामर्थ्यही असे. त्या काळी निर्दिष्ट अपकाराचा गुन्ह्यांमध्यें समावेश होत असून त्यान्या त्याच्या योग्यतेप्रमाणे त्यास शिक्षाही नेमलेल्या असत. पण हल्लीं मत्रातत्रावर विश्वासच नाहीं, तर त्याचा पिनलकोडात शिरकाव तरी कुठून होणार !

पूर्वी ग्रहणाच्या दिवशीं गगेवर मत्र जपणाराची खूप गर्दी दिसून येई. भाविक लोक बिचाऱ्या सूर्यचद्रावरील सकट दूर करण्याकरिता गायत्रीमत्राचा जप करीत असत भिकारी लोकही त्याच उदार हेतूनें ‘दे दान तो सुटे गिऱ्यान’ असा घोष करीत पायली पायली, मण मण धान्य गोळा करून तें संकट दूर करण्याच्या कामीं हातभार लावीत असत. अखेरीस या दोन्ही वर्गाच्या खटपटीनें ग्रहाची सकैटापासून मुक्तता होई. पण या वर्गाखेरीज तिसराच एक वर्ग विंचवाचे, सापाचे, हिंवतापाचे, वशीकरणाचे, भुताखेताचे, मूठ मारण्याचे वगैरे मत्र जपून ग्रहावरील संकटाच्या वहात्या गगेत हात धुऊन घेत असे. एका पिढीच्या अवकाशात तो सारा प्रकार बदलून गेला आहे. आता पिशाचावरचा विश्वासच उडाला, तर ती जडणार कशी व जडल्याशिवाय निघणार कशी ? राहू, केतू हे राक्षस नसून केवळ बिंदुरूप होत अशा खुळचट कल्पना जेथें

धुमाकूळ घालीत आहेत, तेथें ग्रहांवर संकट तरी कुठून येणार आणि तें दूर तरी कसें करावयाचे ! चद्रग्रहण असो कीं त्याचा बाप असो, या अश्रद्धाळाच्या मुखचंद्रास पांघरुणाचें आणि डोळ्यांच्या बुबळास पापण्याचें जे एकदा ग्रहण लागलेले असतें तें सूर्योदयाखेरीज सुटेल तेव्हांच ना त्यानी त्याचा विचार करावयाचा !

वर निर्दिष्ट केलेल्या भिन्न भिन्न मार्गांचा एखाद्या महाकार्यांत समुच्चयानें उपयोग केला तर मोठमोठ्या समाजाचा केवढा तरी फायदा होण्यासारखा आहे. महायुद्धाचीच गोष्ट घ्या ना ! त्याकरिता जवळ जवळ पाच वर्षें पृथ्वीवरील बहुतेक लढाऊ राष्ट्रें आपले असंख्य सैनिक चारी खंडें मुग्याप्रमाणें फिरवीत होतीं, आपल्या बोटी माशाप्रमाणें पाण्यातून चालवीत होतीं, आणि आपलीं विमानें टोळाप्रमाणें आकाशातून नाचवीत होतीं. शेकडो विमानाच्या चिंधड्या झाल्या, हजारों बोटींनी जलसमाधि घेतली, लाखो सैनिक मारले गेले व कोट्यावधि बायकामुलें उघडी पडलीं, तेव्हा कोठे दोस्त राष्ट्रास विजयश्रीनें माळ घातली. आमच्या पुराणातील अग्नि, वायु, पर्जन्य, निद्रा इत्यादिसंज्ञक अस्त्रे जर आज त्याना अनुकूल असतीं तर त्याना शत्रूची धूळधाण करण्याला पाच वर्षें तर राहोतच, पण पाच घटकाही लागल्या नसत्या एकदा समग्र शत्रुप्रदेशावर निद्रास्त्र सोडून तेथील साऱ्या रहिवाश्याना झोंप आणावयाची, नतर त्यावर अग्न्यस्त्र सोडून व त्याच्या जोडीस वाय्वस्त्र देऊन त्या सगळ्याची राखरागोळी करावयाची, मात्र ती आग भडकून दोस्ताच्या प्रातात पोंहोंचू नये म्हणून तिजवर पर्जन्यास्त्र सोडावयाचें ! ही युक्ति लिहिण्याला जितका वेळ लागला तितकाही ती अमलात आणण्याला लागला नसता ! पण द्वापारातील ती अस्त्रे या कलियुगात कशी प्रसन्न व्हावींत ? न होवोत बापडी ! त्याच्या-इतकी त्वरित नसली तरी अचूक कार्यसिद्धि आमच्या या हीन कालातल्या ज्योतिषशकुनादि साधनानींही घडवून आणण्यासारखी आहे ती अशी—

मूठ मारण्याचा प्रयोग राजावर चालत नाही असा नियम असल्यामुळें आपणास आपलें कार्य शक्य तितकें शकुनासारख्या क्षुल्लक साधनाच्याच साहाय्यानें साधिलें पाहिजे प्रथम युद्धाच्या रसद, तोफखाना, रिसाला, पायदळ या खात्याच्या जोडीस शकुन व भाकित ही खाती निर्माण केलीं

पाहिजेत पुनः शकुनखात्याची विधवाखातें, माजरखाते, पालखातें, शिंकखाते इत्यादि पोटखाती करून त्याजवर योग्य सर्कसवाल्याच्या किंवा इतर अधिकाऱ्याच्या नेमणुकी केल्या पाहिजेत सैन्याच्या जशा कवाइती होतात तशा विधवाच्या, माजरांच्या, पालीच्या वगैरे झाल्या पाहिजेत भाकीत-खात्यात फलज्योतिष, सामुद्रिक, रमल इत्यादि निरनिराळी पोटखाती करून त्यावर हुषार तज्ज्ञाच्या नेमणुकी केल्या पाहिजेत

पाश्चात्य देशात पुनर्विवाहाच्या रूढीचा जारीनें अमल चालू असल्यामुळें विधवा फारश्या आढळत नाहींत ज्या आढळतात त्याची नवऱ्याच्या मिळकतीवर चगळ चालत असल्यामुळें त्या लष्करी नोकरी पत्करून सुखाचा जीव दुःखात घालतील असें वाटत नाही, म्हणून रणक्षेत्रातच विधवाची पैदास केली पाहिजे. आता स्त्रिया विधवा असावयास पूर्वी सधवा असल्या पाहिजेत, अर्थात् त्याची लग्नें झालेली असली पाहिजेत म्हणून एक दिवस पाचसात हजार कुमारिकाचीं योग्य सैनिकाशी लग्ने लावून देऊन दुसऱ्या दिवशीं त्या सैनिकांची सरमहा कत्तल केली पाहिजे. म्हणजे पाहिजे तितकी विधवाची सख्या पैदा होईल. पत्नीच्या बाहुपाशातून नुक्तेच सुटलेल्या सैनिकास, कत्तल होताना वाईट वाटू नये म्हणून, त्याच्याकरिता स्वर्गात अप्सरा पंचारति घेऊन उभ्या आहेत अशी त्याची समजूत करून देणें इष्ट आहे. पुढील जन्मी मुलीस सौभाग्य लाधावे म्हणून या जन्मी त्याना विधवा करणाऱ्या आयाच्याइतकेंच आपल्या मालकाचें आपणाविषयींचें वात्सल्य पाहून त्या सैनिकाच्या डोळ्यातून अश्रूचे पूरच वाहिले पाहिजेत.

सैनिकाच्या व विधवाच्या हातावरून व जन्मकालावरून त्याची अचूक भविष्यें वर्तवावीं त्यापैकी ज्याना युद्ध चालू असेपर्यंत मरणाचें, बधनाचें किंवा जखमेचेंही भय बाळगावयास नको अशा सैनिकाची शत्रूशी लढण्याच्या कामी व विधवाची शत्रूना अपशकुन करण्याच्या कामगिरीवर योजना करावी. विधवाचें हिंदु धर्मातील उच्चवर्णीय विधवेशीं साम्य शक्य असल्यास जरूर उत्पन्न करावें पाश्चात्य तरुणींत केंस कापण्याचा प्रघात असतोच, तेव्हा त्यास या बाबतीत विशेष चुकल्यासारखे वाटण्याचा संभव नाहीं अशा विधवांना व मांजराना शत्रु आपल्या गोटातून

निघण्याच्या ऐन सधीस त्याच्या वाटेत आड उभे केल्यास त्याच्या पराजया-बद्दल पूर्ण निश्चिती होईल

ज्याच्यावर मृत्यूचा, अपमृत्यूचा, बधनाचा वगैरे कसलाच प्रसग येण्याचा सभव नाही, अशा निवडक लोकाना—मग ते अगदी नवाशिके अगर शेदाडशिपाई असले तरी चालेल—शस्त्रे देऊन फलज्योतिषखात्यानें निश्चित केलेल्या शुभ मुहूर्तावर शत्रूवर रवाना करावे ते छावणीतून बाहेर पडताच त्यास डोक्यावर पाण्याने भरलेल्या घागरी घेतलेल्या सुवासिनी दिसतील अशी तर्तूद पूर्वीच केलेली असावी असे वीर आणि असा शकुन, मग काय विचारिता? त्याजवर तोफाचा कितीहि मारा केला, बदुकीच्या कितीही फेरी झाडल्या किंवा आगीचा केवढाही लोळ सोडला तरी तें सारे फुकट जाईल त्याजवर आपल्या शस्त्रास्त्राचा काही परिणाम होत नाही हें पाहून शत्रुसैनिक भेदरून जातील आणि त्या अभेद्य वीराच्या शस्त्रानीं पटापट मरून पडू लागतील त्याच्या जोडीस आपल्या वैमानिकानीही वरून शत्रुवीराच्या डोक्यावर पालींचा वर्षाव केल्यास त्याच्या मरणात काही सदिग्धता रहाणार नाहीं. मात्र पाली वजनानें हलक्या असून इष्ट स्थळी पडतीलच असा नेम नसल्याकारणाने त्या जड जड बाबगोळयास बाधूनच खाली फेकणे विशेष श्रेयस्कर होईल. आपले अजिक्य योद्धे शत्रूच्या तोफखान्याशीं जाऊन भिडताच शत्रूकडून त्यास तोफाच्या तोडाशी बाधून उडविण्याचा प्रयत्न होईल. पण तो केवळ आत्मघातकीपणाचाच आहे असें त्यास लवकरच दिसून येईल कारण आपल्या बहाद्दरास शत्रुपक्षाने तोफाच्या तोंडात ठासून भरलें तरी त्यानें त्याच्या ठिकऱ्या न उडता तोफा मात्र फुटून जातील व त्याचा धूर विरळ होताच आपले वीर त्यातून विजयानंदानें बाहेर येताना दिसतील अखेरीस कोणत्याही युद्धशास्त्रानें नव्हे, तर केवळ ज्योतिषशास्त्रानेंच तयार केलेले हे वीर शत्रुपक्षाचा बीमोड करून शत्रुनगरात प्रवेश करितील, तेव्हा त्याजवर आकाशातून पुष्पवृष्टि होईल यात सशय नाहीं.

नुकतेच सपलेल्या महायुद्धात माझ्या या योजनेचा दोस्तसरकारास उपयोग व्हावा म्हणून मी ती योजना तपशीलवार लिहून एका पाकिटात घातली, व ते पाकीट पोस्टात टाकण्यास म्हणून दरवाज्याबाहेर पडतो न

पडतों तोंच एक माजर आडवे आलें. अर्थातूच ते पाकीट खिशातल्या खिशातच राहिलें, व ती योजना जाहीर न करिता डोळ्यावर कातडें ओढून घेऊन महायुद्ध प्रमाणाबाहेर लाबलेले मला पहावें लागलें पण ज्या गोष्टी अवश्य घडावयाच्या त्या माझ्यासारख्या क्षुद्रजतूच्या प्रयत्नानें कशा टळणार ?

---

### मुष्टि ३१ वी*

## आमच्या गांवांतील पाण्याचें दुर्भिक्ष

अत्यंत उपयुक्त पदार्थही विपुल असले म्हणजे त्याचें महत्त्व वाटत नाही. सृष्टीत चैतन्य ओतणाऱ्या रविकराची व त्यास वाहून आणणाऱ्या प्रवाहि द्रव्याची आपणास कितीशी मातब्बरी वाटते ? मुबलक हवापाण्यास सरावलेल्या आम्हांस हवापाण्याचा प्रश्न औपचारिक प्रश्नापैकींच वाटत असतो मातीचें मोल अत्यत स्वस्त पदार्थांच्या किमतीपेक्षा कमी मानण्यात येतें तथापि आवश्यक पण विपुल अशा या महाभूतापैकीं एखादें विरल होऊ लागलें, कीं त्याची आवश्यकताही त्या मानानें अधिकाधिक जाणवूं लागते. हिंदुस्थानात सूर्यकिरणास तुच्छ लेखणारा प्रवासी विलायतेंत गेल्याबरोबर सूर्याच्या कृपाकटाक्षाची वाट पहात बसतो. पृथ्वीच्या सपाटीवर फुकट हवेस सोंकावलेला व तिच्या जिवावर पोसून तिची अवहेलना करणारा कृतघ्न पर्वतशिखरावर जाऊन पोहोंचताच तिच्या विरहानें धापा टाकीत प्राण सोडतो विपुल पाण्याच्या प्रदेशात केवळ आपल्या डोळ्याची तहान भागविण्यासाठी हजारों कारजीं उडविणारा विलासी सहारा वाळवंटात मृगजलाच्या मागे धावत सुटतो व अर्ता पाण्याचा एकही बिंदु न मिळाल्यामुळें प्राणविसर्जन करितो. खेडेगावात मातीला लाथाडून टाकणाऱ्या व मोकळ्या जागेचा मनमुराद उपभोग घेणाऱ्या मजुरास शहरगावात मातीचें मोल देतां देता नाकीं नव येतात आणि धरित्रीमातेच्या अकावर अग टेंकण्यापुरती जागा सुद्धा मोठ्या कष्टाने प्राप्त करून घेता येते.

---

* नवयुग, वर्ष ७ अक १ [ जानेवारी सन १९२१ ]

याप्रमाणे केवळ विपुलत्वामुळेच अनावश्यक वाटणारीं पंच महाभूतें स्थलविशेषी व प्रसंगविशेषीं पंच:प्राणापेक्षाही प्रिय वाटावयास लागून त्याच्या अभावीं कधीं कधीं पंचत्वाप्रत पावण्याचीही पाळी येते.

मुंबईसारखी शहरे परदेशाशी दळणवळण करण्यास सोईची म्हणूनच वसलेली असतात. तेथील पाण्याचा पुरवठा दूरदूरच्या अंतरावरून नळ आणून व सर्व शहरभर नलिकाचें जाळें पसरून होत असतो. उलट पक्षी सामान्य गावें व खेडीं पाण्याच्या सोई पाहूनच वसविण्यात आलेली असतात. ज्या जागेजवळ नदी किंवा झरा असेल अथवा ज्या जागीं खणलें असता पाणी जवळच लागेल अशाच ठिकाणीं बहुधा मनुष्यवस्ती करण्यात येते. तेथील विहिरी व मोठ्या शहरातील नळ यामधील तफावत, गावढळाच्या तोंडास चटके देणारी चिलीम व अमीराच्या मुखाशीं दीर्घ नळीच्या द्वारें दूरचें नाते लावणारी व त्याच्या लांबलचक दाढीस दखल न पोचविणारी गुडगुडी यामधील अंतराइतकीच असते. आमच्या गावात प्रथम घरोघर विहिरी होत्या. पण काही वर्षांपूर्वी तेथें म्युनिसिपालिटी स्थापन होऊन जवळच्या एका तळ्यातून नळ आणून गावभर पाणी खेळविण्याची व्यवस्था झाली, व विहिरीपासून सार्वजनिक आरोग्यास धोका पोचण्याचा संभव आहे या सबबीवर साऱ्या विहिरी बुजविण्यात आल्या एकदोन जुन्या विहिरी मात्र त्याच्या मालकाच्या दुराग्रहामुळें तशाच उघड्या राहिल्या. मात्र मालकाना नळातून मुबलक पाणी मिळत असल्यामुळे त्या विहिरीची वहिवाट पूर्णपणें बंद झाली, व त्याच्या पाण्यावर हिरवा रंग चढून त्यास इतका वास मारूं लागला, कीं आम्ही त्याच्याजवळून जाताना तोंडें फिरवून नाकावरून पदर घेत असूं. प्रत्येक अज्ञात स्थानात आपल्या कल्पनेची अपत्यें वसविण्याचा जो प्रघात लोकामध्ये दिसून येतो त्यास अनुसरून त्या ओसाड विहिरीत शेजाऱ्या-पाजाऱ्यानीं लवकरच भुताखेतांची वस्ती करून साती आसराना आसरा दिला. विहिरींत बघणाऱ्याच्या डोक्यातील भुतेंच प्रतिबिंब पावून त्यांना भेवडावूं लागली विहिरीवरील झाडाचीं फळें सहज त्यात पडलीं कीं जाणारांयेणारांना पिशाच्चांच्या उलट्या पावलांचा शब्द व एखादें मांजर ओरडलें तरी भुताच्या किंकाळ्या ऐकूं आल्यासारखें वाटूं लागलें याचा परिणाम असा

झाला, की त्या विहिरीचें तोंड पहाणें विधवामुखदर्शनाइतकें अशुभ वाटूं लागलें, मग त्यांतील पाणी घेणें विधवापाणिग्रहणाइतकेंच अपशकुनी वाटूं लागल्यास नवल काय ? याप्रमाणें त्या विहिरीतील पाण्याचें त्याच्या घाणीनें व लोकांच्या डोक्यातील खुळचटपणाच्या घाणीनें बरींच वर्षे रक्षण केलें

गेल्या दहाबारा वर्षांपासून आमच्या प्रांतांत पावसाचें मान कमी व्हावयास लागलें गेल्या दोनचार वर्षांत तर त्यानें आपला हात फारच आखडता धरिला. सबध पावसाळा तो एकदोन झडींवर व दोनचार सरींवरच उरकूं लागला मात्र तो योग्य काळीं येत गेल्यामुळें पिकें बऱ्यापैकीं येत, व त्याची इतराजी विशेष भासत नसे गेल्या वर्षी मेघराजानें दोनचार वेळां प्रोक्षण करूनच आपली जलवृष्टीची हौस भागवून घेतली त्याचा अल्पसंतुष्टपणा वाढूं लागला तों तों आमचा धीर सुटूं लागला आमची धरणीमाताही त्याच्याइतकीच अल्पसंतोषी दिसून येऊं लागली. त्याच्या अल्पशा कृपाप्रसादानेंही ती रोमांचित होऊं लागली याप्रमाणें आमच्या तोंडचा घास जरी अजून कायम राहिला होता तरी त्या घासाबरोबर पाण्याचा घोट मिळण्याची वानवा वाटावयास लागून आमच्या तोंडचें पाणी पळूं लागलें हळूहळू अवर्षणाचा आमच्या तळ्यावर परिणाम होऊं लागला त्यांतील पाणी भराभर ओसरूं लागलें आजाऱ्याच्या डोळ्याप्रमाणें तें खोल जाऊं लागलें अखेरीस त्याची सपाटी इतकी खोल गेली, की त्यांतील पाणी यंत्रानें वर चढविल्याशिवाय त्याचा नळांत प्रवेश होईना तेव्हां पंप लावून पाणी वर चढविण्यात येऊं लागलें काहीं दिवसांनीं पाणी इतकें कमी झालें, की तें पंपासही दाद देईना. येथपर्यंत मजल येऊन पोहोंचली तेव्हां इतर जलाशयाकडे आमची दृष्टी वळली. ज्या दोनतीन विहिरी बुरसलेल्या व नासक्या पाण्यामुळें आम्हांस त्याज्य वाटत होत्या त्याजवर आम्ही, कुजलेल्या प्रेतावर धाड घालणाऱ्या गिधाड्याप्रमाणें तुटून पडलों. त्याजपासून चार पावलें दूर रहाणारे आम्ही त्याच्या काठाभोंवतीं जमून त्याच्या पाण्याच्या तळाचा ठाव पाहूं लागलों. पिशाचांनी पछाडलेल्या-असा आजपर्यंत त्याचा जो विनाकारण गवगवा झाला होता तो आमच्या गर्दीमुळें क्षणांत सकारण वाटावयास लागला त्या विहिरींत खरोखरीचीं भुतें असतीं तरी त्यांनीं आमच्या चेष्टांना भिऊन तेथून धूम ठोकली असती. विहिरींत अजून बरेंच पाणी आहे असें दिसताच आम्ही

आनंदाच्या आरोळ्या ठोकीत नाचू उडू लागलो, व त्याच्या पाण्यावरील बुरसा निघून नीट उपासा होण्यापूर्वीच त्यांच्या काठाभोंवतीं आमच्या गाडग्या-मडक्याची कडी व पाणी काढण्याच्या दोराचीं वेटोळीं पडून ते काठ रुंडमालधर व सर्पभूषण शंकराच्या कंठाप्रमाणे शोभू लागले आमच्या आरडाओरडीमुळे व नाचण्याबागडण्यामुळे त्या विहिरी भूतनाथाच्या मूर्तीशीं विशेष साम्य पावू लागल्या

पण सगळ्या गावाचा त्या विहिरीवर मारा होऊ लागल्यावर त्या तरी बिचाऱ्या किती दिवस पुरणार? त्यातील पाणी आटू लागलें, तशी पूर्वी बुजविलेल्या विहिरी खणण्यास सुरुवात झाली वास्तविक पहाता आमची त्याजविषयीची आठवण पार बुजाली होती पण अडचणीच्या तीव्रतेनें आमची आठवणही प्रखर होऊ लागली, व थोड्याच दिवसात गावातील यच्चयावत् विहिरी, आड, हौद, टाकीं खणण्यात आलीं त्यापैकी बहुतेक शुष्क व पेवे म्हणूनच उपयोगात आणण्याच्या लायकीची झाली होती. त्याना तरी दोष लावण्यात काय फायदा! आम्ही त्याना पूर्वी तितक्याच शुष्क अंतःकरणानी मूठमाती दिली नव्हती का? मग आता त्याच्या अंतःकरणात ओलावा दिसला नाही तर नवल कसचें? त्याजबद्दल आमच्या मनात अलीकडे जो जिव्हाळा उत्पन्न झाला होता तो तरी तात्पुरताच होता असो. काही विहिरींतील पाणी मात्र, त्यास पूर्वी जिवंत समाधी मिळाली असताही, त्या उकरताच जालंदरनाथाप्रमाणें जिवंतच आढळून आलें त्या बिचाऱ्यानी भिन्नभिन्न धातूचे पुतळेही बळी घेतले नाहीत. एकदोन रौप्य मुद्रावरच त्याचें समाधान झालें या निरनिराळ्या जलाशयानी ठिकठिकाणची पाण्याची सोय तात्पुरती तरी भागविली खरी. पण यंदा सपाटून पाणी पडल्याशिवाय त्यातील पाणी फार दिवस पुरण्याची आशा नव्हती आणि तसाच पाऊस पडला आणि आमचें तळेंही तुडुंब भरून गेले तर या कृपण जलाशयाची मनधरणी व पायधरणी पुन्हा करावयाची नाही असा आमचा मनातल्या मनात कृतनिश्चय होता.

यंदाचा वर्षाकाळ सुरू झाला आकाशात ढग संचार करू लागले. पण काय असेल ते असो, यंदा ते आपला कृष्ण वर्ण परिधान करीनात किंवा गर्जनाही करीनात आमच्या भयचकित मुद्रा पाहून, आम्हास

अधिकच भयभीत करण्यात हंशील नाहीं असें त्यास वाटत असल्यास न कळे आम्ही जागोजाग थवे करून डोक्यावरून जाणाऱ्या ढगाकडे आपलेपणाच्या भावनेनें पहात उभे राहूं लागलों. पण आमचें व त्याचें मुळींच सोयरेंसुतक नाहीं अशा बेपर्वाईच्या वृत्तीनें ते आले तसे चालते होत ते प्रेमाला दाद देईनात, तेव्हा आम्ही त्यास चिडविण्याच्या प्रयत्नाला लागलों या ढगात पाणीच नाहीं, त्या ढगात रामच नाही, असे आम्ही तुच्छताभावानें ओरडून त्याच्या कानांवर घालू लागलों. पण ते कसले मठ्ठ! आमची व्यंगोक्तिपूर्ण भाषा कळण्याइतकेंही त्याना ज्ञान नाही असें लवकरच त्याच्या वर्तनावरून दिसून आलें. शेवटीं आम्ही 'येरे येरे पावसा, तुला तुला देतों पैसा, पैसा झाला खोटा, पाऊस आला मोठा' या बाळपणातल्या महामंत्राचा प्रयोग करण्यासही कमी केलें नाही पण ढग त्यालाही दाद देईनात. आम्हीं जों जों धि कारपूर्वक बालिश गर्जना करीत असू तो तो ते अधिकच मौनाचा स्वीकार करीत 'गर्जेल ते पडेल काय' ही नीति आम्हापेक्षा त्यासच अवगत होती अखेरीस आम्ही दात ओंठ खाऊन व मुठी वळून त्यास माराचा धाक दाखवूं लागलो व त्याजवर शिव्याचा वर्षाव करू लागलों! तथापि त्या गभीर मेघापैकीं एकानेंही आपले तोंड काळवडू दिलें नाहीं, आपली इद्रधनुष्यरूप भ्रुकुटि वक्र केली नाहीं, ओरडून युद्धाचें आव्हान केलें नाही किंवा आपली विद्युल्लतारूपी तलवार म्यानातून काढली नाहीं. अखेरीस त्याच्या तोंडाऐवजी आमचींच तोंडें निराशेने काळवडून गेली. तेव्हा ते चारुदत्ताप्रमाणें उदार पण निःसत्त्व ढग मधून मधून आम्हाला आशा दाखविण्याकरिता खऱ्या पावसाळ्याची उगीच कोठें चुणूक दाखवू लागले. पण आम्हीं इतकें समाधानी वृत्तीचे बनून गेलों होतो, कीं त्यांच्या मृगजलतुल्य आश्वासनावरच अतिवृष्टीचे टोलेजंग मनोरे बाधू लागलों त्यानीं क्षणभर धारण केलेला काळसरपणा आमच्या काळवडलेल्या दृष्टींतून आम्हाला इतका कुळकुळीत दिसूं लागे व त्यानी केलेली कुजबूज आमच्या आशाळभूत कानास इतकी दणक्याची वाटे, कीं आम्हीं घाईघाईनें छत्र्या उघडावयास लागत असूं. एकदा आसन्नमरण रोग्याच्या प्राणज्योतीहूनही क्षीण अशी एक विद्युल्लता एक निमिषभरच आकाशात चमकली मात्र, आणि पाडूतात्यानीं मला खऱ्या हर्षातिरेकानें इतकें घट्ट

आलिंगन दिलें, की तितकें वसंतसेनेनेंही खोट्या भीतीनें चारुदत्तास दिलें नसेल. तेव्हापासून मला तात्याबद्दल इतका आदर वाटूं लागला, कीं दुरून साजेरे दिसणाऱ्या डोंगराप्रमाणें मी त्यास अंतरावरच ठेवूं लागलों. असो. आकाशातून पाणी मिळण्याची निराशा होऊं लागली तसें भूमिगत पाणी मिळविण्याचे आमचे प्रयत्न अधिक जोरानें सुरू झाले ज्या विहिरीतील पाणी आटत आलें होतें त्या अधिक खोल खणावयास सुरवात झाली; पण नवीन झरे लागण्याचें चिन्ह दिसेना विहिरीतच नसल्यावर पोहोऱ्यात पाणी मिळण्याची ज्याप्रमाणें आशा करावयास नको त्याप्रमाणें भूमींतच नसल्यावर विहिरीत मिळण्याचीही आशा व्यर्थ आहे. खणता खणता खडक लागल्यास तो फुटण्याकरिता सुरुगाची योजना करावी लागे. पण त्या सुरुगानीं खडक फुटण्याऐवजी पुष्कळदा जिज्ञासु लोकाची डोकींच फुटत, व जेव्हा खडक फुटे तेव्हा त्यानें आतील पाणी मोकळे होण्याऐवजी पूर्वी वहाणाऱ्या पाण्याचेंच द्वार बद होई. दुर्दैवी मनुष्यानें अनुकूल साधनाचा आश्रय केला असताही तीं त्यास प्रतिकूल होतात, हा जगाचा नियमच आहे

बंडूनानाची कल्पकता यापूर्वीच गावकऱ्याच्या अनुभवास पूर्णपणें आलेली असल्यामुळे त्यानी कृत्रिम साधनानी पाणी तयार करण्याची कामगिरी त्याजवरच सोंपविली. नानानीं आपल्या नेहमीच्या उत्साहानें कामास जारीनें सुरवात केली. त्यानीं प्राणवायु व जलवायु योग्य प्रमाणात मिसळून पाणी तयार करण्याचा सपाटा लाविला पण इतकी यातायात करूनही पाण्याची पैदास इतक्या थोड्या प्रमाणात होऊं लागली, की तिनें चिमणीचीही तहान भागण्याचा संभव दिसेना. शिवाय तें यात्रिक पाणी इतकें बेचव लागू लागलें, की तें श्रावणीच्या दिवशीं पंचगव्याबद्दल घेण्यासही लोक कबूल होईनात हे प्रयोग करण्यात कांचेचीं भाडी इतकी फुटलीं व रासायनिक द्रव्यें इतकीं खर्च झालीं, कीं त्यास लागलेल्या पैशात इतर मार्गांनी पाण्याचा बराच पुरवठा करिता आला असता. असो. ही युक्ति फसल्यावर नानानीं तोफाचे बार काढून वृष्टि पाडण्याचा उपाय योजण्याचें ठरविलें त्याकरिता त्यानी एक मोठी तोफ तयार करण्यास गावातील सर्वांत कुशल अशा लोहारास सागितलें, व सोरा, गधक इत्यादि द्रव्यें गोळा करून दारूचा लहानसा कारखानाही काढिला सर्व सिद्धता झाल्यावर ठरलेल्या दिवशीं तोफेंत दारू

भरून दारूचा साठा सपेपर्यंत बार काढण्यात आले. पण बार केल्याने पाऊस पडतो हा शोध नानाप्रमाणें ढगास माहीत नसल्याने ते बेटे तोफेच्या इशाऱ्याबरोबर जमूनच येईनात, मग त्यानी वृष्टि करण्याचे दूरच राहिले. इतकी तयारी करून केवळ ढगाच्या अरसिकपणामुळें सगळे ऑफस् व्हावे ही गोष्ट नानाच्या नाजूक मनाला फारच लागली, व तोफानी ढग काबीज करण्याचें काम, आकाशाला गवसणी घालण्याइतकेंच दुर्घट आहे हें ओळखून त्यानी त्या फदात पुन्हा न पडण्याचा निश्चय केला त्या निश्चयास आणखीही एकदोन गोष्टी कारण झाल्या. त्या दिवशीचा तो अभूतपूर्व चमत्कार पहाण्यासाठी शेजारच्या गावातून लोकाच्या झुडीच झुडी लोटल्या होत्या. त्यानी त्या दिवशी आपली तहान भागविण्याकरिता आमचा पाण्याचा साठा इतका सपुष्टात आणिला, की त्या प्रयोगाची पुनरावृत्ति झाल्यास, तो यशस्वी होण्याचे बाजूस राहून बाहेरगावच्या तमासगिराबरोबर आम्हासही गाव सोडून जाण्याचा प्रसग येईल अशी सकारण भीति नानास वाटू लागली. दुसरें असे, की नाना दारूगोळ्याची सपाट्याने जमवाजमव करीत आहेत अशी कीर्ति कर्णोपकर्णी सरकारच्या कानावर जाऊन, नानानी आपला उद्योग बद न केल्यास, त्याजवर सरकारविरुद्ध युद्ध करण्याचा आरोप ठेवण्यात येणार आहे अशी कुणकुण नानास कळली. नानास फुकटेपणाची मनस्वी चीड असल्यामुळें सरकारचे फुकट आदरातिथ्य घेण्याची कल्पना त्यास साहजिकच असह्य झाली, व तोफेपासून पाणी काढण्याचा नाद त्यानीं अजिबात सोडून दिला

मानवी उपाय हरल्यावर दैवी उपाय करून पहाण्याचें ठरले अवर्षण पडलें म्हणजे, तावडीत सापडतील तितके देव विहिरीत उतरवून त्याजवर सकट घालणें, हा अगदी रामबाण इलाज असतो पण या सुमारास विहिरींतील पाणी इतकें खोल गेलें होतें, की ज्या पोहऱ्यात देव घालून बुडवावयाचे तो पोहरा निम्याने सुद्धा बुडावयाची मारामार असल्यामुळे त्यातील देव खाली जाते वेळच्या इतकेच कोरड्या अगानी व कोरड्या अतःकरणानीं वर यावयाचे हें ठरल्यासारखे होते. बरें, एखादे ठिकाणी पोहरा बुडालाच तर त्यातील देव विहिरीच्या ओबडधोबड दगडाच्या धक्यानें पोहऱ्याबाहेर उसळून व सुरुंगानी पोखरलेल्या भगदाडात पडून

नापत्ता होण्याचा फार संभव होता, व अनेक देवाच्या अंगावर त्याच्या प्रेमळ भक्तानीं मौलवान् दागिने चढविलेले असल्यामुळे त्याचा विरह त्यास फारच जाणवला असता. यामुळें तो उपाय सोडून इतर उपाय अमलात आणण्याचे ठरले विष्णूच्या देवळात भजनसप्ताह, महादेवाच्या देवळात अभिषेक व देवीच्या देवळात शतचंडीचा यज्ञ सुरू करण्यात आला ब्राह्मणाचे व भजनी मेळेवाल्याचे घमे सुकून भजनात, पाठात व मंत्रघोषात खळ पडू नये आणि अभिषेकाची धारहि अखंड चालू रहावी म्हणून देवळातून पाण्याचा मुबलक पुरवठा केला होता आपण जें पाणी खर्च करीत आहोंत तें आपणास अनंतपटीने परत मिळणार आहे अशाबद्दल सर्वांची खात्री होती. भजनी मेळ्यानें पहिल्याच दिवसापासून आपल्या झांजानीं, टाळानीं, मृदंगानी व आवाजानी एवढा मोठा कल्लोळ उडवून दिला, की तो श्रीविष्णूस वैकुंठातहि ऐकू गेला असेल. ज्या देवळात सप्ताह उभा होता त्याच्या भोंवतालची निम्मी अधिक बिऱ्हाडें पहिल्याच दिवशी रिकामी झालीं होती उरलेल्यापैकी एका बिऱ्हाडातील एका इसमास जन्मापासून चांगलें ऐकूं येत होते, पण भजनाच्या घोषाने कानाचे पडदे फाटून तो जन्माचा बहिरा झाला दुसऱ्या बिऱ्हाडात एक बहिरा इसम रहात होता, त्याच्या कानाची रंध्रे भजनी किंकाळ्यानी मोकळी होऊन त्यास चांगलें ऐकू येऊं लागले, व कान पुन्हा निकामी होण्यापूर्वीच त्यानें तेथून पोबारा केला तिसऱ्या बिऱ्हाडातील एका गृहस्थास सप्ताहाच्या पहिल्या दिवसापासून जी कपाळदुखीची व्यथा जडली ती आजतागाईत कायम आहे या तिघा इसमाशिवाय बाकीच्या इसमानी कानात कापसाच्या गुंड्या घालून भजनाचा पुण्यघोष कानात न शिरण्याची जी दूरदर्शीपणानें तजवीज केली होती तिजमुळेच ते धड कानाकपाळानिशीं सुटले सप्ताह निर्विघ्नपणे तडीस गेला, त्या दिवशी इतर गावकऱ्यापेक्षा या शेजाऱ्याना विशेष समाधान वाटत असावेसें दिसत होते त्याच दिवशी अभिषेकाची व यज्ञाचीहि समाप्ति झाली. दुसऱ्या दिवशीं पारणें मोठ्या थाटाने पार पडले

पारणे यथासांग पार पडण्याला व पावसाची बुरबुर सुरू व्हावयाला एकच गाठ पडली ती चांगली तासभर चालू होती. तथापि तिनें रस्ते भिजण्याचें तर राहोच, पण ते नुसते सर्दहि झाले नाहीत कदाचित् तिचे

तुषार जमिनीवर पोंचण्यापूर्वीच उष्णतेनें करपून वरच्यावर नाहीसे झाले असावेत कसेंही असलें तरी आम्हीं त्याचें, पुढील महावृष्टीचा सचकार म्हणून प्रेमानें अभिनंदन केलें लागलीच गावकऱ्याची एक जगी सभा भरविण्यात येऊन भजनात, अभिषेकात व पाठात भाग घेतलेल्या सर्वास धन्यवाद देण्यात आले, व त्यास त्याच्या योग्यतेप्रमाणें शुकपाठैक वीर, अभिषेकधारासागर, भजनवाचस्पति, मृदगपचानन, खरग्रीवाचार्य, अगविक्षेप-चित्रमयूर इत्यादि पदव्या अर्पण करण्याच्या सूचनाहि पुढें आल्या पण त्या येताच त्याजमध्यें परस्परात एकमेकाच्या योग्यतेसबधानें इतकी यादवी माजली व एकमेकावर अपशब्दाचा इतका भडिमार झाला, की पदवीदानाचा विधी पुढील सभेपर्यंत तहकूब ठेवावा लागला ती सभा भराविण्याची सुसधि येण्यापूर्वीच पाण्याचें दुर्भिक्ष्य इतकें प्रखर भासू लागलें, की अभिषेकात, भजनसप्ताहात व यज्ञात ज्यानी ज्यानी म्हणून पाणी विनाकारण फस्त केलें होते त्याजवर निंदाव्यजक ठराव करण्याकरिता एक सभा भरून तो ठराव सर्वानुमतें पसारहि झाला लोकमताचे वारे किती तरी अनिश्चित व चचल असतें !

विहिरींतील पाणी जसजसें सपुष्टात येऊ लागलें तसतसा पाण्याचा खर्चहि कमी होऊ लागला. चिखल करावयास पाणी मिळेनासे झाल्यामुळे घरें बाधण्याचें काम बद ठेवण्यात आले झाडास पाणी मिळेनासे झाल्यामुळें बागबगीचे वाळून गेले वाफेच्या रुळाला व सडकावर शिंपडण्यास पाणी न मिळाल्यामुळें रस्ते खराब होऊ लागले प्रात कालीन सडासमैजन बद झालें रोजचें स्नान आठवड्यावर येऊन बसलें. स्मश्रू करावयाच्याच दिवशी स्नान घडूं लागलें. प्रसगी न्हाव्याच्या वाटीपुरतेंहि पाणी मिळत नसल्यामुळे स्मश्रूही आठवड्याची पध्रवड्यावर व पुढें पध्रवड्याची महिन्यावर जाऊन बसली ज्याना रोजचें स्नान घडे त्याची स्थिति तरी समाधानकारक होती असें नाही कारण आघोळीस मिळणारें पाणी विहिरींच्या तळचें व अत्यत गढूळ असल्यामुळें त्याना शुद्धोदक-स्नानाबरोबर मृत्तिकास्नानाचेंही श्रेय मिळत असे, व असें एक स्नान घडलेल्या शुचिर्भूत ब्राह्मणाची कळा एक महिनाभर स्नानाचा सस्कार न घडलेल्या अमंगळाच्याप्रमाणें दिसत असे पुढें पुढें पाणी फारच कमी

झालें. तेव्हा चार चार आठ आठ शुचिर्भूत ब्राह्मण एका चौथऱ्यावर बसून एकाच पाण्यानें स्नानविधि उरकून घेऊ लागले. हळूहळू मुखमार्जनास व पादप्रक्षालनास रजा देण्यात येऊं लागली. तर्पणात पाण्याची काटकसर होऊ लागली. देवपूजेतलें शुद्धोदकस्नान अक्षतावर भागूं लागलें आचमन, पर्युक्षण, परिस्तरण, या सर्वास फाटा मिळू लागला. फार काय, भटाना द्यावयाची दक्षिणा सुद्धा पाण्यात न भिजविताच देण्यात येऊ लागली, व पात्राचें प्रोक्षणही सढळ हातानें होईनासे झालें येथपर्यंत मजल आली तेव्हा गुडगुडीसारखी चैनीची व्यसनें बंद पडली हें निराळें सागण्याचें कारण नाहीं

ज्या गोष्टीची वाण पडते तिची गोडीही विशेष वाटावयास लागते हा नेहमींचा अनुभव आहे गुडगुडीप्रमाणें विड्या, भाग, गाजा, दारू हीं व्यसनेही मागे पडावयास लागून पाण्याचे व्यसन बळावत चाललें या व्यसनाची तलफ बहुधा चोरून भागविण्यात येई. घरोघर पाण्याची काटकसर चालली असताना आपणास ते घशाखाली ढोंसण्याची हौस असावी याची प्रत्येक पाणीबाजास मनापासून लाज वाटे, पण व्यसनापुढे त्याचा निरुपाय होई. त्यास पाणी चोरून पिताना कोणी पाहिलेच तर खरी गोष्ट कबूल करण्यापेक्षा ‘पितों आहे जरा दारू’ असें धडधडीत खोटें सागण्यास त्यास दिक्कत वाटत नसे मद्यप्राशनाची जशी डोळ्यावर धुंदी चढते तशीच त्याच्या डोळ्यांवर जलप्राशनाची धुंदी चढत असे. या व इतर लोकाच्या सोईकरिता लवकरच पाण्याचे गुत्ते व पाण्याची दुकाने उघडण्यात आलीं त्यापैकीं जी सचोटीनें चालत त्यातून विक्रीकरिता निर्भेळ पाणी ठेवीत असत, पण इतरातून पाण्यात दूध मिसळून तें विकण्यात येई. दुधाचा भाव शेरी चार आणे तर पाण्याचा शेरी आठ आणे झाला होता, त्याचाच हा परिणाम होता. निर्भेळ दूध ओळखण्याची यत्रें सुदैवानें निर्भेळ पाणी पारखण्यासही उपयोगी पडत, म्हणून आम्हास उत्तम पाणी मिळत तरी असे. नाही तर आमचे हाल कुत्रा खाता ना पाण्यातून नेमकें दूध वेगळें करून प्राशन करणारे हस जर केवळ काव्यात न आढळता व्यवहारातही दिसले असते तर, त्याचा दुधाच्या गिऱ्हाइकास जरी विशेष उपयोग झाला नसता तरी, पाण्याच्या गिऱ्हाइकास खात्रीने झाला असता

आघोळीकरिता पुरेसें पाणी मिळेनासे झाले तेव्हा आमचे बरेचसे गावकरी स्नानाकरिता बाहेरगावीं जाऊ लागले आमच्या गावापासून दोन दोन तीन तीन कोसाच्या अतरावरील काहीं खेड्यातील विहिरीत अजून कमरेइतकें पाणी शिल्लक होतें आमचे गावकरी रोज पहाटे त्या खेड्यावर जाऊन त्या विहिरीत घटका घटका डुबू लागले व यथेच्छ जलक्रीडा करून त्याच्यातील पाणी पिण्यास अयोग्य करूं लागले पुढे आमच्या गावात पिण्याच्या पाण्याचीही टचाई पडू लागली व जेवणावर पोटभर पाणी पिण्याकरिता त्याना त्याच विहिरीचा आश्रय करावा लागू लागला तेव्हा त्यानी त्यात स्नाने करण्याचा क्रम बद केला, व ते रोज दुपारच्या व सध्याकाळच्या जेवणानतर तृषाशमनार्थ त्या खेडेगावास जाऊन येण्यात दोन दोन तीन तीन तास घालवू लागले. पण या शतपावलीत पोटात जाणाऱ्या पाण्यापेक्षा बाहेर निघणाऱ्या घामाचेंच प्रमाण अधिक आहे असे दिसून येताच त्यानी गाड्यातून जाण्यायेण्याचे ठरविले हाही क्रम काही दिवस चालू होता. हा प्रकार ताजा होता तोंपर्यंत त्याच्या खेडवळ यजमानास त्याचें विशेष महत्त्व वाटले नाहीं. पण दिवसानुदिवस त्याच प्रकाराची पुनरावृत्ति होऊ लागली तेव्हा इतकी माणसे केवळ तहान भागविण्याकरिता इतक्या लाबचा प्रवास करीत असतील ही कल्पना त्याच्या सरळ मनास पटेनाशी झाली एका रात्रीं त्यापैकीं एका खेड्यात एक मोठा डाका पडला, तेव्हा तेथील रहिवाश्याची या आगतुकाच्या हेतूबद्दल पुरीच खात्री झाली. दुसऱ्या दिवशी हे खुशालचेंडू नित्यक्रमाप्रमाणें गाड्या उडवीत त्या खेडेगावात जाऊन पोहोचतात तोंच एक पोलिसाची तुकडी त्याचें स्वागत करण्याकरिता उभी असलेली दिसली तो देखावा दिसताच त्याची तहान विनपाण्यानेंच शात झाल्यासारखी दिसली, व त्यानीं आपल्या गाड्याचा मोर्चा ताबडतोब आपल्या गावाकडे वळविला पण त्याना परत जाण्याची जितकी घाई होती तितकी पोलीस शिपायाना त्यास सोडून देण्याची दिसेना. त्यानी संथपणानें त्याना अडवून आपल्या ताब्यात घेतलें, रात्रीचे डाकेखोर हे नव्हत अशी बऱ्याच चौकशीअतीं खात्री होईपर्यंत त्याची सुटका केली नाही अशीच दुसरी काहीं मडळी याच सुमारास जलपानार्थ दुसऱ्या खेडेगावी गेली होती. ती तेथे जाण्यास

आणि एका बड्या साहेबाचा मुक्काम त्या गावी पडण्यास एकच गाठ पडली. खेडेगावच्या अधिकाऱ्यास साहेबाचे डेरे, तबू ठोकावयाचे होते, पण त्याजपाशी त्या कामास पुरेशी माणसें नव्हती. आता कसें करावें या फिकिरीत ते आहेत तोंच समोरून आमच्या गावची जलपिपासु मडळी धावत धावत तेथें आली. पाटलास देव पावल्यासारखें वाटलें. त्यानें तावडतोब त्या मडळीस वेठीस धरून काहीस खुट्या ठोकण्यास बसविले, काहीच्या हातात दोऱ्या दिल्या व इतराची तबू डेरे उभारण्याच्या कामी योजना केली अखेरीस त्याची तेथून चार तासानीं मुक्तता झाली खरी. पण ते आले होते त्या वेळेइतक्याच कोरड्या घशानी त्याना परत जावे लागलें. कारण त्याच्या शिंकाळ्याच्या दोऱ्या त्या गडबडीत तंबूस लावण्यात आल्या होत्या बरे, पाणी काढण्याचा दोर पाटलापाशी मागावा तर, दुसरा एखादा बडा अधिकारी तेथे येणार असल्याची त्यास अवचित वर्दी आल्यास त्याच्या संकटात त्यासच धावून जाणें भाग पडलें असतें, या गोष्टीचा पोक्त विचार करून व पुन्हा त्या खेडवळ लोकास आपल्या भेटीचा लाभ न देण्याचा निश्चय करून मडळी परतली

यापुढें काही दिवस मडळीस जेवणानतर तहान लागण्याचें चिन्ह दिसेना. परतु पाण्याचे दुर्भिक्ष जसजसें वाढत चालले तसतसा त्याना आपला समाधानी स्वभाव बाजूला ठेवावा लागला त्यानी पाच कोसावरील एका नदीचे पाणी रोजच्या रोज गाड्यातून आणण्याचें ठरविलें, व तेव्हापासून पाच पचवीस गाड्याची राग रोज सकाळी गावातून बाहेर पडताना व सध्याकाळी परत येताना दिसू लागली पहिल्या दिवशी त्या गाड्यात जे डबे पाण्याकरिता पाठविण्यात आले ते कित्येक वर्षाचे पुराणे व फुटके असल्यामुळें जाताना जसे रिकामे होते तसेच परत घरी येऊन पोहोचले जाण्यायेण्याचा रस्ता मात्र त्यानी भिजवून तर्र करून ठेविला होता, पण त्यानें आमचे समाधान होण्यासारखें नव्हतें. दुसऱ्या दिवशीं ते सारे जुने डबे बदलून त्याच्याऐवजी नवे डबे व तेही फुटलेले नाहीत अशी प्रथम खात्री करून घेऊन ठेवण्यात आले परंतु तेही गेले तसेच शून्य

तिसऱ्या दिवशीं गाड्यास तट्टे बाधून गाडीवानाना सावली मिळण्याची सोय केलेली असल्यामुळें डबे बरेच भरलेले येऊन पोहोंचले. पण गाड्या सोडून डबे खालीं उतरण्यात येतात न येतात तोंच त्यावर तृषार्त बलीवर्दांनी निकराचा हल्ला चढवून, व आतील पाण्याचा आमच्या डोळ्यादेखत फन्ना उडवून, आपण केवळ भारवाहकच नाही अशी मुद्देसूद प्रमाणांनीं आमची खात्री करून दिली त्याना आवरण्याचा आम्ही सर्वांनी मिळून किती तरी प्रयत्न केला. पण त्यानी शिंगें उगारून आम्हावर रोंखल्याबरोबर आमचा नाइलाज होत असे. अखेरीस सारें पाणी डब्याच्या उदरातून बैलाच्या उदरात जाऊन बसलें. तेव्हा आम्हाला आमच्या आपलपोटेपणाची मनापासून लाज वाटावयास लागली. आम्ही समान हक्काचे अभिमानी असल्यामुळें माणसाच्याप्रमाणें बैलाचाही पाण्यावर हक्क असणें योग्य आहे अशा तात्विक विचारानी आमची हृदयें उचबळून गेलीं, व आम्ही बैलास अंतःकरणपूर्वक क्षमा केली, इतकेंच नाही, तर आम्हास स्वार्थत्याग दाखविण्याची अपूर्व संधि आणून दिल्याबद्दल आम्ही त्यास अगदीं बेंबीच्या देंठापासून धन्यवादही दिले परंतु बैलानी यापुढेंही पाण्याचें असेंच अतिसेवन केल्यास त्याच्या प्रकृतीस अपाय व्हावयाचा, न जाणो त्यास जलोदरासारखा असाध्य रोगही जडावयाचा, या भीतीनें आम्ही दुसऱ्या दिवसापासून गाड्या परत आल्यावर बैल सोडते वेळी त्याचीं तोंडें दोऱ्यानीं घट्ट आवळून ठेवूं लागलों. शिवाय गाडीवानाना व बैलाना उन्हात जावें यावें लागून तहानही लागूं नये म्हणून लवकरच आम्ही गाड्या सकाळी परत याव्यात या बेतानें संध्याकाळीं रवाना करूं लागलों पण तो मार्ग लवकरच पूर्वीच्या एकूण एक मार्गापेक्षा टाकाऊ ठरला, कारण त्याने बैलाची पायपीट पूर्वीइतकीच होऊन गाडीवानाना, बैलाना किंवा आम्हाला पाण्याचा थेंबही मिळेनासा झाला. गाड्या नदीवर जाण्याकरिता निघाल्या म्हणजे थोड्याच वेळात दिवसाच्या श्रमानें व रात्रीच्या गारव्याने गाडीवानाना इतकी गाढ झोंप लागे, कीं बैल योग्य मार्गावरच आहेत की नाहीत हे पहाण्याचेंही त्याना अवधान राहीना, इकडे बैलाना परत घरीं जाण्याची ओढ असल्यामुळें ते अर्ध्या वाटेंतच गाड्यासह तोंडाचा रोख फिरवून परत यावयास आरंभ करीत, व पहाटेच्या आतच आमच्या

घरासमोर येऊन उभे राहत. आम्ही मोठ्या आशेनें डब्याकडे धाव घेऊन पहातों तों त्यात पाण्याचें एक टिपूसही दिसावयचें नाहीं. गाडीवानाच्या डोळ्यास लावून त्यास जागे करण्याकरिताही आम्हास घरातूनच पाणी आणावें लागे असें दोन चार वेळ झालें, तेंव्हा पहाटे उठून अभ्यास करणारे विद्यार्थी झोंप येऊं न देण्याकरिता जी युक्ति करीत असतात ती युक्ति अमलात आणावी लागली. मानेस थोडाही हिसका बचल्यास शेंडीस ताण बसावा अशा बेतानें आम्ही प्रत्येक गाडीवानाची शेंडी गाडीच्या वरच्या तट्टयास बाधू लागलों. या गाड्यापैकीं दोन आमच्या मुसलमान बंधूच्या असून त्याचे गाडीवानही मुसलमानच असत. त्याना अर्थातच शेंड्या नसत, व दाढ्या जरी असत तरी ते खाली डोकें वर पाय अशा पावित्र्यात उभे राहिल्याशिवाय त्या दाढ्याचा डोकें उचलून धरण्याचें कामीं मुळीच उपयोग होण्यासारखा नव्हता, यामुळें त्याचा झोंपेपासून बचाव करण्याचें काहीं साधन नसे. आमच्या धूर्त पूर्वजानी केंसाची बट डोक्याच्या खाली न ठेविता वर ठेवण्याचा जो प्रघात घालून दिला त्यामुळेंच आमचे विद्यार्थी इतर जातीच्या विद्यार्थ्यांपेक्षा विद्याव्यासंगी निघाले, ही गोष्ट वेळीं अवेळीं मुसलमान बधूंच्या कानावर घालून आम्ही हिंदु धर्माची मुसलमानी धर्मापेक्षा श्रेष्ठता स्थापित करीत असू. असो तर याप्रमाणें नदीवरून गाड्यानीं पाणी आणण्याचा आमचा क्रम बरेच दिवस बिनबोभाट चालला होता. पण पुढें नदीचें पाणीच आटू लागलें तेव्हा पाण्याचें तेंही साधन नाहींसें होत चाललें. शेवटीं नदी अगदीं शुष्क होऊन तिचें वाळवट विधवेच्या कपाळाप्रमाणें अफाट दिसूं लागलें. त्या वाळवंटावर भर दोनप्रहरी सुंदर मृगजळ दिसूं लागलें, पण त्यातून एक लोटाभरही पाणी मिळण्याची आम्हास आशा नव्हती.

पाणी जों जो दुर्मिळ होऊं लागलें, तों तों इतर दुर्मिळ वस्तूंच्याप्रमाणें त्याचेंही चोरापासून रक्षण व इतरांपुढे प्रदर्शन होऊ लागलें. तें कुलपांत मोठ्या बदोबस्तानें ठेवण्यांत येऊ लागलें. त्याचा खरेदीविक्रींत पैशाप्रमाणें उपयोग होऊ लागला. बर्फ जर टिकण्यासारखें असतें तर पाण्याचें बर्फ करून त्याचें नाणेंही पाडण्यात आले असतें, व त्याचा दागिन्यातही उपयोग

करण्यात आला असता. पाण्याकरितां घरफोड्या व मारामाऱ्या होऊं लागल्या; व त्याकरितां होणारा दंडही पाण्याच्याच रूपानें वसूल करण्यात येऊं लागला लग्नात जावई व विहिणी पाण्याकरिता रुसूं लागल्या. पाण्याचा लांच नाकारणें न्यायनिष्ठुर न्यायमूर्तींच्याही जिवावर येऊ लागलें. गेल्या वर्षी श्रीमती दाखविण्यास अगावर जरीकाठी उपरणीं घ्यावी लागत पण यदा तो कार्यभाग बिनकाठाचीं पण पाण्यानें भिजलेलीं उपरणीं वापरून होऊं लागला आहे एखादी तरुणी पाण्यानें भरलेली घागर घेऊन रस्त्याने जाऊं लागली तर सारे लोक हातची कामें टाकून तिजकडे विस्मयानें टकमक पाहूं लागतात.

पाण्याची काटकसर करण्याचा आमचा कृतनिश्चय झाल्यामुळें अगांतून पाणी न जाऊं देण्याची आम्ही शक्य ती खबरदारी घेत असतों आम्ही कोणत्याही प्रकारचा व्यायाम करीत नाहीं उष्णतेनें घाम येऊं नये म्हणून आम्ही आपापल्या घरांतून जागोजाग वाळ्याचे पडदे लाविले असून त्यांजवर सारखा पाण्याचा शिडकाव करीत असतों आम्ही भयभीत झाल्यास घामाघूम होण्याऐवजी अगावर शहारे आणितों किंवा तोंड गोरेंमोरें करितों, व आम्हांवर दुःखाचा डोंगर कोसळल्यास आम्ही डोळ्यातून टिपें न गाळता गळा दाटून आणून व सुस्कारे सोडूनच त्याचें काम भागवितों.

यंदांच्या विलक्षण परिस्थितीचा आमच्या भाषेवरही परिणाम झाला आहे. गेल्या वर्षी 'पाणीदार मनुष्य' याचा अर्थ 'हुशार मनुष्य' असा होत असे, पण, यदा तो बदलून त्याच्या जागीं 'ज्याच्या घरात विहीर आहे असा मनुष्य' हा अर्थ येऊन बसला आहे. 'पाण्यासारखा खर्च करणारा' याचा अर्थ 'उधळा' असा असे, तो आता 'कंजूष' असा होऊन बसला आहे. 'विहीर' शब्दाचा अर्थ 'धान्याचें कोठार' व 'ढग' याचा अर्थ 'पोटात द्रव न बाळगणारी व वारंवार चाळवण्या दाखविणारी व्यक्ति' असा झाला आहे 'हडा' शब्दाचा अर्थ 'महिन्याचें पाणी सांठविण्याचें भाडें' असा होऊन बसला आहे मनुष्यप्राण्याची व्याख्या त्याच्या बुद्धिमत्तेवरून करीत असत, ती आता पाण्यासाठीं चाललेल्या त्याच्या धडपडीवरून करण्यात येते, व 'जीवनार्थ कलह' या शब्दाची व्याख्या 'स्वतःचा योगक्षेम चालावा एतदर्थ चाललेली धडपड' ही होती, ती आतां 'पाण्यासाठीं चाललेलीं भाडणें' ही झाली आहे.

भाषेतल्याप्रमाणें रूढ कल्पनातही मोठा फरक पडला आहे. सृष्टीचें आदिकारण पाणी आहे, हें मत सपाट्यानें पसरूं लागलें आहे. वरुणदेवतेस वेदकालातल्याइतकेंच महत्त्व प्राप्त झालें आहे. गंगा, यमुना इत्यादि नद्यांचें पावित्र्य वाढत्या प्रमाणावर आहे पाण्यात बुडून किंवा जलोदरानें मृत्यु आल्यास स्वर्गप्राप्ति हटकून होते असेंही एक चमत्कारिक मत आपल्या धर्मांत शिरूं पहात आहे अन्नदानाच्या मानानें जलदानाचें महत्त्व फारच वाढलें आहे.

हल्लीं तर विहिरीत लहान भाडेंही बुडत नाहीं. दोरीस हिसके देऊन दोन दोन घटका भाड्याचे हाल करावे तेव्हा कोठें तें अर्धेमुर्धे भरतें. तें वर ओढताना त्यातील निम्मे अधिक पाणी खलास होतें, व उरलेल्या चूळ दोन चुळा पाण्यावर शेंकडों लोकाची तहान भागवावी लागते. या यमयातनास कंटाळून अनेकजण गांव सोडून जात आहेत, पण आम्ही अजून स्वभूमीच्या प्रेमानें त्यास कवटाळून बसलों आहोंत उत्तरोत्तर पाऊस कमी पाडून आमचा प्रांत ओसाड करून टाकावा असा तर ईश्वरी संकल्प नाहीं ना? काही असो, आमचा तर निश्चय झाला आहे, कीं ‘स्वभूम्यां निधन श्रेयः परभूमिर्भयावहा’

---

मुष्टि ३२ वी *

# धर्मांतर

प्राचीन काळीं भरतखडांत सनातन धर्माचें स्वरूप उज्ज्वल होतें म्हणून म्हणा, त्यास राजसत्तेचें पाठबळ होतें म्हणून म्हणा, अथवा अन्य धर्माचें सान्निध्य नव्हतें म्हणून म्हणा, लोकाची धर्मांतर करण्याकडे मुळींच प्रवृत्ति नसे. जसजसें त्याचें उज्ज्वल स्वरूप मलिन व्हावयास लागून जन्मसिद्ध जातिभेदाचें प्राबल्य अधिकाधिक होऊं लागलें आणि ज्ञानाचा, अधिकाराचा व संपत्तीचा संग्रह उच्च जातींतच होऊं लागला तसतसें सर्व जातीस समान लेखणाऱ्या व सर्वसाधारण प्राकृत भाषेच्या द्वारें स्वतःचा प्रसार करणाऱ्या बौद्ध धर्माचें डोकें वर येऊं लागलें, व त्यास राजसत्तेचा प्रथमपासूनच

* अरविंद. वर्ष २. अंक ३ [ जानेवारी सन १९२२ ]

पाठिंबा मिळाल्यामुळें त्याचा प्रसारही सपाट्यानें होऊं लागला याप्रमाणें हिंदुस्थानात एकाऐवजीं दोन धर्मांचें ठाणें बसलें, व त्यामध्यें वर्चस्वाकरिता चढाओढ सुरू झाली. त्या चढाओढींत प्रथम जरी बौद्ध धर्माची बरीच सरशी झाली तरी अखेरीस वैदिक धर्मानें, पशुवधासारख्या समाजास निंद्य वाटणाऱ्या स्वत च्या काही बाबी टाकून व आपल्या प्रतिस्पर्ध्यांच्या केशवपनादि काहीं लोकप्रिय बाबी स्वीकारून त्याजवर विजय मिळविला, आणि त्यानें पुन्हा एकदा भरतखंडाचा सार्वभौम धर्म ही पदवी संपादन केली. त्या काळीं पतितपरावर्तनास आडकाठी नसल्यामुळें बऱ्याच बौद्धास पुन्हा हिंदु करण्यात आलें, व बाकीच्याची देशाबाहेर हकालपट्टी करण्यात आली. यानतर शक, हूण इत्यादि अनेक परदेशस्थानीं हिंदुस्थानावर स्वाऱ्या करून त्याचे काही प्रात काबीजही केले. पण त्याची संस्कृति व धर्म भारतीयाच्याइतकी श्रेष्ठ नसल्यामुळें व त्याची दृष्टिही धर्मप्रसाराची नसल्यामुळें त्याच्या सत्तेचें पर्यवसान भारतीयाच्या धर्मांतरात न होता त्याच्या स्वत.च्याच धर्मांतरात झालें. हा वेळपावेतों हिंदु धर्माची कमी अधिक प्रमाणाने जी चढती कमान होती तिला मुसलमानाच्या स्वाऱ्यापासून उतरती कळा लागली तोंपर्यंत हिंदु धर्माचे स्वरूप प्रसरणशील नसलें तरी संग्राहक होतें, पण पुढें देशाचें स्वामित्व स्वधर्मप्रसाराऱ्या हेतूनेंच दिग्विजय करण्यास निघालेल्या परकीयाकडे गेल्यामुळे हिंदु धर्माच्या अनुयायाच्या सख्येस ओहोटी लागली, व त्या धर्माचें शक्तिसर्वस्व स्वसंरक्षणातच खर्च होऊ लागलें बौद्ध प्रचारक स्वधर्माचा प्रसार बहुधा उपदेशानेंच करीत असत, पण मुसलमानाची तऱ्हा अगदी निराळी असे. त्याचें लक्ष्य केवळ साध्याकडेच असे, साधनाचे ते फारशी पर्वा बाळगीत नसत. परधर्मीयानें मुसलमानी धर्माचा स्वीकार केला म्हणजे झालें; मग तो स्वीकार द्रव्याच्या अगर मानाच्या लालचीनें होवो वा वित्तनाशाच्या अगर प्राणहानीच्या भीतीनें होवो, आत्म्यावर विजय मिळविल्यानें होवो किंवा देहावर विजय मिळविल्यानें होवो, डोक्यात सूक्ष्म धर्मतत्त्व ठसल्यामुळें होवो अगर भला मोठा बडगा बसल्यामुळें होवो, जिभेच्या प्रभावानें होवो अगर तलवारीच्या प्रभावानें होवो. बहुधा उत्तरोक्त साधनाचाच त्याजकडून अवलंब करण्यांत येई. त्यांची महत्त्वाकाक्षा इस्लामी धर्माच्या निशाणाखालीं

सारें जग आणण्याची असल्यामुळें साधनांच्या बरेवाईटपणाची चिकित्सा करण्याइतकी त्याना फुरसदही नसे. मुसलमानी धर्मास राजसत्तेचा जोर असल्यामुळें त्या धर्मात हजारों हिंदु स्वेच्छेनें अगर जुलमानें प्रविष्ट झाले, व शेंकडों हिंदूंनी आपल्या मुली मुसलमानांच्या जनान्यात लोटल्या. मुसलमानानंतर फिरंगी लोकांनीं गोवें प्रात जिंकला, तेव्हा तत्रस्थाना स्वधर्माची दीक्षा देतांना त्यानीं मुसलमानाचेंच धोरण कित्यादाखल समोर ठेविलें होतें. छळ करण्याच्या बाबतींत तर त्यानीं आपल्या गुरूंवरही ताण केली असें म्हणता येईल खिस्ती धर्मांच्या भिन्न पथाच्या अनुयायानीं युरोप खडांत परस्पराचा छळ करिताना ज्या सुधारलेल्या साधनाचा उपयोग केला होता त्याची त्यानीं मुसलमानाच्या रानटी साधनांस पुस्ती दिली, व अशा दुहेरी सरजामानिशीं सज्ज होऊन त्यानी बऱ्याच गोमातकस्थास त्याच्या इच्छेविरुद्ध स्वधर्मदान केलें यापुढें ज्या राजसत्तेशीं आमची गाठ पडली तिचें धोरण इस्लामी धोरणाशीं बरेंच विमगत होतें मुसलमानानी राज्यविस्तार बहुधा धर्मप्रसारार्थच केला. इंग्रजानींही तो ‘ तत्त्वमसि ’ करिताच केला, पण वाच्य व धार्मिक अर्थांच्या नव्हे, तर लाक्षणिक व व्यवहारिक अर्थाच्या ‘ तत्त्वमसि ’ करिता केला जोंपर्यंत अन्य धर्माचा स्वसत्तेस उपसर्ग पोहोंचतच नाहीं तोंपर्यंत त्यांच्या क्षेत्रसीमेंत स्वधर्माचें तट्टू दामटीत न्यावयाचें नाहीं, हें त्याचें ब्रीद असून त्यास ते आजपर्यंत बऱ्याच दक्षतेनें जागले आहेत. तथापि ख्रिस्ती राजसत्तेचा ख्रिस्ती धर्मसत्तेस, प्रत्यक्ष न मिळाला तरी, पर्यायानें दुजोरा मिळत असल्याकारणानें ख्रिस्ती धर्मानें हजारों हिंदु कोंकरें आपल्या कळपात ओढिलीं आहेत. मात्र हें आकर्षण मुसलमानाच्याप्रमाणें जबरीचें व ढोबळ स्वरूपाचें नसून खुषीचें व सूक्ष्म स्वरूपाचें असतें; आणि स्त्री, वित्त, मान किंवा अधिकार याचें मोघम आमिष हेंच बहुधा त्या आकर्षणाचें ठराविक साधन असतें.

धातूवर घणाचे आघात जितक्या जोराचे होतात तितक्या मानानें तीही खंबीर बनून त्या अपघातांस टक्कर देण्यास समर्थ होते. मुसलमानांच्या धर्मावेशमूलक जुलमांमुळें हिंदूंमध्येंही कडवा धर्माभिमान प्रज्वलित होऊन स्वधर्मत्याग न करण्याचा दृढनिश्चय उत्पन्न झाला होता; व त्यामुळें अनेक

हिंदु इस्लामी धर्म स्वीकारण्यापेक्षा वित्ताचा, अधिकाराचा, प्रियजनाचा व प्राणाचा नाश, स्वभूमीचा वियोग, किंबहुना सर्वस्वहानीही पत्करण्यास एका पायावर तयार असत. उलट पक्षी हल्ली इंग्रजाच्या तटस्थ वृत्तीमुळें हिंदूच्या स्वधर्माभिमानासही त्या मानाने शैथिल्य आलें आहे. त्या अभिमानाची घनता व त्याच्या परमाणूंमधील परस्परावलंबिता इतकी कमी झाली आहे, कीं ते परमाणु एखाद्या क्षीण आमिषाच्या मंद झुळकेबरोबर हेलकावे खात परधर्मांच्या आकर्षणक्षेत्रात केव्हा झुकतील याचा नेम नाहीं मूल्यवान् रत्नें अगर जलाल विषे तोलण्याचा काटा जसा एका पारड्यात माशीचा पंख पडताच त्याकडे पक्षपातानें वळतो त्याप्रमाणे अनेक हिंदूची धर्मनिष्ठा इतकी नाजूक व डळमळीत बनून गेली आहे, की ती हिंदु संस्थानात हिंदु धर्माकडे, मुसलमानी राज्यात इस्लामी धर्माकडे व इंग्रजी राज्यात ख्रिस्ती धर्माकडे झुकत असते. त्या क्षीण धर्मबुद्धीचें लठ्ठ पगाराच्या लालचीनें जाज्वल्य ख्रिस्तप्रेमात अगर एखाद्या मांसल तुर्क रमणीच्या कटाक्षानें इस्लामी धर्मावेशात रूपांतर होण्यास मुळींच वेळ लागत नाहीं. धर्माच्या नावाखालीं मद्यमांस यथेच्छ सेविता यावें यासाठीच ख्रिस्ताचा व राजरोसपणे हुक्का ओढिता यावा म्हणूनच पैगंबराचा आश्रय घेण्याइतकी ती निमित्ताला टेंकचेली असते. कित्येक थिल्लर हिंदु तर गरगरीत साहेबी टोपीच्या हौसेने ख्रिस्ती व घोंसदार तुर्की टोपीच्या आवडीनें मुसलमान बनण्यास एका पायावर तयार असलेले दिसून येतील.

हिंदुसमाजरूप हौदास पूर्वी बारीकच कां होईना, आत पाणी आणून सोडणारी नळीच काय ती होती. पुढे ती बंद होऊन त्यास वेगानें बाहेर पाणी नेणारा इस्लामी धर्माचा रुंद नळ जोडण्यात आला हल्लीं तो जरी चिंचोळा करण्यांत आला आहे, तरी त्याच्या जोडीस ख्रिस्ती धर्माचा रुंद नळ लावण्यात आल्यामुळें हौदातील पाणी पूर्वीच्यापेक्षाहि सपाट्यानें बाहेर पडत आहे. अगदी अलीकडे त्यास हिंदुधर्मप्रसारक संस्थेची आत पाणी आणणारी एक बारीक नळी लावण्यात आली आहे. पण ती बरीच रुंदावल्याशिवाय हिंदुधर्माची प्रत्यहीं होणारी जीवनहानि भरून निघण्याची आशा नाहीं, हें अंकगणितातील उदाहरणें सोडविणारा बालविद्यार्थीही सांगूं शकेल.

आमचे गाव मध्यम वस्तीचेंच असले तरी त्याची रचना हिंदुधर्मव्यवस्थेप्रमाणेंच जातवार केलेली असल्यामुळें सबंध गांवाचें आम्हास दर्शन घडण्याचा फारच क्वचित् प्रसंग येतो. आमच्या समाजाच्या केंद्रस्थानीं ज्याप्रमाणें ब्राह्मणाचें स्थान असतें त्याप्रमाणें आमच्या गावातील मध्यवस्तीही ब्राह्मणाचीच आहे, व त्या वस्तीच्या चारी बाजूस सोनार, शिंपी, माळी, कुणबी, सुतार, लोहार इत्यादि इतर जातींची वेगळी वेगळी वस्ती वसलेली आहे. मुसलमानास आम्ही गावापैकीच एक अगदी एकीकडचा भाग तोडून दिला असून, महारमागासारख्या अस्पृश्य वर्गांची सोय गावाबाहेर केली आहे. आमच्या येथील सावकाराच्या खतावण्यांतून सुद्धा जर प्रथम ब्राह्मणादि चार वर्णांची खाती, पुढें मुसलमानाची व मध्यें बरीच कोरीं पानें सोडून शेवटीं, केवळ नाइलास्तव, महारमागाची खातीं याप्रमाणें क्रम असतो, तर ग्रामरचनेतही तसाच क्रम राहिल्यास नवल काय? यामुळें आमच्या गावातील जातिभेद मनुयाज्ञवल्क्याच्या काळातल्याइतकाच अविकृत स्थितीत जारी आहे आमचे बडूनाना तर वर्णव्यवस्थेचे नियम पाळण्यात इतके दक्ष आहेत, कीं ते, अतिशूद्राचा स्पर्श झाल्यास ज्याप्रमाणें सचैल स्नान करितात त्याप्रमाणें, महारमागाच्या खात्यात रकमा मांडिल्यावर लेखणीचें टोंकही पाण्यानें धुऊन टाकितात. त्यानीं त्या कामाकरिता एका निराळ्या दौतीचीच योजना केली असून त्या अस्पृश्य दौतीची त्याच्या कलमदानावर सावली पडणार नाहीं इतक्या अंतरावर ती ठेवण्याची ते नेहमी खबरदारी घेतात या एका गोष्टीवरून आमच्या वर्णव्यवस्थेच्या शिस्तीची यथार्थ कल्पना करिता येईल

आम्हा ब्राह्मणास वैश्यशूद्राच्याही आळींत-जाण्याचा जर एखादाच प्रसंग येई तर महारवाड्याचें दर्शन आम्हाला जन्मात कधींही होत नसे हें ओघानेंच आलें. तथापि दुर्दैवानें तोही प्रसंग आम्हावर एकदा ओढवला. आमच्या गावी एक ख्रिस्ती मिशन स्थापन होऊन त्यावर एका पाद्र्याची योजना झाली. आमच्या गावाची रचना एखाद्या चक्रव्यूहाप्रमाणें कडेकोट असून ब्राह्मण्याची स्थापना त्या रचनेच्या मध्यभागीं झालेली असल्यामुळें आम्हास त्या मिशनचा बाऊ वाटण्याचें मुळींच कारण नव्हतें. आम्ही आमच्या बसावयाच्या ठराविक अड्ड्यावर त्याची मनसोक्त टवाळी करू

लागलों. पाद्रुतात्याचे धाकटे चिरंजीव कुशाबा यांजकडे पाद्र्याची नक्कल करण्याची कामगिरी देण्यात आली कुशाबास स्वतःची नट या दृष्टीनें बरीच योग्यता वाटत असे इतरानाही, त्यानीं तोंडास रंग फासून अगावर आपल्या भूमिकेचा साज चढविला म्हणजे त्यांची किंमत त्या रगाच्या व साजाच्या किंमतीइतकी तरी खात्रीनें वाटत असे महायुद्धात विलायती रंगाचे व इतर वस्तूंचे भाव मनस्वीं वाढले, तेंव्हा कुशाबाची किंमतही त्याबरोबर अतोनात वाढली त्यानीं एकदा रगभूमीवर कुंभकर्णाची बतावणी इतकी हुबेहुब केली होती कीं, त्याना त्याच्या दीर्घ निद्रेंतून जागें करण्याकरिता अवेळींच पडदा पाडावा लागला होता, व त्यानी रंगभूमीवर प्रवेश करण्यापूर्वी गाजाचे झुरके नेहमींपेक्षा कमी प्रमाणात ओढले नसते तर पडद्यात सुद्धा त्याची कुंभकर्णी झोंपेची बतावणी लवकर आटपली नसती असो, तर अशा कुशल नटाकडून पाद्रीसाहेबाच्या धेडगुजरी भाषेचें, इंग्रजी हेलाचें व विलायती आविर्भावाचे इतकें हुबेहुब अनुकरण होऊं लागलें, की आमची हसून हसून पोटें दुखू लागलीं. पाद्रीसाहेब व त्याची मड्डम गाणी गातांना पिसाळल्याप्रमाणें ज्या बेसूर किंकाळ्या फोडीत त्यांची नक्कल तर आमचे कुशाबा इतकी बेमालूम चठवीत, कीं आम्हा श्रोत्यानाही घटकाभर पिसाळल्यासारखें होऊन जाई. याप्रमाणें एक दिवस आम्ही पाद्रीसाहेबाची व एकंदर ख्रिस्ती धर्माची कुचेष्टा करीत बसलों असता बंडूनाना धावतच तेथें आले व खड्या सुरांत ओरडून म्हणाले, ‘ अरे अजागळानो, तिकडे त्या पाद्र्यानें मोरे आग लावून दिली आहे, आणि तुम्ही येथेंच तमाशा करीत बसला आहात ? कबरा बाधा लौकर, आणि चला माझ्या मागोमाग ’ आम्हांपैकीं प्रत्येकाला आपल्याच घराला आग लागली आहे असें वाटून जो तो आपापल्या घराकडे धूम ठोकूं लागला. तों नाना आणखीही सूर चढवून म्हणाले, ‘ अरे बावळटानो, तुमच्या घराना नाहीं आग लागली, हिंदु धर्माच्या इमारतीला लागली आहे; आणि तिचा मोरे भडका उडाला आहे. ती आग तुमच्या साध्या पाण्यानें कशी विझणार ? आपल्या महारवाड्यांतले अर्धे अधिक महार बाटून ख्रिस्ती झाले, आणि तुम्ही धांवत गेला नाहींत तर, नेभळटांनो, उरलेसुरलेले महारमांग सुद्धां हातचे गमावून बसाल. मग तुम्हांलाच आपलीं गटारें साफ करावीं लागतील आणि रस्ते झाडावे

लागतील.' आग वास्तविक नसून लाक्षणिक अर्थाची आहे हें ऐकून आमच्या जिवात जीव आला हिंदु धर्माबद्दल नानांच्याइतकी आस्था आम्हापैकीं एकालाही नव्हती. पण आता माघार घेतल्यास तें अगदींच स्वार्थीपणाचें दिसेल असा विचार करून आम्ही पंधरावीस जवानमर्द ब्राह्मणभाई काचे मारून व हातात काठ्या घेऊन उसन्या अवसानानें पाद्र्याचा समाचार घेण्यास निघालो तोंपर्यंत महारवाडा हा शब्द आम्हीं 'गाव तेथे महारवडा' या म्हणींत अनेकदा ऐकिला होता, पण महारवाडा ही चीज आम्हापैकीं एकानेंही जन्मात पाहिली नव्हती. म्हणून प्रथम काहीं वेळ आमची बरीच दिशाभूल झाली. अखेरीस एकदाचें महारवड्याचे दुरून दर्शन झालें. पण त्याच्या स्थलसीमेंत पाऊल टाकण्याची एकाचीही छाती होईना दूर अंतरावर पाद्री व त्याची पत्नी उभी असून त्याच्या भोवती महारमागाची खेंच झाली होती ती त्या लोकाना भाकरी वाटीत होती त्याना स्पर्श्यास्पर्श्यांचा काहीच विधिनिषेध वाटत नव्हता असें दिसत होतें मड्डुम तर पोराबाळाना जवळ घेऊन त्याचे मटामट मुके घेत होती. 'ज्याना स्पर्श्यास्पर्श्यविचार नाही ते पतिताचा उद्धार काय करणार कपाळ!' ही कल्पना बड्डूनानाच्या व पाडूतात्यांच्या एकदमच मनात येऊन त्यानी ख्रिस्ती धर्माबद्दलच्या तुच्छतादर्शक दृष्टीनें एकमेकाकडे पाहिलें. पण तो समोरील भ्रष्टाकाराचा देखावा दिसल्यावर नानाना मुळींच धीर निघेना. ते मोठमोठ्यानें ओरडून व हातवारे करून त्या जमलेल्या अंत्यजांना जवळ बोलावूं लागले. पण आमच्या हातात काठ्या असल्यामुळें त्याचा आम्हाजवळ येण्यास बराच वेळ धीर झाला नाहीं अखेरीस दोघे-चौघे महार भीत भीत व थबकत थबकत आम्हांपासून काहीं अंतरावर येऊन उभे राहिले. त्याना उद्देशून नाना म्हणाले, 'अरे मूर्खांनो, ही काय अवदसा तुम्हाला आठवली आहे आज? हा परका साहेब तुमच्या महारवाड्यांत येतों काय, आणि तुम्ही मेंढरासारखे त्याच्या कळपांत उड्या घालतां काय!'

एक महार—रावसाहेब, हा साहेब तर रोज आम्हाकडे येतो. ते आम्हाला मीठभाकर खायला देतो, आमच्या लेकरांना मिठाई चारतो आणि आमच्या बायकांना साडीचोळी देऊन त्यांची लाज राखतो. या दुकाळांत

तो नसता तर आम्ही मरून गेलों असतों. मग आम्ही त्याला परका कसा समजावा, रावसाहेब ?

नाना—हें तुमचें अज्ञान आहे हा लफंगा धडधडीत थापा देऊन तुम्हाला बाटवितो आहे. त्याचा कावा तुम्हांला कळत नाही. तुमचे खरे बांधव आम्ही आहोंत. बांधवच काय, तुम्ही आम्ही एकाच विराटपुरुषाचे निरनिराळे अवयव आहोंत. अंतर येवढेच, कीं आम्ही त्याचें डोकें आणि तुम्ही त्याचे पाय. काटेतोलच बोलावयाचें झाल्यास तुम्ही त्याचे पाय नव्हे पायाचे तळवे आहात हे नातें तुम्ही विसरून कसे चालेल ?

महार—आम्ही अडाणी लोक नातें विसरून गेलों असलों तर नवल नाहीं. पण रावसाहेब, आपण शहाणेसुर्ते असूनही तें नातें विसरूनच गेला नव्हता का ? आपण कधी तरी आमची वास्तपुस्त केली होती ? आमच्या पोटाला भाकर मिळते कीं काय, आमच्या कच्चाबच्चाना चिरगुटे पांघरुणें आहेत कीं नाहींत, थंडीपावसात आमची काय दशा होते, याची आपण कधीं तरी चौकशी केली होती ? आपण जर आमच्या घरी मधूनमधून पायधूळ झाडून आम्हाला आमच्या नात्याची आठवण करून दिली असती, तर आम्ही तरी या पाद्र्याच्या नादाला कशाला लागलों असतो ?

नाना—आम्ही व तुम्ही तोंड आणि पाय आहोंत खरे, पण ते सामान्य देहाचें नसून विराट पुरुषाच्या विशाल देहाचे आहोंत अर्थातच तोंड पाया-पासून दूरच असावयाचें, आणि त्याला पायाची वार्ताही कळावयाची नाहीं.

महार—मग आजच कुठून त्याला पायाची वार्ता लागली, रावसाहेब ?

विराटपुरुषाचें तोंड व पाय ही एकमेकापासून कितीही दूर असलीं तरी बिचाऱ्या नानाच्या तंगड्या त्याच्या गळ्यात आलेल्या उघड उघड दिसत होत्या. त्यांचा राग पार मावळून त्याच्या जागीं लाजेनें आपलें ठाणें दिलें होतें. तें पाहून महार म्हणाला, 'रावसाहेब, अजूनहि फारसें बिघडलें नाहीं. अजून आपण आम्हाला पोटाला द्याल आणि आमच्या पाठीवरून प्रेमानें हात फिरवाल तर आम्ही उरलेले महार हिंदु धर्मातच रहावयास तयार आहोंत. इतकेंच नाहीं, तर यापूर्वीच बाटलेल्या महारांना आपण परत हिंदु धर्मात घ्यायला तयार असला तर त्यानाही आम्ही पाद्र्याच्या कळपांतून परत खेंचून आणूं. बोला, आहांत तयार ?

नानाना मोठी पचाईत पडली. गावात वर्गणी करून महारांच्या पोटा-पाण्याची सोय कशी तरी लाविता येईल. पण ब्राह्मणानें महाराच्या पाठीवरून हात कसा फिरवावयचा? विराट पुरुषाच्या तोंडानें आपला हात त्या पुरुषाच्या पायाच्या पाठीवरून कसा फिरवावयाचा? हें त्यास सहाजिकच मोठें कोडे पडलें. पाठीवरून हात फिरविणेंही एखादे वेळीं शक्य होईल. कारण त्याने होणाऱ्या पापाचे क्षालन स्नानानेंहि होण्यासारखें आहे. पण महारवाड्यासारख्या भ्रष्ट ठिकाणी जाऊन तेथें पवित्र ब्राह्मणांच्या पायाची धूळ झाडावयाची कशी? ती धूळ इतकी सवंग झाली आहे कीं काय! बरें, हा धुळीचा प्रयोग वर्षांतून एकदा धुळवडीच्या दिवशीं करून भागण्यासारखे आहे थोडेंच! पाद्र्याची गडबड मुळींच चालू व्हायची नसेल तर महारवाड्यात नेहमी गेले पाहिजे, महाराच्या घरीं जाऊन घटका घटका बोलत बसलें पाहिजे; त्या सर्धीस एखादें महार पोर रांगत रागत आल्यास, तोंड वेडेंवाकडें करीत का होईना, त्याचा मुका घेण्याचीही बतावणी केली पाहिजे आणि जर का आपल्या महार यजमानानें आपल्या फार दिवसानीं भेटलेल्या बाधवाचे आदरातिथ्य करण्याकरिता पहिल्याच भेटीस साखरपाणी पुढें केले तर? येथपर्यंत विचाराची मजल आली तेव्हा नानाच्या ब्राह्मणी कल्पनेची गति सहाजिकच खुंटून गेली. सारा महारवाडा ख्रिस्ती झाला तर बेहेत्तर, पण असा भ्रष्टाकार कधीं करावयाचा नाही असा त्यानीं निर्धार केला. त्यानतर त्यानीं व पांडूतात्यानीं त्या महारास नुसत्या वाग्जालात अडकविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण तो पाद्र्याच्या सक्रीय सहानुभूतीच्या गळातून सुटून त्या वाग्जालात सापडण्याचें चिन्ह दिसेना. बंडूनानाचा विचार महाराची उपासमारींतून मुक्तता करण्यासाठीं वर्गणी जमविण्याचा तरी होता. पण पांडूतात्याची त्यालाही तयारी नव्हती. त्यांनीं त्या महाराला स्वावलंबनाचा उपदेश केला आणि प्राणासारख्या क्षुद्र वस्तूचें रक्षण करण्याकरिता पाद्र्यासारख्या परकीयाच्या नव्हे, तर स्वदेशबंधूंच्याही तोंडाकडे पहाणें किती लाजिरवाणें आहे व शरीररक्षणापेक्षां आत्मोन्नतीचें महत्त्व किती अधिक आहे हें त्याच्या मनावर ठसविण्याचा प्रयत्न केला. उपवासांचा शरीर निकोप राखण्याचे कामीं कसा उपयोग होतो, हिंदु धर्मात त्याची किती थोरवी मानली आहे, श्रीमंत लोकसुद्धां आरोग्याप्रीत्यर्थ

व पुण्यसंपादनार्थ मुद्दाम उपास करितात, मग गरिबाना अनायासें उपास करून स्वार्थ व परमार्थ साधण्याची अमोल संधि आली असता ती त्यांनीं दवडणें किती अविचाराचें आहे, याचेंहि त्यांनी आपल्या खणखणीत व अस्खलित वाणीनें उत्तम विवेचन केलें, त्याच्या भाषणास आधल्या दिवसाच्या कडकडीत उपोषणाच्या ढेकरांनी व्यत्यय आला असेल तेवढाच काय तो अखेरीस 'आम्हांला महारवाड्यात येण्यास तूर्त फुरसत नाही. पण जर तूं त्या पाद्र्यास येथपर्यंत घेऊन येशील तर त्याच्या पाखंडी धर्माचे आम्ही यथास्थित खडन करू' असें म्हणून त्यानीं आपला सोटा जमिनीवर इतक्या जोरानें आपटला, कीं त्यासरशी ती जमीनही हादरली खंडन करण्याच्या साधनाचा भक्कमपणा त्या महारास इतका पटला, की त्यानें पुढें एक चकार शब्दही न काढिता मागच्या पायींच आपल्या सोबत्यासह पलायन केलें. रामानें आखून दिलेल्या मर्यादेच्या आत प्रवेश करणें सीताहरणोत्सुक रावणास जितकें दुष्कर, तितकेंच महारवाड्यांतून पाद्र्यास हुसकावूं पहाणाऱ्या आम्हासही महारवड्याची बाह्यसीमा ओलाडणें होतें. सबब आम्ही त्या महारावर मिळालेल्या विजयावरच सतुष्ट होऊन घरोघर परत आलों.

महारास बाटविण्याचें कामी जरी पाद्र्यास कल्पनेबाहेर यश मिळालें होतें तरी अजून काहीं महार असे शिल्लक राहिले होते कीं, जे घरचे खाऊन पिऊन सुखी असल्यामुळें, ज्यानीं त्याच्या गोड गोड थापास दाद दिली नव्हती. अशापैकीं जान्या नावाचा एक महार होता. त्याच्याजवळ बरीच माया होती त्यामुळें गावातील लोक एखाद्या उपयुक्त पण अस्पृश्य पशूस द्यावा त्याजपेक्षां बराच जास्त मान त्यास देत असत. तो कधीं काळीं पाहुतात्यांस भेटावयास आल्यास ते लागलीच घराबाहेर पडून रस्त्यावर उघड्या माथ्यानें त्याच्याशीं बोलत घटकाघटका उभे रहात. अशा प्रसंगीं त्यास थंडीमुळें किंचित् सर्दी झाली तरी त्याची त्यांस पर्वा नसे. जान्यास मात्र घराच्या आंत तिरवा डोळा करून पाहण्याचीही परवानगी नसे. 'न जाणो त्या दृष्टीनेंच घर विटाळलें तर!' अशी भीति तात्यांस वाटत असावी. आपले बरेच जातभाई ख्रिस्ती झाले असतां आपण मात्र खंबीर राहिलों. यामुळें तात्यांस आतां तरी आपणाबद्दल अधिक आपलेपणा

उत्पन्न झाला असला पाहिजे अशा समजुतीनें जान्या एकदा भर पावसात तात्यांच्या घरासमोर येऊन उभा राहिला. तात्या कदाचित् आपणाला घराच्या बाहेरच्या पडवींत थारा देतील अशी त्यास अंधुक आशा असावी. पण ती फार वेळ टिकली नाहीं. तात्या एक छत्री घेऊन घराबाहेर पडले आणि ती उघडून व स्वतःच्या डोक्यावर धरून जान्याशीं स्वस्थपणें बोलत उभे राहिले. हें पाहून जान्या खट्टू होऊन घाईघाईनें परत घरीं जाण्यास निघाला. पण त्यास इतक्या लवकर सोडण्याइतकी बेपर्वाई तात्याच्या अगीं नव्हती त्यानी त्याच्याशी गप्पा गोष्टी करीत त्यास तब्बल तासभर पावसात भिजत व कुडकुडत उभें केलें. तात्याच्या विशाल देहाला मात्र पावसाचें टिपूसही लागलें नव्हतें. जान्याची केंविलवाणी स्थिति पाहून त्यास वाईट वाटलें नाही, असें नाही पण करतात काय? त्यास छत्रीच्या आत घेऊन स्वतःशीं खेंटून उभें करण्याची सोयच नव्हती. बरें, त्यास घरातील एखादी रिकामी छत्री आणून द्यावी तर तिजवर अगोदरच पाणी सोडणे भाग होतें अखेरीस जान्याचें अग चिंब भिजून जाऊन त्यास थर्डानें जोराची हुडहुडी भरली तेव्हा कुठें तात्यानीं त्यास निरोप दिला दुसरे दिवशीं चौकशी करिता जान्यास सडकून ताप भरल्याचें वर्तमान त्यास कळले परतु त्यानतर आपल्या महार बाधवाची चाभारचौकशी करण्याचे त्यास प्रयोजन दिसलें नाही. बरेच महिने न दिसल्यामुळें तो बहुधा मेला असावा असें अनुमान काढून त्यानी आपल्या मनाचें समाधान करून घेतलें.

एक दिवस खुद्द पाद्रीसाहेब आपल्या एका देशी ख्रिस्ती स्नेह्यासह तात्याच्या भेटीस आले. महारांनी आपल्या घराचा उंबरठा ओलाडण्याबद्दल जरी तात्यांची प्रतिकूलता होती तरी महारास बाटविणाऱ्या आणि अर्थात्च त्याजपेक्षाही भ्रष्ट व पतित अशा पाद्याने आपल्या बैठकींत येण्यास त्याची मुळीच हरकत नव्हती त्या दोन पाहुण्याचें स्वागत करितांना त्याची मारे एकच धादल उडाली त्याच्या बैठकीत नेमक्या तीनच खुर्च्या होत्या; व त्याही एखाद्या सग्रामात जाऊन घायाळ होऊन परत आल्यासारख्या दिसत होत्या. एकीला एका काळी हात होते, परंतु साप्रत ते मोडून ती पुरी थोटी झाली होती ती खुर्ची त्यांनी पाद्रीसाहेबांस बसावयास

दिली. दुसरी खुर्ची जन्मतःच थोटी असून हल्ली तिच्या पाठीचा कणाही मोडून गेलेला असल्यामुळें ती स्टूलवजा झाली होती. ती त्यांनीं त्या देशी खिस्त्यास दिली. तिसऱ्या खुर्चीचे दोन्ही हात अजून शाबूत होते, पण पाठ नाहीशी झाल्यामुळें त्या हाताचे बाहुटे अधात्री लोंबत होते. अशा विकल स्थितींतही आपले बाहुटे उभारून धरणारी ती वीरबाला प्रसंग पडल्यास शत्रूस पाठ दाखविणार नाहीं अशी प्रेक्षकास ताबडतोब खात्री पटत असे. या खुर्चीचें वेत्रासन पार फाटून गेलें असून तिच्या चार पायापैकीं हल्लीं तीनच शिल्लक उरल्यामुळें तिची द्विपाद व चतुष्पाद यापैकीं एकाही वर्गांत गणना होण्यासारखी नव्हती. स्वतः किंवा खुर्ची न पडता तिच्यावर आसन स्थिर करण्याची कला एकट्या पाडूतात्याच्याच अंगीं होती, म्हणून तेच तिच्यावर आरूढ झाले. मात्र बसण्यापूर्वी त्यानी एकसमयावच्छेदेंकरून आपल्या दोन्ही पाहुण्याशीं इतक्या जोरानें हस्तादोलन केलें, कीं खुर्च्यांच्या हाताची उणीव त्यांनीं पूर्णपणें भरून काढून उलट पाहुण्याचेच हात निखळून पडून पाहुणे खुर्च्यांच्या पंक्तीस बसतात कीं काय अशी भीति त्याना क्षणभर वाटावयास लावली. हस्तादोलन करिताना त्यानीं उजवा हात पाद्र्यास व डावा हात देशी खिस्त्याला दिला होता; आणि या प्रकारें गोऱ्याकाळातील अंतर आपणास पुरें कळत असून, आपलें ज्ञान मार्मिकपणें दाखविण्याची कलाहि आपल्या अंगी आहे, हें त्यानीं स्पष्टपणें त्याच्या प्रत्ययास आणिलें. पाद्रीसाहेबानीं देशी खिस्त्याची ओळख करून देताना 'हे जॉन साहेब, खिस्ताच्या कपाळात नुक्तेंच शिरलेलें एक मेंढरू आहेत' असें सांगितलें तें ऐकून तात्यानीं किंचित् स्मित करून मान हलविली, पण लाडग्याच्या गुहेंत शिरलेल्या त्या बिचाऱ्या मेंढराकडे ओझरताही दृष्टिपात केला नाहीं. पाद्रीसाहेब आपल्या येण्याचें प्रयोजन सागत म्हणाले, 'आज तुम्हा ब्राह्मण लोकाची गृहस्थिति प्रत्यक्ष पहाण्याकारिता मुद्दाम आम्ही आलों आहोंत. आपली कांहीं हरकत तर नाहीं ना?' 'छे छे, हरकत कसली असणार?' असें म्हणून तात्या खुर्चीवरून उठले, व त्याजबरोबर उठलेल्या खुर्चीस भिंतीशीं उभी करून त्यांनीं पाहुण्यास आपल्या मागाहून येण्यास खुणविलें. त्याबरोबर त्यांच्या पाठीशीं पाद्रीसाहेब व त्याच्या मागोमाग तो नवखा किरिस्तांव या क्रमानें घराची पहाणी करण्यास सुरवात

झाली. ओटीवरून माजघरांत जाण्यापूर्वी ‘आम्ही आपले बूट बाहेर काढून ठेवू का?’ म्हणून पाद्रीसाहेबानीं विचारलें. त्यास ‘छे छे, इतकी तसदी घेण्याचें कारण काय?’ असें तात्यानीं उत्तर दिलें. आता पाहुण्यास बाकीचें घर बुटानीं तुडविण्यास हरकत नव्हती त्यानीं माजघर, कोठी, अंगण, न्हाणीघर याची पहाणी बुटानिशींच केली स्वयंपाकघरापाशीं आल्यावर ते जरा थबकले, व तात्यांनीं त्यांस पुढें सरसावण्यास म्हटलें असतांहि ते पुढें होईनात. कारण जीव गुदमरून सोडण्यासारखा धुराचा एक प्रचंड लोट आंतून सारखा त्याच्या तोंडावर येऊन आदळत होता स्वयंपाकघराला आग लागली असावी अशी शंका येऊन साहेब म्हणाले, ‘आत काहीं तरी पेटलेलें दिसतें. पाणी आणाल तर विझवून तरी टाकूं.’ तात्या म्हणाले, ‘चूल पेटली आहे, दुसरें काहीं नाहीं आमच्या घरीं चुलीचें जरा प्रस्थ आहे नेहमीं अशी पेटलेली ठेवावी लागते.’

पाद्रीसाहेब–आणि असें असून स्वयंपाकघराला धुराडें नाहीं?

तात्या–नाहीं, साहेब आमची अरुन्धतीच्या काळीं जशी गृहस्थिति होती तशीच आजतागायत आहे. दुसऱ्या धर्मांतील इसम आमच्या धर्मांत आलेला जसा आम्हास खपत नाहीं तसेंच परक्यांच्या चालीरीतींचा आमच्या गृहव्यवस्थेंत शिरकाव होऊ देणेंहि आम्हांला पसंत नसतें स्वयंपाकघर, बाळतिणीची खोली हीं तर आमच्या पुराणप्रियतेचीं आगरें. बाळंतिणीच्या खोलींत एखाद्या वेळीं सूर्याचा किरण शिरेल, पण परकी चाल कधींही शिरावयाची नाहीं.

पाद्रीसाहेब–पण अशा धुरानें भरलेल्या स्वयंपाकघरांत तुमच्या बायका दिवसभर राबतात तरी कशा?

तात्या—याचें इतर राष्ट्रांना आश्चर्य वाटतें. पण साहेब, त्या आर्य स्त्रिया आहेत, ही गोष्ट आपण विसरतां. त्या इतर राष्ट्रातल्याप्रमाणें पुरुषांना डोईजड झालेल्या नाहींत. त्यांना धुरानें डोळे गेले तरी पत्करेल, पण परक्या चालीरीतींचें अनुकरण खपणार नाहीं. खुर्च्यांवर बसून नवऱ्यांशीं बरोबरीच्या नात्यानें गुलगुल गोष्टी बोलणाऱ्या आमच्या बायका नाहींत, साहेब.

साहेबांना कशाचीशी लाज वाटून ते खालीं मान घालून पुढें चालले. स्वयंपाकघरातील पदार्थ पहाण्याची त्यांना इच्छा असली तरी ती पूर्ण होणें

शक्य नव्हतें. कारण तेथील धूर दाट धुक्याप्रमाणें डोळ्याना जसा अंध, तसा तेथील पदार्थांनाहि अस्पष्ट करून टाकीत होता. असो पुढें देवघर लागलें. तेथें तरी आपला प्रवेश होणार नाही असे पाद्रीसाहेबास वाटत होतें, व म्हणून ते दाराच्या बाहेरूनच देवदर्शन घेण्याच्या विचारात होते. पण तात्याना पाहुण्याचे डोळे देवघरातील वैभवाच्या जवळूनच्या दर्शनानें दिपवावयाचे असल्यामुळें ते म्हणाले, 'साहेबानीं आत यायला काहीं संकोच बाळगूं नये. देवाच्या दारीं कसला आला आहे पक्तिप्रपच ?. बूटही राहूं दिले तरी चालेल'

पाद्रीसाहेब–आणि हा माझा स्नेही ? हा पूर्वाश्रमात महार होता.

तात्या–आता तर ख्रिस्ती झाले आहेत ना ते ? झाले तर ! त्यानाही आणा आत.

दोघे पाहुणे थक्कच झाले बाळंतिणीच्या खोलीत सूर्यकिरण न येऊं देणारा आर्य इसम देवघरासारख्या व अत्यंत पवित्र ठिकाणीं दोन परधर्मीयाना आत घेतो ! पण त्याना आपल्या यजमानाची इच्छा मोडवेना ते बुटानिशीं आत गेले. नतर तात्यानीं त्याना देव्हाऱ्यातील महादेव, लगडा बाळकृष्ण, मारुति, गणपति, दत्तात्रेय, शालिग्राम, बाण, देवी, बालाजी, भागीरथी, शंख इत्यादि प्रमुख देवताची ओळख करून दिली. देवावर चढविलेल्या अलंकाराची माहिती देण्यात त्यानीं जो वेळ घालविला त्यावरून त्याना त्यांचेंच महत्त्व विशेष वाटत असावेंसें दिसलें.

सर्व घर पाहून झाल्यावर पाहुण्यांनीं तात्याचा निरोप घेतला. निरोप घेते वेळीं पाद्रीसाहेब म्हणाले, 'आपण या आमच्या जॉनसाहेबाना ओळखलेंच नाही तर ? आमच्या ख्रिस्ती धर्मानें त्याच्यात बराच फरक पडलेला दिसतो.'

तात्या–माझ्या ओळखीचे आहेत म्हणता ?

इतक्यात जॉनसाहेब उद्गारले, 'तात्या, या जान्या महाराची ओळख विसरलात तर ? मर्जी आपली ! त्या दिवशी रस्त्यात तासभर पावसात भिजत उभा होतों, त्याने मला भयकर ताप आला, त्यांत माझी रात्रंदिवस शुश्रूषा करून साहेबानीं मला वाचविलें'

पाद्रीसाहेब म्हणाले, 'मी कोण वाचविणार ? देवानें वांचविलें असें म्हणा.'

जॉनसाहेब ऊर्फ जान्या म्हणाला, ' हो, खरेंच; मी दुखण्यातून उठल्यास ख्रिस्ती होईन असा साहेबाच्या आग्रहावरून नवस केला होता दुखण्यातून उठल्याबरोबर मी सहकुटुंब सहपरिवार ख्रिस्ती होऊन नवसाची सव्याज फेड केली साहेबानी माझे प्राण व आत्मा वाचवून जे उपकार केले आहेत ते मजकडून सात जन्मातही फिटावयाचे नाहींत.'

पाद्री—हं, जॉनसाहेब, येथें तुम्ही चुकलात. आपल्या धर्मांत तुम्हाला जन्ममरणाचा फेरा पडणार नाही. हिंदु धर्म चौऱ्यायशी लक्ष जन्माच्या अखेरीस तुम्हाला जी ईश्वरप्राप्ति करून देतो ती आमचा धर्म एकाच जन्मात घडवितो. मात्र ख्रिस्तावर विश्वास ठेविला पाहिजे

आता मात्र पाद्रीसाहेबाचा कावा तात्याच्या ध्यानात आला. त्यांच्या भेटीचा हेतु जान्याच्या धर्मान्तराची कहाणी आपल्या कानावर पडावी हाच होता हें ते समजून चुकले. ते मनातून खूप चडफडले, पण त्याचा काय उपयोग होता! पाद्रीसाहेबानी जाता जाता जे उद्गार काढिले त्यानी तर त्याच्या रागात तेलच ओतलें ते म्हणाले, ' आमचा धर्म कसाही असो, त्यामुळें आपल्या घराच्या पडवीचेंही दर्शन न घडलेल्या जान्या महाराचा आपल्या देवघरात प्रवेश झाला खरा, ही गोष्ट काही कमी महत्त्वाची नाही, हें आपणही कबूल कराल '

हे शब्द तात्यांच्या कानात तापलेल्या तेलाप्रमाणें पोळतच गेले व त्याच्या मनात बरेच दिवस शल्याप्रमाणें सलत राहिले. पण त्याचा परिणाम मात्र त्याच्या किंवा इतराच्या अंदाजाहून निराळाच झाला. सन १९१८ साली तापाची जी भयंकर साथ वणव्याप्रमाणे सारा मुलूख बेचीराख करीत चोहोंकडे पसरली तिची तात्याच्या कुटुंबासही बाधा झाल्यावाचून राहिली नाहीं प्रथम त्याचा धाकटा मुलगा कुशाबा यानें अंथरूण धरिलें. थडीवाऱ्याचा साधा ताप असेल असें समजून त्यांनीं पहिले दोन दिवस घरगुती उपचारावरच काढिले. तात्या आपल्या घरात बहुधा घरगुती उपचारच योजीत असत ते उपचार पूर्ण स्वदेशी असल्यामुळेंच करण्यात येतात असें ते स्वतः तोंडानें बोलून दाखवीत; पण त्या उपचारात मनुका, खारका, दालचिनी, खडीसाखर अशा स्वादिष्ट पदार्थांचाच विशेष उपयोग करण्यात येतो हें ओळखून व तो उपयोग झाल्यावर उरलेले पदार्थ बाया

जाऊ नयेत ही काटकसरीची दृष्टि ठेवूनच ते त्याचा आश्रय करीत असावे असें त्याच्या कृतीवरून कुत्सित लोक अनमान काढीत असत. असो तिसरे दिवशीं रोग्याच्या जलद् चाललेल्या श्वासोच्छवासावरून त्याचीं फुप्फुसें बिघडली असावीत असा तात्यास संशय आला, आणि मग मात्र त्याचें धाबें दणाणलें या वैद्याला बोलाव, त्या डाक्तराला बोलाव, अशी त्यांच्या जिवाची एक तारांबळ उडून गेली ज्यानी ज्यानी म्हणून रोग्याची प्रकृति तपासली त्याचें त्याचें मत रोग असाध्य नसला तरी दुःसाध्य आहे असें पडलें. मग काय विचारता? तात्यास त्रिभुवन आठवलें. कुशाबा त्याचा धाकटा मुलगा असल्यामुळें अत्यंत आवडता होता आतून बाहेर व बाहेरून आत, अशी त्याची एकच धावपळ सुरू झाली. त्याची पत्नी तर बिचारी मुलाच्या अंगावरून हात फिरवीत व पदरानें अश्रू पुशीत अंथरुणाच्या उशाशी बसली होती. इकडे ताप प्रत्येक घटकेस वाढतच चालला. इतक्यांत तात्याना पाद्रीसाहेबाची आठवण झाली, त्याबरोबर ते त्याजकडे धावतच गेले. साहेबही अशा संधीची वाटच पहात होते ते तात्यासह तातडीनें त्याच्या घरी गेले. रोग्यास तपासून त्यानी गंभीर मुद्रा केली व तात्यास एकीकडे नेऊन त्याच्या कानात सांगितलें, 'रोग दुर्धर आहे त्याला एकच उपाय आहे मुलगा बरा झाल्यास त्याला ख्रिस्ती करीन, असा आपण नवस केला तरच देवाला दया आली तर येईल.' तात्यास मुलगा उठण्याची मुळींच आशा नव्हती त्यानी ती अट ताबडतोब कबूल केली. त्याची पत्नी तर भावी पुत्रविरहाच्या कल्पनेनें वेडीच झाली होती. तिचाही रुकार मिळण्यास फारशी अडचण पडली नाहीं. झालें, लागलीच पाद्रीसाहेब व त्याची मडम अंथरुणापाशीं ठाणें देऊन बसलीं पाद्रीसाहेब वैद्यकींत प्रवीण होते. आत्म्याचा उद्धार करण्यापेक्षा रोगाचें उच्चाटन करण्यातच त्याचा हातखंडा होता. त्याची पत्नी तर पटाईत रुग्णपरिचारिका होती उभयतानी आपलें सर्व कौशल्य खर्च करून कुशाबास खडखडीत बरें केलें. तो बरा होतो न होतो तों त्याचा वडील भाऊ रामरावही त्याच तापानें आजारी पडला. त्यालाही साऱ्या देशी वैद्याचे व डाक्तरांचे इलाज करून तात्या थकले. पुन्हां पाद्रीसाहेबांकडेच धांव घेण्याचा त्याचा विचार होता. पण त्याला बंडूनानानीं

मोडता घातला. ते म्हणाले, 'तात्या, एकदा अविचार होऊन गेला तो गेला. पण पुन्हा तरी तो करू नका. येथील काजी युनानी वैद्यकांत त्या पाद्र्याइतकाच निष्णात आहे. रामभाऊ बरा झाल्यास त्यास मुसलमान करण्याचें तुम्ही कबूल कराल तर तो त्याला औषध देण्यास तयार आहे. परधर्म घ्यावयाचा असेल तर तो परदेशी बाटगा धर्म कशाला? मुसलमानी धर्म निदान स्वदेशी तरी आहे, व तुमचें स्वदेशीचें कडकडीत व्रत जगजाहीर आहे. ह, आता विचार करण्याची वेळ नाही. द्या रुकार झालें.' तात्यानी व त्याच्या कुटुंबानें या खेपेस पूर्वीच्या खेपेइतकीही हरकत घेतली नाहीं लवकरच काजीसाहेबाची रोग्याच्या खोलींत स्थापना झाली, व चमत्कार हा, की रोगास उतार पडण्याचीं स्पष्ट चिन्हेंही दिसूं लागलीं. कदाचित् तें काकतालीय न्यायानेंही झालें असेल काजीसाहेब रोगाच्या खनपटीस बसायला आणि रोगाची डहाळी डळमळायला एकच गाठ पडून आठ दिवसातच रामभाऊ खडखडीत बरा झाला. पाद्रीसाहेबाच्या हातचें एक सावज चुकून इस्लामी धर्माच्या कोंडवाड्यात गेल्याचें त्यास कळले, तेव्हा त्यास मनस्वी घुस्सा आला, व त्याच्या भरात त्यानीं तात्याच्या मागें कुशाबाला बाप्तिस्मा देण्याबद्दल लकडा लाविला. ते पाहून इकडे काजीसाहेबानीही रामभाऊस इस्लामी धर्माची दीक्षा देण्याविषयीं त्यांच्यामागे टुमणें लाविलें तात्यानीं व त्यांच्या कुटुंबानें पुष्कळ ओढेवेढे घेतले व अनेक सबबी दाखविल्या. पण अखेरीस त्या दोघाच्या धरण्यास कटाळून त्याना मुलाच्या धर्मांतरास मान्यता द्यावी लागली एकाच मुहूर्तावर रामभाऊस मशिदींत इस्लामी धर्माची व कुशाबास मिशनमध्ये ख्रिस्ती धर्माची दीक्षा देण्यात आली. त्याचीं नवीन आश्रमातील नावें 'राम' व 'कृष्ण' या जुन्या नावांस शोभण्याजोगींच असलीं पाहिजेत असा बंडूनानानीं आग्रह धरिल्यामुळें तीं अनुक्रमें 'रहीमखा' व 'ख्रिस्तोफर' हीं ठेवण्यात आलीं. ख्रिस्तोफर हें नांव ठेवण्यांत नानाच्या कोलंबसावरील आदरबुद्धीचाही अंश होता.

यानंतर कांहीं दिवस तात्याच्या कुटुंबात बाह्यात्कारी तरी पूर्ण शांति नांदत होती. पण ती फार दिवस टिकणें शक्य नव्हतें. युरोपखंड इतकें विस्तीर्ण, पण त्यांतही ख्रिस्ती व इस्लामी धर्म सामावूं शकले नाहीत.

भरतखड युरोपखंडाच्या खालोखाल अवाढव्य, पण त्यातही इस्लामी व हिंदु धर्म गुण्यागोविंदानें नादत नाहीत. मग तात्याच्या टीचभर घरांत हिंदु, मुसलमानी व खिस्ती हे तीन धर्म कसे नादावेत? रामभाऊ व कुशाबा याची पानें पडवीत निराळ्या पक्तीत माडण्यात येऊ लागलीं तेव्हा प्रथम त्याना असें वाटलें, कीं आपण आजारातून नुकतेच उठलेले असल्यामुळें काहीं दिवस असेंच चालावयाचें. त्याच्या बायका जानकीबाई व राधाबाई या त्याजपासून दूरदूर राहूं लागल्या, तेव्हा त्याचेंही कारण तेंच लावून त्यांनीं मनाचें समाधान करून घेतलें त्याचें धर्मांतर अजून ताजेंच असल्यामुळें त्यास त्याच्या परिणामाची जाणीवही उत्पन्न झाली नव्हती. पण त्याच्या प्रकृति जों जों सुधारूं लागल्या तों तों त्याना तो पक्तिप्रपंच असह्य होऊं लागला. एकदा रामभाऊ आपल्या तान्ह्या मुलास प्रेमानें जवळ घेऊन त्याचे मुके घेत बसले असताना जानकीबाई तावातावानें त्याना म्हणाल्या, 'ठेवा तें पोर खाली वाटेल एखादें.' एकदा कुशाबांनी चहाचा पेला पिऊन खाली ठेविला व तो घरात नेण्यास राधाबाईला सांगितलें. त्यासरशी ती उसळून म्हणाली, 'पेला वाळल्याशिवाय मी त्याला कशी शिवू? किरिस्ताव आहे वाटतें मी?' आपण बेशुद्धींत असता आपल्या स्वकीयानी आपणास बाटविण्याचा नवस करावा आणि तो नवस फिटल्यावर त्यानींच आपणाशी असें फटकून वागावें याचा त्या उभयताना काहींच उमज पडेना. त्यांच्या अंगीं विशेष ताकद आली नव्हती तोंपर्यंत त्याची पानें व खरकटीं हलालखोराकडून नेण्यांत येत असत, व खरकट्या जागेस शेणही त्याजकडून लावण्यात येई. पण त्याना जों जों शक्ति येऊं लागली तों तो ती कामें त्याना स्वत सच उरकावीं लागूं लागलीं. त्याना निमाजाच्या व प्रार्थनेच्या वेळीं ज्या समाजांत मिसळणें भाग पडे त्याच्या रीतीभाती हळूहळू त्याच्या आचरणात उतरावयास लागून त्याजमधील व त्याच्या आप्तांमधील वैषम्य दिवसेंदिवस वाढत गेलें. कुशाबा उर्फ ख्रिस्तोफरसाहेब धोतर नेसावयाचें व पुणेरी जोडा घालावयाचें सोडून तंग तुमान व बूट घालूं लागले, आणि डोक्यावरील पागोटें फेंकून देऊन इंग्रजी तऱ्हेची टोपी घालूं लागले. रामभाऊ ऊर्फ रहीमखा मुसलमानी तऱ्हेची चुण्याची विजार व चढाऊ जोडा चढवून डोक्यास

## मुष्टि ३२ वी

तुर्की टोपी घालूं लागले. तिकडे पाडूतात्यानीं आपली चिलीम पेटविल्या-बरोबर इकडे रामभाऊ आपला रंगीत हुक्का व कुशाबा आपला काळा चिरूट ओढीत वडिलाच्या तोंडावर धुराचे फवारे सोडू लागले. कुशाबानीं डोईभर केंस ठेविले, तर रामभाऊंनीं आपलें सबंध डोकें भादरून घेऊन गुळगुळीत गोटा बनविलें व आपल्या मुसलमान बंधूना बालाग्रही कुरकुर करण्यास जागा ठेविली नाही. परंतु रामभाऊंनीं या सहारा वाळवंटाचा वचपा एक भली लाबलचक दाढी ठेवून काढिला, व कुशबांनीं दोन्ही मिशांची भादरपट्टी करून ओंठावरील भाग रामभाऊच्या डोक्याइतकाच गुळगुळीत व निसरडा करून सोडिला. वडील हयात असल्यामुळें आजपर्यंत त्याना स्त्रीवेषांत अभिनयकौशल्य दाखविण्याची संधि मिळाली नव्हती, ती अडचण या क्षौरविधीनें नाहींशी झाली. आता रामभाऊ आपली दाढी वेळीं अवेळीं हातानें कुरवाळून व कुशाबा आपला मिशाचा ओसाड भाग विनाकारण खाजवून इतरांचें लक्ष त्यांकडे वेधून घेऊं लागले. रामभाऊ आपली दाढी कंगव्यानें घटका घटका विंचरीत बसत, तर कुशाबा ब्रशानें केंसाचा भाग काढण्यांत तास तास खर्ची घालीत. परिचित माणसाची गाठ पडल्यास रामभाऊ बंदगी व कुशाबा हस्तांदोलन करूं लागले. रामभाऊ 'हम तुम' करून आपल्या मोडक्या उर्दूचें व कुशाबा 'यस् फ्यस्' करून आपल्या तुटक्या इंग्रजीचें आपापल्या बायकोपोरांपाशीं प्रदर्शन करू लागले. कांहीं दिवसांनीं तर त्यांची मजल याच्याही पुढें जाऊ लागली. रामराव एखाद्या कर्मठ मुसलमानाप्रमाणें रोज पांच वेळा कानात बोटें घालून खड्या सुरात निमाज पढूं लागले, व कुशाबा डोळे मिटून आपल्या पृथ्वीवरील बापादेखत आकाशांतील बापाचें थोडाच वेळ पण गभीर मुद्रेनें ध्यान करीत बसूं लागले. त्याचे धर्म परस्परापासून भिन्न जरी होते तरी रामरावाच्या धर्मांचा पूर्वेतिहास कुशाबाच्या धर्मग्रंथांतूनच आलेला असल्यामुळें व त्यांचीं धर्ममतेंही पुष्कळ अंशीं जुळत असल्यामुळें त्यांमध्यें वादाचे प्रसंग क्वचित्च येत. हिंदु धर्माशीं मात्र त्याचा उभा दावा असे. बायकांनीं कुंकू लावणें उभयतांनाही रानटीपणाचें लक्षण वाटू लागलें होतें, व ते स्वतःच्या बायकांच्या कपाळावरील सौभाग्य-चिन्हें जुलमानें पुसून टाकूं लागले. कुंकू पुसता पुसतां त्याचे हात चुकून

एखादे वेळीं गालांकडेही झुकत असत, त्यावरून त्यांचा गालावरील गोंदण्यावरही कटाक्ष असावा असें तिऱ्हाइतास वाटावयाचें, पण धर्मावेशाच्या या प्रकाराचें परक्यादेखत प्रदर्शन करण्याइतकें धर्मवेड त्याच्या अगीं नसे हें प्रांजलपणें कबूल केलें पाहिजे त्या उभयताना मूर्तिपूजेचाही सारखाच तिटकारा असे. त्या विषयावरून पितापुत्रांचे रोजच्या रोज खटके उडू लागले. तात्या पूजेला बसले म्हणजे त्याच्या स्वधर्मनिष्ठ पुत्रांनीं त्यांस मधून मधून शिवण्याचा धाक दाखवावा, व ते नैवेद्य दाखविताना डोळे मिटून देवांचे दुरून ओचकारे घ्यायला लागले, कीं त्याची नक्कल करून मोठमोठ्यानें खिदळू लागावें. धिम्या व थंड प्रकृतीचे तात्या हें सारें बहुधा निमूटपणें सहन करीत; पण तो त्रास प्रमाणाबाहेर गेला, कीं त्यांचेंही माथें भडकत असे नैवेद्य अखेर कोणत्या स्थली जाऊन पडणार आहे याची बरीचशी अटकळ त्यास आगाऊ असल्यामुळें ते निरनिराळ्या देवांचा नैवेद्य भिन्न भिन्न प्रकारचा घेऊन त्याना जरा सटळ हातानेंच अर्पण करीत असत, पण त्यानी तो देवास दाखविण्याकरिता डोळे मिटले कीं, एकदम रहीमखांनी व ख्रिस्तोफर साहेबानी त्यावर एकदिलानें हल्ला करून तो सारा अशा शिताफीनें लाबवावा, कीं तशी हिकमत तुर्क व जर्मन राष्ट्राच्या सयुक्त सैन्यानें दोस्त राष्ट्रांचा दाणागोटा पळवितानाही दाखविली नसेल. अशीं विघ्नें वारंवार येऊं लागल्यामुळें तात्यांना नैवेद्य दाखविताना दोन्ही डोळे उघडे ठेवून एक देवाकडे व दुसरा त्यांस त्रास देणाऱ्या दैत्यांकडे लावावा लागे. रामभाऊ इस्लामीसारख्या कडव्या धर्माचे असल्यामुळें त्यांना कधीं कधीं घरांतील माणसाना मासानें बाटविण्याचीही लहर येई पण त्यांनीं स्वत.च कधीं मांसभक्षण केलेलें नसल्यामुळें व हल्लीं श्राद्धास मासाऐवजी माषान्न चालतें हें त्याना पूर्वाश्रमींच्या अनुभवावरून माहीत असल्यामुळें ते एका हातीं काठी व एका हाती नुसता उडदांचा वडा घेऊन, बायकामुलांच्या मागें लागत असत त्याच्या मूर्तिद्वेषाची मजल तर एकदां मूर्तिभंजनापर्यंतही गेली. गिझनीच्या महमुदानें जशी सोमनाथावर स्वारी केली होती तशी रहिमखानींही पाहूतात्या बाहेर गेले आहेत अशी संधि साधून त्याच्या देवघरावर केली, व त्यांची आई गयावया करीत असता तिच्याकडे दुर्लक्ष करून देवाची

नासधूस चालविली त्यानीं रामपंचायतन व शिवपंचायतन भिंतीवर आपटून त्यांस खरोखरच पचत्वाप्रत पोंचविलें, भागीरथीचा चंबू सहाणेवर आदळून तिच्या पाण्यास बारा वाटा मोकळ्या करून दिल्या, लंगडा बाळकृष्ण फरशीवर आपटून दोन्ही पायानीं लंगडा केला, द्रव्यलोभांतही महमुदाचें अनुकरण करून बाळकृष्णाच्या पायातील वाळे खिशात कोंबले, नैवेद्याचें सारें भांडार फोडून त्याचा फडशा उडविला, आणि अखेरीस सर्वांवर ताण करण्याकरितांच की काय रामरक्षेच्या पोथीचीं पानें फाडून व त्याचे चुट्टे करून ते ओढण्यास सुरुवात केली. त्यांची बायको बिचारी थरथर कापत जवळच उभी होती, तिची विटंबना करण्यासही त्यानीं सोडिलें नसतें, पण तितक्यात तात्या बाहेरून आले म्हणून ती बचावली.

या अत्याचारानें इतराचीं मनें तर राहोतच, पण रामभाऊचें स्वतःचेंच मन इस्लामी धर्मास विटूं लागलें हा एक मोठा फायदा झाला त्याचें चित्त जितक्या शीघ्र व अस्वाभाविक गतीनें इस्लामी धर्माकडे वळलें होतें तितक्याच झपाट्यानें त्यानें उलट खाण्यास सुरुवात केली वरील प्रकार घडल्यानंतर लवकरच त्याला पश्चात्तापानें पूर्णपणें ग्रासिलें. रात्रीच्या वेळीं घरांत चोहोंकडे निजानीज व सामसूम झाली असता रहीमखा देवघरांत जाऊन देवाची क्षमायाचना करीत घटका घटका बसूं लागले. त्यांच्या मनास मिळालेल्या उलट गतीचे धक्के हळूहळू ख्रिस्तोफर साहेबापर्यंत पोहोंचून त्याच्या मनाचा ग्रहही वक्री होऊं लागला त्यास निद्राभ्रमणाची संवय असे. तो आता रोज रात्रीं झोंपेंत बिछान्यावरून उठून देवघरांत जाई आणि देवाची पूजाअर्चा करीत व तोंडानें मंत्र पुटपुटत बसे. याप्रमाणें दिवसा कुराणातील कलमे घडाघडा म्हणणारा रहीमखां रात्रीं रामराव बनून देवासमोर तुकारामाचे अभग प्रेमानें आळवूं लागला, व ख्रिस्ताचीं प्रार्थनागीतें गाणारा दिवसाचा ख्रिस्तोफर रात्रीं कुशाबा होऊन पवमान, सौर, रुद्र इत्यादिकांचें पठण करूं लागला पूर्व वयांतील हिंदु धर्मांचे संस्कार व सांप्रत मारून मुटकून लादलेल्या नवीन धर्मांचे संस्कार यांचा त्यांच्या मनोभूमीवर निकराचा संग्राम सुरू होऊन त्याची ' इरहर न हिंदुर्न यवनः ' अशी केविलवाणी व अर्धवट स्थिति झाली. त्यांच्या स्वकीयांस त्या स्थितीचा कांहीं दिवस मुळींच मागमूस लागला नाही. पण

एके दिवशीं रात्रीं रहीमखाच्या काकडआरतीचा व ख्रिस्तोफर साहेबाच्या अभंगवाणीचा घोष अहमहमिकेनें इतका वाढला, कीं तो ऐकून सारें घर खडबडून जागें झालें. चाललेला प्रकार पाहाताच मुलाची मनःस्थिति तात्याच्या ताबडतोब लक्षांत आली. ते गृहकलास पूर्णपणें विटून गेले होते. त्याच्या मुलाचे त्याच्याशीच खटके उडत असें नाहीं, तर त्याच्या कुटुंबाशीं, त्याच्या सुनांशीं, किंबहुना त्याच्या नातवडाशींही उडत असत इतकेंच नाहीं, तर मुलाशिवाय इतराचीं परस्पराशींही भाडणें सुरू झाली होतीं रामराव व कुशाबा याच्या बायका आपापल्या नवऱ्याशीं जरी तुसडेपणानें वागत तरी परस्पराशीं बोलताना नवऱ्यांचीच कड घेत. त्याना ख्रिस्ती व मुसलमान धर्मांचीं गूढ तत्त्वें मुळींच माहित नव्हती, पण वस्त्र-प्रावरणासारख्या गौण वस्तूच त्याच्या भाडणास पुरे होत असत. राधाबाई मडमेच्या झग्याचा तर जानकीबाई मुसलमानिनीच्या चोळण्याचा पक्ष घेऊन त्यावर घटका घटका वितडवाद घालीत. आपल्या मुलाचे लाड पुरविताना रामराव त्यास लेमेनेड देत तर कुशाबा रंगारंगाचीं सरबतें देत, एवढ्या-वरूनच त्या अर्भकासही आपापल्या वडिलाचे धर्म तितक्यापुरते तरी गोड वाटावयास लागून ती त्यावरून एकमेकाशी कुरापती काढून भांडूं लागलीं होतीं. तात्याच्या पत्नीस आपले दोन्ही मुलगे सारखेच असल्यामुळें, ती स्वतः हिंदु धर्माची कट्टी अभिमानी असताहि, कधीं ख्रिस्ती धर्मांचा तर कधीं इस्लामी धर्मांचा कैवार घेत असे. याप्रमाणें तात्याचें सारें घर कलहाग्नीनें व्यापिलें असल्यामुळे त्याना आपल्या मुलांच्या मनात उदित झालेली नवी वृत्ति पाहून साहजिकच अत्यंत समाधान वाटलें. त्यानीं ताबडतोब मला व नानास बोलावून पुढील कर्तव्याची दिशा ठरविली. रामभाऊ व कुशाबा हेही आमच्या मसलतींत सामील होते हें निराळें सागण्याचें कारण नाहीं.

नतर लवकरच एके दिवशीं रामरावाच्या पोटात भयंकर शूळ उठला व त्याच सुमारास कुशाबाच्या डोक्यातही तितकीच भयकर तिडीक उत्पन्न झाली. तात्यानीं हरतऱ्हेचे इलाज करून पाहिले, पण काहीं गुण येईना. शेवटीं निदानीचे उपाय करण्याकरिता त्यांनीं काजीसाहेबास व पाद्रीसाहेबास बोलावून आणिलें. ते लगबगीनें येऊन पाहातात, तों रामराव भुईवर

गडबडा लोळत आहे व कुशाबा भिंतीवर तडातड डोकें आपटून घेत आहे असें त्यास दिसून आलें त्यानी आपल्या रोग्याचें पोट व कपाळच नव्हे, तर इतरही भाग बारकाईनें तपासून पाहिले, पण त्यांना कोठेंच रोगाचे उगम सापडेनात इकडे रोग्याची तळमळ वाढतच चालली मधून मधून रामराव पैगबरांच्या व कुशाबा येशूख्रिस्ताच्या नावाचा घोष करून धावा करीत पण त्यानें शूळ थाबण्याऐवजीं विकोपासच जातो हें पाहून त्यांनी तो नाद सोडून दिला. शेवटीं त्यांना तात्पुरता तरी आराम वाटावा म्हणून त्या ख्रिस्ती व युनानी अश्विनीकुमारानी परत घरीं जाऊन गुर्गीची औषधें पाठवून दिलीं ती मात्र इतकी गुणकारी ठरली, कीं ती येण्यापूर्वीच किंबहुना अश्विनीकुमाराच्या पाठी फिरतात न फिरतात तोंच रोगी आपापल्या अंथरुणावर स्वस्थ पडून घोरूंही लागले मात्र दुसरेच दिवशी काजीसाहेब व पाद्रीसाहेब रोग्याच्या खोलींत प्रवेश करितात तों त्यास ते गुरासारखे ओरडत असलेले दिसून आले. जवळ त्याचा पुत्रवत्सल पिता उभाच होता तो कळवळून म्हणाला, ‘ हा खास याच्या बाटण्याचाच परिणाम आहे. मी याना मुदतीच्या तापातून वाचवायला गेलों आणि याच्या मागें जन्माचा ताप लावून दिला मला आता एखाद्या हिंदु देवाला नवस करणें भाग आहे देवा नारायणा! जर तूं माझ्या या लाडक्याना बरें केलेंस तर मी याना परत आपल्या धर्मात यावयास लावीन.’ इतके शब्द तात्याच्या तोंडातून बाहेर पडले मात्र, लागलीच रामराव व कुशाबा हंसत हंसत बिछान्यावरून उठून उभे राहिले व त्या परधर्मीयांदेखत वडिलांच्या पायां पडून सद्गदित कंठाने म्हणाले, ‘बाबा, आज तुम्ही आमच्या शरीरांचेंच केवळ नाहीं तर आत्म्याचेंहि रक्षण केलें आहे आपल्या धर्माच्या जिवंतपणाचा केवढा हा साक्षात्कार! ’ रोग कारणाशिवाय होणें व उपाया-शिवाय जाणें हा साक्षात्कार खराच! तो पाहून पाद्रीसाहेब व काजीसाहेब जे तेथून निसटले ते पुन्हां म्हणून त्या घरीं आले नाहीत

एकाच कुटुंबांतील भिन्न मनुष्यानी भिन्न धर्मांचा स्वीकार केल्याचें हें जसें उदाहरण आमच्या गावात घडून आलें तसें त्याच्या उलटही घडून आलें आहे. औरंगजेब बादशहा महाराष्ट्र जिंकण्याचा चंग बांधून दक्षिणेंत आला तेव्हां त्याजबरोबर द्रव्यप्राप्तीच्या आशेनें उत्तरेकडील अनेक

जातींचे लोक आले व त्यापैकीं काहीं इकडे स्थायिक होऊन बसले यापैकीच आगरवाले लोक होत पूर्वी आग्र्याजवळ रहात असल्यामुळें त्यांना तें नाव मिळाले असावें. या जातीची वसाहत इकडे लहानशीच असल्यामुळे व तिच्यात पुरुषापेक्षा स्त्रियाचें प्रमाण कमी असल्यामुळें पुरुषाची लग्ने होण्यास फार पचाईत पडते. ब्राह्मण, प्रभु वगैरे ज्ञातींत वधूपक्षास जसा वरपक्षाच्या चरणीं जबर हुडा ओतावा लागतो तसा आगरवाल्यात वरपक्षास वधूपक्षाच्या पायी ओतावा लागतो कधी कधी तर वराना विवाह-होमाबरोबर सर्वस्वाची होळीही उरकून घ्यावी लागते या जातीचे जे थोडे लोक आमच्या गावात वस्ती करून होते त्यात दुर्गादास व देवीदास हे दोन सखे बधु होते. दोघेही अविवाहित होते. वडील भाऊ दुर्गादास हा जात्या सुस्त व थड प्रकृतीचा होता देवीदास त्याच्या उलट स्वभाचा म्हणजे उद्योगी व उतावळा होता दुर्गादास स्वत च्या लग्नाविषयी बेफिकीर असल्यामुळें व वडील भावाच्या पूर्वी धाकट्या भावाचें लग्न होणें जनरूढीस विरुद्ध असल्यामुळें देवीदासालाच दुर्गादासाच्या लग्नाची खटपट करणे भाग पडलें व तो त्या खटपटीस मनापासून लागला त्यास बायको दुसऱ्याकरिता पाहावयाची होती म्हणून म्हणा किंवा स्वत-च्या वडील भावजयीकडे पुत्राच्या दृष्टीनें पाहाता यावे असा त्याचा उच्च हेतु होता म्हणून म्हणा, त्याची रंग, रूप, बाधा या बाह्य व क्षणभगुर गुणावर मुळीच दृष्टि नव्हती ·याची नजर नुसत्या स्त्रीत्व ह्या आतर व टिकाऊ गुणावरच खिळलेली होती त्या स्त्रीत्वाची कुरूपपणा, अधळेपणा, पांगळेपणा, अशासारख्या शारीरिक व्यग्याशीं किंवा वेडसरपणा, दुष्टपणा, क्रव्यादपणा यासारख्या मानसिक दोषाशी सागड असली तरी त्याची त्याला पर्वा नव्हती. केवळ स्वतःच्या लग्नाची पूर्वतयारी म्हणूनच त्याला आपल्या भावी भावजयीची किंमत वाटत होती. तरीही तिच्यासाठीं तो हजारों रुपयावर पाणी सोडण्यास तयार होता अखेरीस त्याच्या त्या नि·स्वार्थीपणावर लुब्ध होऊन एका कुरूप, खुज्या, लगड्या व कजाग मुलीचा बाप पांच हजार रुपयाच्या मोबदल्यात आपली मुलगी दुर्गादासास अर्पण करण्यास तयार झाला. लवकरच एका सुमुहूर्तावर उभयताचा विवाह झाला, व लागलीच देवीदासाची स्ववधूसंशोधनाची

# मुष्टि ३२ वी

रूपादि बाह्यगुणांवरच आवड दिसून आली देवीदास स्वतः गोऱ्यात जमा नव्हता, पण एक वधू गोरीपान नसून निमगोरी आहे याच सबबीवर त्यानें नाकारली मग तो काचनभटाच्या. 'सावळा वर बरा गौर वधुला' या मताचा कट्टा पुरस्कर्ता असल्यास न कळे! तो स्वत. चागलाच काणा होता, पण एका वधूचा डोळा किंचित् तिरपा दिसताच त्याकडे थोडाही कानडोळा करण्याचें औदार्य त्याने दाखविलें नाहीं तो स्वतः पाप्याचा पितर असता आणि एक त्याच्याइतकीच रोड व अगदीं अनुरूप वधू पाचसात हजाराच्या आत मिळण्यासारखी असता त्यानें तिच्यावर पाणी सोडले 'स्थूल न कृशहि न' अशी एखादी वधू मिळाल्यास ती नेहमीं तशीच राहील अशी हमी घेण्यास तिचा बाप तयार नसल्यामुळे तीही त्यास पसत नसे. आधींच आगरवाल्यात मुलींची सख्या थोडी, आणि तशात असा चोखंदळ वर, मग काय विचारावयाचे आहे? सशोधनाची प्रत्येक मोहीम देवीदासानें मोठ्या आशेनें शिरावर घ्यावी, पण शेवटी हात हालवीत परत यावें. इकडे दुर्गादासाचा ससार चागला थाटून त्यास संततीचें सुखहि विपुल मिळूं लागलें. ज्या मुली देवीदासानें नापसत ठरविल्या होत्या त्या पणात येऊन मोहक दिसू लागल्या, व त्याना नाकारल्याचा त्यास पश्चात्ताप होऊं लागला पण त्याचा काहीं उपयोग नव्हता, कारण त्याची लग्नें होऊन त्यापैकीं काहींना मुलेंही झालीं होती. देवीदास मात्र अजून नवरामुलगाच होता. त्याचें वय वाढूं लागलें तशी त्याच्या विवाहात वयाची एक नवीनच अडचण उपस्थित झाली. येवढ्या मोठ्या घोडनवऱ्यास आपली कोंवळी मुलगी देण्याची हिंमत घाडसी म्हणविणाऱ्या बापासही होईनाशी झाली. त्याच्या वयास अडतिसावें वर्ष लागले तेव्हा त्यानें दक्षिण सोडून मराठ्याप्रमाणें उत्तर हिंदुस्थानावर स्वारी सुरू केली. पण त्याला मराठ्याच्या शताशही यश मिळण्याचें चिन्ह दिसेना. दक्षिणेंत त्याची मोहीम प्रतिवर्षी होत असल्यामुळें तो बिजवर नसून प्रथम वरच आहे व त्याची असमाधानी वृत्तीच त्याच्या अविवाहितपणाचें कारण आहे हें इकडील सर्व आगरवाल्यास माहीत झालें होतें. पण उत्तरेकडील ही त्याची पहिली स्वारी असल्यामुळें तिकडील लोकांस हा जून दिसणारा

बाप्या कोरा करकरीत नवरा मुलगा आहे ही गोष्टच पटण्याचा फारसा संभव नव्हता एकाही लग्नाचें सुख मिळण्यापूर्वीच बिजवर किंवा तिजवर असल्याचा त्याजवर आळ येणें अपरिहार्य होतें बरें, त्याचा अविवाहितपणा नकली नसून अस्सल आहे अशी खात्री पटली तरी इतके दिवस लग्न न होण्याच्या कारणाबद्दल हव्या तशा नसत्या शंका निघण्याची फार भीति होती म्हणून त्यानें या खेपेस आपण होऊन बिजवर तिजवर असल्याचाच नव्हे, तर आपल्या वयास शोभण्यासारखा पुरा चतुर्थ-वर असल्याचा बहाणा सुरू केला पण ही शक्कलच त्याच्या गळ्यात आली. बायका गिळंकृत करणाऱ्या या दक्षिणेकडील राक्षसाच्या भक्ष्यस्थानीं मुलगी देण्यास तिकडचा एकही बाप तयार होईना. फाजील अविवाहितपणा जसा त्याला नडला होता तसा हा फाजील विवाहितपणाही नडू लागला. तो वधू पहाण्यास येणार अशी आगाऊ सूचना मिळताच वधूचे बाप घरास कुलूपे ठोकून स्थलांतर करू लागले, व त्यानें त्याजवर अचानक छापा घातल्यास ‘मला मुलगी कधींच झाली नाहीं, झाली असल्यास ती जन्मताच मरण पावली, मेली नसल्यास तिचें लग्नाचें वयच झालेलें नाहीं, वय झालें असल्यास तिचें लग्न यापूर्वीच झालें आहे, लग्न झालें नसल्यास तिचा आमरण कौमार्यावस्थेंतच रहाण्याचा निश्चय झाला आहे’ अशा हट्टी प्रतिवादीस शोभण्यासारख्या व एकाहून एक सरस सबबी दाखवूं लागले उत्तर हिंदुस्थानातील लागोपाठ दोन मोहिमा व्यर्थ गेल्या, तेव्हा देवीदासाच्या मनाची स्थिरता डळमळू लागली गेल्या वीस वर्षात सारें जग झपाट्यानें पुढें गेलें असतां तो मात्र ध्रुवताऱ्याप्रमाणें अचल राहिला होता त्याच्या भावास आता नातू झाला असून त्याचें बारसें नुक्तेंच थाटानें झालें होतें तो स्वतः मात्र अजून कोंवळा मुंजाच होता. त्यानें अजून एकही पुरुषार्थ साधिला नव्हता सहधर्मचारिणीचाच पत्ता नव्हता, तर धर्म कसा साधणार! त्याच्या वीस वर्षांच्या उद्योगाने त्याचा अर्थ वाढण्याऐवजी घटला मात्र होता तारुण्याचा बहर निघून गेल्यामुळें खऱ्या कामसुखास तो अंचवलाच होता. आणखी काहीं वर्षे गेल्यावर त्यास मोक्ष मिळण्याचा मात्र संभव होता. पण त्या अर्थाच्या मोक्षासाठीं तो फारसा हपापलेला नव्हता. तो अगदीं कातावून गेला. लग्नाच्या चिंतेनें त्याच्या डोक्यावरील केंस भराभर

पांढरे होऊं लागले व कपाळास सुरकुत्या पडूं लागल्या त्यानें अनेक वर्तमान-पत्रांतून आपल्या जातभाईंस इशारतवजा नोटीस दिली, कीं 'आणखी एका वर्षांत जर मला नवरी मिळाली नाहीं तर मी धर्मांतर करीन.' ही नोटीस कोरडी धमकी नसून अंतःकरणपूर्वक आहे असें भासविण्याकरिता तो रोज नेमानें मिशनमध्ये जाऊं लागला पाद्रीसाहेब एखादें नवें सावज गाठण्याकरिता टपले होतेच. त्यानीं आपल्या धर्मशास्त्रातून अनेक दाखले काढून ख्रिस्ती धर्मावाचून मनुष्याला तरणोपाय नाही असें त्याच्या गळीं उतरविण्याचा नेटानें प्रयत्न चालविला. त्याचा कोटिक्रम चालू असता देवीदासाचे डोळे जरी त्याच्या चेहेऱ्याकडे लागलेले दिसत तरी त्याचें सारें लक्ष्य मिशनमधील अविवाहित मुलींकडे लागलेलें असे कुमारिकाचा येवढा मोठा ताडा पाहून ख्रिस्ती धर्म हिंदु धर्मापेक्षा खरोखरच श्रेष्ठ आहे अशी त्याची खात्री होऊं लागली. पाद्रीसाहेबास आपल्या वक्तृत्वाबद्दल धन्यता वाटू लागली पण त्यानीं सहा महिन्याच्या उपदेशानतर देवीदासाची परीक्षा घेण्याकरिता त्यास आदम व ईव्ह याचा परस्परसबंध विचारिला असतां तर त्यानें ईव्हला आदमचा आजोबा बनवायला कमी केलें नसतें. त्यास वास्तविक आकाशातील बापाची तहान लागली नसून पृथ्वीवरील बायकोची लागली होती ही गोष्ट पाद्रीसाहेबाच्या लक्ष्यात देवीदासाच्या नोटिशीची मुदत पुरी होण्याच्या सुमारासच आली. झालें, त्यानीं त्या दिशेनें आपलें सुकाणू फिरविलें मिशनमधील एखादी मुलगी व ख्रिस्ती धर्म हीं देवीदासाच्या गळ्यात एकदमच अडकविण्याचा त्यानीं विचार केला तसें करण्यावाचून मुळीं गत्यंतरच नव्हतें कारण ख्रिस्ती धर्माशिवाय नुसत्या मुलीचेंच दान करण्यास पाद्रीसाहेब तयार नव्हते; व मुलीशिवाय नुस्ता ख्रिस्ती धर्म स्वीकारण्यास देवीदास तयार नव्हता. मुलगी मिळाल्यास तो ख्रिस्ती धर्मच काय, पण आफ्रिकेंतील काळ्या हॉटेंटॉट लोकांचा किंवा अमेरिकेंतील तांबड्या इंडियनांचा धर्मही पत्करण्यास एका पायावर तयार होता. खुद्द मुलींचीं मतें घेतां त्यांची देवीदासला नवरा म्हणून पत्करण्याची पूर्ण नाखुषी दिसून आली. दोघी चौघी फटकळ मुलींनीं तर या थेरड्या माकडाशीं लग्न करण्यापेक्षां आम्ही सैतानाशीं लग्न करूं असें स्पष्ट बोलून दाखविलें. आपण म्हातारपणाच्या इतके जवळ असून

कुरूपही आहोंत अशी बिचाऱ्या देवीदासाची कल्पना नसल्यामुळें त्याच्या मनास या स्पष्टोक्तीने बराच धक्का बसला. अनेक वर्षांच्या निराशेनें त्याची सौंदर्यविषयक महत्त्वाकांक्षा बरीच खिळखिळी झाली होती, ती या धक्याने जमीनदोस्त झाली रतीबद्दलही शंकेखोरपणा दाखविणारा देवीदास आता अष्टावक्रेशींही लग्न करण्यास तयार झाला असता. पण आता त्याच्या पसतीचा प्रश्न उरला नव्हता, आणि एका आधळ्या मुली-शिवाय दुसरी एकही मुलगी त्याच्या कुरूपपणावर पाघरूण व त्याला माळ घालण्यास तयार नव्हती, व त्या आधळ्या मुलीचा देवीदासास उतार वयात काठीदाखल मुळीच उपयोग होण्यासारखा नसल्यामुळे तिच्या अध प्रेमावर त्याला पाणी सोडावे लागले. अखेरीस एक त्याच्यापेक्षाही काळी व कुरुप मुलगी धाकदपटशाने त्याच्याशी चतुर्भुज होण्यास तयार झाली. लवकरच नवा धर्म व सहधर्मचारिणी याचा देवीदासाने एकाच मुहूर्तावर अगिकार केला त्याचे ख्रिस्ती धर्मातले नाव डेव्हिड हें ठेवण्यात आले. त्याच्या बायकोचें नाव मेरी हें होतें

डेव्हिड साहेबास विवाहसुखाचा हा पहिलाच अनुभव असल्यामुळे त्यास ते स्वर्गसुखापेक्षाही अधिक वाटावे यात नवल नाही. मेरीमध्ये जरी त्यानी पूर्वी पाहिलेल्या शेकडों वधूमधील व्यंगे एकवटलेली होतीं तरी त्याच कारणामुळें त्याना त्या सर्व वधूशीं विवाह केल्यासारखे वाटून त्या मानानें सुखही शतपट होऊ लागलें त्यानी तिच्या समागमात काहीं वर्षे फार आनदात घालविली. नवऱ्याचें आपणावरील अकृत्रिम प्रेम पाहून मेरीचेंही त्याजवर तसेंच प्रेम जडलें. पण त्या दापत्याच्या सुखामृतांतही एक मिठाचा खडा होताच, व तो त्यास दिवसेंदिवस अधिकाधिक अस्वस्थ करू लागला. लग्नास जरी बरेच दिवस होऊन गेले तरी मेरीस दिवस जाण्याचें चिन्ह दिसेना. डेव्हिड साहेबाच्या मनात उतारवयास अनुरूप अशी पुत्रसुखेच्छा उद्भवून सपाट्याने वाढीस लागली होती. त्यांनी बाह्यात्कारी सेंट पॉल, ग्रेगरी, ॲंटनी, निकोलस वगैरे सर्व ख्रिस्ती साधूंस व अंतर्यामीं म्हसोबा, रोकडोबा, सोयरोबा, बहिरोबा इत्यादि यच्चावत हिंदु देवांस परोपरीचे नवस केले; पण त्यानीं मेरीचें वाझपण दूर होण्याचें लक्षण दिसेना. बरें, पुत्रप्राप्तीकरिता दुसरी बायको करावी तर धर्मांतरानें

तीही सोय नाहीशी झाली होती. एक पत्नी असता दुसरी केल्यास बिनभाड्याच्या घरात रवानगी होण्याचा फार संभव, व स्वतःचे सत्तेचें घर असता फुकटाफुकटी सरकारचा पाहुणा होऊन राहणे कोणता स्वाभिमानी पुरुष पत्करील? सुदैवानें या संधीस त्याची काजीसाहेबाशी गाठ पडली, व इस्लामी धर्मात एकदम चार चार बायका करण्याचीही व त्या नकोशा झाल्यास त्याच्याशी घटस्फोट करून मोकळें होण्याचीही सोय आहे, असें त्यास कळलें. अहाहा! मुसलमानी धर्म किती तरी श्रेष्ठ आहे! त्याची श्रेष्ठता अगोदर कळली असती तर या भिकारड्या ख्रिस्ती धर्माकडे ढुंकूनही पहाण्याची आपणास मुळीच बुद्धि झाली नसती जो धर्म एकाच बायकोशी लग्न करण्याची परवानगी देतो तो भिकारडाच, नाही तर काय? मुसलमानी धर्म खास त्याच्या चौपटीने श्रेष्ठ आहे. हिंदु धर्मात बायकांच्या सख्येस काहीच मर्यादा नसल्यामुळे तो धर्म इस्लामी धर्मापेक्षा श्रेष्ठ आहे पण तो धर्म एकदा अव्हेरिला असल्यामुळें त्याचा पुन स्वीकार करणें शक्य असलें तरी उच्छिष्टभक्षणासारखेंच होईल शिवाय आपण पुन्हा हिंदु झालों तरी आपला प्रवेश अगरवाल्याच्या जातीतच व्हायचा, व हिंदु धर्माचें खरे उज्वल स्वरूप त्या जातीच्या मुळीच वाट्यास आलेले नाहीं. याप्रमाणें साधक बाधक प्रमाणाचा पोक्त विचार करून डेव्हिड साहेबानीं ख्रिस्ती व हिंदु धर्माच्या मधील इस्लामी धर्माचा मार्गच चोखळण्याचा विचार कायम केला पण आपल्या धर्मपत्नीच्या पत्तीस आणखीही एखादी दुसरी धर्मपत्नी आणून बसविण्याचा विचार तिला कळल्यास ती त्याला खो घालील असें भय वाटून त्यानी तो विचार सावधगिरीनें तिजपासून लपवून ठेविला व तिला आपल्या बेतास कपाटानेंच अनुकूल करून घेण्याचा संकल्प केला. लवकरच मेरीस आपला नवरा आपल्या पारमार्थिक कल्याणाबद्दल अस्वस्थ असलेला दिसून आला तो तिला म्हणू लागला, 'मेरी, या ख्रिस्ती धर्मात काहीं जीव नाहीसे मला अलिकडे वाटूं लागलें आहे. जर ख्रिस्ताच्या अंगी आपलें तारण करण्याचें सामर्थ्य असतें तर तो स्वतःच कां सुळीं गेला असता? त्यापेक्षा महंमद पैगंबर किती तरी श्रेष्ठ! प्राण गेला असता तरी तो सुळीं गेला नसता. स्वतः न मरता दुसऱ्याला मारणें हें त्याचें ब्रीद होतें. त्याच्या अनुयायांनीं इतर धर्मातील लोकांची कत्तल व गांजणूक

केली असेल, पण एका गालावर चापट बसली असतां दुसरा गाल पुढें करण्याचा नेभळटपणा मात्र कधींच दाखविला नाही त्याचा धर्म वणव्याप्रमाणें थोड्याच काळात तीन खंडात पसरला, तो उगीच नाही मला अलीकडे मुसलमानी धर्माचा स्वीकार करावासा वाटू लागला आहे. पण तो केल्यास तुझ्या सुखकर संगीताला मुकावें लागेल, व तसे होण्यापेक्षां सदैव नरकांत होरपळत पडावें लागलें तरी मला पत्करेल.' पतीचें आपल्यावरील निःसीम प्रेम पाहून बिचारी मेरी सद्गदित झाली ती म्हणाली, 'तुम्ही जसे मूळचे हिंदु, तशी मीहि हिंदूच आहें, व पतीला देवाप्रमाणे भजणें हें तर हिंदु स्त्रीचें आदि कर्तव्य आहे तुम्ही ख्रिस्ती असा की मुसलमान व्हा, माझे देव तुम्हीच आहात. तुमचा जो धर्म, तोच माझाही.' पत्नीच्या तोंडच्या पडत्या फळाची आज्ञा घेऊन डेव्हिड साहेबानीं लागलीच काजीसाहेबाची भेट घेतली व त्यास सपत्नीक मुसलमान होण्याचा निश्चय कळविला त्यानतर दुसऱ्याच दिवशीं त्या दापत्यानें मशिदीत जाऊन कुराणातील कलमे उच्चारून मुसलमानी धर्माची शास्त्रोक्त दीक्षा घेतली. डेव्हिड साहेबानीं नवीन धर्मास अनुरूप असें 'दाऊदखा' हें नाव घेतलें

आतां बायकोपासून आपला कावा लपविण्याचें त्यास काहीच कारण नव्हतें 'तुझ्या नशिबीं सख्ख्या मुलाचे सुख नसलें तरी तुला सापत्न मुलाचें सुख मिळवून देण्याचे माझे प्रेमळ पति या नात्यानें पवित्र कर्तव्य आहे.' अशा गोड शब्दानी त्यानीं तिला आपला मानस कळविला तो ऐकून ती बिचारी ओक्साबोक्सीं रडू लागली व गयवया करून नवऱ्याच्या परोपरीनें विनवण्या करूं लागली. पण कर्तव्यनिष्ठुर दाऊदखा आपल्या निश्चयापासून केंसभरही ढळला नाहीं. अखेरीस त्यानें स्त्रीसुखाच्या तामस लोभानें नव्हे, तर पुत्रसुखाच्या सात्विक इच्छेनें चुन्नाबी नावाच्या एका विधवेशीं निका लावला. या गोष्टीला एक वर्ष होऊन गेलें, पण या लग्नाचेंही पूर्वीच्या लग्नापेक्षा अधिक साफल्य होण्याचा संभव दिसेना तेव्हा त्यानें मुन्नाबी नांवाच्या दुसऱ्या एका विधवेची आपल्या अंतःपुरांत भर घातली. पण त्याच्या नशिबींच नसल्यावर त्या बिचारीस तरी पुत्रप्राप्ति कशी होणार! तथापि त्यानें हातपाय गाळिले नाहींत. ज्या बहाद्दरानें आपली स्त्रीप्राप्तीची मोहीम सारखी वीस वर्षे नेटानें चालविली होती त्यानें चार वर्षांच्या अपेक्षानें

पुत्रप्राप्तीची मोहीम सोडून देणें शक्य नव्हतें. त्यानें वजीरबी नांवाच्या तिसऱ्या विधवेशीं विवाह लाविला. पण त्या योगानें त्याच्या कुटुंबाचा विस्तार रुंदीच्या दृष्टीनें जरी वाढला तरी लांबीच्या दृष्टीनें पूर्वीइतकाच आखूड राहिला त्यांत आतां स्त्रियांची जरी बरीच भर पडली होती तरी पुरुषाची भर पडण्याची आशा मुळीच दिसेना. त्याच्या वंशवृक्षाचा बुंधा जरी वाढत चालला तरी त्यास पालवी फुटण्यास सुरवात होईना. अखेरीस त्यानें तो वृक्ष खच्ची करून त्यास जोम आणण्याचा संकल्प केला. मुसलमानी कायद्यानें आखून दिलेली स्त्रीसंख्येची मर्यादा यापूर्वीच होऊन गेली होती. स्त्रीचतुष्टयाचें वैवाहिक माप आधींच कांठोकांठ भरलें होतें. पांचवें लग्न करावयाचें झाल्यास त्यास आपल्या चार अर्धांगीपैकीं एकीस अर्धचंद्र देणें जरूर होतें. हा वेळपर्यंत मेरीस आपल्या नवऱ्याचा अगदीं वीट येऊन गेला होता, व यामुळें त्याने काडी मोडण्याची गोष्ट काढतांच तिनें ती ताबडतोब कबूल केली. आपल्या पतिनिष्ठ स्त्रीचें हें अखेरचें औदार्याचें कृत्य पाहून दाऊदखास गहिंवर आला त्यानें शिळया बायकोच्या विरहदुःखाच्या व ताज्या बायकोच्या प्राप्तीसुखाच्या भरांत मेरीच्या गळ्यास मिठी मारिली. ही मिठी अर्थात्‌च शेवटची होती. कारण यानंतर लागलीच पतिपत्नीची कायदेशीर फारकत झाली. ही फारकत व दाऊदखाचा नजीरबी नांवाच्या विधवेशीं विवाह हीं एकाच दिवशीं घडून आलीं. त्या विवाहाचेंही तादृश फळ दिसून न आल्यामुळें त्यानें ‘ अरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी ’मधील शहारियर बादशहाप्रमाणें जुन्या बायकांच्या फारकतीचें व नव्या बायकांच्या लग्नाचें एक पद्धतशीर रहाटगाडगेंच सुरू केलें. ज्याप्रमाणे पोहऱ्यात पाण्याचा प्रवेश झाल्यापासून त्याची उन्नति होत जाते आणि अर्धें परिभ्रमण झाल्याबरोबर तो रिकामा व अधोमुख होऊन त्याचें अधःपतन सुरू होतें, त्याप्रमाणें दाऊदखाशीं पाणिग्रहण झाल्यापासून सहा महिनेपर्यंत त्याच्या नव्या बायकोची चलती असे, पण त्या सहामाहींत गर्भधारणेचें कांहीं एक चिन्ह दिसलें नाहीं हें लक्ष्यांत येताच ती त्याच्या मर्जीतून उतरावयास लागे व पुढील सहा महिन्यांत रसातळास जाई. प्रतिवर्षी एक घटस्फोट व एक विवाह

दिसून आल्यास त्यानें तिला दुःशब्दानीं रडवून, काठीनें बडवून व पायानीं तुडवून वठणीला आणावें त्याने मुसलमानी धर्मशास्त्रातील चार स्त्रियाचा नियम अक्षरश जरी पाळिला होता तरी तात्पर्यंत मोडून त्याचीं शकलें उडाविलीं होतीं त्याने हा वेळपर्यंत मोरोपताच्या एकशें आठ रामायणातल्याप्रमाणें आपल्या रामाऽयणात चुन्नाबी, मुन्नाबी, वजीरबी, नजीरबी असे शब्दचमत्कार जसे साधिले होते तसे यापुढेंही अनेक साविले, पण त्यानीं इष्ट अर्थ साधण्याचें मात्र चिन्ह दिसेना. हा क्रम आठदहा वर्षे चालू होता. पूर्व वयात प्रमाणाबाहेर घडलेल्या उपासाचें त्यानें या अवधींत मनसोक्त पारणें फेडून घेतलें. पण प्रत्येक गोष्टीस मर्यादा ही असतेच. या अतिरिक्त वैवाहिक सुखाचा असा परिणाम झाला, की चाळिसाव्या वर्षी तरणा बाड म्हणून मिरवणाऱ्या देवीदासाच्या दाऊदखारूपी अवतारास त्यानंतर पधरा वर्षांच्या आतच पूर्ण वार्द्धक्य आलें. त्याची गात्रें शिथिल होऊन उत्साह मद होऊ लागला. त्याचें ऐहिक सुखावरून लक्ष्य उडावयास लागून तें पारलौकिक व शाश्वत कल्याणाकडे लागूं लागलें. आपल्या मागें आपलें नांव चालविणारा योग्य वारस कोणत्या प्रकारें मिळू शकेल याची त्याला विवचना पडली त्यास चार बायका असल्यामुळें त्याची मिळकत सरकारात बेवारशी म्हणून जाण्याची भीति नव्हताच पण तेवढ्याने त्याचें समाधान होण्यासारखें नव्हतें. कारण त्याच्या वारसानीं त्याचें नाव त्याच्या मरणानतर लावविणें व त्याची मिळकत त्याच्या घरून लावविणें यात बरेच अतर होतें. हिंदु विधवा नवऱ्याच्या मागें ज्याप्रमाणें निरपेक्षपणें वैधव्यावस्थेंतच राहाते त्याप्रमाणें, त्याच्या विधवा निरपेक्षपणें किंवा त्याच्या मिळकतींतील वाट्याच्या मोबदल्यानही लग्नावाचून रहाण्याची खात्री असती तर त्याचें नाव त्याच्या औरस मुलाकडून चाललें असतें तितकेंच, किंबहुना त्याच्या चौपटीनें त्याजकडून चालण्याची त्यास आशा बाळगता आली असती कारण या बायका फलाण्या माणसाच्या विधवा आहेत असें लोकाच्या तोंडून मधून मधून निघण्याचा बराच सभव असता शिवाय याला नावें ठेवून व त्याच्या नावानें खडे फोडून त्यानीं त्याचा लौकिक त्याच्या अटकळीहून निराळ्या प्रकारानें वाढविला असता तो निराळाच. पण त्या त्याच्यामागें वैधव्या-

वस्थेंतच रहातील अशी त्याला मुळींच उमेद नव्हती. उलट पक्षीं त्याचें कलेवर चौघांच्या खाद्यावर कबरस्थानात जाऊन पडते न पडतें तोंच त्याची मिळकत त्या चौघींच्या खाद्यावर त्याच्या नवीन नवऱ्याच्या घरीं जाऊन पडण्याचीच विशेष भीति होती. त्याला इतक्या बायकातून एक जरी औरस मुलगा पैदा करिता आला असता तरी मौज झाली असती. त्या मुलाच्या, मुलाच्या मुलाच्या किंबहुना नातवाच्या हयातीपर्यंत त्याचें नाव बाप, आजोबा व पणजोबा म्हणून राहिलें असतें शिवाय विधवेचें पुनर्लग्न झाल्यावर ती जशी पहिल्या नवऱ्याचें नांव आपल्या नावामागें लावण्याचें सोडून देते तसेंही मुलाच्या, नातवाच्या व पणतवाच्या बाबतींत होणें शक्य नव्हतें. पण आता याप्रमाणें मनांत मांडे खाऊन मिटक्या मारण्यानें किंवा अशक्य गोष्टीच्या हानीबद्दल हळहळल्यानें दाऊदखास कांहींच फायदा नव्हता. तो जर हिंदु असता तर त्यास औरस मुलाची उणीव दत्तक मुलाकडून भरून काढिता आली असती. मुसलमानी किंवा ख्रिस्ती धर्मशास्त्रांत मात्र ती सोय मुळीच नव्हती. ही विचारपरंपरा मनांत घोळूं लागताच दाऊदखाची दृष्टी हिंदु धर्माकडे आशाळभूतपणाने पाहू लागली ज्यानें अवघ्या पधरा वर्षांत दोनदा धर्मांतर करून स्वत:चे नांव वदललें त्यास तें नाव आपल्या वंशजानी अविच्छिन्नपणें चालवावें अशी अपेक्षा करण्याचा, वास्तविक पाहाता, काहींच हक्क नव्हता. पण उलट दाऊदखाच्या तर्फेने असेंही म्हणता येईल कीं, ज्यानें तारुण्यात स्त्रीप्राप्तीकरिता ख्रिस्ती धर्माचा व प्रौढ दशेंत औरसपुत्रप्राप्तीकरिता इस्लामी धर्माचा स्वीकार केला त्यानें वृद्धपणीं दत्तकपुत्रप्राप्तीकरिता हिंदु धर्मात प्रवेश करण्याची इच्छा धरावी यात, त्याच्या विसगतपणाशीं विसंगत असें काहीच नव्हतें. दाऊदखाचें दुर्गादासाशी अजून चागलें सख्य होतें. हिंदुस्थानातील हिंदु मुसलमान आपणास एकाच मातृभूमीचे पुत्र म्हणवून परस्परावर प्रेम करीत असतील, पण एकाच मातेचे पुत्र म्हणवून एकमेकांवर सख्या भावंडाप्रमाणें प्रेम करणारे दुर्गादास व दाऊदखा यासारखे आदर्शभूत हिंदु मुसलमान या एकीच्या काळातही विरळाच सांपडतील. दाऊदखानें दुर्गादासाचा मधल्यापैकीं एक मुलगा दत्तक घेण्याची गोष्ट काढतांच दुर्गादासानें तिला आपली मान्यता दिली. आतां

दाऊदखांचें रूपांतर करण्याचेंच काय तें बाकी राहिलें होतें. अलीकडे मुंबईत हिंदुधर्मप्रसारक संस्था निघाली असून ती पतितपरावर्तन सुलभतेनें घडवून आणिते अशी बातमी पूर्वी एकदा दाऊदखांच्या कानावर उडत उडत आली होती, ती चौकशीअतीं खरी ठरली. त्याच्या स्त्रिया मूर्तिपूजकाचा धर्म स्वीकारण्यास कबूल नसल्यामुळें त्याने त्याच्यापासून रीतसर फारकती करून घेतल्या व ताबडतोब मुबईस जाऊन हिंदु धर्मात पुनरागमन केलें. हल्ली तो व त्याचा दत्तक पुत्र दुर्गादासाच्या व त्याच्या परिवाराच्या संगतींत आनंदानें कालक्रमण करीत आहेत प्रिय वाचकहो, आपणही त्या आनंदाचे वाटेकरी व्हावें येवढीच या गरीब सुदाम्याची इच्छा आहे

---